# बाबा पद्मनजी

## काल व कर्तृत्व

डॉ. के. सी. कऱ्हाडकर



# बाबा पद्मनजी : काळ व कर्तृत्व

डॉ. केशव सीताराम कऱ्हाडकर




१९७९

# अनुक्रमणिका

## निवेदन

मराठी भाषा व साहित्य यांचा सर्वांगिण विकास करून त्यांना समृद्ध करणे व साहित्य, इतिहास व कला या क्षेत्रांतील महाराष्ट्राचा थोर वारसा जतन करणे हे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे उद्दिष्ट आहे. ज्यांच्या साहित्यकृतींमुळे मराठी इतिहास, संस्कृती व वाङमय यामध्ये फार मोलाची भर पडली आहे, अशा प्रख्यात साहित्यिकांची एकोणिसाव्या शतकातील व विसाव्या शतकातील पहिल्या जागतिक युद्धाच्या काळापर्यंतची मराठी साहित्यात झालेली उच्च वाङमयीन, साहित्यिक व सांस्कृतिक मूल्ये असलेली पुस्तके व त्या वेळचे साहित्यिक याविषयींचे ज्ञान मराठी वाचकास उपलब्ध व्हावे म्हणून त्यांचे साहित्य प्रकाशित करावयाचे धोरण महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने ठरविले आहे. अशा-तऱ्हेचे साहित्य मंडळ एकतर स्वतः प्रकाशित करते अथवा खाजगी प्रकाशक व साहित्यिक संस्था यांनी प्रकाशित करावयाचे ठरविले तर मंडळ त्यांना अनुदान देण्याचा विचार करते.

२. मराठी साहित्यिक तसेच साहित्य यांची शैली कालपरत्वे बदलत व विकसित होत गेली आहे. कविता, कथा, लघुकथा यांचा आशय व आकृतिबंध कालाप्रमाणे बदलत गेला आहे. वर्णनात्मक बदल फार मोठ्या प्रमाणात दिसून येतात. वैचारिक निबंध व प्रबंध यांच्यातील ध्येयवाद व तत्त्वप्रतिपादन यामध्ये नवीन भर पडली आहे. तसेच जीवनमूल्ये व सामाजिक परिस्थितीतील बदलही प्रकर्षाने जाणवत आहेत. निरनिराळ्या काळातील साहित्यिकांचा त्या त्या वेळच्या परिस्थित्यनुरुप आपल्या साहित्यावर ठसा उमटलेला दिसून येतो.

३. मंडळाने हा हेतू साध्य करण्यासाठी विष्णुशास्त्री चिपळुणकरांची *निबंधमाला* नागपूर विद्यापीठाचे माजी कुलगुरु व मंडळाचे माजी सदस्य, डॉ. वि. भि. कोलते यांजकडे संपादनासाठी सोपविली आहे. लोकमान्य टिळकांच्या *केसरी*तील निवडक लेखांचा संग्रह इंग्रजी व मराठीत संपादन तयार करण्याचे आणि कै. गोपाळ गणेश आगरकरांचे *केसरी*तील व *सुधारका*तील निवडक व दुर्मिळ लेखांचे संपादनाचे काम मंडळातर्फे चालू आहे. लोक-हितवादी गोपाळराव हरी देशमुख यांच्या समग्र वाङमयाचे संपादन झाले आहे. कै. राजाराम-शास्त्री भागवत यांचे *विविधज्ञान विस्तार, सुबोध पत्रिका, हिंदुधर्मविवेचक, दिनबंधु,*

इत्यादी नियतकालिकात प्रसिद्ध झालेले व आज सहजपणे उपलब्ध नसलेले निवडक व महत्त्वपूर्ण निबंधांचे संपादन कार्य मंडळातर्फे चालू आहे. सिस्टर जेराल्डिन यांनी संकलित केलेला *The Letters and Correspondence of Pandita Ramabai* हा १८८३ ते १९१७ या काळातील आंतरराष्ट्रीय महत्त्वाचा पत्रव्यवहार मंडळाने इंग्रजी भाषेत प्रकाशित केला असून त्याच्या मराठी अनुवादाचे काम प्रा. सौ. सरोजिनी वैद्य यांजकडे सोपविले आहे. मंडळाच्या या योजनेत आजवर *महात्मा फुले समग्र वाङ्मय*, *धर्मरहस्य* या ग्रंथांच्या द्वितीयावृत्ती प्रसिद्ध झाल्या आहेत *महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग* या ग्रंथाचे प्रकाशनही झाले आहे. तसेच *सेनापती बापट समग्र वाङ्मय*, कै. आचार्य धर्मानंद कोसंबी लिखित *बुद्धलीलासारसंग्रह*, *जातककथा भाग १, २ व ३*, *बुद्ध धर्म आणि संघ-बुद्ध संघाचा परिचय*, *समाधीमार्ग* इत्यादी ग्रंथांच्या पुनर्मुद्रित आवृत्त्या लवकरच प्रकाशित होत आहेत.

४. महाराष्ट्रात आजवर अनेक साहित्यिक झाले. परंतु काही अपरिहार्य कारणामुळे सर्वच साहित्यिक प्रकाशात येऊ शकले नाहीत. काही साहित्यिक प्रसिद्धीपराङ्मुखतेमुळे तर काही साहित्यबाह्य परिस्थितीमुळे प्रसिद्धीच्या झोतात येऊ शकले नाहीत. बाबा पदमनजी हे असेच १९व्या शतकातील एक अप्रकाशित साहित्यिक होत. विद्यार्थीदशेपासूनच त्यांनी आपल्या लिखाणास सुरवात केली होती. सन १८५१ पूर्वी लिहिलेल्या दोन पुस्तकांपैकी *स्त्री विद्याभ्यास* या त्यांच्या पुस्तकास बक्षिसही मिळाले होते. सन १८५१ ते १९०४ पर्यंत त्यांचे लेखन अव्याहतपणे चालू होते. त्यांनी निरनिराळ्या विषयांवर शंभरावर पुस्तके लिहिली आहेत. निबंध, कादंबरी, कोशवाङ्मय, शिक्षण, चरित्र, आत्मचरित्र, धर्मप्रसार तसेच नियतकालिके वगैरे अनेक क्षेत्रात त्यांनी उल्लेखनीय कामगिरी केली असली तरी आजवर त्यांचे साहित्य दुर्लक्षितच होते. प्रस्तुत लेखक डॉ. के. सी. कऱ्हाडकर यांनी तर त्यांचे 'पहिले मराठी कादंबरीकार,' 'मराठी-ख्रिस्ती वाङ्मयाचे जनक' असे वर्णन केले आहे व त्यांचे योग्य मूल्यमापन केले आहे. हे सर्व लक्षात घेऊन मंडळाने अपवाद करून या ग्रंथाचे प्रकाशन मंडळाच्या वतीने करण्याचे ठरविले. डॉ. कऱ्हाडकर यांनी परिश्रम घेऊन सर्व उपलब्ध संदर्भ साहित्य मिळवून व बारकाईने पाहून बाबांच्या चतुरस्र लेखणीचे दर्शन मूळ लेखनातील सुलभता व रसाळ शैली कायम ठेऊन या पुस्तकात घडविले आहे. विशेष म्हणजे यापूर्वी पूर्णपणे दुर्लक्षिलेला हा विषय त्यांनी सामान्य वाचकाला सहज समजावा इतक्या सुबोध व सोप्या भाषेत लिहिण्याची कामगिरी जबाबदारीने पार पाडली आहे. पुस्तकाच्या मुद्रणप्रतीचे संपादन श्री. बापूराव नाईक यांच्यावर सोपविले होते. याच पुस्तकात बाबा पदमनजींनी १८६० साली प्रसिद्ध केलेला *शब्दरत्नावली* हा मराठीतील पहिला समशब्दकोश पुनर्मुद्रीत केला आहे. हे पुस्तक *बाबा पदमनजी : काल व कर्तृत्व* या नावाने प्रसिद्ध करण्यास मंडळास आनंद होत आहे.

वाई, १ जानेवारी, १९७९
११ पौष, शके १९००

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

# प्रस्तावना

विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात एकोणिसाव्या शतकाचा सर्वांगाने अभ्यास करण्याची आपल्याला गरज भासू लागली आहे, ही ज्ञानक्षेत्राच्या दृष्टीने मोठी अर्थपूर्ण घटना आहे. एकोणिसाव्या शतकातील घडामोडींकडे मुद्दाम पुन्हा पुन्हा मागे वळून पाहावे, त्यातल्या व्यक्तींच्या हालचालींतून त्या काळाच्या प्रेरणा लक्षात घ्याव्या आणि त्यांच्या संदर्भात गत शतकातील आपल्या सांस्कृतिक जीवनाचा वेध घेऊन विसाव्या शतकाच्या संदर्भात त्याचे मूल्यमापन करण्याच्या कार्यात अनेक अभ्यासक आज प्रयत्नशील आहेत. त्यासाठी मोठ्या प्रमाणात दुर्मिळ साधनांची जमवाजमव करण्याची धडपड चालू आहे, त्या साधनांच्या अंतरंगात शिरून त्यामुळे हा कालखंड कितपत बोलका करता येईल, हे पाहिले जात आहे. असा प्रयत्न करणे आज या अभ्यासकांना अत्यावश्यक वाटू लागले आहे. या प्रयत्नांमुळे त्या काळातील व्यक्तींचे, त्यांच्या कार्याचे आणि त्याचा त्या काळावर झालेल्या परिणामाचे एक वेगळेच परंतु सम्यक्‌चित्र आता दिसू लागले आहे. काही मानदंडांच्या सावलीत उभे राहून केलेल्या विकारग्रस्त मूल्यमापनाच्या मर्यादा आता लक्षात येऊ लागल्या आहेत आणि त्यामुळे उत्पन्न झालेल्या आणि स्थिरावलेल्या कित्येक समजुती आता वितळू लागल्या आहेत. अशा प्रकारच्या आजच्या प्रयत्नात डॉ. कऱ्हाडकरांनी केलेल्या 'बाबा पदमनजीं'च्या या अभ्यासास बरेच महत्त्व आहे.

बाबा बदमनजींची ग्रंथसंपदा फार मोठी आहे, त्यांनी शंभरावर पुस्तके लिहिली आहेत, यासंबंधीची स्थूल स्वरूपाची जाणीव या विषयाच्या अभ्यासकांना होती. त्यांची एक-दोन पुस्तके सोडल्यास त्यांच्या ग्रंथलेखनाची, त्यांच्या प्रचंड धडपडीची आणि त्यांच्या कामगिरीची आपल्याला फारशी कल्पना नव्हती. बाबा पदमनजींचे नाव त्यांच्या मृत्यूनंतरच्या काळापासून आजतागायत उपेक्षित मानकऱ्यांच्या पडद्याआड जाऊन बसले होते. त्यांच्या समग्र वाङ्मयाचे संशोधन करावे आणि काळाच्या संदर्भात त्याचा अभ्यास करावा, असे कै.अ.का. प्रियोळकरांना फार वाटत होते आणि तशी त्यांनी मला वेळोवेळी सूचना केली होती. प्रा. कऱ्हाडकरांनी संशोधनासाठी कोणता विषय निवडावा, यासंबंधाने विचारविनिमय सुरू केला तेव्हा प्रियोळकरांच्या या सूचनेची डॉ. स. गं. मालशे यांनी आठवण करून दिली आणि तीनुसार मी

प्रा. कन्हाडकरांना या विषयाची व्याप्ती सांगून हे आव्हान स्वीकारणार का असे विचारले. प्रियोळकरांबरोबर *ज्ञानोदया*च्या एका विशिष्ट अंकाच्या शोधासाठी मी एकदा सबंध दिवसभर भटकलो होतो आणि शेवटी तो अंक कुठेच मिळत नाही, याचा अनुभव घेतला होता. त्या सबंध दिवसात प्रियोळकर जेवले नव्हते. केवळ सकाळी एक कप दूध घेऊन आम्ही बाहेर पडलो होतो. रात्री जेवताना ह्या साऱ्या पायपिटीचे फलित काय असा प्रश्न माझ्यापुढे उभा राहिला, तेव्हा प्रियोळकर म्हणाले, 'संशोधन करावयाचे म्हटल्यानंतर अभ्यासकाने अशा प्रकारच्या अनुभवांना तयार असले पाहिजे. तशी त्याच्या मनाची तयारी नसल्यास त्याने संशोधनाच्या वाटेला जाऊ नये. एखादा विषय निवडल्यानंतर सुरवातीलाच कुठे काय मिळते, किती मिळते याचा जसा संशोधकाने शोध घेतला पाहिजे, तसेच कुठे काय मिळत नाही आणि मिळू शकत नाही, हे त्याला माहीत झाले पाहिजे. अगदी शेवटच्या क्षणापर्यंत ते मिळविण्याचा त्याने प्रयत्न केला पाहिजे. आणि मोठ्या प्रमाणात प्रयत्न करूनही एखादा तपशील मिळत नसल्यास, त्या निर्णयापर्यंत ठामपणे येईपर्यंत त्याने प्रयत्न सोडता कामा नये'.

बाबा पदमनजींवर संशोधन करावयाचे तर या जिद्दीने केले पाहिजे या अपेक्षेनुसार करावयाचे कन्हाडकरांनी पत्करले आणि ते यशस्वीरीतीने तडीला नेले. साधनांची जमवा-जमव करण्याबाबतीत कुठल्याही तऱ्हेचे प्रयत्न करण्याचे त्यांनी बाकी ठेविले नाही. साधी बाबांच्या जन्मतारखेची बाब, परंतु 'ती मिळत नाही' या निष्कर्षाला येण्यासाठी त्यांनी किती कष्ट घेतले आहेत हे हा प्रबंध वरवर चाळणाऱ्यांच्याही लक्षात येईल. बाबा पदमनजींची अत्यंत दुर्मिळ असलेली जवजवळ बहुतेक सारी ग्रंथसंपदा आणि नियतकालिके त्यांनी मिळविली (अर्थात अगदी शंभर टक्के ती त्यांना मिळविता आली, असे नव्हे!), बाबांशी संबंधीत स्थळांना, व्यक्तींना त्यांनी भेटी दिल्या आणि बाबांच्या समकालीन वाङ्मयाच्या संदर्भात त्याचा तौलनिक अभ्यास केला. या अभ्यासामुळे बाबांच्या समग्र कार्याचे, त्यांच्या विचार-धारेचे आणि त्यांच्या मानसिक घडणीचे एक ठसठशीत चित्र उभे राहते. त्यामुळे एकोणिसाव्या शतकातील एका विस्मृतप्राय झालेल्या परंतु अत्यंत महत्त्वाच्या विषयाचा चिकाटीने, साक्षेपाने आणि प्रामाणिकपणाने केलेला हा मराठीतला विद्यापीठीय पातळीवरून लिहिला गेलेला बहुधा पहिलाच प्रबंध असावा, असा माझा कयास आहे.

एकोणिसाव्या शतकातील मोठ्या ग्रंथकारांमध्ये बाबांची गणना होत असली तरी त्यांच्या समकालीन अशा साऱ्या ग्रंथकारांमध्ये ते अनेक प्रकारे वेगळे पडतात. ग्रंथसत्तेचे नव्या समाज-घडणीच्या दृष्टीने महत्त्व ओळखून सातत्याने त्यांची ग्रंथनिर्मिती केली आहे, परंतु ती सारी ख्रिस्तधर्मप्रणीत पारमार्थिक उद्धाराच्या तीव्र तळमळीपोटी. इंग्रजांच्या सान्निध्यामुळे, विशेषतः त्यांच्याबरोबर आलेल्या ग्रंथसत्तेच्या प्रभावाने, आपल्या धर्मातील कर्मकांडाने ओशाळगत होऊन धर्मसुधारणेचा प्रयत्न करणाऱ्या तत्कालीन विचारवंतांनी प्राचीन धर्मग्रंथांचे आलोचन करून त्यांच्या प्रामाण्यानेच मानवताप्रणीत धर्माची प्रतिष्ठापना करण्याची स्वप्ने पाहिली. आंग्ल शिक्षितांच्या धर्मसुधारणेच्या या कल्पनांनी बाबांच्या मनाची पकड घेतली नाही. ऐहिक दृष्ट्या भावी समृद्ध आणि संपन्न जीवनाचे प्रलोभनही त्यांना पडू शकले नाही. कळायला

लागल्यापासून 'धर्म' या शक्तीने त्यांच्या मनाचा कब्जा घेतला आणि ऐन तारुण्यात ते ख्रिस्ती धर्माकडे आकृष्ट झाले आणि अस्वस्थतेच्या अनेक रात्री घालवल्यानंतर त्यांनी श्रद्धापूर्वक ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. ह्या ख्रिस्तभक्तीनेच त्यांचे सारे भावविश्व त्यानंतरच्या काळात पूर्णतः व्यापिले गेले. या भक्तीतूनच त्यांनी नव्या करारावर टीका लिहिली, ख्रिस्ती धर्म आणि हिन्दु धर्म यांचा तुलनात्मक अभ्यास केला. अनेक नियतकालिके काढली, पुस्तिका लिहिल्या आणि शाळा चालविल्या. आपल्या या साऱ्या प्रयत्नांचे फळ ख्रिस्तभक्तांना मिळावे, यासाठी त्यांनी कर्मयोग्याचे व्रत आचरिले आणि एकाग्रतेने स्वतःसाठी, आपल्या अंतेवासियांसाठी आणि ख्रिस्तबांधवांसाठी ते सदासर्वकाळ परमेश्वरी प्रार्थनेत दंग राहिले. युरोपियन ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या संपर्काने लेखन व मुद्रण याबाबतीत ते अतिशय साक्षेपी होते. छोट्या पुस्तिकांना देखिल त्यांनी सूची जोडून वाचकांची सोय पाहिली. लिहिलेली पुस्तके वाचकांपर्यंत पोचविण्यासाठी आकर्षक रीतीने त्यांच्या जाहिराती केल्या. ग्रंथप्रसिद्धीपूर्व सवलतींची प्रलोभने दाखवून आपले महत्त्वाचे ग्रंथ मोठ्या प्रमाणात वाचकांपर्यंत पोचविण्याची दक्षता घेतली. त्यांच्या निबंधसंग्रहामागची, बायबलच्या टीकाग्रंथामागची आणि हिंदुधर्माचे स्वरूप स्पष्ट करण्यामागची भूमिका पाहिली तर ती प्रामुख्याने सर्वसंग्रहीची (एन्सायक्लोपिडिया) दिसते. सर्वसंग्रहीमध्ये ज्याप्रमाणे अनेक विषयांची अभ्यासपूर्ण परंतु संकलित माहिती दिलेली असते, त्याप्रमाणे मराठी वाचकांना अनेक विषयांची माहिती करून द्यावी; त्यांच्या अज्ञानाचे पटल दूर करावे, त्यांच्या विषम चालीरीतींची त्यांना जाणीव देऊन त्यांना सन्मार्गाला लावावे आणि ख्रिस्ती धर्मातील आत्म्याच्या शुद्धीकरणाच्या मार्गाने त्यांना आणखी उदात्त आणि पवित्र जीवनाच्या वाटेला लावावे हा त्यांचा सदा सर्वकाळचा ध्यास दिसतो.

हे त्यांचे मत अतिशय आत्मकेंद्रित आहे आणि आपणांसारखे इतरांनी करावे, हीच त्यांची एकमेव तळमळ आहे. डॉ. कऱ्हाडकरांनी बाबांच्या ग्रंथातील, पुस्तिकांतील आणि नियतकालिकांतील लेखांमधील, आशयाची थोडक्यात संकलन करून त्यांच्या या आत्मकेंद्री पारमार्थिक वृत्तीवर चांगल्या रीतिने प्रकाश टाकण्याचे साधन उपलब्ध करून दिले आहे आणि त्यांचा काही महत्त्वाचा पत्रव्यवहार परिशिष्टातून उद्धृत करून बाबांचा जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोन स्पष्ट केला आहे. त्यातून त्यांची परमेश्वरविषयक आत्यंतिक भूमिका स्पष्ट होते. बाबांना लोकहितवादींप्रमाणे पेशवाई आणि आंग्लाई यांचा तौलनिक विचार करावा आणि इतिहास व राजकारण यांचा अभ्यास करावा असे वाटत नाही. दादाभाई, रानडे, गोखले यांच्याप्रमाणे राजनीतीचे परिशीलन करावेसे त्यांना वाटत नाही. अर्थकारण, समाजकारण इत्यादिकांच्या चिंतनात त्यांचे मन रमत नाही. हरी केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्याप्रमाणे विज्ञाननिष्ठ शास्त्रांचाही ते पुरस्कार करीत नाहीत किंवा वृत्तपत्र ही एक लोकजागृतीची मोठी शक्ती आहे, या दृष्टीने ते त्याच्याकडे पाहत नाहीत. भाऊ महाजन, आगरकर यांच्याप्रमाणे बुद्धिवादाची कास त्यांच्या सारख्या सश्रद्ध मनाने धरणे शक्यच नव्हते. या त्यांच्या सश्रद्धतेला जेथे धक्का बसला तेथे त्यांनी आपपरभाव मनात न ठेवता आपल्या मनातील प्रक्षोभ व्यक्त केला आहे. विष्णुबुवा ब्रह्मचारी किंवा

पंडिता रमाबाई यांच्यावर पत्रव्यवहारातून त्यांनी जो मारा केला आहे तो पाहाण्यासारखा आहे. एकीकडे ते आपण ज्वलंत राष्ट्रवादी असल्याचे आवर्जून सांगतात आणि स्वभाषेवरचे आपले नितांत प्रेम करतात, परंतु स्वदेश आणि स्वभाषेबरोबरच आपण ज्या धर्मात जन्माला आलो, त्या हिंदुधर्माबद्दल कसलेही प्रेम त्यांच्या मनात राहिले नसल्याने त्यांची ख्रिस्त भक्ती प्रचारी बनते आणि प्रसंगी ती आग्रही आणि एकांगी बनते.

वैयक्तिक व सामाजिक नीतिमत्तेचा पुरस्कार हिंदुधर्म करीत नाही, हे हिंदुधर्माचे मोठेच वैगुण्य होय, असे त्यांना मनापासून वाटते. ख्रिस्त धर्मतत्त्वाच्या स्वीकारानेच आपल्या देशातील लोकांना वैयक्तिक व सामाजिक नीतिधर्माची खऱ्या अर्थाने जाणीव होईल, याबद्दलच्या बाबांच्या भावना आणि मते अतिशय दृढ आणि पराकोटीची एकान्तिक आहेत. ऐहिक अभिवृद्धिची नवी धारणा त्यांना दुबळेपणाची वाटते आणि ख्रिस्ताची एकनिष्ठ भक्ती रमाबाई-सारख्यांना काही प्रसंगी दूषणास्पद वाटली तरी बाबांना मात्र ती भूषण वाटते. एका अर्थाने स्वतः जागे होऊन दुसऱ्याना जागे करू पाहणारे हे मन एकोणिसाव्या शतकामध्ये केवळ धार्मिक व आध्यात्मिक स्वरूपाचे प्रबोधन निर्माण करण्याची धडपड करीत होते. म्हणूनच त्या काळच्या खऱ्या कर्त्या पुरुषांपेक्षा बाबा वेगळे होते, सर्वस्वी वेगळे होते, ही भूमिका नीट समजावून घेतली पाहिजे.

डॉ. कऱ्हाडकरांच्या या प्रबंधातील सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे त्यांनी *यमुनापर्यटन* आणि *अरुणोदय* या बाबांच्या दोन महत्त्वाच्या कृतींचे केलेले मार्मिक विश्लेषण. वास्तविक *यमुनापर्यटन* ही मराठीतील आद्य कादंबरी. तिच्यानंतर येणाऱ्या अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांच्या तुलनेने आणि एकोणिसाव्या शतकातील एकंदर कादंबऱ्यातील सामाजिक वास्तवचित्रणाच्या दृष्टीने तिचे श्रेय फार मोठे. परंतु ती लिहिली गेली त्यावेळी दीर्घ कथनात्मक आणि संवादात्मक गद्य निवेदनास मराठीत काय म्हणावयाचे हा मोठा प्रश्नच होता. त्यांच्या या कृतीनंतर निर्माण झालेल्या आणि पावसाळी छत्र्यांप्रमाणे भराभर उगविलेल्या, मुख्यतः संस्कृतातील बाणाच्या *कादंबरी* नावाच्या कृतीसारख्या अद्‌भुतरम्य कथानकांची लयलूट करणाऱ्या कृतींना 'कादंबरी' असे म्हटले जाऊ लागल्यामुळे उद्‌भुतरम्यतेचा लवलेशही नसणाऱ्या बाबांच्या या निखळ सामाजिक वास्तवाचे चित्र करणाऱ्या कृतीस 'कादंबरी' म्हणून कोण संबोधील? समकालिनांना ही कादंबरी आहे, याची मुळीच जाणीव नसून निखळ सत्य घटनांचे निवेदन करणारे वैचारिक पुस्तक आहे, असेच त्यांना वाटत होते! १८६० साली रघोबा जनार्दन यांच्या पुनर्विवाहाला विरोध करणाऱ्या ब्राह्मणांना बळवंतराव गोपर्डीकर नावाच्या तत्कालिन सामाजिक नेत्याने *यमुनापर्यटन*मधील उतारे आपल्या समर्थनार्थ उद्‌धृत करून गप्प बसविले होते. त्यामुळे न्या. रानडयांनी तिची प्रवासवर्णनात गणना करावी किंवा दत्तो वामन पोतदारांनी 'सामाजिक व धार्मिक' या सदराखाली तिची बोळवण करावी, याचे फारसे आश्चर्य वाटत नाही. परंतु कादंबरी या वाङमय प्रकाराचे होल्डाली स्वरूप ज्यांच्या पूर्ण परिचयाचे होते त्या वि. ह. कुळकर्णी किंवा रा. श्री. जोगांसारख्या मान्यवर रसिक समीक्षकांनी तिला कादंबरी म्हणू नये, आणि तिच्या आद्यत्वाचा मान हिरावून घ्यावा, याची गंमत वाटते.

डॉ. कऱ्हाडकरांनी या कादंबरीला भरपूर न्याय दिला आहे आणि आजपर्यंत झालेल्या तिच्या उपेक्षेतून तिला बाहेर काढून योग्य ती भरपाई केली आहे. मात्र आपल्या हयातीत या कादंबऱ्यांच्या आवृत्त्या प्रसिद्ध होत असताना बाबांनी काही ठिकाणी जी काही मार्मिक परिष्करणे केली, त्यांची दखल कऱ्हाडकरांनी घेतली नाही. विशेषतः तिसऱ्या आवृत्तीतील पंढरपूरच्या विधवेच्या तोंडी लोकहितवादींबद्दल चारदोन वाक्यात जे फटकारे ओढले आहेत, ते त्यांच्यावरच्या तत्कालीन वृत्तपत्रीय टीकेपेक्षा अधिक बोचरे आहेत. तसेच *यमुनापर्यटन* वर ज्या उलटसुलट टीका प्रसिद्ध झाल्या, त्यांपैकी कऱ्हाडकरांनी *ज्ञानोदया*वरच भिस्त ठेवून प्रामुख्याने त्याच्या आधारेच या टीकेचा परामर्श घेतला आहे. त्याला त्या काळच्या इतर पत्रातील टीकांची जोड देणे अवश्य होते. हिंदुपत्रांच्या या कृतींवरील टीका अधिक जहाल होत्या. अगोदर पैसे भरून हाती पडलेले हे पुस्तक उत्सुकतेने वाचावयास गेलेल्या अनेक हिंदू वाचकांच्या अपेक्षांचा त्याने भंग केला. एक प्रकारच्या कडवट अभिनिवेशाने अनेक व्यक्ती या कादंबरीवर तुटून पडलेल्या दिसतात. या टीकांचे अवलोकन करून त्यांच्या संदर्भात या कादंबरी बद्दलच्या जाणिवा अधिक अर्थपूर्ण निश्चितच करता आल्या असत्या!

*अरुणोदय* हे बाबांचे आत्मचरित्र म्हणजे ललित वाङ्मयाच्या क्षेत्रातील एक मोठा चमत्कारच मानावे लागेल. आपण ख्रिस्ती का व कसे झालो, हे सांगण्यासाठी बाबांनी ह्या लेखनाचा प्रपंच केला आणि हिंदुधर्मातील अनेक प्रकारच्या चालीरीतींची कल्पना देता देता बाबांनी सहजगत्या हिंदुधर्मातील रूढीप्रिय समाजाचे एक जिवंत व चैतन्यपूर्ण विश्व साकार केले. या पुस्तकाचे सहावेळा पारायण केल्यानंतर एका अनोळखी विद्वानाने न राहवून त्यांना पत्र लिहिले,

> ह्या पुस्तकात शब्दलालित्य किंवा अलंकार किंवा शास्त्रदृष्ट्या कोणताही गुण नसूनहीं मला ते शेकडोवेळा पुनः पुनः वाचावे असे वाटले. ह्यात खरा कळवळा, खरी भक्ती, साधेपणा व निरीच्छता आहे.

आपले मनोगत आपल्याला वाटले त्या भाषेत व्यक्त करण्यात आलेल्या या पत्राने *अरुणोदया*ची आस्वाद्यता नेमकी टिपली आहे, परंतु तिच्या आस्वाद्यतेचे मर्म कशात आहे, याची मीमांसा करण्याच्या भरीस काही पत्रकर्ता पडलेला दिसत नाही.

*अरुणोदय* किंवा *यमुनापर्यटन* लिहिण्या पाठीमागचे प्रयोजन तर सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. परंतु ज्या हेतूने या कृती बाबांनी निर्माण केल्या, तो हेतू कितपत सफल झाला? हिंदू विधवांची दुःस्थिती कळावी म्हणून *यमुनापर्यटन* थोडीच वाचली जाते किंवा *यमुनापर्यटन*ने सुचविले म्हणून हिंदु तरुण विधवा थोड्याच ख्रिस्ती व्हायला बसल्या? बाबांनी आपल्या ख्रिस्ती होण्याचे चित्र रंगविले म्हणून, प्रचारासाठी या पुस्तकाची जगातल्या अनेक भाषात भाषांतरे झाली असली तरी सामान्य मराठी वाचक किंवा अभ्यासक त्या हेतूने हे आत्मचरित्र मुळीच वाचत नाही. अशा तऱ्हेची असंख्य प्रचारी पुस्तके काळाच्या उदरात केव्हाच नाहीशी झाली. परंतु *अरुणोदया*चे तसे नाही आणि तसे होणार नाही, कारण कर्त्याला न कळतच त्यांच्या या आत्मनिवेदनाने नितांत रमणीय वाङ्मयीन रूप धारण केले. कर्त्यालाही न कळता,

कर्त्याच्या हेतूला दूर सारून काही कृतींना वाङमयीन स्वरूप कसे प्राप्त होते, हे पाहावयाचे *यमुनापर्यटन* किंवा त्यापेक्षा प्रामुख्याने *अरुणोदय* पाहावे. केवळ वास्तव घटनांच्या मांडणीने वा एखाद्या कालखंडाचे तपशीलवार चित्रण करावयाचे म्हणून एखाद्या कृतीला ललितकृतीचे स्वरूप येत नाही. ललितकृती ही व्यक्तिनिष्ठेपेक्षा, वस्तुनिष्ठेपेक्षा, आणखी काहीतरी वेगळी असते. या एका नव्या सत्याची प्रचिती *अरुणोदय* मुळे येते.

आणि बाबांचे मन ईश्वर भक्तीने पूर्णत: व्यापले गेले होते तरी त्या मनाच्या खोलवर दडून बसलेल्या प्रतिभाशाली कलावंताने केलेली ही किमया आहे, हे लक्षात येते. बाबां-मधील कलावंताची ही जाणीव लक्षात आल्याखेरीज त्यांच्या साक्षेपाचे, शिस्तीचे नव्या जगाची स्वप्ने पाहण्याचे, लहान मुले, स्त्रिया आणि प्रौढ यांच्यासाठी वेगवेगळया तऱ्हेची नियतकालिके काढून त्यांच्या अंत:करणापर्यंत पोचण्याच्या त्यांच्या धडपडीचे, सर्व तऱ्हेचे कोशवाङमय परिश्रमाने मराठी माणसाच्या पुढयात आणून ठेवण्याच्या त्यांच्या परिश्रमाचे, त्यांच्या शुद्धतेच्या हव्यासाचे, सात्त्विकेच्या उद्‌घोताचे आणि एकोणिसाव्या शतकात अनेक क्षेत्रात आद्यत्वाचा मान सहजगत्या मिळवून जाण्याच्या कर्तृत्वाचे यथार्थ आकलन होणार नाही.

बाबा पदमनजी हे बहुप्रसव ग्रंथकार होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या यच्चयावत पैलूंचा साराच पट उलगडून दाखविणे ही गोष्ट केव्हाही अशक्यप्रायच ठरेल. तरीपण या पैलूंचे अधिक आकलन होण्याच्या दृष्टीने डॉ. कऱ्हाडकरांच्या या अभ्यासाचे महत्त्व कोणासही मान्य केले पाहिजे.

पुणे

भीमराव कुलकर्णी

# ऋणनिर्देश

**बा**बा पदमनजी : *काल व कर्तृत्व* हा ग्रंथ पुरा करताना ज्या अनेक व्यक्ती व संस्था यांनी मला सक्रिय साहाय्य केले, त्या सर्वांचा नामनिर्देश करणे केवळ अशक्य असले, तरी पण त्या सर्वांच्याबद्दल कृतज्ञतेने माझे अंत:करण भरून आले आहे.

एका तपाहून अधिक काळ ज्या महाविद्यालयात मी अध्यापनाचे कार्य करीत आहे त्या कॉलिजचे प्राचार्य डॉ. टी. बार्नबस यांनी मला सतत प्रोत्साहन दिले. 'गो अहेड यंग मॅन' या त्यांच्या सस्मित उद्‌गारांनी व वेळोवेळी चौकशी करून त्यांनी दाखविलेल्या आस्थेमुळेच मी हा ग्रंथ पुरा करू शकलो. त्यांनीच हे व्यक्तित्व घडविले आहे व त्यांच्याच प्रोत्साहनाने अशा प्रकारची कामे सातत्याने करण्याची उमेद आहे.

माझे पी.एच्.डी. चे मार्गदर्शक, प्राध्यापक डॉ. भीमराव कुलकर्णी, यांनी मित्र व शिक्षक अशी दुहेरी भूमिका स्वीकारून मला अक्षरश: तन-मन-धनेकरून मदत केली. त्यांनी माझ्याबरोबर संशोधनार्थ भ्रमंती केली. दुर्मिळ पुस्तके स्वत: विकत घेऊन ती मला पाठविली. आपला विद्यार्थी म्हटला की त्याच्यावर अमाप प्रेमाची बरसात करण्याची 'प्रियोळकर–मालशे' यांची गुरुपरंपरा डॉ. कुलकर्णी यांनी देखील पुढे चालवली आहे. त्यामुळेच मी विद्यापीठाच्या नियत मुदतीत प्रस्तुत प्रबंध पुरा करू शकलो व आज त्या प्रबंधाचे ग्रंथरुपाने प्रकाशन होत आहे. कोण-त्याही प्रकारच्या संशोधनासाठी किती प्रकाराने साधने धुंडाळावी लागतात, किती प्रकाराने आणि कुठे कुठे न कंटाळता, न निराश होता पाहावे लागते व प्रत्यक्ष लेखनामध्ये किती प्रकाराने शिस्तीचा आग्रह धरावा लागतो याची जाण त्यांनी वेळोवेळी दिली, ती सबंध आयुष्यभर मला साथ देणारी आहे.

१९७२ च्या दिवाळीच्या सुटीतली गोष्ट. मुंबईच्या 'साहित्य सहवास'मधील कै. प्रियोळ-करांच्या निवासस्थानी मी त्यांना भेटावयास गेलो होतो. ते जीवावरच्या मोठ्या आजारातून उठून नुकतेच घरी आलेले होते. 'मी नगरच्या डॉ. हिवाळयांच्या कॉलेजमधील प्रा. कऱ्हाडकर, बाबा पदमनजींवर पी.एच्.डी. साठी काम करीत आहे', माझी ओळख मी करून दिली. उठवत नसतानाही प्रियोळकर एकदम उठून बसले. समोरच्या काचेच्या कपाटातून दोन तीन ग्रंथ माझ्या पुढ्यात टाकले. 'कऱ्हाडकर, तुम्ही जरूर बाबा पदमनजींवर काम करा. बऱ्याच

दिवसापासून हा विषय माझ्या डोळ्यासमोर होता. या उपेक्षित वाङ्मयसेवकावर कुणी तरी काम करावे ही माझी फार दिवसांची इच्छा आहे. तुम्ही सवडीनुसार परत एकदा या. मी तुम्हाला बरीच मदत करू शकेन', प्रियोळकर म्हणाले. नंतर मी कॉफी घेतली व प्रियोळकरांची पाठीवरची थापही. ती मला आशीर्वादासारखी वाटली. मे महिन्यात प्रियोळकरांच्याकडे जायचे मी केवढे मनसुबे रचले होते! पण प्रियोळकरांच्या मृत्यूने माझे सारे मनसुबे विरून गेले. त्यांचा आशीर्वाद बरोबर घेऊन मी ही सारी वाटचाल केली. आज ते असते तर. . . प्रस्तुत ग्रंथ अवलोकून कै. प्रियोळकरांना तर आसमानच ठेंगणे झाले असते.

कै. प्रियोळकरांप्रमाणेच डॉ. कै. शं. दा. पेंडसे, प्रा. गं. बा. सरदार, डॉ. रा. शं. वाळिंबे, श्री. गं. दे. खानोलकर, डॉ. स. गं. मालशे, डॉ. श्री. रं. कुलकर्णी अशा मान्यवर ज्येष्ठांचे आशीर्वाद या कामी वेळोवेळी मला मिळाले आहेत. ही शिदोरी कधीही न संपणारी अशीच आहे.

माझ्या कॉलिजातील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. गं. ना. मोरजे माझ्या प्रबंधाच्या व ग्रंथाच्या प्रगतीची रोजच जातीने चौकशी करावयाचे. सर्व तऱ्हेच्या सोयीसवलती उपलब्ध करून द्यावयाचे. वेळी–अवेळी केव्हाही त्यांच्याकडे जा, त्यांच्या कपाळावर आठी कधीच दिसली नाही. त्यांच्या प्रेरणेशिवाय हे काम इतक्या गतीने मला पुढे नेता आले नसते. त्यांचे आभार मानावेत तितके थोडेच होणार आहेत. माझ्या महाविद्यालयातील इतर सहकाऱ्यांनीही वेळोवेळी मला सहकार्य दिले आहे.

बाबा पदमनजींची ग्रंथसंपदा जितकी मोठी आहे तितकीच दुर्मिळ आहे. ती मिळविण्यासाठी आटोकाट प्रयत्न करूनही सारीच काही हाती लागली आहे असे नाही. विशेषतः त्यांच्या पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या उपलब्ध न झाल्यामुळे काही महत्त्वाच्या पुस्तकांची त्यांनी केलेली परिष्करणे अभ्यासता आली नाहीत. ही ग्रंथसंपदा मला ज्यांनी उपलब्ध करून दिली त्यांच्यामध्ये श्री. भास्करराव जाधव, डॉ. स. गं. मालशे, श्री. सुमंतराव करंदीकर, श्री. सुरेश जोशी, श्री. शा. म. आढाव, श्री. राम दसरे, श्री. निळूभाऊ डोंगरे, मित्रवर्य बिपीन गायकवाड, प्रा. सोज्वळ, फादर क्रोजियर, व सौ. डॉ. मनोरमाबाई बार्नबस आणि पुण्यातील दुर्मिळ पुस्तकांचे विक्रेते कै. पां. रा. ढमढेरे यांचा मोठा वाटा आहे. आमच्या कॉलिजातील *ज्ञानोदया*च्या दुर्लभ संग्रहाने तर मला या कामी मोठाच हात दिला.

अहमदनगर कॉलिज, डॉ. भा. पां. हिवाळे एज्युकेशन सोसायटी, अमेरिकन मराठी मिशन, अ. ए. सोसायटी, अहमदनगर शहर वाचनालय, सनातनधर्मसभा वाचनालय, मॉडर्न कॉलिज, फर्ग्युसन कॉलिज, पुणे विद्यापीठ, थिऑलॉजिकल कॉलिज, महाराष्ट्र साहित्य परिषद, महाराष्ट्र शासकीय प्रादेशिक ग्रंथालय, पुणे, बॉम्बे बुक अँड ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई विद्यापीठ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, प्रार्थनासमाज ग्रंथालय इत्यादी नामवंत संस्था, त्यांचे पदाधिकारी व ग्रंथपाल यांच्या सक्रिय व उदार सहकार्याने माझा प्रबंध व ग्रंथ आकारास येऊ शकला. मी त्यांचा मनःपूर्वक आभारी आहे.

बाबा पदमनजींच्या स्नुषा श्रीमती सुंदराबाई व नातू हेमन्त यांनी जीवापाड जतन करून ठेवलेली बाबांची छायाचित्रे, हस्ताक्षर, काही पुस्तके इत्यादी माझ्या स्वाधीन केली. ते दोघेही

माझ्याबरोबर मुंबईत ख्रिस्ती स्मशानभूमीपासून बाबांशी संबंधित अनेक ठिकाणापर्यंत पायपीट करीत. माझे काम त्यांनी आपलेच मानले. त्यांचे आभार कसे मानावेत हे कळत नाही!

माझ्या पी.एच्.डी. च्या प्रबंधाचे ग्रंथरूपाने प्रकाशन करण्यास पुणे विद्यापीठाने मोठ्या उदार अंतःकरणाने परवानगी दिली यासाठी मी पुणे विद्यापीठाचा खूपच ऋणी आहे.

सामान्यतः पी. एच्. डी. चा प्रबंध महाराष्ट्र साहित्य संस्कृति मंडळ प्रकाशनार्थ व अनुदानासाठी स्वीकारीत नाही. तरी देखील बाबा पदमनजींचे मराठी साहित्यातील व महाराष्ट्र संस्कृतीतील श्रेष्ठत्व लक्षात घेऊन प्रस्तुत ग्रंथ महाराष्ट्र साहित्य संस्कृति मंडळाने प्रकाशनासाठी स्वीकारला आणि माझ्या गेल्या सात–आठ वर्षाच्या संशोधन कार्याचे एकापरीस कौतुकच केले. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, यांचा मी अत्यंत ऋणी आहे.

प्रस्तुत ग्रंथाचे शुद्ध, नेटके व सुबक मुद्रण करणारे श्री. राजीव व अरुण नाईक यांचा उल्लेख न करणे म्हणजे कृतघ्नताच होईल. तसेच मुद्रणमहर्षि मा. बापूराव नाईक यांनी ग्रंथप्रकाशनाच्या संदर्भात जे मार्गदर्शन आपलेपणाने केले त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

शेवटी माझी पत्नी सौ. सुमा व भाऊ वसंत व यशवंत आणि मुले रवि, रश्मी, राजू यांनी त्यांना शक्य ते ते सर्व सहाय्य या ग्रंथलेखन काळात केले. त्यांनाही माझ्याप्रमाणेच या कामाची नशा चढली होती. त्यामुळे हा काळ मोठ्या आनंदाचा, झपाटल्यासारखा गेला!

या सर्वांना पुनश्च धन्यवाद.

अहमदनगर

**केशव सीताराम कऱ्हाडकर**

१

## बाबा पदमनजी : जीवनरेखा

एकोणिसाव्या शतकातील धर्मप्रवण अशा कर्त्या पुरुषांमध्ये बाबा पदमनजी यांची गणना होते. पारतंत्र्याच्या कैचीत सापडल्यामुळे हा काळ एकीकडे औदासीन्याचा तर दुसरीकडे पाश्चात्यांच्या संसर्गामुळे संक्रमणाचा होता. इंग्रजी शिक्षणाला नुकतीच सुरुवात झाली होती; ख्रिस्ती धर्मोपदेशकांचा प्रचार जारीने चालू होता; राजकीय सत्ता गमावल्यामुळे उच्च वर्णियांच्या जीवनात सर्वत्र निराशेचे व पराभूतपणाचे वातावरण पसरले होते; इंग्रजांची विद्या, कर्तृत्व, सामर्थ्य आणि प्रगती पाहून आमचे डोळे दिपून गेले होते आणि महाराष्ट्रातील नवशिक्षितात न्यूनगंडाची भावना निर्माण होऊन इंग्रजांच्या अंधानुकरणाची प्रवृत्ती पोसली गेली होती. जुन्या जमान्यातील विचारवंत व शास्त्रीपंडित तर अगदी दिङ्मूढ होऊन गेले होते. ह्या राजकीय व सामाजिक स्थित्यंतराचे सम्यक आकलन त्यांना होण्यासारखे नव्हते. नवीन सुशिक्षितांना आधुनिक विचार–प्रवाहांचे आकर्षण वाटत होते. परंतु पौरस्त्य व पाश्चात्य संस्कृतीची तुलनात्मक चिकित्सा करून त्यातील ग्राह्यांश ठरविण्याइतका विवेक त्यांच्या ठिकाणी नव्हता. म्हणूनच जुन्या नव्याची सांधेजोड करताना ते खूप गोंधळून गेले होते. पंचविशीतले तरुण बाबा याला अपवाद नव्हते आणि त्यांनी वयाच्या ऐन तारुण्याच्या बहरातच ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेण्याचा निर्णय घेतला होता. ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या भूलथापांना बळी पडून एखाद्या प्रवाहपतीताप्रमाणे त्यांनी धर्मांतर केले नाही. धर्मजिज्ञासेपोटी त्यांनी हा मार्ग पत्करला. त्यांचे समवयस्क तरुण इंग्रजी चारपाच बुके शिकून सरकारी नोकरी मिळ-विण्याच्या खटपटीत होते. तत्कालीन लौकिक उत्कर्षाच्या व प्रतिष्ठेच्या मार्गाने जाणारा हा तरुण नव्हता! मानवी मनाच्या अत्युच्च सुखाचा शोध धर्ममार्गाने शोधण्यात अंतर्मुख झालेले ते एक आर्त भक्त होते. या भक्तीच्या व मुक्तीच्या मार्गाचा प्रवास करीत असताना त्यांनी अखंड ज्ञानसाधना व लेखनसाधना केली व तत्कालीन मराठी वाङ्मयात स्वतःचे एक महत्त्वपूर्ण

स्थान प्रस्थापित केले. त्यांचे मराठी साहित्यक्षेत्रातील कार्य खरोखरच अविस्मरणीय आहे. त्यांनी सतत पन्नास वर्षे मातृभाषेची एकनिष्ठपणे सेवा केली.

एकोणिसाव्या शतकातील एक थोर वाङमयसेवक व ख्रिस्तसेवक म्हणून बाबा पदमनजींचे नाव अभ्यासकांना माहित असले तरी त्यांचे कार्य, त्यांचे चरित्र यांचा परिचय महाराष्ट्रास जितक्या प्रमाणात व्हायला हवा तितका झाला नाही हेच खरे आहे. म्हणूनच त्यांचे नाव महाराष्ट्राच्या उपेक्षित मानकऱ्यात घेतले गेले आहे.[१]

सुदैवाने बाबांचे आत्मचरित्र *अरुणोदय* या नावाने उपलब्ध आहे आणि जगभर त्याची अनेक भाषात भाषांतरेही झाली आहेत. ती अर्थातच पूर्वाश्रमीच्या एका हिंदू मनाच्या मानसिक स्थित्यंतराचा भावोत्कट आविष्कार या दृष्टीने धर्मप्रचाराचे साधन म्हणून झालेली आहेत हे उघडच आहे. बाबांचे हे आत्मचरित्र त्यांच्या धर्मपरिवर्तनाच्या म्हणजे १८५४ सालापर्यंतच्या त्यांच्या जीवनचरित्राचा वेध घेताना दिसते. त्यानंतर वाङमयसेवक व ख्रिस्तसेवक म्हणून त्यांची दीर्घ काळाची कारकीर्द झालेली आहे. उपलब्ध साधनांच्या साहाय्याने या काळा-चाही शोध घेता येतो.

बाबा पदमनजी या नावानेच बाबा ओळखले जातात. १९ व्या शतकात उपनावांचा आजच्यासारखा सर्रास उपयोग करण्यात येत नसे. दादोबा पांडुरग, गोविंद नारायण, मोरोबा कान्होबा, भाऊ दाजी अशीच नावे त्या काळी प्रचलित असत.[२] बाबांचे संपूर्ण नाव बाबा पदमनजी मुळे असे होते. ते कासार या उपजातीचे होते. त्यांच्या वडिलांचे 'पद-मनजी' हे नाव पारसी–गुजराती पद्धतीचे वाटते. आणि ते तसे आहेही, कारण बाबांनीच सांगितल्याप्रमाणे त्यांची मातापितरे सुरतकर घराण्यातील होती.[३]

बाबांनी आपल्या जन्माचा उल्लेख 'माझा जन्म बेळगांवमध्यें सन १८३१ च्या मे महिन्यांत झाला' असा मोघम केला आहे.[४] कारण त्यांच्या आत्मचरित्र लेखनसमयी त्यांना त्यांच्या जन्माची निश्चित तिथी उपलब्ध झालेली नसावी.[५] ही तिथी शोधून काढण्याच्या माझ्या प्रयत्नालाही यश आले नाही.[६] त्यांच्या वडिलांचे नाव पदमनजी माणिकजी असे होते. त्यांचे शिक्षण कर्नल टी. बी. जर्विस यांच्या इंजिनिअरिंग स्कुलात झाले. एका अर्थाने अव्वल इंग्रजीतील पहिल्यावहिल्या स्थापत्यविशारदात त्यांची गणना होते, असे म्हटले पाहिजे. ते प्रथम दक्षिण कोकणात सब असिस्टंट सर्वेअर व बिल्डर होते. नंतर इ. स. १८३१ साली त्यांची बदली झाली बेळगावास. बेळगावातल्या मारुतीच्या आळीतले त्यांचे घर खूपच मोठे होते व त्याला भाडे फक्त दरमहा दोन रुपये व ते देखील सालअखेर द्यावे लागे. घरासमोर मोठा बाग-बगीचा होता. पदमनजींच्या सामाजिक प्रतिष्ठेची ती निशाणी होती. 'असे शोभायमान घर त्या सगळया आळींत नव्हते'...असे म्हणून बाबांनी त्याचे श्रेय वडिलांना दिले आहे.[७] शेजारीपाजारी मोठी ब्राह्मण वस्ती आणि घरी तर सामिष आहार! साहजिकच सागुतीस 'मटण किंवा तांबडी–भाजी', माश्यास 'फिश किंवा पाणशेंगा', बोंबलास 'साबळे', सोड्यास 'रुद्रगांठे', वगैरे म्हणावयास घरी मुलास कसे शिकवीत असत याचे बाबांनी लिहिलेले वर्णन वाचून आज मोठी गंमत वाटते.[८]

कासार जातीचे असूनही बाबांच्या घरचे धार्मिक वळण मध्यमवर्गीयांच्या ब्राह्मणी संस्कृतीला जवळचे होते. बाबांच्या घरी सढळ हाताने ब्राह्मण–भिक्षुकांना दक्षिणा देण्यात येत असे. घरी एक स्वतंत्र देवघर असे. प्रत्येक प्रौढ मनुष्य देवास भजत असे. सकाळी मुखमार्जनानंतर देवास नमस्कार करीत. त्यांची आई फारच श्रद्धाळू होती. ती उपासतापास, व्रतवैकल्ये करी. तुळशीला पाणी व पिंपळाला प्रदक्षिणा घालणे हा तिचा नित्यनेम असे. बाबांच्या वडिलांजवळ गीतेची प्राकृत पोथी होती. तिचा एखादा अध्याय त्यांनी वाचावा व ती पोथी कोठे बाहेर गेले असता बरोबर न्यावी. तिची पूजा ते करीत व निजते वेळेस ती उशास ठेवीत.[९] त्यामुळे झोप शांत येते व भूतपिशाच्चांची बाधा होत नाही असा तत्कालीन समज असे. शाक्तपूजेसही त्यांच्या घरी प्राधान्य होते.

लहानपणी बाबांना बेळगावच्या सरकारी प्राथमिक शाळेत घालण्यात आले. बाबांच्या हुशारीमुळे व त्यांच्या पंतोजींचा व वडिलांचा फार स्नेह असल्यामुळे त्यांचे शाळेत फार लाड होत व तत्कालीन पद्धतीप्रमाणे शिक्षा वगैरे होत नसे. परिणामी यथापद्धत शिक्षण न देता लवकरच पहिल्या वर्गात म्हणजे वरच्या वर्गात घालण्यात आले.[१०] बाबांना घरगुती शिकवणी होती. जिल्ह्याची भाषा कानडी असली तरी त्यांना एक शिक्षक शिकवीत 'मराठी काव्य'. दुसरे एक शास्त्री संस्कृत शिकवीत.

बेळगावला एकुलती एक मिशन शाळा होती. ह्या शाळेत इ. स. १८४३ मध्ये बाबांनी प्रवेश घेतला. ही शाळा लंडनच्या मिशनने चालविली होती. रे. टेलर व रे. बेनन हे त्या शाळेवर मुख्य म्हणून काम करीत असत.[११] इतर शिक्षक होतेच. बाबांचे नारायण माणिकजी नावाचे चुलते होते. त्यांचाही इंग्लिशचा अभ्यास याच शाळेत झाला. चुलत्यांनी बाबांची व रे. टेलर यांची ओळख करून दिली. काकांच्या ओळखीने बाबांचे स्वागत त्या शाळेत चांगले झाले. त्या शाळेतील शिक्षण सर्वांगीण स्वरूपाचे होते. मिशनरी स्वतः वर्गांना शिकवीत. शनिवारी उपदेश होत असे. तेथील वाचनालयात बाबांचा *यात्रिकक्रमण, भारतीय यात्रिक* व *नवा करार* इत्यादी धार्मिक पुस्तकांशी संबंध आला. ती पुस्तके मराठीत होती. अद्यापपर्यंत बाबा पदमनजी कट्टर मूर्तिपूजकच होते. बेळगावच्या मिशन शाळेत असेपर्यंत बाबांची हिंदुधर्मविषयक श्रद्धा मुळीच कमी झालेली नव्हती. धार्मिक कृत्ये आणि व्रतवैकल्ये यांत त्यांना गोडी वाटे. तसेच पोकळ डामडौल व सुखोपभोग यांचीही आवड होती.[१२]

परंतु काही काळानंतर त्यांना यात रस वाटेनासा झाला. मनाचे समाधान व अंतःकरणाची शांती यांच्याविषयी ते विचार करू लागले. ते उच्च व उदात्त विचारांकडे आकर्षित होऊ लागले. दैवी आणि अद्‌भुत सामर्थ्यप्राप्तीची महत्त्वाकांक्षा त्यांच्या ठायी निर्माण झाली. त्यासाठी त्यांनी काही मंत्रतंत्र शिकण्याचा प्रयत्न केला. परंतु लवकरच भोळीभाबडी माणसे तर या मंत्रजालातच सापडतात हे त्यांना जाणवले. मंत्र व मंत्रोच्चार म्हणजे संस्कृत शब्दांची पोपटपंची असून त्यात फारसा अर्थही नसतो, फक्त त्यांची जडणघडण नवी असते, श्रुतींना ते मनोहर वाटतात इतकेच, अशी त्यांची धारणा झाली.

बाबा आठ-नऊ वर्षांचे असताना आपल्या आईबापांबरोबर चुलत्याच्या व आतेच्या लग्ना-

साठी १८३९ मध्ये मुंबईस जाण्याचा त्यांना प्रसंग येतो. घर सोडण्यापूर्वी जोश्यास बोलावून प्रयाणाचा मुहूर्त पाहिला होता व प्रस्थान काढून ठेविले होते. घरातून चांगल्या मुहूर्तावर निघूनही प्रवासात फार हाल झाले. प्रवासास दोन महिने लागले. वाटेत त्यांच्या एका भावाला देवी आल्या. त्याचे डोळे गेले. पैसे वाटेतच संपले. ही आठवण बाबांच्या मनात पक्की रुजलेली दिसते.[१३] वयाच्या सोळाव्या वर्षी १८४७ मध्ये बाबा पुन्हा एकदा सागरी मार्गाने मुंबईस गेले. या वेळी बाबांच्या बरोबरच्या जुन्या सामानावर अधिकाऱ्यांनी जकात वसूल केली. त्यासंबंधी *प्रभाकर* पत्रात त्यांनी जाहीर तक्रार केली.[१४] हाच त्यांचा पहिला लेख होय.

दुसऱ्या खेपेस बाबांचे मुंबईस सुंदर बाबाजीच्या वाडीत बराच काळ वास्तव्य झाले. तेथे प्रसिद्ध लेखक व नाटककार महादेवशास्त्री कोल्हटकर राहत असत. ते एज्युकेशन सोसायटीच्या एल्फिन्स्टन विद्यालयात शिक्षक होते. त्यांच्याशी ओळख होऊन त्यांनी विद्यालयाचे प्रिन्सिपल डॉ. हार्कनेस यांजकडे बाबांना प्रथम नेले.[१५] प्रिन्सिपलने बाबांचे मिशन स्कूलचे सर्टिफिकेट पाहून त्यांना प्रथम दादाभाई नवरोजी यांजकडे पाठविले. दादाभाईंनी बाबांची परीक्षा घेऊन त्यांना तिसऱ्या क्लासात बसविले. या वर्गाचे शिक्षक फार प्रेमळ होते. ते सर्व वर्गावर प्रेम करीत. बाबा त्या शिक्षकांबरोबरच शाळेत व घरी जात. ते शिक्षक शाळेत येताना व घरी जाताना वाटेत मारुतीस नम्र भावाने नमस्कार करीत. बाबा पण त्यांचेच अनुकरण करीत. याच मारुतीस बाबा परीक्षेच्या वेळेस पास होण्यासाठी नमस्कार करीत असत. वाचनाच्या नादाने या काळात बाबांनी बरीच पुस्तके वाचून काढली. ती बहुतेक हिंदुधर्मविषयकच होती. या विद्यालयात बाबांचे शिक्षण सुखेनैव पार पडण्याचा काही योग नव्हता. कारण मध्येच शिक्षण थांबवून तत्कालीन पद्धतीप्रमाणे बाबांचे लग्न उरकून घ्यावे लागले. हे लग्न हिंदूंच्या रीतीप्रमाणे मोठ्या डामडौलाने झाले. त्याच्या ठोकळ खर्चाची यादी बाबांनी खूप दिवस जपून ठेवली होती. तीत कलावंतणीच्या नाचाबद्दल जी रक्कम मांडली आहे ती व्यर्थ खर्चाची असे लग्नाच्या वेळी देखील त्यांना वाटले.[१६] या लग्नानंतर बाबांच्या वडिलांना सहकुटुंब एडनला जाण्याची परवानगी मिळाली. बाबांच्या लग्नासाठी ते रजा काढून इकडे आले होते.

एडनला गेल्यावर शाळा नसल्यामुळे बाबांनी वडिलांच्या हापिसात काही काळ नोकरी केली. एडनला ऊर्फ आदनास बाबा धर्माच्या बाबतीत विशेष श्रद्धाळू नव्हते. तेथील लोकांचे निरीक्षण करून बाबांनी त्याचा वृत्तांत *अरुणोदयात* बऱ्याच विस्ताराने दिला आहे. तेथील लोकांनी पर्वताच्या गुहेचे मंदिरात रूपांतर केले होते. त्यात मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केलेली होती. तिची उपासना व पूजाअर्चा चाले. विशेष गमतीचे वृत्त लिहिताना बाबा लिहितात : 'आदनात असतांना दोनच कावळे माझ्या दृष्टीस पडले. ते तेथील हिंदू लोकांनी आपल्या पितरांच्या श्राद्धपक्षाकरिता मुंबईहून आणून सोडले होते.'[१७]

इ. स. १८४९ मध्ये बाबा एडनहून परत मुंबईस आले. त्या वर्षाच्या ऑगस्टमध्ये बाबांनी मुंबईच्या फ्री चर्च हायस्कूलमध्ये प्रवेश केला. तेथे त्यांच्या दोघा मित्रांनी दुसरे दिवशी आपल्या वर्गात येऊन बसण्याचा आग्रह केला. परंतु त्या वर्गाचे शिक्षक मि. नारायण शेषाद्री हे बाटलेले ब्राह्मण असल्यामुळे त्यांच्या हाताखाली शिकणे बाबांना बरे वाटले नाही.[१८] प्रथम

बाबा नारायण शेषाद्रींचा तिरस्कार करीत. परंतु त्यांच्या प्रेमळ स्वभावामुळे बाबांच्या मनातील त्यांच्याविषयीचा तिरस्कार नष्ट झाला.[१९]

बाबा इ. स. १८४९ मध्ये जेव्हा 'फ्री चर्च विद्यालया'त जाऊ लागले तेव्हाचा काळ हा नव्या जागृतीच्या उदयाचा होता. सगळीकडे धार्मिक बाबतीत एक प्रकारचे चैतन्य निर्माण झाले होते. बाबांनी आपल्या आत्मचरित्रात या काळातील आपल्या मनःस्थितीचे रेखाटलेले चित्र पश्चातबुद्धीचे असले तरी महत्त्वाचे आहे. निषिद्ध गोष्टी व मद्यपान यापासून ते अद्याप-पर्यंत दूर होते तरी नैतिक शुद्धतेविषयी ज्ञानाच्या अभावामुळे असत्य भाषण व शपथा घेणे इत्यादी गोष्टी ते सर्रास करीत. देवाच्या उपासनेचा आपल्या आचारविचाराशी काही संबंध आहे, असे त्यांना वाटत नव्हते. धर्म व सत्य यांचे काही नाते असते किंवा धार्मिक सत्याची बूज राखावी लागते या गोष्टी त्यांच्या ध्यानीमनी नव्हत्या. वाडवडील व जनरीत याप्रमाणेच ते वागत. ब्राह्मण, बैरागी यांच्याबद्दल त्यांच्या मनात पूज्यबुद्धी वसत असे. कारण त्या वेळेपर्यंत त्यांच्या चारित्र्याचा, वर्तनाचा त्यांनी कधी विचारच केला नव्हता. त्यांना काही मांत्रिक मंत्रतंत्र देत, परंतु मांत्रिकांजवळ मितपणा व नेमस्तपणा यांचा अभावच दिसून येई, पावित्र्य, भक्ती व निष्ठा यांचा तर त्यांच्यापाशी गंध देखील नव्हता. मंत्रतंत्रवाद्यांचे शिष्य व्रतवैकल्ये व उपासतापास करीत. आपापले जपजाप्य, उपासना ते नियमित करीत. परंतु सदभिरुचीस न शोभणारे दुर्गुण त्यांच्या अंगी असत व एक प्रकारचे कलंकित जिणे ते जगत. तसेच सुधारणुकीसंबंधी शिकलेल्या तरुणांच्या त्यांच्या मनामध्ये या काळात मोठी खळबळ चालली होती. सन १८४८ सालापासून जातिभेद मोडावा व मूर्तिपूजा सोडावी याविषयी पुष्कळ तरुणांच्या मनात विचार येऊन त्यांची एकजूट झाली होती. तिला त्यांनी 'परमहंस सभा किंवा मंडळी' असे नाव दिले होते. ह्या काळात मुंबईत व महाराष्ट्र देशात धर्म व लोक समाज यांची स्थिती सुधारण्याकरिता व विद्यावृद्धी करण्याकरिता जे प्रयत्न चालू होते त्यात दक्षिणी भाषेत पुस्तके प्रसिद्ध करणारी मंडळी—दक्षिणा प्राइज कमिटी, मराठी ज्ञान प्रसारक मंडळी, कल्याणोन्नायक मंडळी, ज्ञान प्रसारक सभा इ. मंडळ्यांचे सुधारणुकीचे काम महत्त्वाचे होते. शिवाय या काळात डॉ. भाऊ दाजी यांजसारखे अन्य विद्वान होतेच.

इ. स. १८५० मध्ये भारतीय कायदे मंडळाने धार्मिक स्वातंत्र्याचा कायदा मंजूर केला. त्याची व्याप्ती सर्व देशभर होती. सर्व लोकांच्या जाहीर सभा सर्वत्र भरू लागल्या. त्यात मिशनऱ्यांचा प्रामुख्याने भाग असे. त्यापैकी रे. नारायण शेषाद्री व रे. जॉर्ज बोएनसाहेब यांचा उल्लेख आवर्जून करावा लागेल.[२०] ते दोघे मुंबईच्या प्रमुख रस्त्यांमधून दररोज उपदेश करताना दिसत. ही चर्चा जाहीर असे. तिचे स्वरूप अनौपचारिक असे. या दोन्ही मिशनऱ्यांना सहसा कुणी वाईट वागणूक देत असे. उलटपक्षी नारायण शेषाद्री यांनी जी संयमी व नम्र पद्धति स्वीकारली असल्यामुळे ते तर घरोघरी परिचित झाले होते. 'मुंबईचा पाद्री—नारायण शेषाद्री' असे त्यांचे नाव सर्वतोमुखी व यमकबद्ध झाले होते.

फ्री चर्च स्कूलमध्ये जाऊ लागल्यावर बाबांच्या मनावर नव्या शिक्षणपद्धतीचा जो परिणाम होऊ लागला त्याची परिणती खालीलप्रमाणे शपथ घेण्यात झालेली दिसते :

॥ श्री ॥

सकल विश्वाचा उत्पन्न कर्ता श्री जगद्गुरु सर्वोत्तम नारायण याच्या पवित्र चरणातें स्मरून मी शपथ करतो की आजपासून मी ह्या खाली लिहिलेल्या गोष्टी कदापि प्राण गेला तरीही करणार नाहीं व ईश्वर मला अशा गोष्टी करण्यास बुद्धी न देवो. जर मजपासून असे घडलें तर शतगोहत्त्येच्या पातकाचे फळ माझ्या मस्तकी पडो व यमराज मला अक्षय नरकांत टाको. (१) असत्य भाषण (२) चोरी (३) रंडीबाजी, व्यभिचार, शिंदळकी व तत्संबंधी कर्मे—लावण्या, नाच, तमाशा, ख्याली खुशाली, गप्पा. जर कदाचित यांतून कांही मजपासून कांही घडले तर तात्काळ हे परमेश्वरा तुझ्यापाशी क्षमा मागून पश्चाताप करीन, कां की तुझ्या दयेशिवाय मनुष्याचे कोणतेही चांगले उद्योग सिद्धीस जात नाहीत.

तारीख २५ ऑगस्ट १८४९.[२१]

नीतीसंबंधिच्या आचरणाचा बाबांनी लिहिलेला हा पहिलाच उल्लेख त्यांची परमेश्वराविषयक श्रद्धा व त्यांची आत्मोद्धाराची तळमळ व्यक्त करणारा होय.

बाबा आता नारायण शेषाद्री शिकवित असलेल्या वर्गात बसू लागले. लवकरच धर्मांतराच्या निमित्ताने निर्माण झालेला आकस कमी होऊ लागला. शाळा सुटल्यावर घरी येताना ते त्यांच्या बरोबर जाऊ लागले. तसेच त्यांच्या घरी होणाऱ्या खाजगी वर्गालाही बाबा जाऊ लागले. फ्रीचर्च विद्यालयात बाबांचे आध्यात्मिक शिक्षण फारच चांगल्या प्रकारे पूर्ण झाले. गणित व शुद्ध शास्त्रे सोडली तर प्रत्येक तासाला काही ना काही आध्यात्मिक संदर्भ येईच. तेथील धार्मिक शिक्षण बाबांच्या दृष्टीने प्रभावी व परिणामकारी ठरे. ख्रिस्ती धर्माचा अंकूर बाबांच्या मनात याच शाळेत रुजला असे म्हणता येईल. तेथे वरच्या वर्गात त्यांना रेव्ह. डॉ. विल्सन, रेव्ह. मिस्टर निसबीट व रेव्ह. मरे मिचल यांसारख्या विद्वान, कुशल व ज्ञानी अध्यापक व उपदेशकांच्या हाताखाली शिकण्याचे भाग्य लाभले.[२२] ते जी धर्मसंबंधी पुस्तके शिकवीत ती त्यांना फार उपयोगी पडली. वरच्या वर्गातही नारायण शेषाद्री चर्चचा इतिहास व सुधारणुकीचा इतिहास इ. विषय शिकवीत. विशेषतः सुधारणेचा इतिहास ते फारच तल्लीनतेने शिकवीत. ते तास बहारीचे होत. त्यापासून अनेकांना स्फूर्ती मिळे. लूथरच्या महान चरित्राचा बाबा पदमनजींच्या व त्यांच्या वर्गमित्रांच्या मनावर विशेष परिणाम झाला. त्यांना प्रेरणा मिळाली.

बाबांच्या मनावर परिणाम करणाऱ्या इतर काही गोष्टींचा उल्लेख करणे योग्य होईल फिरत्या ग्रंथ विक्रेत्याकडून घेतलेले ग्रंथ; *ज्ञानोदय*, *प्रभाकर*, *ज्ञानप्रकाश*, इ. नियतकालिके; काही धार्मिक पत्रिका; तसेच इंग्रजी व मराठीतील अनेक व्याख्याने; *प्रभाकरातून* प्रसिद्ध होणारी लोकहितवादींची 'शतपत्रे'—या सर्वांचा एकसंघ परिणाम त्यांच्या मनावर होणे स्वाभाविक आहे. आपण वाचलेल्या व काळजीपूर्वक परिशीलन केलेल्या पुस्तकांचा स्मरणपूर्वक उल्लेख केलेला आहे. त्यातील ग्रंथ पुढीलप्रमाणे आढळतात :

(१) *Doddridge's Rise and Progress of Religion in Soul.*

(२) *Dunyan's Holy War.*
(३) *James Anxious Enquirer.*
(४) *Lord Lytitleton's On Conversion of St. Paul.*

याखेरीज आणखी काही पुस्तकांची नावे त्यांनी आपल्या आत्मचरित्रात दिलेली आहेत. या पुस्तकांच्यापेक्षाही मोठा असा रे. डॉ. विल्सन यांच्या भाषणांचा परिणाम तत्कालीन लोकांच्या मनाप्रमाणेच बाबा पदमनजींच्या मनावरही झाला. एक कुशल मिशनरी व उत्तम संघटक तसाच तो ज्ञानी धर्मोपदेशक होता. तो मनमोकळी चर्चा करी. त्याचे ज्ञानपूर्वक भाषण श्रवणांना तृप्त करी. अंतःकरण जिंकी. इतर मिशनरी पण धार्मिक व्याख्याने देत. त्याचा पण फायदा बाबांसारख्याना मिळे.

आपल्या मनावर तत्कालीन नियतकालिकांचा परिणाम कसकसा झाला[२३] याबद्दलची त्यांची मीमांसा मूळातून पाहण्यासारखी आहे :

*ज्ञानोदय*, *प्रभाकर* व *ज्ञानप्रकाश* ह्या तीन पत्रांच्या वाचनाकडून मला धर्म व नीतिसंबंधी गोष्टींचा जो लाभ झाला तो पुरतेपणी सांगता येत नाहीं. रे. आर. डब्ल्यू. ह्यूम यांच्याशी ओळख ज्ञानोदयामुळे झाली. *प्रभाकर* पत्र रा. रा. भाऊ महाजन हे काढीत. हे गृहस्थ विद्वान असून पहिल्या प्रतीचे मराठी लिहिणारे होते. त्यांचाही मजवर फार लोभ होता. ख्रिस्ती धर्माविषयी त्यांचे मत असे होते कीं, मनुष्याच्या सामाजिक सुखाच्या वृद्धीसाठी हा धर्म फार चांगला आहे. त्यांच्या पत्रात 'लोकहितवादी' ह्या सहीची जी दीर्घ निबंधमाला लाभली होती तिजपासून मला फार उपयोग झाला. (ह्या मालिकेत १०० हून जास्त पत्रे होती.) ब्राह्मणधर्म व ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व यांजवरील माझी श्रद्धा व पूज्य बुद्धी ही उत्तरोत्तर नष्ट होण्यास ही पत्रमालिकाच बहुतेक अंशी कारणीभूत झाली. मी *ज्ञानप्रकाश*चा काही काळ एजंट होतो. ते मी फार मन लावून वाचत असे. त्यांत नितीविषयक निबंध वारंवार येत असत.[२४]

या तिन्ही पत्रात बाबांचे लेख वारंवार प्रसिद्ध होत. ख्रिस्ती मताच्या मनावरील पगडयामुळे हिंदुधर्माच्या अभिमान्यांनी काढलेली वर्तमानपत्रे बाबांना आवडेनाशी झाली. कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या नव्या वृत्तपत्राबद्दलची त्यांची प्रतिक्रिया बोलकी आहे : 'पुण्यात *विचार लहरी* या नावाचे एक ख्रिस्ती धर्मविरोधी पत्र १८५२ नांत निघूं लागले. तेही मी घेत होतो. त्यांतील विचार फारच हलकट व पोरकट होते. असले निंदक व बाष्कळ पत्र फार दिवस चालले नाही, व तें वाचल्यानें माझ्या धर्मविचारांत कांहीं फरक पडला नाही. केव्हां केव्हां मी ह्या पत्रास दुसऱ्या पत्रातून उत्तर देत असें'.[२५] यापुढे बाबा लिहितात : 'सारांश ह्या तिन्ही (*ज्ञानोदय*, *प्रभाकर* व *ज्ञानप्रकाश*) पत्रांकडून माझी तीन प्रकारची सुधारणुक झाली, म्हणजे *ज्ञानोदया*ने माझी ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयी व हिंदुधर्म ईश्वराप्रणित नाही यांविषयी खात्री केली. *प्रभाकरा*ने माझ्या मनांत ब्राह्मणविषयी पूज्यबुद्धी होती ती नष्ट केली आणि *ज्ञानप्रकाश*ने नास्तिक मताकडे माझी प्रवृत्ति होऊ दिली नाही'.[२६]

बाबा पदमनजी पहिल्यापासूनच सुधारणेस अनुकूल असणाऱ्या व धर्मांतर केलेल्या लोकांच्या

व मित्रांच्या संगतीत होते. त्या मित्रांशी मूर्तिपूजेसंबंधीं', जातिभेदासंबंधी, चर्चा होई. वादात मित्रांचा जय होई. मित्र त्यांना प्रत्यक्ष विचाराप्रमाणे आचरण्यास व पाव-बिस्किटे खाण्यास भाग पाडीत. त्या वेळी बाबांची फार पंचाईत होई. पाव-बिस्किटे खावी तर घरी आई रागावेल व कदाचित आपणास घराबाहेर जावे लागेल अशी धास्ती त्यांना वाटत असे. त्यांच्या मनातल्या या बाबतीतल्या फारच संघर्षाचे चित्रण त्यांनी केले आहे.[२७] लोक आपल्यावर बहिष्कार टाकतील, आपला अधिक्षेप करतील इत्यादी नाना शंका-कुशंका त्यांच्या मनात येत. तरीही त्यांचे मन सुधारणुकीकडे कळले होते. पुढे ह्या मित्रांनी त्यांना व त्यांच्या मताच्या दोघा तिघा मित्रास परमहंस मंडळीविषयी सांगून एका रात्री तिच्या सभेस नेले. जातिभेद मोडावा, विधवाविवाह रूढ करावेत. मूर्तिपूजा बंद करावी. हे या सभेचे मुख्य उद्देश्य होते. सभेच्या सभासदांनी एक हजार सभासद होईपर्यंत कमालीची गुप्तता राखावी असे ठरले होते. परंतु एका तरुण सभासदाने घेतलेली शपथ मोडली व सभेच्या इतिवृत्ताचा गौप्यस्फोट केला आणि सभासदांची यादीच प्रसिद्ध केली. हे सभासद लौकरच ख्रिश्चन होणार असा बोभाटा सर्वत्र झाला. बाबांच्या सासऱ्यांनाही अशा अर्थाचे पत्र गेले. या वेळी बाबांचे वडील साताऱ्याजवळ उडतऱ्यास होते. त्यांनी बाबांना एका माणसाबरोबर 'माझी मातोश्री फार आजारी आहे व तिच्याकरिता दोन वैद्य वाईहून आणले आहेत' अशी चिठ्ठी लिहिली. मजकूर वाचून बाबा मुंबईहून त्वरित उडतऱ्यास निघाले. वाटेतच त्या माणसाकडून बाबांना खरी हकीकत समजली. उडतऱ्यास घरी पोचल्यावर (सप्टेंबर १८५१) त्यांच्या नातेवाईकास फार आनंद झाला. त्यांनी महादेवाच्या देवळात बाबांना नेले व शिवापुढे नारळ ठेवण्यास सांगितला. बाबांनी नकार दिला. चिडलेल्या वडिलांचा सात्विक संताप 'भंग्यांची टोपली उचलणे व ख्रिश्चन होणे एकच' या शब्दात व्यक्त झाला.[२८] या काळात बाबा पदमनजी घरी जवळ जवळ दोन महिने होते. पण त्यांचे राहणे काही सुखासमाधानाचे झाले नाही. घरात शाक्तपंथीय व्रतवैकल्ये व धार्मिक विधी होत. त्यात बरीच उधळमाधळ होई. बराच खर्च होई. बाबांना शक्तपंथीय पंच'म'कारांचा अगदी वीट आला होता. बाबांना मुंबईस शिकण्यास परत पाठवायचे नाही असे ठरविण्यात आले होते, पण बाबांनी मात्र तसाच हट्ट धरला. त्यांनी वडिलांच्या हयातीत तरी ख्रिश्चन धर्म स्वीकरणार नाही अशी नकळत शपथ घेतली. मनाची स्थिती दोलायमान होती. या दोन महिन्यात घरी सणावाराच्या निमित्ताने बरीच धर्मकार्ये झाली, परंतु ती त्यांना रुचेनात. नाईलाजाने त्यांना मुंबईस पाठविण्यात आले. त्यांनी आपल्या मित्रमंडळीस व शिक्षकास साताऱ्यास काय काय घडले याचा सविस्तर वृत्तांत सांगितला. बाबांनी तशी शपथ घ्यावयास नको होती असे सर्वांचे मत पडले. काही काळाने, अशी शपथ घेण्यात आपण फार मोठी घोडचूक केली, असे त्यांनी वडिलांना स्पष्ट कळविले व आपणास शपथेतून मुक्त करावे अशी विनंती केली.

इ. स. १८५१ च्या डिसेंबरमध्ये बाबांनी परत फ्री चर्च विद्यालयात प्रवेश घेतला. तेथे बाबा व त्यांचे काही मित्र हे जणू धर्मविचाराने पछाडलेले होते. बाबा याविषयी लिहितात, 'मी मुंबईस सत्य शोधू लागल्यापासून बेळगांवी जाईपर्यंत फ्री चर्च विद्यालयात जी सत्यशोधकांची

टोळी झाली होती तिच्यांत ब्राह्मण, परभू, सोनार, शेणवी इ, जातींची मुले होती'.[२९] दर रवि-वारी ही मुले प्रार्थनेसाठी व चर्चेसाठी एकत्र येत. तेथे प्रामुख्याने बायबल वाचले जाई. या काळापर्यंत वेदान्त मताचा त्यांच्या मनावर पगडा होता, परंतु डॉ. विल्सन यांच्या व्याख्यानाने व त्यांनी केलेल्या भाषांतराने बाबांचे मत पालटले. वेदांचे निरुपयोगित्व त्यांच्या मनावर ठसले. वेदप्रणीत निसर्गोपासना, पूजा इत्यादी गोष्टी मूर्तिपूजेचेच प्रतीक आहे असे त्यांना वाटले. परमेश्वराचा विचार त्यांच्या मनावर पक्का झाला. धार्मिक व पारमार्थिक बाबतच्या अभ्या-सात त्यांना शिक्षकांची मदत झाली. ग्रंथांचे साहाय्य झाले. त्यामुळे त्यांचे घरातले वागणे, शाक्तपंथीय आचार-विचार हे सर्व पालटले. पापाची त्यांना घृणा वाटू लागली. पावित्र्य व पुण्याची आवड त्यांच्या मनात उत्पन्न झाली. केवळ बौद्धिक प्रगती अपुरी वाटू लागली तर आत्मोद्धार व पश्चाताप आणि श्रद्धा यांचा विचार ते करू लागले. ख्रिस्ती प्रार्थना, पाद्रयांचा उपदेश, व ख्रिस्तधर्म याकडे त्यांचा कल जाऊ लागला. आत्म्याच्या मुक्ततेसाठी ख्रिस्ती धर्म आवश्यक आहे असे त्यांना वाटू लागले.

बाबा पदमनजींच्या मनात व वर्तनात होत चाललेला बदल त्यांच्या वडिलांना समजला होताच. त्याचे कारण फ्री चर्च विद्यालय असे त्यांना वाटले. त्यांना त्या शाळेतून बाहेर काढ-ण्याच्या उद्देशाने काय केले सांगताना बाबा म्हणतात : 'त्यांनी माझ्या मनाची स्थिती जाणून मला मिशन स्कुलांतून काढण्याचा उपाय योजला तो असा कीं, मी ग्रांट मेडिकल कॉलेजात जाऊन वैद्यक शिकावें अशी त्यांनी इच्छा दर्शविली. ह्या इच्छेस मी आड आलो नाही. मलाही त्या विद्येचा अभ्यास करावासा वाटले आणि त्याप्रमाणे मी सन १८५२ मध्ये त्या विद्यालयात प्रवेश घेतला.'[३०] मेडिकल कॉलेजात बाबांनी जेमतेम आठ नऊ महिने काढले. त्यांचे मन वैद्य-काच्या विषयात रमेना. वैद्यकीय अभ्यासक्रमात ते आध्यात्मिक किंवा परमेश्वरविषयक माहिती शोधू लागले. त्यांना तेथे मानसिक अस्वास्थ्य वाटू लागले. त्यांच्या मनाचे समाधान तेथे झाले नाही. त्यांनी त्या विद्यालयातून बाहेर निघण्याचा प्रयत्न केला. शेवटी त्यांनी मेडिकल कॉलेजला रामराम ठोकला.[३१] मेडिकल कॉलेजातून निघाल्यावर पुनः फ्री चर्च विद्यालयात बाबा जाऊ लागले. तेथे त्यांनी आपला पूर्वीचा अभ्यास सुरू केला.

बाबांनी मेडिकल कॉलेज सोडले, याबद्दलचे दुःख एकीकडे व दुसरीकडे बाबांचा ख्रिस्ती-धर्माकडचा विलक्षण ओढा, यामुळे त्यांच्या वडिलांना झालेले दुःख व त्यांचा विरोध एका महत्त्वाच्या घटनेमुळे कमी होत गेला असे दिसते.[३२] ही घटना म्हणजे बाबांचे विद्यार्थिदशेतील ग्रंथलेखन. सन १८५१ पासून सन १८५४ च्या मध्यापर्यंत त्यांची पाच पुस्तके प्रसिद्धीस आली. त्याहीपूर्वी बेळगावातील मिशन शाळेत असताना बाबांनी दोन पुस्तके लिहिली होती.[३३] या काळामध्ये निरनिराळया कमिटयांकडून बक्षिसे लाविल्यामुळे बाबांनी हौसेने व पोट-तिडिकेने हे ग्रंथलेखन केलेले दिसते. त्यातील *स्त्रीविद्याभ्यास निबंध* ह्या ग्रंथास डॉक्टर लीथ याने ट्राक्ट सोसायटीतर्फे १०० रुपयांचे बक्षिस दिले. या विषयावर मोठमोठया पाच पंडितांनी लिहिलेल्या ग्रंथांपेक्षा बाबांनी लिहिलेल्या ग्रंथास प्रथम बक्षिस एकमताने देण्यात आले आहे.[३४] *हिंदु लोकांच्या सणाविषयी निबंध* या पुस्तकासही असेच मुंबईतील

पुस्तके व निबंध करणाऱ्या मंडळाने १०० रुपयांचे बक्षिस दिले.[३५] *कुटुंबाची सुधारणा* व *निबंधमाला* या दोन पुस्तकांना दक्षिणा प्राइज कमिटीने अनुक्रमे १५० व १२५ रुपयांची बक्षिसे दिली आहेत.[६३] *व्यभिचारनिषेधकबोध* हे पुस्तक मात्र बाबांनी स्वतः छापून प्रसिद्ध केले आहे व प्रसिद्धीसाठी मदतीचे आवाहनही जनतेला केले आहे. प्रसिद्धीपूर्व नोंदणी करणाऱ्यांना बाबांनी सवलतीची किमतही अगोदरच जाहीर केली आहे. म्हणजेच सवलतीने प्रसिद्धीपूर्व पुस्तकाची नोंद करण्याचा हा प्रघात जवळ जवळ १२५ वर्षे इतका तरी निश्चितच जुना आहे.

इ. स. १८५४ साली बाबांच्या वडिलांची बदली साताऱ्याहून बेळगावास झाली. १८५४ च्या एप्रिल महिन्यात मुंबई सोडून आपल्या मातापितरांच्या समागमे समुद्राच्या मार्गाने बाबांना बेळगावास जावे लागले. तेथे गेल्यावर बाबांचा व त्यांच्या आईवडिलांचा बराच वादविवाद झाला. बाबांनी सरकारी चाकरी करावी व स्थैर्य मिळवावे असे त्यांना वाटे. या उलट बाबांना वाटे की आपण आपल्या मातापित्यांना ख्रिस्ती सत्याचा परिचय करून द्यावा. एकदा घरी एक धर्मकृत्य असे निघाले की बाबांशिवाय अन्य कुणी ते करून चालणार नव्हते, पण बाबांनी तर मनाशी ठरविल्याप्रमाणे ठामपणे त्या गोष्टीस नकार दिला. कारण मूर्तिपूजेसंबंधी कोणतीही गोष्ट करावयाची नाही असा त्यांचा निश्चय झाला होता. त्यावेळी त्यांना रात्रंदिवस तळमळत रहावे लागले. अखेर त्यांनी आपला तारक व रक्षणकर्ता याचा स्वीकार करण्याचे ठरविले, तेव्हा त्यांच्या मनास समाधान व शांती लाभली.

त्यानंतर काही दिवसांनी बाबांनी आपला निश्चय रे. टेलर यांना सांगितला. टेलरसाहेब बेळगावासच होते. बाबांनी टेलर साहेबांच्याकडेच आश्रय मागितला. रे. टेलर साहेबांनी मुंबईस डॉ. विल्सन यांना पत्र पाठविले व त्यांचा सल्ला बाबांच्या संदर्भात मागवला. त्यांचे पत्र आल्यावरच बाबांचा बाप्तिस्मा पार पाडण्याचे ठरविले. तोपर्यंत बाबांनी टेलर साहेबांच्या बंगल्यावर राहावे असे ठरले. १ ऑगस्ट १८५४ रोजी रविवारी बाबा चर्चमध्ये प्रार्थना करण्यासाठी गेले व नंतर टेलर साहेबांच्या बंगल्यावरच गेले. त्यांना आपल्या शिरावरचे पापचे ओझे उतरल्यासारखे वाटले. बाबा या संदर्भात लिहितात : 'मी जरी स्वानंदाच्या साम्राज्यात राहत होतो तरी माझे नातलग फार निराश होते. दुसऱ्या दिवशी माझी आई माझ्या भावंडासह मला तिच्या बरोबर नेण्यासाठी (टेलर साहेबाच्या) बंगल्यावर आली. मी तिच्या पाठोपाठ जाईन अशी तिची खात्री होती. तिने मला खूप विनविले. ही आमची भेट फारच शोकात्मक होती. त्यावेळी केवळ परमेश्वरानेच मला आधार दिला.'[३७] बाबांचे मन वळवण्याचे सर्वांचे प्रयत्न निष्फळ झाले. बिचारी आई विदीर्ण अंतःकरणाने मोठ्याने शोक करू लागली. ती बाबांना व टेलर साहेबांना शिव्याशाप देऊ लागली. ती व्याकुळ अंतःकरणाने घरी परतली. पण चौथ्या दिवशी तिने बाबांचे कपडे व काही पैसे पाठवून दिले. तसेच आणखी काही पैसे पाठविण्याचे आश्वासन पण तिने त्यांना दिले. जिल्ह्याच्या फिरती-वरून वडील परत आल्यावर ते बाबांना भेटले. मग बाबा पण घरी जाऊ लागले. नातलगांना भेटू लागले. बाबांचे वडील या वेळी फार समजुतीने व धोरणाने वागले असे दिसते.

मुंबईहून बाबांच्या शिक्षकांचा सल्ला आला. त्यात डॉ. विल्सन यांचे पत्र महत्त्वाचे होते. ते लिहितात : 'तुम्ही वैचारिक कोषांतून, वर्तमानकालीन संघर्षांतून मुक्त व्हा. हे सत्याविषयीचे कर्तव्य तुम्हाला व तुमच्या आत्म्यास समाधान देईल.'[३८] अखेर बाबाच्या बाप्तिस्म्याचा दिवस नक्की ठरला. ३ सप्टेंबर १८५४ रोजी सायंप्रार्थनेनंतर मि. बेनन यांनी उपदेश केला. मि. टेलर यांनी धार्मिक विधी केला. अशा तऱ्हेने बाबा पदमनजींचे धर्मांतर झाले. आपण धर्मांतर का केले याची सविस्तर कारणे बाबा पदमनजींनी *ज्ञानोदयात* प्रसिद्ध केलीच होती. *अरुणोदय* या आपल्या आत्मचरित्रात तीच कारणे त्यांनी दिली आहेत.[३९] त्या काळातल्या विविध वृत्तपत्रातून बाबांच्या धर्मांतराबद्दलच्या प्रतिक्रिया व्यक्त झाल्या आहेत. *ज्ञानप्रकाशने* लिहिले :

> बाबा पदमनजी कासार. राहाणार मुंबई. यांनी गेल्या २० वे तारखेस ख्रिस्ती धर्म बेळगावास स्वीकारला. हे वृत्त सर्व वर्तमानपत्रांतून छापून प्रसिद्ध झाले आहे. परंतु आम्हास एका आमच्या मित्रांस एक घरगुती पत्र आले त्यावरून असे समजते की, सदरहू गृहस्थाने आपल्या बायकोस समागमे नेण्याविषयी पुष्कळ यत्न केला. परंतु तिने त्यांच्या गोष्टीस मान्य केले नाही. बाबा पदमनजी हा इंग्रजी शिकलेला आहे. परंतु त्याचा कल पुष्कळ दिवसापासून ख्रिस्ती धर्माकडेच असे. त्याने *स्त्री विद्याभ्यास निबंध, सणाविषयी निबंध, व्याभिचारनिषेधकबोध* आदि करून पुस्तके मराठीत केली आहेत. त्यांत बैबलांतील वाक्ये घातली आहेत व श्रुतिस्मृतीसारखी गौरवून लिहिली आहेत. यावरून त्याची श्रद्धा त्या धर्मावर आहे असे स्पष्ट दिसते.[४०]

धूमकेतू लिहितो :

> बाबा पदमनजीने स्वदस्तुरचे लांबलचक पत्रांत ख्रिस्तीधर्म राजीखुषीने व अक्कल हुशारीने त्याने कसा स्वीकारला हे वृत्त लिहिले आहे. सर्व मनुष्यांस आपापल्या घरी शहाणपणाचा ताठा असतोच. आणि हा क्रम दीर्घकाळापासून चालत आला आहे. तेव्हां बाबा पदमनजीने जे लिहिले आहे त्याचा मोठा हर्ष मानावा असे नाही. परंतु आपण जे करितो तेच लोकांनी आचारावे हे बरीक बोलणे हास्यास्पद होय.[४१]

*वर्तमानदीपिकेतील* याबाबतचे आणखी हे एक वृत्त पाहा :

> गेल्या आठवड्यांत अशी दाट बातमी जिकडें तिकडे उठली होती व ती खरी असे आम्हास एका उत्कृष्ट आधारावरून समझले आहे की, राजश्री म्हणता येत नाही, सबब मिस्तर बाबा पदमनजी यांनी बेळगावांस रेवरंड टेलर याजपासून ख्रिस्ती धर्माचा अनुग्रह घेऊन ते आता स्वर्गपंथाच्या दिशेस लागले. अलिकडच्या काळात मराठी लिहिणारात बाबा पदमनजी मोठा प्रख्यात होता. त्यांस इंग्रजीचेही बरें ज्ञान होते. अस्तु. आतां येशु ख्रिस्ताच्या पवित्र धर्माने तरी बाबांचे तारण होवो. बळीरामासारखा दररोज नवा धर्म न होवो असे आमचे म्हणणे आहे.[४३]

ही बातमी वाचल्यावर काही जण *वर्तमानदीपिकेवर* रागावले. त्यांच्यासाठी त्यांनी पुढे आणखी एक खुलासा याच संदर्भात प्रसिद्ध केला तो असा :

गेल्या अंकात आम्ही मि. बाबा पदमनजींनी ख्रिस्ती धर्माचा अनुग्रह घेतल्यावरून असे लिहिले होते की, 'आता येशू ख्रिस्ताच्या पवित्र धर्माने तरी बाबांचे तारण होवो. बळीरामासारखा रोज नवा धर्म न होवो.' असे आमचे म्हणणे आहे हे वाचल्यापासून आमच्या कित्येक मित्रांस फार वाईट वाटले, असे आमच्या पाहण्यांत येतें. आम्ही खरोखर द्वेषबुद्धीने लिहिले नाही व बाबांचें व आमचें बऱ्याच रीतीचे मित्रत्व आहे. परंतु बाबानें स्वधर्म सोडून परधर्माचा स्वीकार केला हें आम्हांस योग्य दिसत नाहीं. स्वधर्माचें तत्व बाबांस प्राकृत पुराणे वाचून कितपत कळलें आहे. हें उघडच आहे. तर आम्हांस असें वाटतें की, हिंदु धर्माच्या बाह्यतः दिसणाऱ्या गोष्टी पाहून त्या त्यांस खोट्या दिसल्या व त्यामुळें त्यांनें स्वधर्म सोडला. परंतु ही गोष्ट चांगली झाली नाहीं म्हणून आम्ही लिहिलें, यांत त्यास वाईट वाटलें असल्यास आमचा उपाय नाही.[४३]

बाबा पदमनजींच्या आगेमागे साऱ्या हिंदुस्थानात ख्रिस्ती धर्मप्रसारकांच्या कार्यामुळे धर्मांतराची जणू एक लाटच पसरली होती. मुंबईस धनजीबाई नवरोजी[४४] या पारशी गृहस्थाचा आणि नारायण शेषाद्री या दाक्षिणात्य तरुणाचा अनुक्रमे १ मे १८३९ व १३ सप्टेंबर १८४३ रोजी बाप्तिस्मा झाला होता. त्यापूर्वीच १८३२ मध्ये बंगालात कृष्णमोहन बॅनर्जी, मोहनचंद्र घोष आणि अरुणचंद्र मुजुमदार यांनी व त्यांच्या मागोमाग लालबिहार डे व मायकेल मधुसूदन दत्त यांनी ख्रिस्ती धर्माला कवटाळले होते. दक्षिणेत त्रिचनापल्लीच्या सत्यनाधन यांनी १८४७ साली व त्याच सुमारास मौलवी सफदरअल्ली यांनी जबलपुरास व डॉ. इमादुद्दीन यांनी पेशावरास व काशीच्या नीळकंठशास्त्री गोऱ्हे या महाराष्ट्रीय ब्राह्मणाने १८४८ साली ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला होता. त्यानंतर लाहोरचे महाराज दुलिपसिंग यांनी वयाच्या सोळाव्या वर्षी १८५३ मध्ये अगदी स्वेच्छेने ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली होती व त्यांच्यानंतर लगेच कलकत्याच्या ज्ञानेंद्रमोहन टागोर यांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यामुळे सगळीकडे एक प्रकारची खळबळ माजली होती व हाच एक महत्त्वाचा असा चर्चेचा विषय होऊन गेला होता.[४५]

बाबांच्या धर्मांतराचा सर्वदूर परिणाम झालेला दिसतो. त्यांनी १८८८ साली लिहिलेल्या *अरुणोदय* या आत्मचरित्राचे जगातील महत्त्वाच्या भाषात भाषांतर झाल्यामुळे या परिणामाची तीव्रता वाढणे साहजिकच होते. शं. बा. कुळकर्णी, कविवर्य नारायण वामन टिळक, पं. रमाबाई इ. धर्मांतरित ख्रिस्तभक्तांना तर बाबांचे लेखन व कार्य यांनी प्रेरणा मिळालीच, परंतु महात्मा जोतीबा फुल्यांसारख्या कर्त्या सुधारकालाही ख्रिस्ती मताने विद्यार्थिदशेत झपाटले होते. जोतीबा तरुणपणी आपले सहकारी वाळवेकर व परांजपे यांच्यासह ख्रिस्ती धर्मात जाण्याच्या विचारात होते.[४६] जोतीबांनी प्रत्यक्षपणे ख्रिस्ती धर्म स्वीकारला नसला तरी त्यांना बाबांच्या कार्यापासून स्फूर्ती मिळाली होती हे खरे !

हिंदुधर्मात राहून मनातील अज्ञान व अविद्या यांचा नाश करता येत नाही; सत्यशोधन व असत्यमुक्ती यासाठी ऋषिप्रणीत हिंदुधर्मातील वचने उपकारक ठरत नाहीत; नाना प्रकारच्या विद्या व ज्ञान यांनी बुद्धीचे समाधान झाले तरी अंतःकरणाचे समाधान करण्यास शेवटी धर्मच कारणीभूत होतो आणि आचारास प्राधान्य असलेल्या ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्याने

आपल्या अंतःकरणाचे समाधान झाले, हिंदुधर्मातील मूर्तिपूजा, जातिभेद, व्रतवैकल्ये इ. देवाधर्माच्या विपरीत समजुतीतील वैय्यर्थ लक्षात येऊन भूतप्रेतपिशाच्चादिकांची पूजा व शकून-ज्योतिषासारख्या अडाणी लोकभ्रमाचारणातील विलक्षण ढोंग आणि वेदान्ताचा शुष्क काथ्याकूट मिथ्या असल्याची जाणीव झाल्यानेच आपण ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याचे बाबांनी विस्ताराने सांगितले आहे.[४७] 'मानवधर्मसभा' किंवा 'परमहंस मंडळी' याही बुद्धिप्रधानच असल्याने भावनेची भूक भागविण्यासाठी बाबा पदमनजीसारख्यांना ख्रिस्ती धर्मात जावे लागल्याचे प्रियोळकरांनीही म्हटले आहे.[४८]

ख्रिस्ती झाल्यानंतर बाबा पदमनजी मुंबईस गेले व तेथे त्यांनी फ्री चर्च विद्यालयात शिक्षकाचे काम पत्करले व ईश्वरी विद्या शिकण्याच्या वर्गात त्यांनी नावही घातले. परंतु प्रकृती नादुरूस्त असल्यामुळे त्यांना वर्ग सोडावा लागला. पुढे बेळगावी त्यांच्या वडिलांवर दोन फिर्यादी झाल्याने त्यांच्या मदतीसाठी बेळगावी काही दिवस राहावे लागले.[४९] १८५८ च्या सुमारास तेथून ते मुंबईस गेले; व लवकरच पुण्यास आले. तेथे ते सुमारे १६ वर्षे राहिले. पुण्यासच त्यांचे पहिले ख्रिस्ती लग्न १८६० साली झाले. या लग्नासाठी बाबांच्या वडिलांनी त्यांना शंभर रुपये दिले होते. बाबांच्या हिंदु पत्नीच्या साडी-चोळीची व जेवणाखाण्याची जबाबदारी त्यांच्या वडिलांनी अगोदर स्वीकारली होतीच. स्वतःच्या बाप्तिस्म्यानंतर बाबांनी आपल्या हिंदू पत्नीस ख्रिस्ताचा स्वीकार करण्यासाठी तयार करण्याबाबत प्रयत्न केलेच होते. परंतु पत्नीच्या वडिलांच्यामुळे ते प्रयत्न अयशस्वी झाले. त्यामुळे इ. स. १८५७–५८ च्या सुमारास बाबांना हिंदू पत्नीपासून घटस्फोट घ्यावा लागला. घटस्फोटाच्या खर्चासाठी त्यांना त्यांच्या *यमुना-पर्यटन* या विधवेच्या जीवनावर रचलेल्या कादंबरीमुळे २०० रुपये मिळाले. त्यानंतर इ. स. १८६२ साली त्यांची हिंदू पत्नी त्यांच्याकडे परत येऊ इच्छित होती. पण ख्रिस्ती लग्न झाल्यावर व ख्रिश्चन धर्माप्रमाणे बाबा पदमनजींना तिचा स्वीकार करता येण्यासारखा नव्हता. बाबा पदमनजींनी ऐन विशी-पंचविशीत हे धर्मांतर केले. यापूर्वीच त्यांनी पापे न करण्याची शपथ घेतली होती.[५०] पाद्र्याजवळ पापांचे उच्चारण (self confession) व पापांबद्दल पश्चाताप व्यक्त करून आत्मोध्दार करण्याची ख्रिस्ती धर्मात सोय आहे. तशी हिंदुधर्मात नाही. कदाचित यासाठी पण बाबा पदमनजींनी धर्मांतर करण्याची शक्यता होती. प्रख्यात चरित्रलेखक धनंजय कीर यांनीही असेच म्हटले आहे.[५१]

पुण्यात असताना बाबांनी बराच काळपावेतो फ्री चर्चच्या मिशन शाळेत शिक्षकाचे काम केले. हे काम करीत असता त्यांनी मेजर कॅन्डीच्या इंग्रजी मराठी कोशाचा संक्षेप केला. हे काम बरेच महत्वाचे व जाणकारीचे होते. प्रकृती अशक्त होती तरीही श्रमाची पर्वा न करता त्यांनी हे काम पूर्ण केले. या काळात वर्तमानपत्रात लेखन, धर्मसमीक्षा, चर्चा, व्याधिग्रस्तांच्या भेटीगाठी,[५२] धाकट्या *सत्यदीपिके*चे संपादन व मुख्य काम शिक्षकाचे असा त्यांचा बहुविध उद्योग होता. ही गोष्ट त्यांच्या डायरीच्या एका पानावरून स्पष्ट होते.[५३]

दुसऱ्यांच्या गुणांचे कौतुक करण्यात, कदर करण्यात बाबा अतिशय तत्पर होते. १८६६ साली अहमदनगर येथे काम करणारे रे. हेनरी बॅलंटैन, त्यांच्या पत्नी व रेव्ह. जॉर्ज बोअेन

या लोकांच्या गुणांचे कौतुक करण्याच्या दृष्टीने त्यांच्या नावाने शिष्यवृत्ती सुरू करण्याचा प्रयत्न बाबांच्या खटपटीने झाला.[५४] त्यासंबंधीचे त्यांचे *ज्ञानोदयातून* विनंतीपत्र प्रसिद्ध झाले होते.[५५] पदमनजी माणिकजी, शेख दाऊद, अॅडम व्हाईट, नारायण शेषाद्री व कृष्णशास्त्री पंडित, शाहु दाजी कुकडे ,म. फुले, जनार्दन रामचंद्र, डॉ. बिसल इत्यादिकांचे मृत्युलेख लिहिण्याचा बाबांवर प्रसंग आला, त्यातून बाबांच्या व्यापक भ्रातृभावनेचा प्रत्यय येतो.

७ एप्रिल १८६७ रोजी बाबा पदमनजींची पुणे येथे फ्री चर्च मिशनच्या मंडळीचे पालक म्हणून दिक्षा झाली. त्याप्रसंगी मुंबईचे डॉ. विल्सन हे अध्यक्षपदी होते. रे. नायारण शेषाद्री उपस्थित होते. आधल्या वर्षी, म्हणजे इ.स १८६६ साली. बाबा अहमदनगर येथे मि. मॅकफर्सन यांना पाळकाच्या कामात मदत करण्यास गेले होते. त्यानंतर त्यांच्या पाळकाच्या दीक्षेपूर्वीच्या जितक्या परीक्षा असतील तितक्या लवकर घेण्याची शिफारस मुंबईच्या प्रेस्बिटरीला करण्याचे ठरले. पण पाळकपदाची दीक्षा त्या मानाने वेगानेच पार पडली. ही एक ईश्वरीयोजना असे त्यांना वाटले. नंतर पाचसहा वर्षे पाळकदाचे काम पूर्ण निष्ठेने व जबादारीने पार पाडल्यावर १८७३ साली त्यांनी पाळकपदाचा राजीनामा दिला. त्यानंतर त्यांनी लेखन हाच व्यवसाय म्हणून पत्करला. ते आपल्या लेखणीचा अप्रतिहत उपयोग करू लागले. कँडी व मोल्सवर्थ यांच्या शब्दकोशांच्या संक्षेपाची जबाबदारीची कामे त्यांनी यापूर्वीच पार पाडलेली होती. हौसेने व ख्रिश्चियन लिटरेचर सोसायटीकरता त्यांनी अनेक ट्रॅक्टस् केले व काही नियतकालिकेही चालविली. राजीनामा देण्याच्या अगोदरच बाबांच्यावर कौटुंबिक आपत्ती आली ती म्हणजे त्यांची ख्रिस्ती पत्नी सेराबाई ही इ. स. १८७२ मध्ये निधन पावली.[५६] सेराबाईची बहीण हन्नाबाईने आपल्या बहिणीच्या मुलांच्या प्रीतीने बाबांशी लग्न लावले. ती इ. स.१८७९ मध्ये नाशिकला शरणपूर येथे मरण पावली.[५७] अशा प्रकारे बाबा पदमनजींवर एका मागून एक संकटे येतच होती.

सन १८७२ साली पुण्यास इन्फ्ल्यूएंझाची साथ आली. त्यावेळी बरेच लोक बाबांच्या ख्रिस्ती मंडळीत आजारी पडले. त्यांच्यासाठी प्रार्थना व इतर गोष्टी त्यांनी केल्या. पाळकपणाचे काम सोडल्यावर नऊ वर्षे बाबांनी केवळ आपल्या लेखणीच्या जोरावरच स्वतंत्रपणे आपल्या आपल्या कुटुंबाचे पोषण केले. द्रव्यसंपादनार्थ त्यांनी कसोशीने यत्न केलाच नाही. शक्यतो कर्ज न काढणे, याचना न करणे, द्रव्यसंचयाचा प्रयत्न करणे याच गोष्टींमुळे आपण, आपला वाढता संसार, वाढती महागाई यांच्याशी मुकाबला करू शकलो, असे त्यांचे मत होते. या कामात आपणास सतत परमेश्वरी साहाय्य होते असा त्यांचा विश्वास होता. त्यांच्या कामाचे प्रतीक म्हणजेच त्यांनी लिहिलेली शंभर सव्वाशे पुस्तके होत. त्याशिवाय त्यांचे वृत्तपत्रातील लेख, पुस्तकपरीक्षणे, अग्रलेख, भाषणे व त्यांचा समृद्ध पत्रव्यवहार इ. सर्व वाङमयसंभार पाहता बाबा पदमनजींच्या उद्योगाची व तळमळीची कल्पना येते.

सन १८७८ मध्ये बाबा पदमनजींनी बायबल सोसायटीच्या व ट्रॅक्ट सोसायटीच्या संपादनाची जबाबदारी स्वीकारली.[५८] त्यापैकी बायबल सोसायटीत त्यांचे काम बायबलचे मराठी भाषांतर तपासणे, बायबल छापून झालेले भाग पाहणे, प्रुफे तपासणे छपाई व्यवस्थित करून

घेणे हे होते.[५९] ह्याशिवाय सध्या आपल्याला विषयानुक्रमे मथळे दिलेले मराठी बायबल मिळते. ते काम बाबा पदमनजींनीच केलेले आहे. त्याच सौसायटीची एक ट्रान्सलेशन कमिटी होती. तिचेही बाबा मेंबर होतेच. तेथे बाबांनी इतके मन लावून काम केले की लवकरच कोणत्याही शिफारशीशिवाय ब्रिटिश ॲंड फॉरेन बायबल सोसायटीने त्यांना आपल्या कमिटीचे ऑनररी फॉरेन मेंबर करून घेतले.[६०] तसेच बाबा पदमनजींनी जुन्या कराराचे संशोधन पण आपली कन्या एस्तर हिच्या साहाय्याने केले आहे. हे काम फार कष्टाचे होते. त्यानंतर बाबांच्यावर एक महान संकट कोसळले आणि ते म्हणजे बाबांच्या तिसऱ्या कुटुंबाचे निधन होय.[६१] ही घटना इ. स. १८९० च्या ऑगस्ट महिन्यात घडली. २८ ऑगस्ट १८९० च्या *ज्ञानोदयात* या दुःखद बातमीचे वृत्त छापलेले आढळते.[६२] बाबांचे हे तिसरे ख्रिस्ती लग्न इ. स. १८८१ मध्ये झाले होते.

तिसऱ्या पत्नीच्या मृत्यूनंतर बाबा फारच खचले होते. शास्त्रसंशोधन, ग्रंथलेखन, या लिखाणाच्या कामात त्यांना त्यांच्या कन्येची–एस्तेरची–खूपच मदत होत असे. बाबांना ती वृद्धपणी एखाद्या तळहाताच्या फोडाप्रमाणे जपे. बाबांची दृष्टी मंद झाली तरी कन्येच्या डोळयांनी त्यांचे अपरंपार साहाय्य केले.[६३] बाबा आयुष्याच्या अखेरीपर्यंत अविश्रांत वाचत होते, लिहीत होते. त्याचे बरेचसे श्रेय एस्तेरकडेच जाते.

बाबा पदमनजी किती तत्वनिष्ट होते यासंबंधीची एक दंतकथा[६४] सांगतात. एकदा एक विधवा बाई बिनापरवानगी बाबांच्या बागेत फुले तोडीत होती. बाबांनी हे पाहिले. बाबांनी विचारले, 'फुले कोणाला विचारून तोडता आहात? ही फुले तुम्हाला कशासाठी हवी आहेत?' विधवा बाई म्हणाली, 'देवपूजेसाठी फुले तोडली आहेत.' बाबा रागावले व उद्‌गारले, 'देवपूजेसाठी फुले मुळीच मिळणार नाहीत. ठेवा ती फुले.' मूर्तिपूजेसाठी आपल्या बागेतील फुले देणे बाबांना मंजूर नव्हते व तसेच ते वागले. त्या बाईच्या राग-लोभाची पर्वा त्यांनी केली नाही. अशी तत्त्वनिष्ठा वेळोवेळी बाबांच्या जीवनात दिसली.

बाबा 'टेंपरन्स युनियन' म्हणजे दारू वगैरे कैफी पदार्थवर्जक मंडळीचे एक सभासद होते.[६५]

बाबा पदमनजी भिडस्त स्वभावाचे होते. माणुसकीच्या नात्याने ते लोकांशी वागताना त्यांना नेहमीच त्रास होई. त्यांच्या मुलीच्या लग्नाच्या वेळी त्यांच्या या स्वभावाचा पुरेपूर प्रत्यय आला. *ज्ञानोदय*कारांनी तिच्या लग्नानंतर एक स्फुटच लिहिले. ते पुढीलप्रमाणे:

> मित्रा आमंत्रणावाचून का आलास? एखाद्या सार्वजनिक आमंत्रण चिठ्या नसतात तेथे किंवा दुसऱ्या सभास आमंत्रणावाचून गेल्यास हरकत नाही. तथापि लग्नाच्या मेजवानीस किंवा अशा दुसऱ्या स्नेहमेळचास कोणाच्या घरी जाणे बरे नाही. रे. बाबा पदमनजी यांच्या कन्येचे लग्न झाले. त्यावेळी लग्नाच्या मेजवानीस आमंत्रितांखेरीज दुसरे काही लोक चहा केकांवर हात मारण्यास आले होते. सुशीला ताराबाईच्या चहा केकाचे खमंग ढेकर देऊन त्या मंडळीने तिला आशिर्वाद दिले असतील व त्यांच्या आशिर्वादाने ती आपल्या पतिगृही आता आनंदाने राज्य करीत असेल ना?

अशाने यजमानाच्या बेताप्रमाणे आमंत्रित लोकांची योग्य व्यवस्था करण्यास अडचण येते

व दुसऱ्या काही कारणामुळे त्यांला वाईट वाटते म्हणून आगंतुक लोकांनी असे करू नये हे बरे. यजमान सज्जन व भिडस्त असल्यामुळे कोणास हाकून लावीत नाही हे खरे, तथापि मिवा आमंत्रणावाचून येथे का आलास? असे म्हणून कोणाची मानहानी करीपर्यंत किंवा त्याला बाहेर लावीपर्यंत असा क्रम चालू द्यावा हे बरे नाही.[६६]

याच भिडस्त स्वभावाने त्यांनी *सत्यदीपिके*चे अंक वर्गणी न देणाऱ्या वाचकांना त्यांच्या सज्जनत्वावर विश्वासून पाठविले होते. काही विद्यार्थ्यांना ते आर्थिक मदत करीत. आपल्या शब्दकोशाची तर कागद-नमूना-छपाई याची इत्थंभूत कल्पना ग्राहकांना अगोदरच देत. इतका साक्षेप त्या काळात विरळाच.

बाबांना लेखन, वाचन, भाषण यांचे जणू व्यसनच लागले होते. त्यांनी कापावरील (कँपातील) फ्री चर्च भजनालयात स्वच्छता व प्रतिष्ठितपणा या विषयांवर निबंध वाचल्याचा *ज्ञानोदयात* उल्लेख आहे.[६७] मिसेस नारायण शेषाद्री यांच्या आजारापणात त्यांना वारंवार जाऊन भेटणे, त्यांच्यासाठी प्रार्थना करणे, त्यांना वरचेवर शुभवर्तमान वाचून दाखवणे, यासारख्या गोष्टी त्यांनी मोठ्या आत्मीयतेने केलेल्या दिसतात.[६८] मिस्टर नारायण शेषाद्री यांच्या मृत्यूनंतर त्यांचा सविस्तर परिचय, थोरवी व निधनाचे वृत्त इ. त्यांनी तत्परतेने प्रसिध्द केलेल्या आहेत.[६९] आपल्या स्वतःच्या वडिलांच्या निधनानंतरही बाबांनी *ज्ञानोदयात* व *सत्यदीपिके*त लेख लिहिले होते.[७०] बाबा विविध प्रसंगांना अध्यक्ष म्हणून उपस्थित राहत. कधी ते भाषणे करीत, कधी उपदेश करीत, तर कधी कधी बक्षिसे देखील वाटत असत. त्यांच्या हस्ते बक्षिस समारंभ झाल्याचा पण उल्लेख सापडतो.[७१] ते थोडक्यात समयोचित भाषणे करीत, त्यांची स्फूर्ती व प्रेरणा मिळणारी व्याख्याने ऐकली की सभा त्यांच्या बाजूची होई. बाबा सहजगत्या सभा जिंकीत असत.[७२] अशी त्यांची बहुविध कामगिरी सतत चालू असे.

इ. स. १८८७ साली महाराणी व्हिक्टोरिया यांच्या ज्युबिलीच्या प्रसंगी बाबांनी मनापासून पुष्कळ काम केले. त्यांनी वर्गणी जमविण्यात पुढाकार घेतला होता. विविध सभा घेणे, पैसे जमवणे, जमलेल्या पैशांचा हिशेब देणे इ. काहींचा उल्लेख करता येईल. याचा बोलका पुरावा म्हणून त्यांची जाहीर पोहोच पुढे दिलेली आहे :

आदरपूर्व स्वीकार

गुजराथ, मुंबई, पुणे, सोलापूर, सातारा, कोल्हापूर, बेळगांव, रत्नागिरी, मालेगांव, अहमदनगर, जालना व इतर ठिकाणें, येथील प्रीय ख्रिस्ती भावांस, पश्चिम हिंदुस्थानांतील एतिहाशीय ख्रिस्ती ऐक्य प्रदर्शन सभेचा सलाम.

आपण सभेच्या सूचनेवर आपल्या दयाळू महाराणींच्या ज्युबिलीच्या प्रसंगी मानपत्र पाठविण्याकरिता जी वर्गणी मोठ्या उदार बुद्धीनें आमच्याकडे पाठविली, तिच्याबद्दल आम्ही आपले बहुत उपकार मानतो. हे मानपत्र तयार करण्यास एकंदर रु. १०९ लागले.

९ ऑगस्ट १८८७ सभेच्या हुकूमावरून

बाबा पदमनजी

विवक कमारत, सेक्रेटरी.[७३]

त्याचप्रमाणे जून १८९७ मध्ये महाराणी व्हिक्टोरिया राणीच्या राज्यास साठ वर्षे पूर्ण झाली. त्या वेळी पण निधी गोळा करणारांपैकी एक व मानपत्र अर्पण करणारांपैकी एक म्हणून त्यांचा केला गेलेला उल्लेख लक्षणीय आहे.[७४]

बाबा पदमनजींचा पत्रव्यवहार फारच मोठा होता. त्यांनी आपल्या आयुष्यात अनेक भूमिकांवरून हजारो पत्रे लिहिली. त्यापैकी रे. ना. वा. टिळक[७५], शं. बा. कुलकर्णी[७६], *ज्ञानोदयकार*[७७] व *प्रभाकर* इत्यादी नियतकालिकांशी पत्रव्यवहार झाले. ना. वा. टिळक व शं. बा. कुळकर्णी यांना धर्मांतरप्रसंगी धीर दिला तो बाबा पदमनजींच्या पत्रांनीच. विष्णुबुवा ब्रह्मचारी[७८] व पंडिता रमाबाई [७९] यांच्यावर त्यांनी सडकून टीका केली. बाबा पदमनजींची ही पत्रे *ज्ञानोदयात* प्रसिद्ध झाली आहेत. आपले शब्दकोश खपावेत म्हणून बाबा पदमनजींनी वृद्धपणी डायरेक्टर ऑफ पब्लिक इंस्ट्रक्शन यांच्याशी केलेला पत्रव्यवहार कारुण्याची छटा असलेला पण पुस्तकांवर असलेल्या त्यांच्या प्रेमाचे द्योतक आहे.[८०] अशा तऱ्हेने बाबा पदमनजींचा पत्रव्यवहार समृद्ध प्रभावी व परिणामकारक होता असे म्हणणे युक्त ठरते.

३ सप्टेंबर १८९४ हा दिवस बाबांच्या जीवनात अतिशय महत्त्वाचा मानला जातो. त्या दिवशी त्यांच्या ख्रिस्ती जिण्याला चाळीस वर्षे पूर्ण होणार होती. त्या निमित्ताने बाबांनी लोकांना उद्देशून एक विनंतीवजा पत्र लिहून आपल्यासाठी परमेश्वराची प्रार्थना करण्याची इच्छा प्रकट केली.[८१] *ज्ञानोदयाने*ही लोकांची या दिवशीचे कर्तव्य काय याची जाणीव करून दिली व कार्यक्रमाची सूचनाही केली.[८२] प्रत्यक्ष त्या समारंभाच्या कार्यक्रमाचा खास वृत्तांत व विविध ठिकाणी या निमित्ताने झालेले समारंभही त्याने प्रसिद्ध केले. बाबा पदमनजी त्या काळात ख्रिस्ती लोकांच्यात किती लोकप्रिय होते याची कल्पना आपणास यावी व अशासारख्या प्रसंगातून येते. *ज्ञानोदयाने* तर या प्रसंगी खालीलप्रमाणे खास गुणगौरवपर स्फुट लेखच मुद्दाम प्रसिद्ध केला आहे :

> रेव्हरंड बाबासाहेब हे त्राक्त आणि बैबल ह्या दोन्ही सोसैट्यांचे एडिटर आहेत हें आमच्या वाचकास बहुतकरून माहित असेलच. गेल्या अंकांत या दोन्हीही सोसैट्यांच्या वार्षिक सभेविषयी आम्ही थोडक्यांत लिहिलें आहेच. त्राक्त सोसायटीच्या रिपोर्टीत मि. बाबा यांच्या कामाचा थोडक्यांत उल्लेख आहे. त्यावरून समजतें कीं, सोसैटीकडे छापण्या-साठी जी पुस्तकें येतात ती तपासून पाहून त्यावर यांस अभिप्राय द्यावा लागतो. जुनी व नवी पुस्तकें तपासून छापखान्यात पाठवण्यास लायक करावी लागतात. आणि ती छापत असता प्रुफेही तपासावयास लागतात. गतवर्षी सोसैटीनें जी पुस्तकें छापली त्यांत तीन मि. बाबांची जुनी आहेत. ती किती उपयोगी आहेत हें तर सांगणें नको आहे. दुसऱ्यांची हस्तलिखित पुस्तकें तपासणे, हे काम फार त्रासदायक आहे. त्यांत बाबासाहेबांचा बहुतेक वेळ जातो. आमचा असा अनुभव आहे कीं दुसऱ्यांचा लेख तपासण्यास जो वेळ लागतो तितका स्वतः त्याच किंवा दुसऱ्या विषयावर मूळचा लेख लिहिण्यास लागत नाही. याशिवाय मि. बाबांस मूळच्या लेखकांस वारंवार पत्रें पाठवून त्यांचे स्पष्टीकरण मागवावे

लागते. यांतही त्यांचा वेळ जातो. शिवाय सोसैयटीच्या जनरल व मराठी सब कमिटीचे ते मेंबर असल्यामुळे सदरहू कमिटींच्या बैठकीस त्यांस हजर रहावे लागते.

बैबल सोसैयटीच्या संबंधाने रेव. बाबा पदमनजी साहेब यांच्याकडे अलिकडे विशेष महत्त्वाचें, अर्थात फार जोखमाचें काम आले आहे. मराठी शास्त्राची हल्लीची आवृत्ती तपासण्यासाठी जी एक नवीन कमिटी नेमली आहे, तिजपुढें अगोदर सर्व तयारी करून तो तपासलेला शास्त्र भाग यांस सादर करावा लागतो आणि या कमिटीबरोबर त्या तपासलेल्या शास्त्रभागाची फेरतपासणीही करीत बसावे लागते.

याशिवाय अनेक सभा, मंडळ्या व मेळे प्रसंगानुसार साधणे, व मित्रांच्या भेटी घेणे हे ईश्वरभक्त चुकू देत नाहीत. बाहेरीलच नव्हे तर मुंबईतील देखील पत्रव्यवहाराचा रगडा यावर आहे. अशा अशक्तपणांत ही सर्व कामे करण्यास प्रभु त्यांस शक्ती पुरवीत आहे म्हणून त्याची स्तुति केली पाहिजे आणि त्याच्या या सेवकास दीर्घायु करून बहुत दिवस आपल्या नावाचे गोरव करून घ्यावे म्हणून *ज्ञानोदया*च्या सर्व ख्रिस्ती वाचकांनी त्या प्रभूजवळ प्रार्थना करावी अशी आमची त्यांस विनंती आहे.[८३]

बाबांच्या बाप्तिस्म्याच्या ४०-व्या वर्षाच्या समारंभप्रसंगी 'ऐक्यप्रदर्शक सभे'च्या वतीने ग्रांट रोडवरच्या मेथॉडिस्ट मिशनच्या भजनालयात एक मेळा जमला होता त्याचे अध्यक्ष धनजीभाई नवरोजी होते. त्यावेळी बाबा पदमनजींनी आपल्या चाळीस वर्षांच्या ख्रिस्ती जिण्याचे विविध अनुभव कथन केले. त्यातील महत्त्वाच्या अनुभवांचा गोषवारा *ज्ञानोदया*ने प्रसिद्ध केला होता. त्यांनी त्यावेळी आपल्या अनेक मित्रांना स्मरणपूर्वक उल्लेख केला. याशिवाय आपले ख्रिस्ती जीवन, आपल्या प्रपंचात ईश्वरी सहाय्य, आपले दुसऱ्यासाठी खपणे, आपली सेवा व कर्तव्य इ. मुद्यांवरून लोकांना उपयुक्त असा अनुभव कथन केला.[८४]

त्यानंतर दहा वर्षांनी बाबांच्या बाप्तिस्म्याच्या ज्युबिलीचा समारंभ झाला. या समारंभाच्या प्रीत्यर्थ इंडियन ख्रिश्चन ॲसोसिएशनतर्फे चर्च मिशन हॉलमध्ये सभा भरली होती. बाबांना फुलांची माळ घालण्यात आली होती व मराठी जाडया टाइपाचे एक बायबल त्यांना बक्षिस देण्यात आले. भाषणे उपदेश, प्रार्थना इ. नित्याचे कार्यक्रम झाले.[८५] अशा प्रकारे बाबांच्या जीवनात काही महत्त्वाचे, आनंदाचे व कौतुकाचे समारंभ लोकांकडून साजरे करण्यात आले. अर्थात बाबासाहेबांच्या जीवनातील तपश्चर्याच या सर्वांस कारणीभूत आहे यात शंका नाही.

रे. बाबा पदमनजी, पुण्यातील मराठी प्रेसबिटेरियन मंडळीचे माजी पाळक, यांच्या बाप्तिस्म्याच्या ज्युबिलीप्रीत्यर्थ त्या मंडळीने काढलेले त्यांस पुढीलप्रमाणे मानपत्र दिले आहे:

आपल्या बाप्तिस्म्यास नुकतीच ५० वर्षे झाली म्हणून आम्ही देवाची उपकार स्तुती करितो. या ५० वर्षांतील आपल्या चरित्राचा व त्याच काळातील महाराष्ट्रातील ख्रिस्ती मंडळीच्या इतिहासाचा निकट संबंध आहे असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाही. उपदेशक, शिक्षक, लेखक, पालक, मासिक पत्राचे प्रकाशक व पवित्र शास्त्राचे भाषांतराचे संशोधक या नात्यांनी महाराष्ट्रातील ख्रिस्ती समाजावर आपले बहुत उपकार झाले

आहेत. आपण जे लहान मोठे ग्रंथ लिहिले आहेत त्यांची संख्या १०० वर गेली आहे. त्या ग्रंथाच्या योगाने शेकडो लोकांस ख्रिस्ती धर्माचे ज्ञान प्राप्त झाले आहे व ज्यांस आपले दर्शन कधीही घडले नाही ते देखील आपल्या ग्रंथावरून आपणास ओळखतात व पूज्य मानतात.

अशा प्रकारें आपण समाजसेवा केली आहे. इतकेंच नव्हे तर ख्रिस्ती मंडळीच्या वृद्धीकरतां व ऐक्याकरितां आपण अनेक प्रकारांनी परिश्रम केले आहेत. शेकडो गरजवंतांना आपण उदारपणानें व गुप्तपणानें सहाय्य केले आहे. तरुण मंडळीस उत्तेजन दिले आहे. उत्कृष्ट ख्रिस्ती जिण्याचा कित्ता लोकांस सदोदित घालून देत आला आहा. व आपणांस जे योग्य दिसले ते धरून करण्यास आपण कधी भीति बाळगली नाही. आपण काही वर्षे या मंडळीचे पाळक होता. त्यावेळी असलेले बहुतेक भाऊ व बहिण आतां वरील विसाव्यात गेली आहेत. तरी त्या वेळची आपली शांत वृत्ति, आपली धार्मिकता, आपली आस्था, आपला कनवाळूपणा, यांचे आम्हांतील कित्येकांस अद्याप स्मरण आहे. आपण आता वृद्ध व अशक्त झाला आहा तरी आपला अविश्रांत उद्योग चालूच आहे. ख्रिस्ती समाजाच्या हिताकरिता आपण आपला देह झिजवीत आहा. त्यामुळे आम्ही आपले आभारी आहो व त्यावरून आम्ही देवाची स्तुती करितो.

परमेश्वरानें आपणांस आणखी बहुत दिवस राखावे. त्याच्या सेवेकरितां बहुत सामर्थ्य द्यावे व आपल्या उरलेल्या आयुष्यात आपणांस प्रभु ख्रिस्ताच्या समागमाच्या हर्षाचा अधिकाधिक अनुभव घ्यावा असे आमचे त्याच्या जवळ मागणे आहे.[८६]

बाबा पदमनजींनी *अरुणोदय* नामक आत्मचरित्र लिहिले. त्याला रे. ना. वा. टिळकांनी पुरवणी जोडली आहे. त्यांत ते म्हणतात :

बाबासाहेबांनी बायबल सोसायटीच्या व ट्रॅक्ट सोसायटीच्या एडिटरचे काम २५ वर्षे केले. १९०२ सालच्या जून महिन्यांत त्यांना ह्या संस्थेकडून पेंशन देण्यांत आले. त्यावेळेस त्यांचे वय ७१ वर्षांचे होते. दृष्टि मंद झालेली अशा वेळी बाबांची पूर्व सेवा लक्षांत घेऊन वरील संस्थांनी घेतलेला हा निर्णय योग्यच होता असें म्हणावे लागते. बायबल सोसायटीनें पेंशन म्हणून कांही रक्कम मंजूर केली व त्यांतच ट्रॅक्ट सोसायटीने काही रक्कम भर म्हणून घातली होती. या व्यतिरिक्त बायबल रिव्हिजन सोसायटी यांना कार्य पडेल तेंव्हा बोलावणार होतीच. उर्वरित आयुष्यात प्रभुसेवा, प्रभुराज्यवृद्धि आणि स्वदेशकल्याण करण्यासाठी झटण्याचे त्यांनी मनोमन ठरविले होते. अर्थात प्रिय देशाचें कल्याण म्हणजेच प्रभुराज्याची वृद्धि असें त्यांचें समीकरण होते. बाबासाहेबांनी देहविसर्जन करीपर्यंत केवळ हीच देशसेवा केली. ते एकनिष्ठ स्वराज्य सेवक होते. त्यांच्या लेखणीनें जे कार्य केले आहे, पेंशन मिळाल्या-वर, वृद्धापकाळीं सारा देह शिथिल झाल्यावर, दृष्टि निरुपयोगी झाल्यावर सुद्धा जें कार्य केले तें सुद्धा आश्चर्य वाटण्यासारखे. हा आधुनिक मराठी ख्रिस्ती वाङमयाचा जनक, वाङमयाची सेवा करीत असतांना निधन पावला नाही तर देहातीत होऊन स्वर्गवासी झाला. बाबा पदमनजी ४१ व्या गीताच्या पहिल्या वाक्याचें संशोधन करीत असताना त्यांचे

देहविसर्जन झाले. हिंदु असताना व ख्रिस्ती झाल्यावरही हा ईश्वर भक्त सत्यानुयायी होता. आपणास जे खरें दिसते त्याचा आचार प्राणपणाने करावयाचा, हा त्यांचा कृतसंकल्प. त्यांची धर्मश्रद्धा, ईश्वरावरचा लेकरासारखा भाव, त्यांना येणारा दांभिकपणाचा त्वेष व त्यांचे ख्रिस्ती बंधुप्रेम, त्यांची स्वराज्य सेवेची उत्कंठा. इ. गुण अशातच होते कीं ते त्यांच्या शत्रूला सुद्धां कबूल करावे लागत व शेवटपर्यंत कबूल करावे लागतील.[८७] असे हे बाबा पदमनजी वयाच्या ७५ व्या वर्षी दि. २९ ऑगस्ट १९०६ रोजी प्रभुपदीं विलीन झाले.[८८]

बाबा पदमनजींच्या मृत्यूची दखल मात्र तत्कालीन बऱ्याच वृत्तपत्रांनी घेतलेली दिसते. *ज्ञानोदयाने* वृत्त व अग्रलेख लिहिला. *मुंबईवैभव*, *ज्ञानप्रकाश*, *सुधारक* व *केसरी* या पत्रांनी आपापल्या सोयीनुसार बाबांच्या मृत्यूनंतर त्यांच्याविषयी चार शब्द लिहिले. काहींनी बाबांचा अल्प-परिचय प्रसिद्ध केला. बाबांच्या मृत्यूनंतर *ज्ञानोदयातील* अग्रलेख वाचनीय व सविस्तर आहे. बाबांच्या स्वभावातील गोडवा, त्यांचे जाज्वल्य ख्रिस्तप्रेम, त्यांची समाजसेवा व ख्रिस्तसेवा, त्यांच्या लेखणीचा चौफेर विलास, त्यांचे जबरे ग्रंथलेखन, त्यांची शोधक बुद्धी, वादविवादाची व लेखनाची विलक्षण हौस, त्यांची शिस्त, टापटीप, साऱ्या जग-भरच्या व्यक्तींशी त्यांचा दांडगा पत्रव्यवहार यांची विस्ताराने माहिती देऊन 'या प्रिय पित्याच्या सहवासास मुकलो' असे दुःखपूर्ण उद्‌गार *ज्ञानोदयकारांनी* या अग्रलेखात काढले आहेत. *ज्ञानोदयकारांनी* याच अग्रलेखात शेवटी म्हटले आहे :

> बाबासाहेब आपले लेख वाऱ्यावर टाकीत नसत. स्वतःची व इतरांच्या पुस्तकाचा प्रचार धडाक्याने ते करीत. चांगले पुस्तक बघताच ते विकत घेत. इतरांना वाचा-वयास सांगत. सुट्टीत लोणावळयास व खंडाळयास, इगतपुरीस कोठेही गेले तरी ट्रॅक्ट सोसायटीकडून पुस्तके मागवीत. लोकांना वाटीत व बिल मात्र स्वतःच देत असत. ख्रिस्ती तरुणांस इंग्रजी विद्यादान त्यांनी पुष्कळ केले. त्यांच्याकडे दरसाल एक तरी आश्रित विद्यार्थी असे. धार्मिक व यात्रिक युरोपियनांना पत्रे लिहून मदत मागवीत असत व ती विद्यार्थ्यांना देत. त्यात क्वचित पदरची भर ते घालीत. त्यांच्या मदतीवर मोठे झालेले आज अनेक विद्यार्थी आहेत. त्यांची महत्त्वाची व शेवटची सेवा म्हणजे त्यांची बायबलची टीका (तपासणी). हे फार श्रमाचे काम होते. त्यांनी अनेक टीका व पुस्तके पाहून ते काम रिव्हिजन कमिटीपुढे ठेवावे. त्यासाठी रोजचा ठराविक वेळ ते खर्च करीत. त्यांच्या सेवेवरील विश्वासाने त्यांना लंडन बायबल सोसायटीने आपले सभासद करून घेतले होते. लंडन सोसायटीने हा बहुमान त्यांना दिला. ट्रॅक्ट सोसाय-टीची पण त्यांनी विश्वासूपणे सेवा केली. ते तिचे पुष्कळ वर्षे एडिटर होते. या सर्वांचे फळ त्यांना आता त्यांच्या धन्याकडून मिळाले असेल.
>
> जगदारण्य प्रवासात बाबांनी आपली कंबर सत्याने बांधली. सत्य हेच त्यांचे ब्रीद होते. त्याला अनुसरून त्यांचे वर्तन असे. कोणतीही चूक वा उणिव ते पत्र लिहून दाखवित. कित्येकांचे ते शत्रू झाले पण खूण जणांची खात्री झाली की ते आपले मित्र आहेत. प्रेम, माया व नम्रता हे गुण होते. साधी राहणी, गोड स्वभाव, हे त्यांचे खास

उल्लेखनीय विशेष होते. गरीब, श्रीमंत, ज्ञानी, अज्ञानी या सर्वांशी त्यांचे दळणवळण असे. त्यांची ख्रिस्ती धर्मावर दृढ श्रद्धा होती. सततोद्योग, चिकाटी, शुद्ध मताचा पुरस्कार इ. गोष्टी त्यांच्या आचारात दिसून येत.

*ज्ञानोदय*कार म्हणतात, बाबांच्या मृत्यूने महाराष्ट्राचे नुकसान झाले. ख्रिस्ती लोकरत्न हरपले. नामांकित वीर पुढारी पडला. मसलतीचा आधार, गरीबांचा आश्रय, बहुतांचा खरा प्रेमळ मित्र गेला. दोन मुलींस व तीन पुत्रांस 'पपा' म्हणण्यास ठिकाण राहिले नाही. पण महाराष्ट्राचा 'बाबा' गेला. बाबांसारखी कामे आम्हास करता येणार नाही. दुसरा बाबा होणेच कठीण. ख्रिस्ती मंडळीत एकच बाबा होऊन गेला. तरी त्यांच्या कित्यास आम्हास अनुसरता येईल. प्रभु बाबांचे अंगवस्त्र बहुतांवर टाको. बाबांनी पौलाप्रमाणे म्हटले आहे, 'म्या चांगले युद्ध केले आहे. धावणे संपविले. विधान राखला. आता मजसाठी न्यायीपणाचा मुगुट ठेविला आहे.'[८९]

बाबासाहेबांच्या मृत्यूनंतर त्यांच्या संबंधाने एक स्मारक सभा यु. फ्री चर्चमध्ये झाली. त्या सभेस डॉ. मकिकन, डॉ. ॲबट व प्रो. वेलिंगकर उपस्थित राहिले होते. त्यांची भाषणे कळकळीची व पोक्त विचाराची होती. प्रो. वेलिंगकर म्हणाले, 'पूज्य व सर्वमान्य भाऊ ख्रिस्तानें आपणाकडे घेतला हा शोककारक प्रसंग. याने सारा महाराष्ट्र दुःखात बुडाला. बाबा ख्रिस्ती साक्रेटीस होते'[९०] त्यानंतर बाबा पदमनजींच्या मरणोत्तर त्यांच्या स्मरणार्थ एक स्कॉलरशिप सुरू करण्याचे ठरविले. ता. १५-२-१९०७ ते १५-३-१९०७ या काळात सुमारे ११०० रुपये जमले, असे स्कॉलरशीप फंडाचे चिटणीस डी. एल. जोशी कळवतात. त्याचप्रमाणे आणखी १४०० रु. जमल्यास एकूण २५०० रु. होतील व मग आणखी एकाच माणसाकडून ५०० रु. मिळणार आहेत. म्हणून इलाख्यातील लोकांनी या कामी मदत करावी असेही त्यांनी सुचविले आहे.[९१] नंतर हा फंड जमला. अद्यापही बाबा पदमनजी स्कॉलरशीप एस. एस. सी. परीक्षेस बसणाऱ्या व जास्त मार्क मिळविणाऱ्या ख्रिश्चन विद्यार्थ्यास मिळते. अशा प्रकारे बाबा पदमनजी स्मारक सभा व बाबा पदमनजी स्कॉलरशिप फंड दोन्ही गोष्टी पार पडल्या. बाबा पदमनजींचे हे एका अर्थाने महत्त्वाचे स्मारक होय.

बाबा पदमनजींनी स्वतः तर पुस्तक लेखन केलेच पण दुसऱ्या लेखकांची पुस्तके पण तपासून देऊन ती छापली. *ख्रिस्ती मनुष्याचा मरणावर जय* नावाचे लहानसे पुस्तक तामीळ मूळवरून मराठीत मि. वेदनायक यांनी केले असून रे. बाबा पदमनजींनी ते तपासून छापले आहे. त्या पुस्तकाचा विषय असा की हल्लीच्या काळाला ख्रिस्ती मनुष्यास फार उपयोगाचा असून लहान थोरास समजण्याजोग्या भाषेत लिहिला आहे.[९२] त्यानंतर *ब्राह्मणाचे कसब* या महात्मा फुले यांच्या ग्रंथाला बाबा पदमनजींनी प्रस्तावना लिहिली आहे. म. फुले यांच्या *शिवाजीचा पोवाडा* या पुस्तकाची प्रुफेही बाबांनी तपासली.[९३] आणखी *शास्त्रप्रतिक दर्शन कोश* या कोशाची इ. स. १८९० च्या आवृत्तीची हस्तलिखित प्रत रे. बाबा पदमनजींनी फार श्रमाने व काळजीने शोधून प्रुफे तपासली आहेत असे जी. डब्ल्यू. सायलर त्याच कोशाच्या प्रस्तावनेत म्हणतात. आणखी एके ठिकाणी *ज्ञानोदय*कार बाबांच्या संदर्भात लिहितात, 'रे. बाबा

पदमनजी यांनी या ग्रंथाची हस्तलिखित प्रत वाचून त्यातील भाषा शुद्ध करून व रूढीस अनुसरून असण्याकरिता ग्रंथात भाषेच्या संबंधाने बहुत ठिकाणी फेरफार केले आहेत. दुसऱ्याही कित्येक गोष्टीविषयी त्यानी मेहरबानी करून सुचना केल्या आहेत.'[१४] हे उद्गार *ज्ञानोदय-कारांनी* रे. कासम महंमद ढलवाणी व रे. हेन्री जे. ब्रूस यांच्या *शास्त्रासंबंधी कोश* या पुस्तकाच्या परीक्षणात काढले आहेत. बाबा पदमनजींनी केलेली पुस्तकांची परीक्षणे मिताक्षरी व मार्मिक आहेत.

बाबा पदमनजींचा देह मरणोत्तर मुंबई येथील शिवडीच्या स्मशानभूमीत दफन करण्यात आला. शिवडीच्या सध्याच्या टी. बी. हॉस्पिटलच्या समोरच ही स्मशानभूमी असून प्लॉट नं. ९ बी १५ मध्ये बाबांना दफन करण्यात आले. प्लॉटची लांबी रुंदी ६" × ३" अशी असून तो प्लॉट पदमनजी कुटुंबाच्या मालकीचा आहे. स्मशानशीला किंवा स्मारक समाधी मात्र त्या जागेवर बांधणे बाबांच्या नातलगांना द्रव्याभावामुळे जमले नसावे. संकोचामुळे तसे कोणी उघड बोलत नाहीत इतकेच. बाबा पदमनजींनी स्मारकशिला त्यांच्या नातलगांनी तेथे बसविणे रास्त आहे पण बाबा पदमनजींनी ज्या ज्या संस्थात अनेक वर्षे काबाडकष्ट केले, लेखन–संपादन केले त्यांनी, मराठी भाषिकांनी जरी या गोष्टीचा विचार केला असता तरी चालले असते. पण मराठीचा हा उपेक्षित मानकरी त्याच्या जिवंतपणी उपेक्षित राहिला तसाच मरणोत्तरीही उपेक्षितच राहिला. निदान शिवडीच्या स्मशानभूमित याचीच जाणीव होते. अंतःकरणात खिन्नता पसरते.[१५]

* * *

## टीपा

१. चिं. ग. कर्वे, *मराठी साहित्यातील उपेक्षित मानकरी*, पुणे, १९५७, पृष्ठे ३१–३९.
२. अ. का. प्रियोळकर, 'आपली नावे आणि आडनावे', *प्रिय आणि अप्रिय*, पुणे, १९६५, पृ. ४६–६३.
३. *अरुणोदय*, मुंबई, १८८८, पृ. २.
४. तत्रैव, पृ. ४–५.
५. बाबा पदमनजींची निश्चित जन्मतारीख शोधण्याचा मी बराच यत्न केला. इ. स. १८५२ मध्ये बाबा ग्रॅन्ट मेडिकल कॉलिजात विद्यार्थी म्हणून होते. त्या संस्थेचे इ. स. १८५२ चे स्टयूडंट रजिस्टर पाहिले. बाबांचे दफन शिवडी येथील सेमेट्रीमध्ये झाले. तेथील इ. स. १९०५ चे डेथ रजिस्टर पाहिले. त्यात मृत्यूची तारीख आहे. पण जन्मतारीख नाही. फ्री चर्च हायस्कूल, अंबोली चर्च, बेळगावचे लंडन चर्च यांची रजिस्टरे पाहूनही काहीही निष्पन्न झाले नाही.
६. टॉमस बेस्ट जर्विस हा प्रथमपासून महाराष्ट्रातील शिक्षणप्रसाराशी संबंधित अशांपैकी एक होता. तो प्रसिद्ध स्थापत्यशास्त्रज्ञ, नकाशातज्ञ होता. तसेच हा विद्वान व कर्नल होता. याचे *A Century Tribute* हे १८९८ साली प्रसिद्ध झालेले चरित्र उपलब्ध आहे. पाहा–*मराठी संशोधन पत्रिका*, वर्ष ३, अंक २ (ऑक्टोबर १९५५), पृ. १३८.
७. *अरुणोदय*, पृ. ४.
८. तत्रैव, पृ. ८.
९. तत्रैव, पृ. १४.
१०. तत्रैव, पृ. २०.
११. रे. टेलर बेळगाव मिशनचा पाद्री. चर्च शाळेचा मुख्य. बाबा पदमनजींचा यानेच बाप्तिस्मा दिला. प्रेमळ उपदेशक. संयमी प्रचारक. पहिला युरोपियन सेक्रेटरी. रे. डब्ल्यू. बेनन टेलर याच्या जोडीने बेळगावास काम करी. बेळगाव मिशन शाळेत मुख्य.

नारायण माणिकजी, बाबा पदमनजींचे चुलते. बेळगावच्या मिशन शाळेत इंग्रजी शिकले. मिलिटरी हापिसात नोकरी, 'रायटर'ची. बाबांवर प्रेम करीत. बाबांनी धर्मांतर केले तेव्हा चुलते रागावले पण पुढे त्यांनीच बाबांचे ख्रिस्ती लग्न झाल्यावर बाबांचा सत्कार केला. बाबांवर त्यांचा अति विश्वास. इ. स. १८७४ मध्ये मृत्यू.

(*अरुणोदय*, पृ. १८७, १८८ व ३४१).
१२. तत्रैव, पृ. ५१.

१३. तत्रैव, पृ. ८४.

१४. *प्रभाकर*चे कर्ते यांस, विनंती विशेष.

या इंग्रज सरकारांत प्रजेवर जुलूम वगैरे इन्साफ चालू जाहला असे माझे ऐकण्यांत आलें नाहीं. . . .त्याविशीं माझें म्हणणें असे आहे कीं दाहा पांच जुन्या दागिन्यांत एक नवा दागिना सांपडल्यास जकात घ्यावी कीं काय आणि आम्हीं ते जिन्नस व्यापाराकरिता आणले नाहीं असे असून जुने दागिने नवे ठरवून दुप्पट जकात घेणे ही फार जुलमाची गोस्ट आहे. या प्रमाणे गैरइन्साफाची चाल मी तेथे पाहिली व तेणें करून हजारों गरीब लोक बुडतात. हें पाहून मला फार दुःख वाटतें. तर हे प्रभाकर महाराज आपण कृपा करुन हे पत्र छापून प्रसिद्ध करावें म्हणजे सरकारांत अशी अंधाधुंधी चालणार नाहीं व रयतेचे हाल होणार नाहीत.

मुक्काम मुंबई तुमचा मित्र,
तारीख ३ री एप्रिल सन १८४७. बाबा पदमनजी.

१५. १८३५ साली **जॉन् हार्कनेस** एल्फिन्स्टन् कालेजात प्रोफेसर म्हणून दाखल झाले. १८४५ साली ते तेथेच प्रिन्सिपल झाले. त्यांना मराठी भाषा चांगली येत असे. मुंबई युनिव्हर्सिटीचे ते बरीच वर्षे डीन होते. ग्रंथास बक्षिसे देणाऱ्या कमिटीवरही त्यांची नेमणूक झाली होती. शाळा तपासण्याचे काम पण ते करीत. समता व ममता हे त्यांचे वैशिष्ठ्य. इ. स. १८६२ मध्ये ते निवृत्त झाले. नंतर त्यांच्या विद्यार्थ्यांनी त्यांना १२,००० रु. ची थैली व मानपत्र अर्पण केले. १८६२ मध्ये ते स्वदेशी परत गेले. —अ. का. प्रियोळकर, *डॉक्टर भाऊ दाजी : काल व कर्तृत्व*, मुंबई, १९७१, पृ. ४३७, ४३८.

१६. *अरुणोदय*, पृ. १०२.

१७. तत्रैव, पृ. ११०.

१८. तत्रैव, पृ. ११७.

१९. नारायण शेषाद्री — डॉ. नारायण शेषाद्री यांनी १८४३ मध्ये खिस्ती धर्माची दीक्षा घेतली. त्यांनी *सुभक्ति उत्तेजक ग्रंथ*, *फुलमनी व करुणा*, *पाप व त्याचे दुष्परिणाम*, *रामनवमी*, *गोकुळअष्टमी* इत्यादी २० पेक्षा अधिक धर्मपत्रिका व लघुग्रंथ लिहिले आहेत. शुभवर्तमानाचा उपदेश करण्याविषयी ते फार तत्पर होते. जालना, इंदापूर, या बाजूस धर्मप्रचार केला. इंदापूरास त्यांचे वास्तव्य होते. प्रथम मुंबईस फ्री चर्च विद्यालयात शिक्षक. प्रार्थनेवर त्यांचा नितांत विश्वास होता. इ. स. १८९१ साली निधन. (पाहा – *ज्ञानोदय*, २०–८–१८९१, पृ. २७५, २७६)

२०. रे. जॉर्ज बोअेन साहेब यांचा जन्म अमेरिकेत इ. स. १८१६ त झाला. प्रथम नास्तिक होते. प्रेयसीच्या मृत्यूने मग आस्तिक झाले. अमेरिकन मिशनच्या संदर्भात येथे भारतात आले. गायनवादन कला त्यांना अवगत होती. जर्मन, फ्रेंच, इंग्लिश भाषा त्यांना येत. १८५४ पासून मुंबई *गार्डियन* हे पत्र चालविले, विनावेतन. १–२ तास

शिकवणी करून २५ रु. मिळवित. उपदेश व धर्मपर पुस्तकरचना. *The Life of Mohumed* या त्यांनी लिहिलेल्या पुस्तकाचे मराठीत व गुजरातीत भाषांतर झाले आहे. पुस्तके व निबंध करणाऱ्या मंडळीचे १८७९ मध्ये चिटणीस. मृत्यू ५–२–१८८८. *ज्ञानोदय*, ९–२–१८८८, पृ. २४३.

२१. *अरुणोदय*, पृ. १४६.

२२. **डॉ. जॉन विल्सन** (१८२८ ते १८७५)—ख्रिश्चन धर्मप्रचारार्थ त्यांनी तनमनधन खर्च केले. १८३० मध्ये *Oriental Christian Spectator* सुरू केले. मराठी, संस्कृत, गुजराती व हिंदी इ. भाषांचे स्वतः अध्ययन केले. *हिंदुधर्म पक्षपाती* व *उपदेश-चंद्रिका* मासिकांचे संपादक मोरभट दांडेकर यांच्या हिंदुधर्म स्थापन (१८३०) या ग्रंथावरून कडाक्याचा वाद झाला. यानंतर साताराचे नारायणराव (स्वदेश-भक्ताभिमानी) यास उत्तर म्हणून डॉ. विल्सनने 'दुसरे प्रसिद्धीकरण' (१८४५) प्रसिद्ध केले. (मोरभटांशी वाद = १ ले 'प्रसिद्धीकरण'). *पाऊसासाठी प्रार्थना* (१८३३), *खरा जो खिस्तीधर्म त्यांत हिंदू लोकांनी प्रवेश केला त्याविषयी वर्तमान* (१८३८), *भगवान कसा ओळखावा ?* इ. धर्मविषयक पुस्तके रचली. कुशल धर्मप्रसारक म्हणून लौकिक.

**रे. निसबीट**—हिंदुधर्माचा बारकाईने अभ्यास करून त्यावर टीका करणारांपैकी एक. *भगवत्‌गीतासार* (१८३२) गीता खरी नाही हे ठरविण्याचा यत्न. हिंदुशास्त्रात ब्राह्मणांचे सांगितलेले महत्त्व (१८३२) पृथिव्यादी भूतांचे भजन (१८३५) ब्राह्मण व पंचमहाभूतांची पूजा यावर टीका. *ज्ञानोदय*. १५–८–१८५५ पृ. २४५.

**रे. जे. मरे मिचल**—ख्रिस्ती धर्मोपदेशक. बायबलच्या मराठी भाषेत सुधारणा करणे हे महत्वाचे काम. 'नारळी पौर्णिमा' (१८५१), 'पंढरपूरची यात्रा' (१८५५), 'आळंदीची यात्रा', 'तुकारामाची गोष्ट', 'शकुन मुहूर्त' इत्यादी विषयी (१८६२) 'खंडोबाची गोष्ट' (१८७८). रे. मरे मिचल यांच्या इंग्रजीच्या करणांचा संक्षेप (मराठी वाङमयाचा इतिहास–खंड ४) *British India* या मरेच्या ग्रंथाचे भाषांतर. जरीमरीच्या वाऱ्याने ५२ व्या वर्षी मृत्यू. २७ जुलै १८५५. १८२७–मध्ये या देशात आले. मिशनरीच्या कामावर. १८३७ फ्रीचर्च विद्यालयात गुरूच्या कामावर. विद्वान, ज्ञानी, उत्तम शिक्षक. इंग्रजांवर छाप पडे.

२३. *अरुणोदय*, पृ १५८.

२४. तत्रैव, पृ. १६३.

२५. व २६. तत्रैव, पृ. १६४.

२७. तत्रैव, पृ. १७१–१७२.

२८. तत्रैव, पृ. १८६.

२९. तत्रैव, पृ. २०३.

३०. तत्रैव, पृ. २०९.

३१. Report of the Board of Education, Bombay.
From May 1, 1852 to April 30, 1853; 30, Bombay.
Printed at Bombay Education Society Press. (1853 App, B.P. XII).

**Principal Grant Medical College**

**Appendix B :** List of students in attendance in the Grant Medical College, during the Session 1852–53.

| *Free* | *Stipending Names* | *Caste* | *Age on Admission* | *Native Town* |
|---|---|---|---|---|
| 26 | Baba Padmanji | Kasar | 20 | Bombay |

| *In What School Educated* | *Date of Admission* | *Remarks* |
|---|---|---|
| Free Church Institution | 15th June 1852 | Resigned |

Principal Morhead
Grant Medical College,
Bombay.

३२. *अरुणोदय*, पृ. २२४.
३३. तत्रैव.
३४. *ज्ञानोदय*, १५ मार्च १८५२, पृ. ८३.
३५. *ज्ञानोदय*, २१ नोव्हेंबर १८५३, पृ. ३३८.
३६. *अरुणोदय*, पृ. २२४.
३७. *अरुणोदय*, पृ. २९८.
३८. तत्रैव, पृ. ३१४.
३९. तत्रैव, पृ. ३६६ व ३७५.
४०. हे *ज्ञानप्रकाश* मधील वृत्त *ज्ञानोदयाने* जशाच्या तसे उद्धृत केले आहे. १५ सप्टेंबर १८५४, पृ. २८७.
४१. *अरुणोदय*, पृ. ३७५–३७६ वरून उद्धृत.
४२. *ज्ञानोदय*, १५ सप्टेंबर १८५४, पृ. २८७ वरून उद्धृत.
४३. तत्रैव.
४४. बाबांनी आपले *अनुभवसंग्रह* (१८९५) हे पुस्तक यांनाच अर्पण केले आहे.
४५. *Sketches of Indian Christians* या मद्रासच्या नटेशन आणि कंपनीने प्रसिद्ध केलेल्या पुस्तकातील माहितीच्या आधाराने, (The Christian Literature Society for India, London & Madras) 1896.
४६. धनंजय कीर, *महात्मा फुले*, मुंबई, १९६८, पृ. ८३.
४७. *अरुणोदय*, पृ. ३६६–७५.

४८. अ. का. प्रियोळकर, *रा. ब. दादोबा पांडुरंग*, मुंबई, १९४७, पृ. २७३–७४.

४९. बाबा पदमनजी, *अनुभवसंग्रह*, मुंबई, १८९५, पृ. ७५–७८.

५०. *अरुणोदय*, पृ. ६०.

५१. 'मुंबई येथील मिशनऱ्याच्या मार्गदर्शनामुळे आणि उपदेशामुळे त्यांनी ३ सप्टेंबर १८५४ रोजी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. डॉ. जॉन विल्सन यांचा प्रभाव, मृत्यू-नंतरच्या जीवनातील शांतता वगैरेसाठी हे धर्मांतर असावे.' धनंजय कीर, *महात्मा फुले*, मुंबई, १९६८, पृ. ६९–७०.

५२. 'जोतिरावांच्या आजारपणात रे. बाबा पदमनजी त्यांची चौकशी करण्यास गेले होते. जोतिरावांना बाबांनी अनेक वेळा सहाय्य केले'—धनंजय कीर, *महात्मा फुले*, १९६८, पृ. २९३.

५३. (१) कोशाचे संशोधन सुमारे ३ तास. (२) ख्रिश्चियन व्हर्नाक्युलर लिटरेचर सोसायटीकरिता तिसऱ्या पुस्तकाचे भाषांतर करणे. (३) हाय व्हर्नाक्युलर स्कूलच्या हिंदू शिक्षकांना शास्त्र शिकवणे. (४) आणखी एका रोमन कॅथॉलिक मुलाला शास्त्र शिकवणे. (५) स्वतः देवाच्या वचनाचा अभ्यास करणे. (६) तोच अभ्यास सायंकाळी पत्नीबरोबर इंग्रजी शास्त्रावरून करणे. —*अरुणोदय*, मुंबई, १९६३, आ. ३ री (पुरवणी) पृ. २४३.

५४. **रे. हेनरी बॅलंटन**—इ. स. १८४२ मध्ये *ज्ञानोदय* सुरू करणाऱ्यांपैकी एक. सन १८५८ मध्ये संपादक. २० वर्षे अहमदनगर मिशनचे चिटणीस व खजिनदार. नव्या कराराचे भाषांतर १८४५. १८३९ मध्ये अहमदनगरचे श्रेष्ठ मिशनरी झाले. पाळक झाले. १८४९ मध्ये प्रकृतीच्या कारणाने अमेरिका गमन. १८५२ मध्ये पुनरागमन. ९–११–१८६५ पोर्तुगालच्या किनाऱ्यावर त्रिपली बोटीत मृत्यू. गोड उपदेशक, मराठीचा अभ्यासक. लहानपणापासून हुशार. जन्म १८१३ त अमेरिकेत.

**रे. जॉर्ज बोअेन**—जन्म अमेरिका युनायटेड स्टोत्सात १८१६. प्रथम नास्तिक. पत्नीच्या मृत्यूने आस्तिक झाला. गायन वादन कला निपुण. जर्मन, फ्रेंच, इंग्लिश भाषा येत. १८५४ पासून *मुंबई गार्डियन* चालवले. विनावेतन काम. उपदेश व धर्मपर पुस्तक रचना. ५–२–१८८८ मृत्यू. बाबा पदमनजी यांनी मरणोत्तर बोअेन फंड जमवला. त्याचा हिशेब पुढीलप्रमाणे दिला आहे :

ग्रांट मेथडिस्ट चर्च मारफत रे.
मि. राबिन्स साहेब १० रु.
मि. मोसेस इझिकेला ३ रु. पुणे.
मिस वेणुताई तर्खडकर २ रु. पुणे.

बाबा पदमनजी
९–१२–८९
सेक्रेटरी प. हिं. ऐ. ख्रि. ऐक्य प्रदर्शक सभा

—*ज्ञानोदय*, १२–१२–१८८९, पृ. ४०० वरून.

५५. बाबा पदमनजींच्या सहीचे विनंती पत्र *ज्ञानोदय* पु. २५, अंक ४, दि. १५–२–१८६६ च्या अंकांत प्रसिद्ध झाले. दरमहा १० रु. अशा दोन स्कॉलरशिप्स् बालंटैन व मिसेस बालंटैन यांच्या नावाने सुरू करावयाच्या असे गेल्या वर्षीच्या सभेत ठरले होते. त्यासाठी २००० रु. जमा व्हावयास हवेत. यासाठी महाराष्ट्र देशातील सर्व नेटिव ख्रिस्ती लोकांचे सहाय्य मागितले आहे. २००० रु. व्याजातून दरमहा १० रु. च्या दोन स्कॉलरशिप्स् बालंटैन पतिपत्नीच्या स्मरणार्थ अहमदनगर मिशन शाळात सुरू करण्यासाठी हा फंड होता. या फंड जमा करणाऱ्या मंडळीचे सेक्रेटरी बाबा पदमनजी होते.

५६. डिसेंबर १३, १८७२ रोजी बाबा पदमनजी यांची पत्नी मरण पावली. हिला एकूण ७ मुले झाली. शेवटचे मृत्युसमयी ४ महिन्यांचे आहे. ही निष्ठावान व पतिव्रता स्त्री होती असे *ज्ञानोदयात* तिचे गुणवर्णन आहे.—*ज्ञानोदय*, १–१–१९७३ पृ. ९.

५७. ता. १० मीन रोजी मि. बाबा पदमनजी यांची पत्नी हन्नाबाई ही शरणपूर नाशिक येथे मरण पावली. ती मि. बाबा पदमनजीच्या पहिल्या पत्नीची धाकटी बहीण होती. हिची बहीण साराबाई. ती वारल्यावर मि. बाबांनी तिला वरले. तिच्यामुळे बाबांवर पुष्कळ संकटे आली. आपल्या व आपल्या बहीणीच्या लेकरावरील प्रीतीने तिने संकटे सोशिली.'—*ज्ञानोदय*, १–१–१८७३, पृ. ९; १–७–१८७९, पृ. ३४३.

५८. 'बैबल सोसायटीकडून जाहीर खबर. मुंबईच्या बैबल सोसायटीस दोन ख्रिस्ती कोल पोर्चर (पुस्तक विक्रेते) पाहिजेत. एकाला मुंबईत राहावे लागेल व दुसऱ्याला मह्रू येथे जावे लागेल. विशेष माहिती खाली सही करणाराकडे मिळेल. त्यास येऊन भेटावे किंवा पत्र पाठवावे.

अप्पर डंकन रोड, मुंबई बाबा पदमनजी, नि. बै. सो'

—*ज्ञानोदय*, ८ मे १८८०, पृ. २२८.

५९. 'मुंबईची बैबल सोसायटी १८७९ चा अहवाल व शास्त्राच्या मराठी भाषांतराची नवी आवृत्ती लौकरच छापावी लागेल. म्हणून या भाषांतराची तपासणी रे. बाबा पदमनजी यांच्या हातून होत आहे. हे काम कमिटीकडूनही होण्याची काही विषेष तजवीज केली आहे.'—*ज्ञानोदय*, २९ एप्रिल १८८०, पृ. २१४.

६०. 'पत्रकर्त्याचे स्फुट. रेव्हरंड बाबा पदमनजी यास लंडन बैबल सोसायटीने आपल्या संस्थेचे सन्मानार्थ सभासद नेमले हे कळवण्यास आम्हाला फार संतोष वाटतो. लंडन बैबल सोसायटीचे मुख्य ऑफिस लंडनमध्ये असून तिच्या शाखा जगभर पसरल्या आहेत. बाबासाहेब मुंबई येथील शाखेच्या संबंधात काम करीत आहेत. बाबांची मौल्यवान सेवा व सोसायटीचे कामाविषयी आस्था व कळकळ लक्षात आणून सर्वानुमते लंडन बैबल सोसायटीने त्यांस सन्मानार्थ नेमिले आहे".

—*ज्ञानोदय*, १३–८–१८९६, पृ. २५९.

६१. बाबा पदमनजी वापरीत असलेल्या बायबलमध्ये त्यांच्या इंग्रजी हस्ताक्षरात त्यांच्या या पत्नीच्या मृत्यूची नोंद आढळते. ती नोंद अशी :
'Bombay Ebenzar Vishwas Padmanji born on 24th October 1882. Baptised by Rev. Dhanjibhai Naoroji, Bombay, 4th February 1883. His dear mother died in Poona on 22nd August 1890. Her last words were "I am saved." '

६२. 'आम्हास कळविण्यास दुःख वाटते की रे. बाबा पदमनजी यांची पत्नी गेल्या शुक्रवारी मरण पावली. (२२ ऑगस्ट १८९०.) प्रभूची ही सेवकीण पुष्कळ दिवसांपासून आजारी होती'. —*ज्ञानोदय*, ता. २८ ऑगस्ट १८९० पृ. २७४.

६३. *अरुणोदय*, पृ. २३४ ते २५५.

६४. बाबा पदमनजींच्या मृत्यूनंतर ता. ८–९–१९०६ ला 'एक ख्रिस्ती नव्हे' या सहीने एक पत्र *ज्ञानोदयात* प्रसिद्ध झाले आहे. त्यात प्रस्तुत हकीगत पत्रकर्त्याने दिली आहे. प्रस्तुत पत्रकर्ता म्हणतो, बाबांचे वर्तन 'बोले तैसा चाले' या उक्तीप्रमाणे होते.

६५. *ज्ञानोदय* १, फेब्रुवारी १८५४, पृ. ३५–३७.

६६. *ज्ञानोदय* ३, सप्टेंबर १८९१, पृ. २८२.

६७. *ज्ञानोदय*, १५ एप्रिल १८७१, पृ. १२१.

६८. *ज्ञानोदय*, २४ नोव्हेंबर १८८७, पृ. ७४३

६९. *ज्ञानोदय*, २० ऑगस्ट १८९१, पृ. २७५–२७६

७०. *ज्ञानोदय*, १० डिसेंबर १८७४, पृ. ६१६.

७१. *ज्ञानोदय*, १५ जानेवारी १८८०, पृ. ३६.

७२. *ज्ञानोदय*, १२ फेब्रुवारी १८८०, पृ ७९ व २२ एप्रिल १८८०, पृ. २०३.

७३. *ज्ञानोदय*, ता. २५ फेब्रुवारी १८९७, पृ. ६०–६१.

७४. *ज्ञानोदय*, ता. २७ मे १८९७, पृ. १६४–१६५.

७५. ना. वा. टिळक, *वनवासी फूल*, संपा. देवदत्त नारायण टिळक, आ. ५ वी, अमरावती, १९६२, पृ. २०, २५ (१०–२–१८९५ च्या डायरीत रे. ना. वा. टिळक लिहितात, 'माझ्या बाप्तिस्म्याच्या वेळी बाबा पदमनजींनी प्रार्थना केली.')

७६. *विश्रब्ध शारदा*/भाग १, संपा. ह. मा. मोटे, मुंबई, १९७२, पृ. २२७.

७७. *ज्ञानोदय*, २८ जून १८८८, पृ. २०५ व ८ ऑगस्ट १८८९, पृ. २५३.

७८. *ज्ञानोदय*, ८ मार्च १८८८, पृ. ७५ व ७६.
*ज्ञानोदय*, ४ मार्च, १८५७, पृ. ६९ ते ७७.

७९. *ज्ञानोदय*, २८ मार्च १८८९, पृ. १०२, १०३.
*ज्ञानोदय*, १ एप्रिल १८८९, पृ. १०९, ११०.

*ज्ञानोदय*, १८ एप्रिल १८८९, पृ. १२५, १२६.

८०. कृ. भि. कुलकर्णी, *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति* मुंबई, १९५६. पृ. १३०.
D. P. I. Book Depot Vol. 59, 1894–95 (No. Paging).
Baba Padmanji, '*A Comprehensive, Dictionary, English and Marathi*', 1870, प्रस्तावना पृ. १०.

८१. ८२. *ज्ञानोदय*, ३० ऑगस्ट १८९४, पृ. २७५.

८३. *ज्ञानोदय*, २९ मार्च १८९४, पृ. ९८.

८४. *ज्ञानोदय*, दि. ६ सप्टेंबर १८९४, पृ. २८३, २८४.

८५. *ज्ञानोदय*, दि. १५ सप्टेंबर १९०४, पृ. २९१.

८६. *ज्ञानोदय*, ता. १६ मार्च १९०५, पृ. ८३.

८७. *अरुणोदय*, मुंबई, आ. ३ री, पृ. २३४.

८८. *ज्ञानोदय*, ता. ३० ऑगस्ट १९०६, पृ. २७५.

८९. *ज्ञानोदय*, ता. ६ सप्टेंबर १९०६, पृ. २८४–२८६.

९०. *ज्ञानोदय*, ता. ६ सप्टेंबर १९०६, पृ. २८६.

९१. *ज्ञानोदय*, पु. ६६ वे, अंक १३, २८ मार्च १९०७, पृ. १०१.

९२. *ज्ञानोदय*, २० जानेवारी १८९८, पृ. २०.

९३. धनंजय कीर, *महात्मा फुले*, मुंबई, १९६८; पृ. ११३.

९४. *ज्ञानोदय*, १४ जानेवारी १८८६, पृ. २५.

९५. बाबांचा मुलगा विश्वासराव ऊर्फ एब्नायसर. हा शिक्षक होता. बाबांचा नातू हेमंत विश्वासराव पदमनजी. हेमंत एस्सो कंपनीत आहे. तो मुंबईच्या ग्रँट रोड स्टेशनजवळ यशोदा भुवनात रहातो. आजही बाबांचे नित्यपाठाचे बायबल, त्यांचा ग्रुप फोटो, त्यांचे हस्ताक्षर इ. गोष्टी हेमंताकडे पहावयास सापडतात.

२

## निबंधकार बाबा पदमनजी

इंग्रजांच्या संपर्काने आम्हा भारतीयांच्या दृष्टीकोनात जी परिवर्तनक्षमता काही प्रमाणात निर्माण होऊ शकली, त्याचे फार मोठे श्रेय मुद्रणकलेच्या शोधाला आणि मिशनऱ्यांच्या आणि इंग्रज शासकांनी सुरू केलेल्या नव्या पद्धतीच्या शिक्षणप्रणालीला द्यावे लागेल. बेळगावच्या मिशन स्कूलमध्ये शिकत असताना कोवळ्या वयातील तरुण बाबांना आपल्या वर्गातील एका ब्राह्मण मुलाचे वर्तन सुधारण्याची प्रेरणा होते आणि त्यासाठी ते बोधपर पुस्तक लिहावयास घेतात. बाबांच्या सर्व हयातभरच्या कार्याचे स्पष्ट प्रतिबिंब या त्यांच्या पहिल्या लेखनकार्यातच पडलेले दिसते. गंमत अशी की, या पुस्तकाची हस्तलिखित सुवाच्य प्रत ज्या मुलासाठी ते पुस्तक लिहिले, त्या मुलाकडूनच बाबा लिहून घेतात आणि त्याला मोठ्या सूचकतेने त्याच्या दुष्कृत्याची जाणीव देतात! बाबांचे हे पहिले हस्तलिखित पुस्तक पाहून त्यांच्या शाळेतील टेलर नावाचे इंग्रज शिक्षक सहजगत्या उदगारून जातात की, 'तीन गोष्टींनी मनुष्य पुरा होतो, म्हणजे पुस्तक लिहिण्याने, घर बांधल्याने व लग्न केल्याने!' टेलर यांचे हे उद्‌गार नव्या युगातील नव्या जाणीवांचे मार्मिक दिग्दर्शन करतात यात शंका नाही. या नव्या दृष्टीकोणाने सारे तत्कालीन कर्ते पुरुष झपाटलेले दिसतात. लेखणीला, पुस्तक लिहिण्याला आणि तेही व्यावहारिक जीवनाची पूर्तता म्हणून, एक नवे महत्त्व म्हणून, या काळात प्राप्त झाले. बाबांच्या मनातील सुप्त लेखकाला या उद्‌गारांनी विलक्षण हुरूप आला असल्यास नवल नाही! दुर्दैवाने बाबांनी हे पहिले पुस्तक छापण्याची खटपट केली नसल्याने अप्रसिद्ध राहिले व काळाच्या उदरात गडप झाले. मात्र त्यानंतर लगेच बाबानी *Napolean's Book of Fate* या लोकप्रिय अशा भविष्यविषयक पुस्तकाचे *नेपोलियन बोनापार्ट याची शकुनवंती* या नावाने मोठ्या उत्साहाने भाषांतर केले व तितक्याच कौतुकाने त्यांच्या वडिलांनी ते स्वखर्चाने छापून त्याच्या हजार प्रती फुकट वाटण्याची व्यवस्था केली.

तत्कालीन अभिरुचीचे हे निदर्शक आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. हे दुसरे पुस्तक लिहिल्याबद्दल बाबांनी अतिशय खेद व्यक्त केला आहे व त्याच्याबद्दल १८८८ साली लिहिताना 'प्रसिद्ध होऊनही ते आता कोठे मिळत नाही हे बरे झाले!' असा समाधानाचा नि:श्वास टाकला आहे. बाबांनी डॉक्टर भाऊ दाजींसारखे आंग्ल वैद्यकशास्त्रात पारंगत व्हावे या वडिलांच्या इच्छेला बाबांनी प्रतिसाद दिला नाही. त्यांनी कशा रीतीची पुस्तके लिहावीत म्हणजे वडिलांचे पुस्तकांच्या प्रसिद्धीसाठी आर्थिक पाठबळ राहील, हे लक्षात येऊनही बाबांनी केवळ हौस म्हणून व तत्कालीन जनतेच्या अभिरुचीला खतपाणी घालावे म्हणून लेखन केले नाही. ते निराळयाच मार्गाला लागले.

इंग्रजांचे राज्य या देशात सुरू झाल्यानंतर सन १८२० ते सन १८५० या कालखंडात भौतिक दृष्टीने आपल्या समाजरचनेचा विचार करण्याची एक नवी दृष्टी प्राप्त झाली. ही दृष्टी या तमोयुगातील आपल्या पराभूतपणामुळे विशेषत्वाने तत्कालीन कर्त्या पुरुषांच्या मनाने आत्मसात करण्यासाठी सुरुवातीला जे काही प्रयत्न केले त्यातूनच मराठीतल्या स्फुट निबंधवाङ्मयाची निर्मिती झाली. हे निबंधवाङ्मय अभिव्यक्तीच्या दृष्टीने अगदीच बालबोध किंवा काही समीक्षकांनी म्हटल्याप्रमाणे[३] बालिश स्वरूपाचे वाटावे असे निश्चितच आहे. आणि ते तसे असावे यात अस्वाभाविक असे काहीच नाही. परंतु या प्राथमिक स्वरूपाच्या स्फुट निबंधलेखनातून नव्या बुद्धिवादाची, नव्या तर्कवादाची आणि भारतीय परंपरेला संमत नसलेल्या नव्या इहवादाची जी बीजे प्रगट झाली तिच्यामुळेच आजच्या आघाडीच्या राज्यकर्त्यांनाही एकोणीसावे शतक हे एक क्रांतिशतक होते असे म्हणावेसे वाटते.[४]

### निबंधमाला

अव्वल इंग्रजीतल्या सुरुवातीच्या काळातील मुख्यत: बाळशास्त्री जांभेकर, गोपाळराव हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी आणि भाऊ महाजन यांचेच स्फुट निबंधलेखन आज विवेचनाच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरते. परंतु हे सारे लेखन वृत्तपत्रातून त्यांनी विभागश: केले आहे. हे त्यांचे स्फुटलेखन वृत्तपत्रीय बाण्याचे व आवेगाचे आहे आणि ते पुस्तकरूपाने उत्तरकाळात प्रसिद्ध झाले आहे. सुरुवातीला तरी ते काही पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्याच्या हेतूने लिहिले गेले नाही. बाबांची निबंधलेखनाची प्रेरणा या प्रकारच्या निबंधलेखकांची नव्हे! बाबांनी सन १८५१ च्या सुमारास स्वतंत्ररीत्या काही निबंध लिहून ते ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्याची महत्वाकांक्षा बाळगलेली दिसते. स्फुट निबंधलेखनही वृत्तपत्रांतून क्रमश: न करता ते स्वत:च्या मनाप्रमाणे करून ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्याची ही अशा प्रकारची धडपड हा बाबांच्या लेखनाचा एक विशेष मानावा लागतो. अर्थातच तत्कालीन राज्यकर्त्यांच्या उदारमतवादी धोरणामुळे एतद्देशीय भाषेतून निरनिराळया विषयांवर ग्रंथलेखन व्हावे यासाठी निरनिराळया प्रकारे बक्षीसांची जी प्रलोभने दाखविण्यात येत होती त्यांचा पुरेपूर उपयोग बाबांनी सुरुवातीच्या काळात आपली लेखनाची विलक्षण हौस भागविण्यासाठी करून घेतलेला दिसतो. परंतु त्यातही प्रलोभनापेक्षाही त्यांची हौस, त्यांची जिद्द व त्यांची तळमळ महत्त्वाची होती हे अनेक

उदाहरणांवरून लक्षात येण्यासारखे आहे. लेखनगुणामुळे बक्षिसे मिळालेली पुस्तके वेळेवर छापली गेली नाहीत म्हणून अनेक प्रसंगी बाबांनी बक्षिस परत करून पुस्तक स्वतः छापण्याची इच्छा प्रगट केली आहे. तसेच *व्यभिचारनिषेधकबोध* यासारखा स्वावलोकनावर आधारलेला निबंध कोणत्याही बक्षिस देणाऱ्या संस्थेकडून छापला जाणार नाही हे लक्षात घेऊन त्यांनी स्वतःच छापून लोकाश्रयासाठी जनतेला आवाहन केलेले आहे.

बुद्धिवाद व ऐहिक अभिवृद्धी या विशेषांबरोबरच अगदी तरुण मनांत आविष्कृत झालेला ज्वलंत धर्मविचार त्यांच्या स्फुट निबंधातून वारंवार डोकावताना दिसतो.

इ. स. १८५२ साली सिध्द करून दक्षिणा प्राईज कमिटीला सादर केलेल्या *सर्वसंग्रही* या निबंधसंग्रहातील विषयांची विविधता तत्कालीन कोणत्याही एकटाकी लेखकापेक्षा व्यापक स्वरूपाची आहे. लोककल्याणासाठी विविध व उपयुक्त विषयांवर नाना प्रकारची माहिती अगदी साध्या सरळ पद्धतीने देण्याचा प्रयत्न या निबंधातून केलेला आहे. आपल्या देशबांधवांचे दोष त्यांना दिसतात. त्यांच्यातील दुर्गुणांनी बाबा व्यथितही होतात. परंतु केवळ विशीतील या तरुणाला याच काळात पंचविशीचा लोकहितवादी हा तरुण ज्या आवेशाने स्वबांधवांवर टीकेचा आसूड ओढीत होता तो आवेश त्याच प्रकारच्या काही निबंधातून दाखविता आला नाही. बाबांच्या तत्कालीन तरुण सुधारकांपेक्षा दिसणारा वेगळेपणा या पहिल्याच संग्रहात प्रकटलेला आहे.

बाबांच्या *निबंधमाला* या संग्रहामध्ये नाना प्रकारच्या धर्मांचा, उपासनापंथांचा विचार केलेला आहे. पारशी, मुसलमानी, ख्रिस्ती, बौध्द आणि हिंदुधर्म या विषयी साक्षेपाने विचार त्यांनी आपल्या निबंधातून केलेला आहे. या निबंधातून त्यांच्या मनावर याही काळात ख्रिस्ती धर्माचा पगडा जास्त असल्याचे दिसून येते. ख्रिस्तीशास्त्र, खरे सुख, पापाचा परिणाम इत्यादी विषयांवर त्यांनी आवर्जून लिहिले आहे. तसेच हिंदुधर्मातील दोषांचा विचार शाक्त पंथाच्या अनुषंगाने ते करतात. त्याचे कारण बहुधा त्यांच्या घरी शाक्तधर्माची असलेली कट्टर उपासना हेच असावे. तसेच शाळेत ख्रिस्तीधर्मपर संस्कार होत असल्याने व ख्रिस्ती धर्मियांची उदाहरणे पुढे असल्याने बाबांनी ख्रिस्ती धर्माचा विस्ताराने विचार केला असण्याची शक्यता आहे.

*सर्वसंग्रही* मध्ये ऐहिक अभिवृद्धीच्या दृष्टीने बाबांनी अलेक्झांड्रियातील पुस्तकगृहांचा नाश, विलायतेची लक्ष्मी, यासारख्या विषयांवर लिहून त्याचे महत्त्व स्वतःस वाटत असल्याचे सिद्ध केलेले आहे. *स्वदेशप्रीति* हा निबंध लिहून त्यांनी आपले स्वदेशावरचे प्रेम प्रगट केले आहे. त्याचप्रमाणे ऐतिहासिक दृष्टया जुना व नवा काळ यांची तुलना करून व इंग्रजी राज्यातून घेण्यासारखे काय आहे हेही सांगितले आहे. पाव शतकापूर्वी नाहीशा झालेल्या मराठ्यांच्या राज्याचा नाश व त्याची कारणे याचा विचार *बाजीराव पेशवे यांच्या अंमलात मराठी राज्याची व देशाची स्थिती* या निबंधामध्ये बाबांनी केला आहे. तसेच बाबांनी पहिल्याप्रथमच स्त्रीशिक्षणाचा विचार मांडला तो *स्त्रीविद्याभ्यास* या त्यांच्या निबंधामध्ये. इंग्रज लोक, मुसलमान लोक, त्यांचे आचारविचार व काल यांची माहिती देत असताना बाबांनी ज्ञान व मनोरंजन असा दुहेरी हेतू साध्य केला आहे.

पौर्णिमेचीं रात्र, ग्रहणे, चहा, सृष्टीतील गुह्य गोष्टी इत्यादी ऐहिक विषयांचा विचार बाबांनी या स्फुट निबंधांमध्ये मांडून आपली ऐहिक विचारसरणीही स्पष्ट केली आहे.

*सर्वसंग्रही* उर्फ *निबंधमाला* सिद्ध करताना बाबांनी तत्कालीन वृत्तपत्रातील ताज्या विषयांवरही लेखणी चालविली आणि आपले विचार त्याद्वारे मांडण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला. लोकसुधारणा व लोकांना उपयुक्त असे विषय मांडून लोकांचे लक्ष त्या विषयावर खेचण्याची कामगिरी या निबंधसंग्रहाने केली, असे म्हणावे लागेल.

*निबंधमाले*तील धर्मविषयक व स्वोन्नतीविषयक तळमळीने सिद्ध झालेल्या स्वतंत्र बाण्याच्या निबंधांबरोबरच शास्त्रीय व माहितीपर निबंधांच्या मांडणीसाठी बाबांनी इंग्रजीतील विज्ञानपर विषयांचा अभ्यास केलेला दिसतो. तरुण वयातच बाबांना लागलेला चौफेर वाचनाचा नाद व समाजापुढे आपले विचार मांडून 'शहाणे करून सोडावे सकळ जन' याचा त्यांना लागलेला ध्यास प्रामुख्याने जाणवतो.

*सर्वसंग्रही*ला उत्तम प्रतीचा निबंधसंग्रह म्हणून दक्षिणा प्राईझ कमिटीने पहिले बक्षिस देऊनही तो छापण्यामध्ये विलंब लावला, हे बाबांना सहन झाले नाही. त्यांनी बक्षीस परत करून पुस्तक छापण्याची तयारी दाखविली तेव्हा कुठे कमिटीने *निबंधमाला* या नावाने तो प्रसिद्ध केला. प्रसिद्ध करताना मुळातील काही निबंध वगळण्यात आलेले पाहून बाबा अतिशय अस्वस्थ झाल्याची नोंद *ज्ञानोदया*ने केली आहे. (ऑगस्ट १८६०) *स्पेक्टेटर*नेही त्याबद्दल नापसंती व्यक्त केली आहे.[५]

*सर्वसंग्रही* या नावाऐवजी *निबंधमाला* या नावाला बाबांनी का संमती दिली आहे असा प्रश्न साहजिकच मनात उद्‌भवतो. बाबांचे शिक्षक गोविंद नारायण माडगांवकर यांचे लेख वाचताना त्याची संगती लागते. माडगांवकरांनी *सर्वसंग्रही* हा शब्द ज्ञानकोश (encyclopedia) या अर्थाने उपयोजिला आहे.[६] बाबांचा लेखसंग्रह ज्ञानकोशातील लेखांना साजेसा असाच आहे. ज्ञानकोशाला साजेसे लेख लिहिण्याची महत्त्वाकांक्षा बाबांनी या तरुण वयात बाळगली होती यात शंका नाही. पुस्तक प्रसिद्ध करताना ही जिद्द ओसरली व पुस्तकातील सुटसुटीत निबंधांना अनुसरून त्यांनी *निबंधमाला* हे नाव संग्रहासाठी योजून टाकले. सुरवातीला बाबांना सुचलेले *सर्वसंग्रही* हे नाव माधव चंद्रोबा डुकले यांच्या *सर्वसंग्रह* या नियतकालिकावरून सुचले होते. परंतु प्रसिद्धीसमयी त्यांनी दिलेले *निबंधमाला* हे नाव आपल्या मासिकासाठी घेण्याचा मोह विष्णुशास्त्र्यांना झाला. बाबांचा हा संग्रह कै. विष्णुशास्त्री चिपळुणकरांच्या *निबंधमाले*च्या आधी जवळ जवळ १४-१५ वर्षे प्रसिद्ध झाला होता. निबंधमाला हे नामसादृश्य आणि विविध विषयांवरचे निबंध असणे हे साम्य लक्षणीय आहे. *निबंधमाले*तील निबंध दीर्घ स्वरूपाचे होते. *निबंधमाला* हे नियतकालिकाचे नाव होते. तर बाबांची *निबंधमाला* एक निबंधांचा संग्रह होता.

### हिंदुलोकांच्या सणाविषयी निबंध

इ. स. १८५२ साली बाबा पदमनजी अवघे २०–२१ वर्षांचे होते. त्या वयात *हिंदूंच्या*

*सणांविषयी निबंध* यासारखा अभ्यासपूर्ण व तळमळीने युक्त असा निबंध तयार केला ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. त्याच काळात ते मेडिकल कॉलेजात विद्यार्थी होते. तेथे त्यांचे मन रमत नते. कारण त्या अभ्यासक्रमात परमेश्वरविषयक कोणताच विषय नसे. बाबा पदमनजींनी प्रयत्नपूर्वक मेडिकल कॉलेज सोडले आणि फ्री चर्च विद्यालयात प्रवेश घेतला. त्यातूनच त्यांच्या हातून अशी महत्त्वपूर्ण पुस्तकाची रचना झाली. हिंदुधर्मात आजही जातीभेद, कर्मकांड आणि रूढींचे प्राबल्य दिसते. त्या काळात तर रूढी, परंपरा यांचेच राज्य होते. शिक्षणाचा फारसा प्रचार नव्हताच. धर्माचा पगडा जनमनावर होता. अज्ञान सर्वत्र होते. स्त्रीविद्याभ्यास, ऋण, मद्य, होळिका, पुनर्विवाह, खोटी शपथ, लाचलुचपत याबाबत विपरीत मते प्रचलित होती. त्यातून समाजाला बाहेर काढणे इष्ट व जरूर होते. अल्पस्वल्प शिक्षण झालेल्या माणसाला या गोष्टी वस्त करीत होत्या. यातूनच त्या काळात *ऋणनिषेधक बोध, पुनर्विवाह प्रकरण, होळीविषयी ग्रंथ, स्त्रीविद्याभ्यास निबंध* पुस्तके निर्माण झाली. क्रांती शस्त्राने होत नाही तर ग्रंथसत्तेने होते या भूमिकेतून बाबा पदमनजींच्या *हिंदुसणांविषयी निबंध* या पुस्तकाची रचना झाली असे म्हणावयास हवे. समाजाची सुधारणा हा बाबांच्या लेखनाचा कणा होता. 'हिंदु लोकांच्या सणाविषयी ग्रंथरचना करावी व त्यांत पुढील विषय यावेत' याबाबत एक निवेदन मुंबईच्या ट्रॅक्ट सोसैयटीने केलेले होते. 'हिंदु लोकांचे सण पुष्कळ आहेत. त्या सर्वांचे वर्णन करणे कठीण म्हणून निबंध रचणारानें त्यांतील आठ किंवा दहा निवडून त्यांचे विवरण करावे. आणि होळींच्या सणाविषयीं मराठी भाषेंत ग्रंथ झाले आहेत म्हणून त्यावर फार लिहू नये. सणाचे वर्णन करताना ह्यासंबंधी क्रिया, कर्मे व त्यांतील ज्या कित्येक गोष्टी सद्बुद्धीस व सद्धर्मास विरुद्ध असतील त्या व त्यांच्या आचरणाने काय परिणाम होतात, हे सर्व दाखवावे. या ग्रंथाची ६० किंवा ७० पेक्षा पाने अधिक असू नयेत.'[७] या अटींप्रमाणे बाबा पदमनजींनी हिंदु लोकांच्या सणांविषयी ८६ पृष्ठांचा निबंध लिहून सादर केला. 'तेव्हा जेवढे निबंध आले त्यातून फ्री चर्च मिशन शाळेतील उपगरु बाबा पदमनजी यांचा निबंध पसंत ठरला व त्यास १०० रु. बक्षीस मिळाले. परंतु त्याच्या खालोखाल दुसरा छापण्याजोगा कोणताच निबंध निघाला नाही.' *ज्ञानोदय*कारांनी या पुस्तकाविषयी म्हटले आहे.

ह्या पुस्तकांत ग्रंथकर्त्यानें सण उत्पन्न होण्याचे कारण दाखवून नंतर सण कोणत्या प्रकारचे असावे—कोणत्या प्रकारचे नसावे त्याविषयीं आपले मत येणेप्रमाणे दाखविले आहे :

(१) ज्या सणापासून घरांत ऋण व दारिद्रय शिरतें व ज्यापासून शरिरास दुःख होतें, प्रकृति बिघडतीं, शरीरीं आळस येतो तो सण कधी कोणी पाळू नये. त्यानंतर ज्या सणापासून मनास त्रास होतो, सदाचरणास कलंक लागतो, नीतीस भ्रष्टत्व येते, अंतःकरण मलीन होते, तो सण कधी पाळू नये. याशिवाय ज्या सणापासून ईश्वराच्या आज्ञा मोडल्या जातात, व लोक पूर्वीपेक्षा भ्रष्ट होऊन कुकर्म करावयास तयार होतात तो सण कधी पाळू नये.

तसेच जो सण ईश्वरस्थापित आहे व ज्यापासून त्याचे गौरव दृष्टीस पडते व ज्यापासून

त्यावर आपली भक्ति व श्रद्धा अधिक नसती, तो सण पाळावा.

याप्रमाणे आपले योग्य मत सांगून तो त्याप्रमाणे हिंदू लोकांच्या सणाची तुळना करून पाहतो. आणि हे पुस्तक कोणी वाचून पाहिले असतां हिंदूंच्या सणात काय बाधक आहे हे साफ ध्यानांत येईल. यांत सर्व सणांविषयीं लिहिले आहे असें नाही पण मुख्य सणांविषयी लिहिले आहे.[८]

ग्रंथाच्या अनक्रमणिकेवरून असे लक्षात येते की अक्षयतृतीया, वटसावित्री, महाएकादशी, नागपंचमी, नारळी पौर्णिमा व गोकुळ अष्टमी, गणेश चतुर्थि, दसरा, दिवाळी व होळी इ. सणांचा विचार यात केला आहे. हिंदू लोकांना आज सुमारे दोन हजार वर्षांपासून अज्ञान अंधकारात गाढ निद्रा लागली आहे, तीतून कित्येकजण आताशा जागृत होत आहेत व आपल्या देशी पूर्वी अंधःकाराच्या समयात कोणकोणत्या राक्षसांनी व क्रूर पशूंनी येऊन वस्ती केली हे पाहून त्यास बाहेर हाकलून लावण्याचे प्रयत्न चालविले आहेत. त्या कामाकरिता कित्येक शूरांनी नवीन शस्त्रे तयार केली आहेत, तेणे करून त्यांनी त्या दुष्टांबरोबर युद्ध चालविले आहे व ईश्वर सदृश्याने त्यांस पुष्कळ मिळून ते यशस्वी होतील, हा बाबांचा विश्वास आहे. ग्रंथ हे शस्त्राप्रमाणे असून त्यांनी कोणत्या शत्रूवर हल्ला केला हे बाबा याप्रमाणे थोडक्यात प्रस्तावनेत सांगून नंतर त्याचे विवेचन करतात.

| शस्त्र | शत्रू |
|---|---|
| दारु पिणाऱ्यास सुबोध | दारु हा अट्टल चोर |
| ऋणनिषेधक बोध | ऋणाग्नि |
| होळीविषयी ग्रंथ | होळिका राक्षसीण |
| पुनर्विवाह प्रकरण | पुनर्विवाह प्रतिबंधक दुष्ट चाल |
| खोटया शपथेविषयी | खोटया शपथेचे महापातक |
| लाच न खाण्याविषयी | लाच घेण्याची दुष्ट चाल |
| सत्यनिरुपण | असत्य नामक राक्षस |
| स्त्री विद्याभ्यास | स्त्रियांस अज्ञानात ठेवण्याची समजुत |
| शुचिर्भूतपणा | मलीनता नामक अवदसा |

स्वदेशीय लोकांनी आपल्या शत्रूंचा नाश करण्यास कोणत्या नव्या शस्त्रास्त्राने सिद्ध झाले पाहिजे हे बाबांनी सांगितले आहे. ते म्हणतात :

या युद्धसंग्रामात एक विलक्षण चमत्कार नजरेस पडतो, तो असा की ज्यांच्या रक्षणार्थ व कल्याणार्थ हे सूज्ञ लोक श्रम घेतात, तेच ह्यांचा द्वेष व निंदा करितात. याचे कारण असे की, ज्या दुष्ट पशूंचा हे योद्धे नाश करू पाहतात, ते पशू बहुतेकांनी आपल्या घरी जशी गाई म्हैस पाळावी तसे बाळगून ठेविले आहेत व त्यावर त्यांचा उदरनिर्वाह चालतो. दुसऱ्या कित्येकांनी जे दुष्ट राक्षस आपल्या देशात शिरले आहेत त्यास आपले धनी करून आपण गुलामाप्रमाणे त्यांच्या स्वाधीन होऊन राहिले आहेत म्हणून त्या राक्षसांचा नाश

करण्यास कोणी उद्युक्त झाला असता त्यास मोठा क्रोध येतो. असो जरी आपल्या लोकांपासून द्वेष व छळवणूक सोसणे प्राप्त पडले तरी, आपले कर्तव्यकर्म आपण सोडू नये, म्हणजे ते लौकरच शुद्धीवर येऊन उलटे आपले सहाय करू लागतील. आता आपली शक्ति थोडी म्हणून उगेच बसू नये, प्रयत्न करावा. मुंगी हा लहान जीव असता त्यांचा मोठा समुदाय मिळाला म्हणजे मोठ्या सर्पासही त्या जर्जर करून टाकितात. याप्रमाणे आपल्या अल्प सामर्थ्याचा खेद न करिता पुष्कळ मित्र जमवून उद्योग करून परमेश्वरापासी सहाय मागावे या प्रकारचा विचार मनात आणून मी यथामति हिंदू लोकांच्या सणाविषयी निबंध रचिला आहे. तर यातील दूषणांकडे लक्ष न देता सुज्ञांनी गुण मात्र ग्रहण करावे अशी माझी प्रार्थना आहे. (पृ. ६७)

बाबांचा हा एक महत्त्वाचा व तत्कालीन उपयोगाचा, सुधारणेस प्रवृत्त करणारा निबंधग्रंथ आहे.

### स्त्रीविद्याभ्यास निबंध

स्त्रीसुधारणेस अनुकूल असा विषयात मुंबईच्या पुस्तके व निबंध करणाऱ्या मंडळीने एक निबंध मागवला होता. बक्षिस होते १०० रुपयांचे. बाबांनी *स्त्रीविद्याभ्यास निबंध* रचून वरील मंडळीकडे पाठविला. त्यांना बक्षिसही मिळाले. त्याचप्रमाणे स्त्रियांस विद्या शिकवून त्यांची सुधारणूक करणे त्यांस त्यांच्या योग्यतेप्रमाणे मान देणे व त्यांच्या कल्याणाची इच्छा बाळगणे याला हिंदूंचा विरोध आहे; नव्हे तो त्यांना अधर्म वाटतो. या विचारसरणीने निर्माण केलेल्या अनेक वर्षांच्या अनर्थपरंपरेने हिंदू धर्माचे किती नुकसान झाले आहे याचे विवेचन या पुस्तकात केले आहे. स्त्रीस शिक्षण दिल्यास ती पुरुषाची सहचरी पत्नी, मार्गदर्शक, मित्र होऊ शकते हे पटवून देण्यासाठी प्रस्तुत निबंधरचना झाली. कित्येकांची अशी समजूत असते की, स्त्रियांनी सतत दासपणात वागावे, त्यांनी विद्या शिकू नये, सुशिक्षित होऊ नये, धर्म जाणू नये, परपुरुषांसी बोलू नये, त्यांच्या मंडळीत जाऊ नये, आपले मत प्रगट करू नये ही त्यांची इच्छा असते. त्यांनी कोणत्याही गोष्टीत पुरुषाची बरोबरी करू नये आणि या मूर्ख समजुतीच्या पुष्टीकरणार्थ ते स्त्रियांची निंदा ज्यात केली आहे अशी स्मृतीतील वाक्ये हिंदू लोक काढून दाखवितात. म्हणतात, 'पूर्वी मोठमोठे ज्ञानसंपन्न व विद्वान ऋषी होऊन गेले. त्यांनी लिहिले ते खोटे की काय?' या वृथाभिमानाने स्त्रिया अज्ञानी राहून देश अधोगतीस कसा गेला याची बाबा मीमांसा करतात. स्त्री सुखी झाल्यास संतती उत्तम ज्ञानी सुशिक्षित होईल. स्त्री शिक्षणाने सुखी होईल. स्त्रीशिक्षणाने विचारी संसारदक्ष, मुलास वळण लावणारी, संस्कारक्षम, ज्ञानी क्वचित आर्थिक स्वावलंबीही होईल. 'जिच्या हाती पाळण्याची दोरी तीच जगा उद्धरी' हे लक्षात घेऊन स्त्रियांनी सुशिक्षित व्हावे यासाठी बाबांचा हा प्रयत्न आहे. प्रस्तुत निबंध संवादरूपाने लिहिला आहे तो केवळ सुबोधतेपोटी. पहिल्या भागात स्त्रियांना विद्या शिकविण्याविरुद्ध हिंदुलोक साधारणतः ज्या शंका उपस्थित करतात त्यांचे समाधान करण्यात आलेले आहे व दुसऱ्या भागात शिक्षणापासून स्त्रियांना होणाऱ्या लाभाची चर्चा केली आहे.

स्त्रीशिक्षणाबद्दल येणाऱ्या सर्व तऱ्हेच्या शंका, त्यांचे बुद्धिवादी दृष्टिकोणातून केलेले खंडणमंडन आणि प्रतिपाद्य विषयाची आवेशपूर्ण तरफदारी असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. केवळ एतद्देशियांवर शिवराळ टीका व ख्रिस्ती धर्माची अनावर प्रशंसा असा प्रकार नाही. सर्वत्र स्त्रीचे दुःख व अज्ञान दूर करण्याकरिता त्यांचे (लेखकाचे) मन व्याकुळ झाल्यासारखे दिसते. म्हणून तो म्हणतो, 'सांप्रत आपल्यांत जी अज्ञानाची गाढ निद्रा लागली आहे तींतून स्त्रियांस जागृत करण्यास विद्यारूप घंटा वाजविली पाहिजे. म्हणजे त्या सावध होतील.' हिंदू मातेचे व तिच्या अपत्याचे वर्णन ते करतात, आपल्या देशांत जेष्ठ पुत्राची आई म्हटली कीं, बहुत-करून किंवा अठरा वीस वर्षांची मुलगी असती, तिजजवळ ते मूल जनावरांच्या बचड्याप्रमाणें शरिरानें मात्र वाढते. तें कांहींसें जाणतें झालें म्हणजे दोन किंवा अडीच वर्षांचे झालें म्हणजे त्यास हात उचलावयास, कोणास छिःथू करावयास, लाथ मारायास, ती शिकविती. ही काय त्या लहान बालकास सुशिक्षा म्हणावी? स्त्री अज्ञानी व मुले असंस्कृत होण्याचे मुख्य कारण म्हणजे पुरुष वर्गाची वृत्ति, त्यास वाटतें कीं, ईश्वराने स्त्री हे एक आपणास दोन पायांचे व बोलतें जनावरच कष्ट, मसालत करण्यास दिलें आहे.' स्त्रीशिक्षणाने पुरुषाची सहचरी, कुटुंबाचे पोषण करणारी, सुखदुःखाची वाटेकरीण, नवऱ्यावर प्राणापलिकडे प्रेम करणारी, भिडस्त, मर्यादशील संसाररथाचे दुसरे चक्र होईल, ती खरीखुरी अर्धांगी होईल. या निबंधात बाबांचे भारतीय कुटुंबाचे सूक्ष्म निरीक्षण, त्यांचा अभ्यास, व्यासंग आणि निवेदनकौशल्य व प्रतिपादनाची रोचक हातोटी इत्यादी गुण स्पष्टपणे लक्षात येतात. विशेषतः या निबंधातील संवाद हा वृद्धतरुण संवाद आहे. त्यातील वृद्ध हा जुना मताभिमानी असून तरुण मात्र नव्या मताचा पुरस्कर्ता आहे. स्त्रियांनी शिक्षण घ्यावे याबद्दल या काळातील वृद्धाला विलक्षण आश्चर्य वाटते. त्याच्या मताने शिक्षण हे पुरुषांच्या दृष्टीनेही मुळीच आवश्यक नसून त्यामुळे शास्त्रीपंडितांचे काय महत्त्व राहिल असा प्रश्न त्याला पडतो. त्याने शिक्षणाला इंग्रजी राज्या-तील एक खूळ मानले आहे. वृद्धाने स्त्री शिक्षणाविरुद्ध मुख्यतः दोन मुद्दे उपस्थित केले आहेत– (१) शिक्षणाने स्त्रिया अमर्याद होतील व पतीची अवहेलना करतील आणि (२) वाचना-साठी कोकशास्त्र, लावण्या इ. चा वापर करून चारित्र भ्रष्ट होतील. म्हणून वाचन हे केवळ कसबिणींचे काम होय.

वृद्धाच्या वरील मुद्यावर तरुणाने उत्तर पक्ष केला तो असा की ज्या विद्येने विनय येतो, ईश्वरापर्यंत व्यापक ज्ञान मिळते त्या विद्येने स्त्रिया व्यभिचारिणी होऊन पतीशी उद्धटपणे वागतील हे कसे शक्य आहे? वृद्धाने दुसरा मुद्दा असा उपस्थित केला की, स्त्रिया आहेत त्या स्थितीविषयी स्वतः कुरकुर करीत नसताना त्या सुखी नाहीत अशी कल्पना करून घेऊन त्यांच्यात सुधारणा घडविण्याच्या गोष्टी करण्यात येतात. यावर तरुणाचे उत्तर असे की दासीपणापेक्षा निराळी आपली अवस्था असू शकते याची स्त्रियांना पिढयान्‌पिढया जखडलेल्या सवयीमुळे कल्पनाच नाही. पण याचा अर्थ त्या संतुष्ट आहेत असा नाही.

वृद्धाने आणखी एक शंका उपस्थित केली की, स्त्रिया शिकल्या तरी सुधारणार नाहीत. त्या मूळच्याच दुष्ट, कपटी व नीच. सापाला दूध पाजले तरी विषच. यावर तरुणाने असे

उत्तर दिले की, सापाच्या अंगात विष असते म्हणून त्याला पाजलेल्या दुधाचे विष होते. पण स्त्रीला विद्येने आणखी जास्त कपटीपणा, नीचपणा येईल असे संभवत नाही. स्त्री व पुरुष यांच्यात स्वभाव, बुद्धि, ज्ञान, विचार, कल्पनाशक्ति इत्यादी बाबतींत परमेश्वराने भेद केलेला नसून त्यांची समान श्रेष्ठता आहे. स्त्री ही पुरुषाच्या पासोळीपासून झालेली म्हणजेच त्याच्याच हाडामांसाची आहे. दोघांचे अन्नपवन सारखेच तद्वत दोघांच्या मनास व आत्म्यास विद्या, बुद्धि व ज्ञानधर्माची सारखीच गरज आहे. स्त्रिया घरकामास योग्य आहेत तर त्यांना नोकरी, पंतोजीपणा इ. साठी आवश्यक विद्येची गरज काय असा प्रश्न वृद्धाने विचारला असता तरुणाने त्याला उत्तर दिले की विद्येचा उपयोग केवळ पोट भरणे एवढाच नसून जगात कलाकौशल्ये, विद्त्ता, ग्रंथ, इतिहासादी गोष्टींची विद्येमुळेच वाढ झाली आहे.

शास्त्रात निषेध मानलेल्या गोष्टींपैकी आज ब्राह्मणही कित्येक गोष्टी आचरतात. समुद्र-यात्रा करून ते खुशाल रामेश्वर, गोकर्ण, द्वारका इत्यादी ठिकाणी जातात. शूद्राची चाकरी ब्राह्मण करीत आहेत. बाजीरावाच्या काळाप्रमाणे आता साहेबाला स्पर्श झाला म्हणजे स्नान करीत नाहीत. वाड-वडिलांचा धंदा सोडून इतर धंदे करितात. अशा प्रकारची उदाहरणे देऊन तरुणाने असा प्रतिप्रश्न विचारला आहे की वडिलांच्या विहिरीला कठडा नव्हता म्हणून सुरक्षिततेसाठी आपण तो बांधू नये काय? तरुणाच्या वरील कोटिक्रमावर एका उपाध्येबुवांनी असा आक्षेप घेतला आहे की *पद्मपुराणात* स्त्रीला पती हाच देव असून त्याच्या सेवेपलीकडे तिला दुसरा धर्मच नाही असे असता पतीपेक्षा तिला विद्याप्राप्ती करून घेऊन श्रेष्ठ होण्याचे काहीही कारण नाही. शिवाय *स्कंदपुराणात* असे म्हटले आहे की स्त्री ही खोटी, सहसी, मूर्ख, लोभी व दुष्ट असल्याने तिला स्वातंत्र्य देऊ नये. तिजवर विश्वासही ठेवू नये. ती शिकली तर पतीची गुप्त कागदपत्रे पाहून त्याचे बिंग फोडील. उपाध्येबुवांना तरुणाने उत्तर दिले की, पतीला देव मानल्यास हिंदुस्थानातला प्रत्येक माणूस देव ठरेल. माणसाने गर्वाने स्वतःला देव मानण्याइतके नीचपणा कोणता? दुःख दारिद्र्याने पिडणारा मनुष्य देव कसा? हा सारा मूर्खपणा इतर धर्मांत नाही. एवढा वाद झाल्यानंतर वृद्ध स्त्रियांच्या शिक्षणाची गरज कबूल करतो पण त्यांनी पुरुषांपेक्षा ज्ञानी व्हावे हे मात्र त्याला मान्य नाही. शास्त्रकारांनी स्त्रीविषयी एवढी क्षूद्रबुद्धी का बाळगावी हे आपणास समजत नाही असे वृद्धाने कबूल केले, स्त्री ही सर्वच बाबतीत पुरुषाची सहचारिणी, कुटुंबाचे पोषण करणारी, सुखदुःखाची वाटेकरीण, नवऱ्यावर प्राणापलीकडे प्रेम करणारी, भिडस्त मर्यादाशील, संसारातील सोबतीण असल्याने तिला पुरुषाने बरोबरीने वागविण्यात पुरुषाला कमीपणा का वाटावा असा प्रश्न तरुणाने वृद्धाला विचारला. त्याच्यामध्ये शास्त्रकारांनी स्त्रियांना अनुदारपणाने वागविले याचे कारण एवढेच असावे की त्यांच्या वेळी अधिकांश स्त्रिया अज्ञानी असाव्यात. शेवटी तरुणाने असे म्हटले आहे की जुन्या समजुती सोडून पृथ्वीवरील सुधारलेल्या देशांप्रमाणे वागणे इष्ट आहे. स्त्रियांस पशूप्रमाणे वागविल्यामुळे सुधारणा होणे शक्य नाही.

पुनः दुसऱ्या भागात स्त्रियांना शिक्षण दिल्याने होणाऱ्या लाभांसंबंधी विस्ताराने चर्चा घडविण्यात आली आहे.

एकंदरित स्त्री शिक्षणाचा सांगोपांग विचार करून हा निबंध लिहिलेला असल्याने त्यात प्रस्तुत विषयाच्या पुरस्कारार्थ जेवढे मुद्दे उपस्थित करता येणे शक्य होते तेवढ्या साऱ्याचा विस्तारपूर्वक विचार केलेला आहे. अर्थातच स्त्री शिक्षणापासून धोके कल्पिण्याच्या बाबतीत विरोधकांनी जेवढे एकांतिक धोरण स्वीकारावयाचे दाखविले आहे तेवढेच अतिरंजित चित्रण शिक्षणाने स्त्रियांना होणाऱ्या लाभाचे करण्यात आले आहे. असे प्रस्तुत निबंध वाचताना सहज लक्षात येते.[९]

### व्यभिचारनिषेध बोध

बाबा पदमनजींचे सुधारणाविषयक आणखी एक पुस्तक म्हणजे इ. स. १८५४ साली त्यांनी लिहिलेले *व्यभिचारानिषेधक बोध* हे होय. व्यभिचारकर्माचे प्रकार व त्यांच्याविषयी लोकांचे मन, जारकर्माचे अपराध व त्याचे वाईट परिणाम. आणि त्याविषयी प्राचीन काळच्या लोकांची दंडनीति, व्यभिचारकर्माचा आणखी एक प्रकार रंडीबाजी व तिचे वाईट परिणाम, त्याविषयी इतिहासातील प्रमाणे, बैठकी करण्याच्या रीती, इष्कबाजीच्या व्यसनात पडलेली तरुण पोरे व त्यांचे आचरण, त्यांचा हुच्चपणा व त्यामुळे प्राप्त झालेली दशा इत्यादी विषय पहिल्या भागात आहेत. दुसऱ्या भागात व्यभिचार, रंडीबाजी व नाचबैठका बंद होण्याचे कारण जे परोपकारी विद्वान गृहस्थ स्वदेशकल्याणार्थ झटत आहेत त्यांचे महत्त्व, मुंबईतील शेट सावकार यांसी भाषण, रंडीबाजीच्या व्यसनात पडलेल्या तरुणांस बोध, महाराष्ट्र देशातील शास्त्री, पंडित, उपाध्ये व हरदास यांसी संभाषण व पुरवणी या गोष्टी आहेत. पुस्तकाचे आवाहन मुख्यतः सर्व विद्वान व स्वदेशकल्याणेच्छू व्यक्तींस आहे. ह्या भरतखंडात कित्येक गोष्टी अविचारामुळे किंवा विचारी लोकांच्या दुर्लक्षामुळे कशा फैलावल्या आहेत याच्या विवेचनाबरोबर या दुर्गुणाशी सामना करणाऱ्या स्वदेशबांधवांबद्दल कृतज्ञताही आहे.

मनुष्यजातीमध्ये जी अनेक दुःखे आपल्या दृष्टीस पडतात त्यांतून बहुतेक अपरिमित वांछेपासून उत्पन्न होतात. इंद्रियभोग मर्यादा सोडून भोगिले असता शरीराचा नाश करितात, बुद्धीस क्षीणता आणतात आणि मनास अस्वास्थ्य देतात. असे असता कोट्यावधी मनुष्ये आरोग्य विम्मुख होऊन दुराचरणाचे अवलंबन करीत आहेत. त्यांची स्थिती पाहून विचार करूं लागले असता आपल्या अंतःकरणास अतिशय द्रव होतो, आणि ईश्वरें आपल्या मनाच्या ठायीं दया म्हणून जी भावना ठेविली आहे, ती जागृती होती, व तिच्या सूचनेवरून दुःखात पडलेला मनुष्यासी आपला कोणता धर्म लागतो. हे ती आपणास सांगती. मनुष्याचें सुख वृद्धिंगत होण्यापेक्षा, त्याचे दुःख निवारण करणे हेच आपले मोठे काम आहे, आणि यातच आपले विशेष यत्न सफल होतील. . . जरी सर्व जगाचे दुःख आपल्या हातून परिहार होत नाहीं, तरी त्याचा विचार केल्याने आपल्या स्वदेशीय लोकांची स्थिति सुधारण्याचे कांही उपाय सुचतात. 'ज्या देशीं ईश्वराने आपणास जन्मास घातले आहे, तेथील लोकांची तरी दुःखे जाणून ती दूर होण्याचे स्वसामर्थ्याप्रमाणे उपाय करणे हा सर्वांचा धर्मच होय. आता हे उपाय सर्वांपासी सारखे असतात असें नाही. कोणी

परोपकारी पुरुष द्रव्यद्वारा स्वदेश उच्चावस्थेस आणू पाहातात, आणि कोणी विद्येच्या प्रसाराने स्वकीय जनांची स्थिती सुधारू पाहातात.[१०]

अशा प्रकारे लोकांची विशेषत: स्वदेशातील लोकांचे दु:ख निवारण करण्याच्या भूमिकेतून प्रस्तुत ग्रंथाचा जन्म झाल्याचे दिसते. 'अति तेथे माती' या न्यायाने मनुष्याने लोभातून व भोगाच्या अतिरेकातून दु:ख निर्माण केले आहे. व्यभिचाराची निर्मिती भोगाच्या अतिरेकी वासनेतूनच झाली. तीपासून मनुष्य दु:खी झाला आहे. या वृत्तीचा निषेध करण्यासाठी, त्याची माणसाच्या मनात घृणा निर्माण करण्यासाठी ह्या ग्रंथाचा प्रपंच त्यांना करावा लागला. या लहानशा ग्रंथातील विवेचन सर्वस्वी नवे आहे, असे ग्रंथकर्त्यास मुळीच म्हणावयाचे नाही. परंतु 'बहुत काळाची चाल, अभिमान, आग्रह व आवड इत्यादी जीं लोकांच्या अज्ञानामुळें, तीं त्यांच्या मनात फार खोल जाऊन इतकी सदृढ बसली आहेत कीं ती उपटून टाकण्यास त्यांस स्वत: सामर्थ्य राहिले नाही. या कामास दुसऱ्याकडून प्रयत्न झाला पाहिजे.' या श्रद्धेने हे काम ग्रंथकर्त्याने पत्करले आहे.

लग्नादि कार्यांत कळावंतीणीचा नाच करण्याचे चालीवर कांहीं ल्याहावें या हेतूने हे पुस्तक लिहावयास घेतले असता संपत्तीचा मद, ऐषारामाचा भोगाचा अपरिमितपणा, धर्माचे निमित्त, प्रतिष्ठा व लोकप्रतिष्ठेची महत्तेच्छा या कारणांमुळे मूळ विषय गुंतागुंतीचा झाला आहे याची त्यांना जाणीव झाली. त्याच्याही पुढे गेल्यानंतर जुगार, दारू इत्यादी नाना प्रकारच्या कंटक वृक्षाचे पाळांसी चहूकडे अडकून पसरले आहे, आणि ती छाटून टाकण्याचा प्रयत्न करताना या मुळांचे मोठे प्रचंड असे 'व्याभिचार' नावाचे एक बहुत काळाचे जुनाट वाढलेले आहे, त्याच्या ऊजव्या बाजूस एक मोठी गाठ वाढली आहे. तिचे नाव रंडीबाजी. ती इतकी कठीण व चिवट आहे की, तिला तीक्ष्ण कुऱ्हाडीचे प्रहार केल्याशिवाय ती तुटणार नाही", असे बाबांना दिसून आले. याप्रमाणे मनुष्याच्या मनातील एका दुर्व्यसनाच्या मुळाचे कारण बारकाव्याने शोधून त्याच्या निर्मूलनाचा विचार यथामति सिध्द करण्याचा हा बाबांचा एक महत्वाचा प्रयत्न आहे. याबाबत लोकांनी काय करावे हे सांगताना त्यांनी एक सुंदर रुपक वापरले आहे. समाजाने 'आपल्या सर्व मित्रबांधवासहित प्रयत्न करून हा व्याभिचाररूप वृक्ष जो सहस्त्रावधी वर्षांपासून जुनावला आहे, तो मुळासुध्दा ऊपटून टाकण्याचा प्रयत्न करावा. जे बलवान असतील त्यांनीं बुंधावर प्रहार करावा, त्यापेक्षा जे अशक्त असतील त्यांनी त्याच्या फांद्या तोडाव्या, कोणी त्याच्या कोवळ्या डहाळ्या छाटाव्या, व ज्यांस अगदीच कमी बळ असेल, त्यांनी पाने तरी तोडू लागावे. असे केल्याने त्याची वाढ कमी होऊन तो उत्तरोत्तर सुकत जाईल आणि त्याच्या मुळावर सदाचरणरूप कुऱ्हाड जिला ईश्वरभीतीची तीक्ष्ण धार असती, तिचे प्रहार होऊ लागले, आणि त्याच्या शेंड्यास विद्यावृध्दीचा झंझा मारूत हेलकावे देऊ लागला म्हणजे तो वृक्ष सहजच उपटला जाईल. असे झाल्यावर त्यापासून उत्पन्न होणारी, जी दु:ख, रोग, विपत्ति, दारिद्र, शोक इत्यादि कुफळे अर्थातच नाहिसी होतील, व जे लोक सांप्रतही कुफळे खाऊन आपला नाश करून घेत आहेत, ते ज्ञान, विद्या, सदाचरण, सुभक्ति, यांची सुरस व

मिष्ट फळे सेवन करून तृप्त व सुखी होतील.[११]

समाजातील दुर्व्यसने नष्ट व्हावीत आणि कुटुंबसुधारणा व पर्यायाने समाजसुधारणा घडावी या हेतूने त्यांनी व्यभिचाराची समाजाला लागलेली कीड कशी दूर होईल याचा सखोल विचार प्रस्तुत पुस्तकात केला आहे. हा अतिशय स्पष्ट व परखड शब्दात त्यांनी मांडला आहे. 'व्यभिचार म्हणजे पुरुषानें स्वस्त्री वर्जून परस्त्रीसंग करणे अथवा स्त्रीने स्वभ्रतार वर्जून (त्यजून) परपुरुषासी रत होणे.' याचे भिन्न भिन्न प्रकार समाजावलोकनावरून त्यांनी उघड केले आहेत. हे सारे प्रकार त्यांना शास्त्री, पंडित, हरदास, तरुण शेट, सावकार व सरदार दरकदार यांमध्ये आढळतात त्यांच्याशी संवाद साधणे हाच या पुस्तकाचा हेतू आहे. चटकदार प्रारंभ, आकर्षक व परिणामकारक मांडणी व तसाच शेवट असे या निबंधाच्या पुस्तकाचे वर्णन करणे योग्य होईल. विषयाचा सांगोपांग अभ्यास, पुरावे, भरपूर माहिती, मुद्देसूद रचना इत्यादी निबंधाची अंगोपांगे प्रस्तुत पुस्तकात दिसून येतील. आपल्या म्हणण्याचा प्रभाव पाडण्यासाठी उपयुक्त आधार, संस्कृत श्लोक आणि पवित्र शास्त्रातील वाक्ये यांचा पण उपयोग त्यांनी कुशलतने करून घेतला आहे. *व्यभिचारनिषेधबोध* या ग्रंथावरून *ज्ञानोदय*कार लिहितात, 'प्राचीन काळी व्यभिचारकर्माविषयी लोकांची कशी समजूत होती, व त्यावेळी शासन कसे होते' याची फार चांगली कल्पना येत नसल्याने *ज्ञानोदया*ने पुस्तकातील उतारेच्या उतारे ह्या पुस्तकावरून उतरवून घेऊन आपल्या वाचकांची सोय केली आहे.[१२] वाचकांना व्यभिचारविषयक साद्यंत माहिती मिळावी आणि त्यांनी व्यभिचारकर्मापासून दूर रहावे एवढ्यासाठी *ज्ञानोदया*ने *व्यभिचारनिषेध बोधा*तून ही माहिती उद्धृत केली आहे हे उघड आहे. ग्रीस, अथेन्स, पोलंड, रोम, फ्रान्स, इंग्लंड तसेच विविध धर्मात व्यभिचारी स्त्रीपुरुषांस कसे शासन करीत याविषयीची माहिती रंजनाबरोबर उद्बोधकही आहे. उदा. यहुदी लोक आपल्या शासनाप्रमाणे व्यभिचारात सापडलेल्या स्त्रीपुरुषास धोंडमार करीत. अथेन्समध्ये अशी रीत होती की व्यभिचाऱ्यास कोणीही कशीही शिक्षा करावी. रोमन लोकांत व्यभिचारी लोकांचे नाककान इत्यादी छेदीत. लोक्रीयन लोक यासाठी पुरुषाचे डोळे काढीत. कास्तानशियांत व्यभिचाऱ्यास गोणपाटांत गुंडाळून समुद्रात फेकीत व जाळून टाकीत. फ्रान्समध्ये अशा स्त्रीपुरुषांना रस्त्यातून नग्न धावत जावे लागे व दंड द्यावा लागे. स्पेनमध्ये शिश्नास खिळे ठोकून मरेपर्यंत टांगून ठेवीत. इंग्लंडमध्ये देहांत शासन होते. नंतर हद्दपारी व पुढे अल्प दंड अशी कमीत कमी शिक्षा होऊ लागली. महंमदी धर्मात स्त्रीपुरुषास वेगवेगळ्या खोलीत कोंडून ठेवीत. पुढे सजा हलकी झाली. हिंदुधर्मात स्त्रीस कोठीत कोंडून ठेवीत. पुरुषांस दंड होई इत्यादी.

## कुटुंबाची सुधारणा

*कुटुंबाची सुधारणा* हा बाबा पदमनजींचा आणखी एक महत्वाचा निबंधपर ग्रंथ होय. ह्या निबंधास बाबांना दक्षिणा प्रैज कमिटीचे १५० रु. चे बक्षिस मिळाले होते. त्यात हिंदु लोकांची स्थिती, स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, विचार, शील, बालविवाह इ. विषयांचा विचार केलेला आहे.

बाबा या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहितात :

जो निबंध लिहावयास मी हाती घेतला आहे, तो जरी मोठ्या उपयोगाचा आहे तरी त्याची सर्व सामग्री मजकडून होणे अशक्य आहे, ह्या कामास पुष्कळ विद्या, विचार, बुद्धि व बहुश्रुतत्व ह्यांचे प्रयोजन असून हा निबंध लिहिण्यास मी प्रारंभ केला आहे. तर तो सिद्धीस कसा जाईल असे कोणी विचारील तर त्यास माझे विनययुक्त उत्तर असे आहे की 'केशराची शेते लावावयास पुष्कळ भांडवल पाहिजे, पण त्या शेताची जमीन नांगरावयास फारसे भांडवल नको. एक नांगर व बैलाची एक जोडी असली म्हणजे पुरे. मग एकदा कुणबी ती नांगरून तयार करतो.' त्याप्रमाणे माझा हा निबंध लिहिण्याचा प्रयत्न आहे.

लेखकाने पुढील प्रकरणात आपला निबंध विभागला आहे : (१) कुटुंबाविषयी साधारण विचार, (२) हिंदु लोकांच्या स्त्रियांची सांप्रतची स्थिति, (३) स्त्रीशिक्षण, (३) विधवा विवाह लाभालाभ, (५) मुलास विद्याभ्यास व सुशिक्षा, (६) बालविवाह, (७) कन्याविक्रय (८) लहान मुलांना अलंकार घालणे अनर्थकारक, (९) हिंदू लोकांचे सण. याप्रकारे कुटुंबातील घटकांच्या सुधारणेचा विचार यात केलेला आहे. कुटुंब म्हणजे काय? संसार असार हे अचूक आहे आणि प्रपंचात गोडी उत्पन्न करून ऐहिक जीवन कसे आनंदात घालविता येईल याचा प्रथम विचार केला. लेखकाची ऐहिकतेवरची निष्ठा येथे स्पष्ट होते. मध्यम, कनिष्ठ व उत्तम वर्गातील स्त्रीची अवस्था कशी असते याचा विचार नंतर येतो हा महत्वाचा विषय लेखकाने विस्तारपूर्वक मांडला, त्यानंतर मुलांच्या शिक्षणाकडे होणारे दुर्लक्ष मांडले आहे. मुलांना शिक्षणाची हौस नाही. त्यांच्यावर संस्कार पडत नाहीत, याचे तपशीलवार वर्णन आढळते. लग्नातील बेसुमार खर्च, कलावंतीणीचा नाच, वाजंत्री, जेवणावळी वगैरेचा विचार लग्नातील चालीत केला आहे. शरीरप्रकृतीत बिघाड, शिक्षणात अडथळा हे बालविवाहाचे तोटे कथन केले आहेत, कोणत्याही परिस्थितीत लहान मुलांच्या अंगावर अलंकार घालू नये, त्यात धोकाच आहे. दिवाळी व शिमगा हे दोन्ही सण त्याज्यच कारण दिवाळीत खर्च होतो व शिमग्यात हीन वृत्तीचे प्रदर्शन करतात. पुनर्विवाहविषयक विचार अत्यंत महत्वाचा व समाजाच्या जिव्हाळयाचा होता. कन्याविक्रय चालीत एका हीन चालीचे प्रदर्शन घडते. आपला निबंध कंटाळवाणा, एकसुरी होऊ नये म्हणून बाबांनी अधूनमधून संवादाची योजना केलेली आढळते. यातील विषय तत्कालीन कुटुंबांच्या दृष्टीने महत्वाचे व विचार करण्यासारखे हे आजही पटते. कुटुंबाचे सुखाकरिता उपरोक्त कुटुंबाची सुधारणा आवश्यक खरीच. प्रस्तुत ग्रंथाचे नाव *कुटुंबाची सुधारणा* असले तरी त्याचे स्वरूप खरोखरच 'समाजाची सुधारणा' या शीर्षकाला शोभेल असेच आहे. हिंदुलोकांतील लोकभ्रम, अंधश्रद्धा, अडाणीपणा यांच्यावर प्रहार करताना या पुस्तकात लोकहीतवादीच्या *शतपत्रा*तील अनेक अवतरणे घेतलेली आहेत. परंतु एकंदर आवेश लोकहितवादींच्या मानाने खूपच सौम्य वाटतो. पुनर्विवाह, संस्कृतविद्या, ब्राह्मण इत्यादी विषयांवरील बाबांचे विचार म्हणजे लोकहितवादींचीच वैचारिक प्रतिकृती वाटते. लोकहितवादींच्या विचारांची दाट छाया या पुस्तकात जितकी बाबा पदमनजींवर पडलेली आढळते तितकी शैलीची आढळत नाही. आपल्या वैचारिक परिवर्तनास *प्रभाकरा*तील लोक-

हितवादींची पत्रे कारणीभूत झाली, या अर्थाने उद्‌गार बाबांनी *अरुणोदयात* काढले आहेतच. संयम व मार्दव हेच खरे बाबांचे सामर्थ्य. १६ एप्रिल १८५६ च्या अंकात *ज्ञानोदयाने* इंग्रजीत अभिप्राय देऊन, 'This book is very much useful to Hindus and we trust it may have extensive circulation' अशी आशा व्यक्त केली होती.

इ. स. १८५४ पर्यंतच्या बाबांच्या निबंधलेखनाचा आतापर्यंत जो आढावा घेतला त्यातील सर्वच लेखन हे बाबा ख्रिस्ती होण्यापूर्वीच झालेले आहे. अर्थातच याही लेखनातून बाबांच्या मनावर असलेला ख्रिस्ती धर्ममताचा पगडा मुख्यत्वेकरून जाणवतो. बायबलमधील वचने, ख्रिस्ती धर्मातील नीतिविषयक जाणिवा यांच्या या निबंधांतून केलेल्या वारंवार उल्लेखाने ही गोष्ट लक्षात येते. सन १८५४ नंतर बाबा ख्रिस्ती झाले असल्यामुळे यापुढच्या त्यांच्या लेखनावर प्रामुख्याने ख्रिस्ती धर्माचाच परिणाम दिसणे साहजिकच आहे. त्यातल्या बहुसंख्य निबंधलेखनाचा हेतू ख्रिस्ती-धर्मप्रसार हाच आहे. तसेच यापुढच्या कालखंडात हिंदुधर्म व ख्रिस्तीधर्म यांचे तुलनात्मक विवेचन करण्यासाठी बाबांनी प्रबंधलेखनाचा आश्रय घेतलेला आहे. त्याचे विवेचन पुढे स्वतंत्र प्रकरणात करण्यात आले आहे. त्याव्यतिरिक्त निबंधस्वरूपाची जी काही थोडीशी रचना उपलब्ध आहे त्यातील *जातिभेदविषयक विचार* हे निबंधात्मक पुस्तक व काही स्फुट निबंध यांचा आता थोडक्यात विचार करणे आवश्यक आहे.

### जातिभेदविषयक विचार

इ. स. १८८१ साली एका स्फुट लेखात *ज्ञानोदय*कार लिहितात :

> तुम्ही योग्य विचार करीत नाही म्हणून तुम्हास जातिभेद चांगला व ईश्वरस्थापित वाटतो. विचार कराल तर तो मानण्याची व पाळण्याची लाज वाटेल. एवढेंच नव्हे तर हा मोठा दुष्टपणा आहे, असें म्हणून तो तुम्ही कांहीं विलंब न करतां सोडाल. अलीकडे ट्रॅक्ट सोसैयटीनें या विषयावर एक पुस्तक केले आहे. त्यांत जातिभेद सृष्टि, बुद्धी, नीति, व सद्धर्म यांच्या विरुद्ध असून त्यापासून फार तोटे होतात म्हणून तो ईश्वरस्थापित नाहीं व तो सुज्ञांनी पाळू नये असे सिद्ध केले आहे.[१३]

प्रस्तुत पुस्तक म्हणजेच बाबा पदमनजींनी तयार केलेले जातिभेदविवेचन हे पुस्तक होय. *ज्ञानोदय*कार अन्य एका ठिकाणी म्हणतात :

> पूर्वी ह्या मंडळीकडून जातिभेदाविषयी दोन पुस्तके प्रसिद्ध झालेली होती. त्यापैकीं एक रे. मि. रामकृष्ण विनायक मोडक ह्यांनी केले होतें, ते फार उत्कृष्ट होते. आतां हे तिसरे पुस्तक झालें आहे तेंहि फार उत्कृष्ट आहे. त्या पुस्तकाचे दोन भाग केले आहेत. पहिल्या भागात चार प्रकरणें आहेत ती येणेप्रमाणे — (१) जातिभेद सृष्टीविरुद्ध आहेत, (२) जातिभेद बुद्धिविरुद्ध आहेत, (३) जातिभेद नीतिविरुद्ध आहेत, (४) जातिभेद सद्धर्मविरुद्ध आहेत. दुसऱ्या भागात दोन प्रकरणे आहेत ती अशी (१) जातिभेदापासून तोटे व ब्राह्मण जातिविषयी ह्या सर्व विषयांचे विवरण फार चांगले केले आहे. त्याचें स्वरूप आमच्या वाचकांच्या लक्षात चांगले यावे म्हणून ते समग्र पुस्तकच आमच्या पत्रांत

उतरून घेतलें पाहिजे. पण स्थलसंकोचामुळे तसे होणे दुरापास्त आहे म्हणून आमच्या वाचकांनी ते विकत घेऊन स्वतः वाचून पाहावे. हाच उत्तम मार्ग. विचार व शोध करावा आणि विशेष करून धर्मसंबंधी गोष्टींचा शोध करीत जावा, आणि आपल्या प्रतिपक्षाचे विचार कसे काय आहेत हें सुद्धा पाहात जावे. हें प्रत्येक मनुष्याचे कर्तव्य आहे. यास्तव ब्राह्मण वगैरे हिंदू लोकांनी मूर्तिपूजा, जातिभेद, वगैरे गोष्टीविषयी ख्रिस्ती लोकांचे विचार कसे काय आहेत हे पाहाण्यास अनमान करू नये. अशी आमची त्यास शिफारस आहे.[१४]

या *ज्ञानोदय*कारांच्या अभिप्रायावरून बाबा पदमनजींच्या निबंधात जातीभेदाचा विचार किती सखोल व सूक्ष्म झाला आहे हे लक्षात येते. मुद्देसूदपणाने विवरण करून जातिभेदाविषयी आपले मत परखड व प्रामाणिकपणे मांडून आपल्या प्रस्तुत निबंध पुस्तकाची रचना केली आहे. जातिभेद मोडण्यासाठी आज शिक्षणाचा प्रचार झालेला आहे. कै. आगरकर, लोकहितवादी, माटे इ.चे प्रयत्न याबाबत खूपच झालेले आहेत. तरीही आज सर्वत्र जातिभेद पसरलेला दिसतो आहे. पण आपल्या समाजाला व पर्यायाने देशाला व धर्माला लागलेला हा एक कलंक आहे व स्वदेशहितास्तव जातिभेद मोडणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे आणि विशेषतः ब्राम्हणांनी इकडे लक्ष दिले पाहिजे हे बाबांचे म्हणणे रास्त व पटण्यासारखे आहे. त्या काळात असे म्हणणे धोक्याचे व अप्रिय होण्याचे लक्षण होते. पण सत्याचा पुरस्कार स्पष्टपणे करणे हे बाबा पदमनजींचे वर्तन होते. त्यासाठी ज्याने स्वतःचा धर्म बदलण्यास मागे पुढे पाहिले नाही, तो जातीभेदावर आपले स्पष्ट मत मांडण्यास कसचा भिणार? त्या काळात या विषयावर पुस्तक लिहून बाबा पदमनजींनी ही एक प्रकारची देशसेवाच केली नाही का?

इ. स. १८६२ मध्ये बाबा पदमनजींनी *जातिभेद निर्णय* या नावाचे पुस्तक तयार केले. जातिभेदामुळे हिंदुधर्मातील माणसामाणसांत नाना भेद पडलेले आहेत याचे वर्णन करून हिंदुधर्मातील दोषाविष्करण केलेले आहे. तसेच बाबांचे *जातिभेद विवेचन* या नावाचे पुस्तक जातिभेद ईश्वरप्रणीत नाही, तो सृष्टीविरुद्ध आहे; जातिभेद बुद्धि, नीति व सद्धर्म यांच्याही विरुद्धच आहे. तसेच जातिभेदापासून होणारे तोटे आणि ब्राह्मण जातीविषयी यांचे चांगले विवरण केलेले आहे. सुज्ञांनी जातिभेद पाळू नयेत, तो एक दुष्टपणा आहे, अविचारी लोकांस जातिभेद चांगला वाटतो पण खरा विचार केल्यास जातिभेद पाळण्याची लाज वाटते इ. विचार प्रस्तुत निबंधात बाबांनी मांडले आहेत.[१५] स्वदेशी लोकांचे हित करण्याचे लेखन करणे हा आपला धर्म आहे असे बाबा म्हणत. तीच गोष्ट बाबांनी या निबंधात मांडली आहे. तत्कालीन समाजसुधारणेच्या प्रयत्नांत सदर निबंध शोभतात.

### अर्वाचीन ग्रंथकर्त्यांच्या अडचणी

बाबा पदमनजी स्वतः ग्रंथकार होते. ग्रंथ लिहिताना त्यांनी ग्रंथकाराच्या अडीअडचणी स्वतः अनुभवल्या होत्या. त्या बऱ्यावाईट अनुभवांचा परिणाम त्यांच्या यासंबंधीच्या एका निबंधावर नक्कीच झालेला असणार. इ. स. १८६२ डिसेंबरच्या *प्रमोदया*च्या एका अंकात

बाबा पदमनजींचा एक नऊ दहा पानी निबंध 'अर्वाचीन ग्रंथकाराच्या अडचणी' या नावाने प्रसिद्ध झालेला आढळतो. हा लहानसाच निबंध असला तरी त्यात अर्वाचीन ग्रंथकारांच्या अडचणींचा सविस्तर विचार केलेला सापडतो. प्राचीन ग्रंथकार आणि अर्वाचीन ग्रंथकार यांच्यात, त्यांच्या अडचणीत फरक होता असे ते म्हणतात. परिस्थिती, मुद्रणाचा शोध, वाचकांची संख्या, प्रकाशन, कागद, छाप, अर्थविषयक विवंचना, टीकाकार, ग्राहक, संदर्भ, राजाश्रय इत्यादी अनेक बाबतीत पूर्वीचे ग्रंथकार व आताचे ग्रंथकार या दोघांमध्ये भिन्नता आहे. अर्वाचीन ग्रंथकारांस अडचणी फार व त्या मानाने पूर्वीचे ग्रंथकार सुखी असे त्यांचे (लेखकाचे) मत दिसते. उदाहरणार्थ काही गोष्टी पाहा. अर्वाचीन ग्रंथकारांना एकांत मिळत नाही. घरे लहान, माणसे जास्त, घरे ठेंगणी, तेथेच पाहुणे त्यामुळे बिचाऱ्या लेखकास शांतता व एकांत मिळत नाही. प्राचीन ग्रंथकारास आपला ग्रंथ कोणी मान्य करील की नाही ही भीति नव्हती कारण ग्रंथ दुर्मिळ होते. मान्यता आपोआप मिळे. आज ग्रंथांची गर्दी आहे. मान्यतेची धास्ती चांगल्या चांगल्या कसलेल्यांना पण पडते. आज मुद्रणकलेमुळे ग्रंथ छापण्याचे प्रमाण वाढले. शिक्षणाने ग्रंथलेखन पण वाढले. राजाश्रय गेला. लोकाश्रय मिळेल की नाही ही शंकाच असते. वृत्तपत्रामुळे टीकाकार पण अमाप झाले व ते गुणदोषग्रहण करून आपल्या ग्रंथाचे काय करतील ही काळजी प्रत्येक अर्वाचीन ग्रंथकारास असते. आपला ग्रंथ प्रसिद्ध कोण करील, तो खपेल का इत्यादी प्रश्न आजच्या ग्रंथकारापुढे असतात. पूर्वी ग्रंथप्रसिद्धीचा खटाटोप नव्हता. आता छापखाना, तेथील तंत्र, कागद, वेळेवर छपाई, मुद्रिते तपासणे, ग्रंथ वेळेवर बाहेर पडणे, छापखान्याची बिले देणे, इत्यादी अनेक गोष्टींचा विचार ग्रंथकारास करावा लागतो. आपला ग्रंथ इतरांच्या ग्रंथासारखा होईल का? ही पण त्याची चिंता असते. तात्पर्य आकार लहान पण विचाराने महान असे या निबंधाचे स्वरूप आहे. याशिवाय गोकुळअष्टमी, गणेशचतुर्थी, नारळी पौर्णिमा, मानवधर्मशास्त्र, मुहूर्तज्योतिष, रामनवमी व वेद कोणी लिहिले? या नावाचे निबंध बाबा पदमनजींनी सी.वी.इ. सोसायटीकरिता छापल्याचे दिसते. पुस्तकाच्या नावावरून त्या त्या निबंधाच्या विषयाची कल्पना येते. आपण राहातो त्या समाजातल्या लोकांचे अज्ञान दूर व्हावे, त्यांनी मूर्खपणाच्या चालीरीति सोडाव्यात, विचार करावा, सन्मार्गास लागावे, आपले दुःख कसे कमी होईल असे आचारावे, यासाठी बाबा पदमनजींनी सतत लिहिले. त्यापैकी ज्यांची पुस्तके झाली अशा निबंधांचा उल्लेख सापडतो. जे नुसते निबंधच होते—पुस्तके झाली नाहीत असे कित्येक निबंध काळाच्या उदरात नष्ट झाले असतील.

बाबा पदमनजींनी केलेले निबंधस्वरूपाचे विस्तृत लेखन तत्कालीन कर्त्या पुरुषांमध्ये निबंधकार म्हणून त्यांना अग्रेसरत्व देण्यास पुरेसे व व्यापक आहे असे निःसंशयपणे म्हणावेसे वाटते. अगदी तरुणपणी विद्यार्थी दशेत बाबांनी निबंधलेखनाला सुरुवात केली त्या वेळी त्यांच्या मनावर बाळशास्त्री जांभेकर, गोविंद नारायण माडगांवकर, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी व भाऊ महाजन यांचाच प्रामुख्याने प्रभाव होता. इ. स. १८३४ सालीच बाळशास्त्री जांभेकर हे स्त्री शिक्षणाचा पुरस्कार करीत होते. या संबंधाने बाळशास्त्र्यांनी लिहिलेल्या निबंधांतील युक्तिवादाचा विकास बाबांच्या *स्त्रीविद्याभ्यास निबंध* या पुस्तकात झालेला

आढळतो. गोविंद नारायण माडगांवकर हे तर बाबांचे मुंबईच्या शाळेतील शिक्षकच. 'ऋण-निषेधक बोध' (इ. स. १८५०), 'नीति संवाद' (इ. स. १८५०), 'हिंदू लोकांच्या रीति सुधारण्याचा बोध' (इ. स. १८५१), 'सत्य निरुपण' (इ. स. १८५२), या त्यांच्या निबंधातील विचारसरणीचा बाबांच्या विचारसरणीवर ठायी ठायी परिणाम झालेला दिसतो. आपल्या या आवडत्या शिक्षकाप्रमाणे निबंधलेखन करावे असे बाबांच्या मनाने निश्चितपणाने घेतलेसे दिसते यात शंका नाही. किंबहुना गोविंद नारायणांच्यामुळेच शाळेत अलिखित असा पहिला निबंध कसा घडून आला त्याची बाबांनी दिलेली *अरुणोदया*तील पुढील हकीगत मोठी उद्बोधक आहे:

> मि. नारायण (शेषाद्री) यांच्या वर्गात गेलो तेव्हा मला तपकिरीचे व्यसन लागले होते. आम्ही कित्येक मुलांनी मिळून तपकीर विकत आणण्याचा व डबी एकमेकांस देऊन बाहेर जाऊन ती ओढण्याचा एक लहानसा क्लब केला होता. एके दिवशी ही गोष्ट रा. गोविंदजी नारायण यांच्या नजरेस पडली, तेव्हा त्यांनी ती आमच्या मास्तरांस सांगितली. मास्तरसाहेबांनी वर्गातील मुलांस तंबाखूपासून तोटे व हानी काय होते यांवर काही लिहून आणावयास सांगितले. त्याप्रमाणे कित्येकांनी या व्यसनाला प्रतिकूल व कित्येकांनी अनुकूल अशा गोष्टी लिहून आणून वाचून दाखविल्या. मी काही लिहिले नव्हते, परंतु जेव्हा माझी वाचायची पाळी आली, तेव्हा मी उभे राहून असे म्हटले की आजपासून मी तपकीर ओढण्याचे सोडून दिले. हाच माझा निबंध. तेव्हा तंबाखूच्या विरुद्ध असणारांनी टाळ्या पिटल्या व गोविंद नारायणसाहेबांस फार संतोष वाटला.[१६]

इ. स. १८५४ पर्यंत बाबा जरी हिंदू होते तरी ते मनाने निश्चितपणाने ख्रिस्ती झाले होते. त्याचे प्रत्यंतर त्यांच्या धर्मांतराने लगोलग आले. हिंदू असूनही मनाने ख्रिस्ती असल्याबद्दलचे आरोप डॉ. भाऊ दाजी, दादोबा पांडुरंग व महात्मा ज्योतिबा फुले यांच्यावरही झालेले आहेत. यांतील भाऊ दाजींचा लेखनविषयक परिणाम बाबांच्यावर अत्यल्प दिसतो. महात्मा फुले यांचे लेखन खूपच उत्तरकालीन असल्यामुळे त्यांच्या प्रभावाचा विचार येथे करण्याची काही गरज नाही. दादोबा पांडुरंगांच्या एका हस्तलिखित पुस्तकाचा बाबांच्यावर परिणाम दिसतो. धर्मविवेचन या नावाचे पुस्तक विद्यार्थी दशेत बाबांच्या मित्रांनी बाबांचा ख्रिस्ती धर्माकडचा कल लक्षात घेऊन त्यांना मुद्दाम वाचावयास दिले होते, त्यासंबंधीचा स्पष्ट उल्लेख आत्मचरित्रातच आहे. दादोबांच्या 'स्वीडन बोर्ग यांच्या मताविषयी एका हिंदु गृहस्थाचे विचार' या पत्ररूप दीर्घ निबंधावरून दादोबांची ख्रिस्ती धर्माबद्दलची विलक्षण आस्था प्रकट होते. याच आस्थेने सुरुवातीच्या काळात बाबांना झपाटले होते.

दादोबांच्या वर उल्लेखलेल्या ग्रंथास *पत्ररूप निबंध* असे म्हटले आहे. बाबांच्याही पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेल्या दीर्घ विवेचनास बाबांनीच वेळोवेळी 'निबंध' ही संज्ञा दिली आहे. आजच्या लिहिल्या जात असलेल्या 'निबंध' या वाङमयप्रकारावरून बाबांच्या निबंधलेखनासंबंधाने विचार केल्यास बराचसा घोटाळा होईल. 'कोणताही विषय न्याय रीतीने उद्‌घाटून आणि त्याची यथाशक्तिने जुळणी करून जे वर्णन करणे तो निबंध होय' अशी *ज्ञानप्रसारका*ने

इ. स. १८५० साली निबंधाची व्याख्या केली होती. ही व्याख्या निबंध या संस्कृतातील धात्वर्थावर (निबध्यते अस्मिन् इ ति नि + बन्ध + ल्युट, अधिकरणे निबन्धनम्) आधारलेली आहे हे स्पष्ट होते. डॉ. मा. गो. देशमुख यांनी आपल्या 'निबंध आणि एसे' या लेखात यासंबंधी केलेली चर्चा अतिशय उपकारक ठरेल.[१८] जुन्या संस्कृत निबंधकारांनी स्मृतीग्रंथातील एखाद्या विवाद्य मुद्यावर साधक बाधक प्रमाणे देऊन आपल्या विशिष्ट मताचे प्रतिपादन करण्याची जी एक धाटणी रूढ केली होती, तिचा बराच परिणाम अव्वल इंग्रजीतील सुरवातीच्या निबंधकारांवर झालेला दिसतो. फरक इतकाच की पाश्चात्यांच्या संसर्गाने या निबंधांचे अंतरंग मात्र आधुनिक पद्धतीने सिद्ध झालेले दिसते. या विचारसरणीनुसार स्फुट निबंधलेखकास निबंधकार म्हणणे बरेच अवघड जाते. वाचकांच्या बुद्धिला आवाहन करणे आणि तिला वश करण्यासाठी इतिहास, अनुभव, अवलोकन यांचा आधार घेणे, आपल्या विषयाचे विवरण करणे, कार्यकारणसंगती दाखविणे, आक्षेप उद्भावित करून त्यांचे खंडन करणे, आपल्या मतांचे मंडन करणे, तुलनेने विवेचन करणे इत्यादि विशेषांनी युक्त असलेल्या लेखनास निबंध म्हणावे अशी दृष्टी अलीकडच्या डॉ. सहस्त्रबुध्यांसारख्या विचारवंतांनीही व्यक्त केली आहे. आणि या दृष्टीकोणामुळे लोकहितवादींच्या *शतपत्रा*तून आपल्या अपकर्षाची कारणमीमांसा व तत्कालिन परिस्थितीच्या चिंतनातून निर्माण झालेली विचारसरणी जरी असली तरी रचनेच्या दृष्टीने वर उल्लेखिलेली वैशिष्टये त्यात आढळत नसल्यामुळे लोकहितवादींना निबंधकार म्हणता यावयाचे नाही असे डॉ. सहस्त्रबुद्धे यांना वाटते.

इंग्रजीतल्या 'ऐसे' (essay) या वाङमयप्रकारावरून रूढ होत गेलेल्या निबंध या वाङमयप्रकाराशी म्हणूनच बाबांच्या निबंधाची तुलना करणे योग्य होणार नाही. त्यांचे स्फुट निबंध काय किंवा दीर्घ निबंध काय हे दोन्ही प्रकार आजच्या दृष्टीने, आजच्या तुलनेने किंवा चिपळूणकर, आगरकर यांच्या तुलनेने प्रकृतीने वेगळे वाटतील. त्यांचे स्वरूप बरेचसे प्राथमिक वाटेल. खांडेकरांनी म्हटल्याप्रमाणे त्याचे स्वरूप प्राथमिक....,

....वाटण्याची कारणे दोन आहेत. पेशवाईने ज्या दिवशी डोळे मिटले, त्यांच दिवशी महाराष्ट्राच्या जनतेच्या पुढाऱ्यांचे डोळे उघडले. आपल्या जेत्यांकडे ते सूक्ष्म दृष्टीने पाहू लागले. नवी शास्त्रे, नवी यंत्रे, नवे विचार आणि नवे आचार यांच्या उपासनेतून इंग्रजांचे सामर्थ्य निर्माण झाले आहे याची त्यांना जाणीव झाली. या नव्या ज्ञानविज्ञानाचे लहान लहान पाट काढून ते पाणी समाजमनापर्यंत नेले तरच आज ना उद्या तिथे नव्या आकांक्षांचे अंकुर दिसू लागतील. अशी त्याकाळच्या समाजसुधारकांची धारणा होती. त्यांची तळमळ तीव्र होती. पण त्यांचा पिंड कर्त्या सुधारकांचा होता. त्यात कलावंतांची प्रतिभा किंवा साहित्यप्रेमी रसिकाची सौंदर्यदृष्टी यांचा भाग फार थोडा होता. १८७४ पूर्वीच्या बहुतेक निबंधकाराच्या दृष्टीने लेखन हे ज्ञान प्रसाराचे व समाजसुधारणेचे एक साधन होते. या एकाच दृष्टीने ते लेखक लिहीत गेले. तलवारीला साधी मूठ असली काय किंवा रत्नजडित मूठ असली काय, शत्रूशी लढताना महत्त्व असते ते तिच्या धारेचे, अशीच जणू काही त्यांची कल्पना होती. त्यामुळे आपला विचार नटवून, सजवून, फुलवून

किंवा साहित्यगुणांत घोळवून सांगण्याचा निबंधकार जवळजवळ झालाच नाही असे म्हटले तरी चालेल.[२०]

बाबांचे निबंधलेखन लोकहितवादींसारखे मुख्यत्वेकरून स्फुट स्वरूपाचे नसल्याने त्या काळच्या कल्पनेनुसार ते खरे 'निबंधकार' ठरतात व त्यांचे निबंधलेखन कालसापेक्ष असेच आहे.

* * *

## टीप


१. *अरुणोदय*, पृ. २२४.
२. तत्रैव, पृ. २२५.
३. वि. ह. कुलकर्णी, 'मराठीतील निबंध वाङमय', *प्रदक्षिणा*, आ. ५, पुणे, १९७२ पृ. (१०२)
४. यशवंतराव चव्हाण, "पुरस्कार" डॉ. भाऊ दाजी, मुंबई, १९७१, पृ. ७.
५. Oriental Christian *Spectator*, Bombay, July, 1860, p. 277., *ज्ञानोदय*, १ ऑगस्ट १८६०, पृ. २९९.
६. *गोविंद नारायण माडगांवकर यांचे लेख, खंड १*, मुंबई, १९६८, प्रस्तावना, पृ. ८.
७. *ज्ञानोदय*, ९ मे १८५२, पृ. १३०.
८. *ज्ञानोदय*, १ नोव्हेंबर १८५३, पृ. ३३८.
९. गो मो. रानडे, *महाराष्ट्रातील समाजविचार*, नागपूर–पुणे, १९७१, पृ. १५८-५९.
१०. *व्यभिचारनिषेधकबोध*, मुंबई, १८५४, प्रस्तावना, पृ. २.
११. तत्रैव, पृ. ४.
१२. *ज्ञानोदय*, १५ एप्रिल १८५४.
१३. *ज्ञानोदय*, २८ जुलै १८८१, पृ. ३४९.
१४. तत्रैव, १४ जुलै १८८१, पृ. ३३०.
१५. *ज्ञानोदय*, २८ जुलै १८८१, पृ. ३३०–३३९.
१६. *अरुणोदय*, पृ. १२०.
१७. तत्रैव, पृ. १९४.
१८. *भावगंध*, अकोला, १९५५, पृ. ८५–१०८.
१९. डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे, 'निबंधरचना आणि राष्ट्ररचना', *पराधीन सरस्वती*, पुणे, पृ. १–३३, 'प्रस्तावना' *लोकहितवादीची शतपत्रे*, पुणे, १९६४.
२०. वि. स. खांडेकर, 'मराठीतील निबंधवाङमय', *प्रदक्षिणा*, आ. ५, १९७२, पृ. १२०–२१


* * *

३

# यमुनापर्यटन : पहिली मराठी कादंबरी

एखाद्या वाङमयप्रकारातील पहिलीवहिली कृतीच मोठी प्रक्षोभक, वादग्रस्त आणि तत्कालीन समाजातील एखाद्या महत्वाच्या ज्वलंत प्रश्नाचा वेध घेणारी क्वचितच असते. अव्वल इंग्रजीमध्ये पाश्चात्यांच्या संसर्गाने मराठीत 'कादंबरी' या नावाचा जो एक महत्त्वाचा वाङमयप्रकार आत्मसात केला त्यातील *यमुनापर्यटन* ही पहिलीवहिली कृती त्या दृष्टीने अपवादात्मकच म्हणावी लागेल.

पाश्चात्य शिक्षणाने महाराष्ट्रातील बुद्धिमान व कर्त्या तरुणांच्या मनामध्ये बुद्धिवादाची जी बीजे रोवली गेली त्यातूनच समाजसुधारणा विषयक चळवळीचे वारे वाहू लागले. या सुधारणाविषयक प्रश्नांमध्ये स्त्रीसुधारणेला अग्रस्थान होते. विधवांचा प्रश्न आणि पुर्नविवाह वषयांसंबंधी तरुणांची मने स्वधर्म आणि तत्संबंधित आचारविचार यांचे आत्मपरीक्षण करावयास प्रवृत्त झाली. विशेषत: विधवांचा प्रश्न शेकडो वर्षांच्या परंपरेने समाजाने इतक्या अगतिकतेच्या पातळीवर नेऊन ठेवला होता की त्यातून कसा मार्ग काढावा हा मोठा प्रश्न होता. ज्या ठिकाणाहून माघारी फिरता येणार नाही आणि ज्याच्या पुढे एक पाऊलही टाकता येणार नाही अशा असाध्यतेच्या काठावर या देशातील विधवा स्त्रिया उभ्या होत्या. त्यातून मार्ग सापडल्याचा एक आवाज उठविण्याच्या हेतूने *यमुनापर्यटन* ही मराठीतील पहिली कादंबरी लिहिली गेली. हे जर लक्षात घेतले नाही तर या कादंबरीचे स्वारस्यच हरवल्यासारखे होईल.

पेशवाईच्या काळात परशुरामभाऊ पटवर्धनांसारख्या मातबर सरदाराचे मन आपल्या अल्पवयीन विधवा कन्येच्या आक्रोशाने विद्ध होऊन उठते आणि पित्याच्या आंधळ्या प्रेमाने परशुरामभाऊ तिचा पुर्नविवाह व्हावा यासाठी सारे रान उठवतात. रामशास्त्र्यांसारख्या निस्पृह न्यायाधीशाने 'अल्पवयी अजाण मुलींचा पुर्नविवाह करणे पूर्णपणे सशास्त्र आहे. त्यास

काही एक प्रत्यवाय नाही' असा निर्णय देऊनही परशुरामभाऊंच्या त्या अभागी मुलीचा पुनर्विवाह होऊ शकला नाही असे इतिहास सांगतो. अव्वल इंग्रजीत या प्रश्नाने मोठी उचल खाऊन मुद्रणकला व वृत्तपत्रविद्या साध्य झाल्यावर अनेक परीने हा प्रश्न समाजातील उच्चभ्रू लोकांच्या मनीमानसी आघात करू लागतो. मुंबईमध्ये इ. स. १८३७ साली एक तेलंग ब्राह्मण व परशुरामक्षेत्रस्थ एक ब्राह्मण या दोघांनी लिहिलेले या प्रश्नाबद्दलचे *एक छापलेली किताब* या नावाचे पुस्तक त्या काळात मोठा चर्चेचा विषय झाला होता. बाळशास्त्री जांभेकरांच्या *दर्पण* पत्रात या पुस्तकासंबंधाने सातत्याने साधकबाधक चर्चा होऊ लागली. *इंदुप्रकाशा*तील यादीवरून इ. स. १८३५–४० च्या सुमाराला बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर व गंगाधरशास्त्री फडके यांनी 'पुनर्विवाह' नावाचे प्रकरण लिहिले होते. आणि त्याच सुमारास नागपूरच्या भरंवसिक गृहस्थाच्या पदरच्या कोणी मनुष्याने *विधवापुनर्विवाह* नावाचेपुस्तक लिहिले होते व त्याला नागपूरचे रेसिडेंट मेजर एल्. विल्किन्सन् यांची इंग्रजी प्रस्तावनाही लाभली होती. मुंबईतून प्रसिद्ध होणाऱ्या *ओरिएन्टल ख्रिश्चन स्पेक्टेटर* या मासिकाचा डिसेंबर १८४० च्या (पृ. ५८२) अंकात बंगालच्या रायकृष्ण दे या तरुणाने मृत्यूपूर्वी आपल्या निधनानंतर आपल्या पत्नीचा पुनर्विवाह व्हावा अशी इच्छा आपल्या मित्रांकडे व्यक्त केली होती, पण ती वाया गेली; याबद्दल खंत व्यक्त करणारे स्फुट लिहिण्यात आले आहे. इ. स. १८४१ ला तर प्रसिद्ध समाजसुधारक विष्णुशास्त्री बापट यांचे *पुनर्विवाह प्रकरण* या नावाचे अत्यंत महत्त्वाचे व या विषयाची धर्मशास्त्रातील वचनांच्या आधारे शास्त्रशुद्ध चर्चा करणारे पुस्तक प्रसिद्ध झाले; आणि त्यानंतर बंगाल, गुजरात, काशी इत्यादी ठिकाणांहून या पुनर्विवाहाच्या प्रश्नाची चर्चा करणाऱ्या पुस्तकांचा जणू काही ओघच सुरू झालेला दिसतो. दलपतराम डायाभाई, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, वेदशास्त्रसंपन्न राजारामशास्त्री कार्लेकर यांची पुस्तके इ. स. १८५६ पर्यंत मोठ्या चर्चेचा विषय झालेली दिसतात. वृत्तपत्रातून बाळशास्त्री जांभेकर, हरि केशवजी पाठारे, गोविंद नारायण माडगावकर, दादोबा पांडुरंग, गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांनी या ना त्या तऱ्हेने हा प्रश्न समाजापुढे तेवत ठेवलेला दिसतो. या सर्व पार्श्वभूमिवर इ. स. १८५६ सालापासून यासंबंधाने आपणही काही वैशिष्टचपूर्ण लिहावे या तळमळीने बाबांच्या मनाने उचल खाल्लेली दिसते. १५ नोव्हेंबर १८५६ च्या *बॉम्बे गार्डियन* या पत्रात बाबांनी या आपल्या नव्या पुस्तकासंबंधाने जे जाहिरातवजा पत्र प्रसिद्ध केले आहे त्यावरून यापूर्वीच *यमुनापर्यटन*चे हस्तलिखित बाबांनी सिद्ध केले आहे व दादोबा पांडुरंगासारख्या जाणकारांना ते वाचावयास दिले आहे हे लक्षात येते.[१] आणि म्हणून बाबांनी लिहिलेल्या *यमुनापर्यटन*विषयी हे पुस्तक पहिल्या 'बायकोच्या वादापायी रुपये दोनशे बाबांस खर्च आला. तो *यमुनापर्यटन* हा ग्रंथ लिहून त्याच्या उत्पन्नातून बाबांनी भागवला' हे दत्तो वामन पोतदारांचे मत[२] चुकीच्या समजुतीतून निर्माण झाले आहे, असे म्हटले पाहिजे. या संदर्भातला बाबांचा *अरुणोदय*मधील मजकूर पोतदारांनी नीट पाहिलेला दिसत नाही. पुस्तकाच्या विक्रीतून आलेले दोनशे रुपये खटल्याचा निकाल लागल्यानंतर निकालानुसार या खटल्याच्या कामी, व पहिल्या पत्नीला पोटगी म्हणून द्यावयास उपयोगी पडले, असे बाबांनी

म्हटले आहे.[३] त्याचा अर्थ खटल्यासाठी पैसे उभे करावेत म्हणून ही कादंबरी लिहिली असा होत नाही, हे उघड आहे. बाबांनी या पुस्तकाची जाहिरात *बॉम्बे गार्डियन* व *ऑरिएन्टल ख्रिश्चन स्पेक्टेटर* व *ज्ञानोदय* या नियतकालिकातून इ. स. १८५६ पासूनच केली होती. या वेळी बाबांच्या पहिल्या पत्नीचे प्रकरण कोर्टात गेले नव्हते. तिने ख्रिस्ती धर्म स्वीकारून आपल्याकडे नांदावयास यावे यासाठी बाबा प्रयत्नशील होते. त्यामुळे ती परत आपल्याकडे येणार नाही वा तिच्या संबंधाने काही कोर्ट कचेरीचा प्रश्न उद्‌भवेल असे या कादंबरी-लेखनाच्या काळात बाबांना वाटत नव्हते. या कादंबरीलेखनाचा बाबांच्या आर्थिक अडचणींशी व पर्यायाने त्यांच्या पूर्वपत्नीशी विनाकारण संबंध जोडला आहे, यात शंका नाही.

विधवांचा हा ज्वलंत प्रश्न कथारूपाने समाजाच्या समोर मांडून त्यातल्या प्रक्षोभक चित्रणाने समाजाला धक्का तर द्यावयाचा, परंतु केवळ धक्का देऊन थांबावयाचे नाही, तर त्यातून सोडवणूक करून घ्यावयासाठी स्वतःला पटलेला एक नवा धर्ममार्ग सुचवावयाचा, असा दुहेरी हेतू या कादंबरीलेखनामागे आहे. तो कितपत यशस्वी होईल याबद्दल बाबा साशंक दिसतात, कारण त्यांनी आपले ज्येष्ठ मित्र दादोबा पांडुरंग यांना या पुस्तकास या साशंकतेपोटीच पुरस्कार लिहिण्यास प्रवृत्त केले आहे. कथारूपाने आविष्कृत झालेली मराठी कृती ही तत्कालीन रीतीरिवाजाप्रमाणे खुशालचेंडू व रिकामटेकड्या ऐदी लोकांच्या करमणुकीसाठी व रंजनासाठीच सिद्ध व्हावयाची आणि त्यामुळे आपला एक महत्त्वाचा प्रयत्न वाया जायचा या भीतीनेच दादोबा पांडुरंगांना संस्कृतमध्ये या प्रश्नाची शास्त्रीय चर्चा पुरस्काराच्या निमित्ताने करण्याचे आवाहन त्यांनी केले आहे. मराठी भाषेत लिहिलेला कोणताही ग्रंथ 'या देशातील शास्त्री पंडित विद्वज्जनास नीरस वाटतो व यावरून या ग्रंथातील विषयाची गोडी त्यास लाभणार नाही' असे वाटूनच हा ग्रंथ विद्वान लोकांस ग्राह्य व्हावा म्हणून आपण संस्कृत भाषेत या विषयावर काही लिहावे अशी विनंती बाबांनी केल्याचे या ग्रंथातील आपल्या प्रस्तावनेत दादोबांनी नमूद केले आहे.[४]

दादोबांनी या ग्रंथासाठी लिहिलेला *विधवाश्रुमार्जनम्* नावाचा छापील २७ पृष्ठांचा निबंध ग्रंथाच्या सुरुवातीला बाबांनी अगत्यपूर्वक जोडला आहे. तो मराठी वाचकांना समजेल की नाही या भीतीने काही शास्त्र्यांच्या मदतीने या निबंधाचा मराठीत तर्जुमा करून तोही सारांशरूपाने सुमारे १८ पृष्ठांत छापला आहे. या विद्वत्तापूर्ण निबंधामध्ये दादोबांनी आमच्या स्मृती ग्रंथाचे आलोचन करून पुनर्विवाहाला अनुकूल अशा तऱ्हेचे मत पराकाष्ठेने मांडण्याचा प्रयत्न केला आहे. प्रश्न असा पडतो की खरोखरच बाबांना हा निबंध आपल्या कादंबरीस जोडण्याची आवश्यकता तरी काय होती? कशासाठी त्यांनी एवढा आटापिटा केला असावा? कारण बाबांचे प्रतिपाद्य आणि दादोबांचे प्रतिपाद्य यात मूलतःच फरक आहे. रूढीप्रामाण्यावर भर देऊन समाजातील दुष्ट चालींवर मात करण्यासाठी बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, विष्णुशास्त्री पंडित वगैरे हिंदू समाजसुधारक शास्त्रवचनांचा पाठपुरावा करीत रूढीवर मात करण्याचा केविलवाणा प्रयोग करीत होते. या त्यांच्या प्रयत्नातील वैयर्थ बाबांना सुचवायचे होते काय? पुनर्विवाहाला अनुकूल व प्रतिकूल अशा दोन्ही मतांतील द्वंद्व शास्त्रवचनांच्या

आधाराने यानंतरही अर्धशतक खेळले जाऊन त्यामध्ये फार मोठ्या प्रमाणात मोठमोठी कर्ती मंडळी होरपळून निघाल्याचे दिसते. म्हणूनच आपण कादंबरी लिहावयाची ती मनोरंजनासाठी लिहावयाची नसून तिचे आवाहन समाजातील विचारवंतांना ठेवावयाचे व सर्व मार्गांनी ती त्यांच्यापर्यंत पोहचवावयाची हाच हेतू बाबांच्या या प्रयत्नामागे होता. हा हेतू फार मोठ्या प्रमाणात पूर्णतेला गेल्याचे दिसते. बाबांनी लिहिलेल्या वृत्तपत्रांतील जाहिराती वाचून या कादंबरीच्या सुमारे ५०० प्रतींची आगाऊ नोंद झाली व ती नोंद करण्यामध्ये महाराष्ट्रातील झाडून सारे समाजसुधारक एकवटलेले आहेत. त्यांच्यामध्ये तत्कालीन नामवंत युरोपियन राज्यकर्ते आहेत, ख्रिस्ती धर्मगुरु आहेत, आणि डॉक्टर भाऊ दाजी, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, महात्मा फुले, गोविंदनारायण माडगांवकर, वेदशास्त्रसंपन्न विष्णुशास्त्री पंडित, जगन्नाथ शंकरशेट, रावबहादूर रामचंद्र बाळकृष्ण, धीरजराय दलपतराम, शेख दाऊद गुलाम महंमद, मोरोबा कान्होबा, डॉक्टर भांडारकर, रावबहादूर मंडलीक इत्यादी एकापेक्षा एक नामांकित मंडळी आहेत. पुणे, मुंबई, नागपूर, बेळगाव, कच्छ, मांडवी, बनारस, कराची, कल्याण, ठाणा, सातारा, धुळे, नळदुर्ग इत्यादी महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्रातील विचारवंतांनी ही कादंबरी विकत घेऊन वाचली आहे. ह्या गोष्टीची कल्पना नसल्यामुळे वि. ह. कुलकर्णी, कुसुमावतीबाई देशपांडे, नरहर कुरुंदकर इत्यादी टीकाकारांनी या कादंबरीविषयक लेखनात *यमुनापर्यटन* ही कादंबरी फारशी वाचली न गेल्याचा जो उल्लेख केला आहे तोही दत्तो वामन पोतदारांच्या वर उल्लेखिलेल्या एका मताप्रमाणे कसा चुकीचा आहे हे लक्षात येते. खरोखर कादंबरी प्रसिद्ध होताच इतक्या मोठ्या प्रमाणात या देशातील साऱ्या विचारवंतांनी अहमहमिकेने ती वाचली गेल्याचे *यमुनापर्यटन*सारखे दुसरे उदाहरण मराठीत क्वचितच दाखविता येईल. *यमुनापर्यटन* प्रसिद्ध झाल्यानंतर १८५९ साली विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचे *पुनर्विवाहाविषयी विचार* व १८६५ साली बाळकृष्ण लक्ष्मणशास्त्री बापट यांचे *विधवा विवाहखंडण* ही दोन महत्त्वाची पुस्तके प्रसिद्ध झाली. या पुस्तकांनी *यमुनापर्यटन*मधल्या विचारांचा धोका ओळखून शास्त्रवचनांकडे दुर्लक्ष करून पुनर्विवाह सर्रास व्हावेत, असे प्रतिपादन केले. बाबांच्या पुस्तकाचाच हा परिणाम होय. पुनर्विवाहाचा प्रश्न महाराष्ट्रात जोपर्यंत तेवत होता तोपर्यंत *यमुनापर्यटन* ही कादंबरी वाचली जाणे हे अपरिहार्यच होते. कालांतराने विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात तिचा समावेश झाल्यामुळे ती सातत्याने मराठी वाचकांसमोर राहिली यात आश्चर्य ते कसले? मात्र इतिहासाचार्य राजवाडे यांनी आपल्या 'कादंबरी' या दीर्घ लेखात, किंवा 'मराठी कथात्मक वाङ्मय' या लेखरूप आढाव्यात श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी या कादंबरीचा उल्लेख का करू नये यासंबंधी मनाला एक कोडेच पडते.[१] राजवाड्यांचा लेख हा तपशीलपूर्वक आढावा घेण्याचा नसल्यामुळे व तो तत्त्वविमर्षक असल्यामुळे त्यांनी मुद्दाम या कादंबरीचा उल्लेख करण्याचे कारण नव्हते हे खरेच आहे, परंतु कोल्हटकरांनी मात्र ज्या ज्या ठिकाणी बाबांचा उल्लेख करणे अत्यावश्यक होते त्या त्या ठिकाणी त्यांचे नाव कटाक्षाने का गाळले आहे हे कळत नाही. अव्वल इंग्रजीतील कर्त्या पुरुषांची नांवे ते नोंदवतात पण नेमके मवाळ बाबांचे नाव ते गाळतात. कदाचित ख्रिस्ती पुस्तके व ख्रिस्ती धर्म यांच्या वादात आपण

पडावयाचे नाही या *विविधज्ञानविस्तारा*च्या मताचा अंगिकार केल्यामुळे श्रीपाद कृष्णांनी *यमुनापर्यटन*चा मुद्दाम उल्लेख केला नसावा असे वाटते.[६] राजवाड्यांनी आपल्या 'कादंबरी' या निबंधात 'मराठे संस्थानिक, जहागिरदार व इनामदार, वाणी, उदमी व भटभिक्षुक अशां-सारखे बडे, सुखवस्तू, ऐदी, खुशालचंद आणि निष्काम लोक अद्भुतरम्य कादंबऱ्यांच्या वाचक-वर्गात मोडत असल्याचे' लिहिले आहे.[७] बाबांना अशा वाचकवर्गासाठी *यमुनापर्यटन* ही कादंबरी लिहावयाची नव्हती. कारण धर्मसुधारक म्हणून विधवाविवाहाच्या ज्वलंत प्रश्नांने ते विद्ध झाले होते. म्हणूनच या कादंबरीचा आवाका तत्कालीन मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने फार मोठा व व्यापक आहे. किंबहुना कुरुंदकारांनी म्हटल्याप्रमाणे तिची 'कक्षा व व्याप हरिभाऊंच्या पेक्षाही मोठा आहे.'[८] या तिच्या व्यापामुळेच तिची साक्षेपाने चर्चा व्हावी अशी इच्छा कुसुमावतीबाई देशपांडे यांनी व्यक्त केली आहे.[९]

*यमुनापर्यटन* हे कादंबरीचे नाव या दृष्टीने अतिशय अन्वर्थक व आकर्षक आहे. हे नाव कदाचित बाबांना हरी केशव पाठारे यांनी इ. स. १८४१ साली जॉन बन्यन्च्या *पिलग्रिम्स प्रोग्रेस* ह्या इंग्रजी कादंबरीचे मराठीत *यात्रिकक्रमण* या नावाने जे भाषांतर केले होते त्यावरून सुचले असावे. *यात्रिकक्रमण*मध्ये आत्म्याच्या इहलोकापासून परलोकास केलेल्या प्रवासाचे स्वप्नमय अशा रूपकार्थाने केलेले वर्णन आहे. बाबांनी *यमुनापर्यटन*मध्ये वास्तवप्रधान अशा इहलोकावरील यमुनेच्या पतिसान्निध्याने केलेल्या प्रवासामुळे विधवांच्या दुःखाची तीव्रता तिला कशी जाणवली याचे वर्णन आहे. या वर्णनातील विलक्षण भवितव्यतेचा (destiny) यमुनेला बसू पाहणारा तडाखा हरीभाऊंच्या *पण लक्षात कोण घेतो !* मधील यमूशी नाते सांगणारा आहे. अशा रीतीने या कादंबरीतील ख्रिस्ती धर्ममताचा पगडा *यात्रिकक्रमणा*-कडे झुकणारा तर त्यातील वास्तवतेचा झपाटा हरीभाऊंसारख्या युगप्रवर्तक कादंबरीकाराला झपाटणारा असा दुहेरी नात्याचा आहे.

*यमुनापर्यटन*मध्ये हिंदू विधवा स्त्रियांच्या दुःस्थितीची प्रातिनिधिक, मोजकी व उच्चवर्गीय कुटुंबाच्या अंतरंगात भेदकतेने हात घालणारी अशी चित्रे आहेत. सुरवातीलाच यमुनेच्या सासरच्या शेजारी राहणारी गोदावरी आपणाला भेटते. पतीच्या निधनाच्या वार्तापत्रानेच खंडू न्हाव्याच्या हातून होणाऱ्या पुढील विटंबनेचे भीषण चित्र पुढे उभे राहिल्यामुळे ही गोदावरी मागच्या दाराने परसातल्या विहिरीचा आश्रय घेते. अंगावरच्या सौभाग्य अलंकारासह, केसातील चाफ्याच्या फुलांसह जलसमाधी घेणारी ही गोदावरी बाबांनी सूचकतेने रंगविली आहे. वैधव्याच्या भयंकर अग्निदिव्यातून सुटका करणारा मृत्यू हाच एक विधवांना दिलासा असतो. उमेदीचे आयुष्य सुखासमाधानात जगण्याचा त्यांचा मार्गच खुंटतो आणि त्या आत्म-घातास प्रवृत्त होतात. जीवाच्या प्रेमाने आत्मघाताच्या मार्गाने न जाता आयुष्य कंठण्याची पाळी ज्यांच्या वाटेला येते त्यांच्या नरकयातनेचे दाहक चित्र नागपूरच्या वेणूच्या रूपाने रेखाटले आहे. तिच्यावरती प्राणापलिकडे प्रेम करणाऱ्या दमेकरी पतीच्या शेवटच्या दिवसात काही औषधपाणी न करता उपासतापास, फेऱ्या-प्रदक्षिणा, आणि हरकाचा भात करून गायीच्या शेणाने सारवलेल्या भुईवर तो काढून घेऊन तिला नुसता अळणी खावयास आणि गोमूत्रात

भिजवलेली भाकर खावयास लावतात. गोदावरीचा पती तिच्या संन्निध नसताना दूरवर कुठे तरी मरण पावला तर वेणूचा पती तिच्यावर समोरच कंठापर्यंत धाप लागून कणाकणाने मरताना दिसतो. वेणूचे वैधव्यदशेतील तिच्या साऱ्या आशाआकांक्षांना मूठमाती देणारे साध्या माणुसकीच्या जाणिवेपासूनही वंचित झालेले हे मोठे केविलवाणे, कारुण्यपूर्ण आणि आपल्या मनाची मोठी विलक्षण कालवाकालव करणारे चित्र बाबांनी तिच्या तोंडूनच वदवले आहे. या चित्रानंतर उच्चकुलीन मराठ्यांच्या घरातील विधवांची मुस्कटदाबी केल्यामुळे त्यांच्या घरादारातून अनाचाराला आलेला ऊत आणि निष्ठूरपणाने घराण्याची लज्जा झाकण्यासाठी म्हणून भ्रूणहत्या, स्त्रीहत्या, इत्यादी अघोरी मार्गाचा केला जात असलेला अवलंब याचे चित्र येते. या चित्राच्या अंतर्गतच गुरुबाजीमुळे निर्माण होत असलेली अनर्थपरंपरा व या भोंदू गुरुंबरोबरच पळून जात असलेल्या विधवा यांचे एक चित्र बाबांनी रेखाटले. मराठ्यांच्याप्रमाणेच शेणवी जातीतील लग्न न करता एका विवाहित पुरुषाबरोबर राहिलेल्या अनाचारी विधवेचे चित्र सहजगत्या एका ओघात बाबा रेखाटून जातात आणि या सर्वांच्या पेक्षाही वैशिष्ट्यपूर्ण विलक्षण धक्का देणारे आणि कल्पितापेक्षा अद्‌भुत वाटावे असे पंढरपूरच्या विधवेचे चित्र अनेक अंगांनी बाबांनी समर्थपणे आणि विस्ताराने रेखाटले आहे. वैधव्यामागचे भीषण अनाकलनीय भवितव्य, त्या भवितव्याला हुलकावणी देण्यासाठी एका विधवेने धाडसाने लोकमताला न जुमानता आचारलेला मार्ग, त्या मार्गाची विविध वळणे, नैसर्गिक रीत्या प्राप्त झालेल्या मातृत्वापोटी स्त्री कोणत्या पल्ल्यापर्यंत जाऊ शकते, आणि आपल्या अपत्यप्रेमापोटी किती विलक्षण परिस्थितीतून आपली जीवन नौका हाकते आणि हे सर्व करूनही तिचे अंत:करण किती पश्चातापदग्ध असू शकते याचे एक अतिशय भेदक चित्र बाबांनी पंढरपूरच्या विधवेच्या रूपाने रेखाटले आहे.

पंढरपूरच्या विधवेची ही 'कहाणी बाबांनी कोठल्या तरी वास्तविक हकीगतीपासून उचलली असावी असा माझा अंदाज आहे. कारण या कादंबरीत बाबांना न पेलणाऱ्या वास्तवाचे अधिराज्य आहे' असे नरहर कुरुंदकरांनी म्हटले आहे.[१०] खरे पाहिले तर या कादंबरीतून सर्वच विधवांच्या कहाण्या तत्कालीन वास्तव हकीगतीवर आधारलेल्या आहेत. बाबांनी कादंबरी लिहिण्यापूर्वी आपल्या निवडक मित्रांना आपापल्या भागातील विधवांच्या दु:स्थितीच्या हकीगती लिहून पाठविण्यास कळविले आहे. त्यांनी या हकीगती कळविल्या म्हणून कृतज्ञतेने बाबांनी पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत त्यांचे आभार मानले आहेत.[११] मित्रांनी कळविलेल्या हकीगतींची निरनिराळ्या प्रकारे बाबा उपयोग करून घेण्याचा उपयोग करीत असताना दिसतात. म्हणूनच त्यांच्या कादंबरीमध्ये कुठे पत्रे येतात, कुठे मित्रांच्यामध्ये चर्चा होते, कुठे अनुभवकथन असते, तर कुठे झालेल्या वादविवादांचे निवेदन कुणी तरी पत्ररूपाने केलेले असते. गमतीची गोष्ट ही की ज्या कथेमध्ये कुरुंदकरांना प्रखर वास्तवाचे रंग दिसतात तीच कथा तत्कालीन वाचकांना पहिल्या आवृत्तीच्या वेळी अगदी खोटी व कल्पनारंजित वाटली याबद्दल बाबांनी दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत वाचकांच्या मताचा उल्लेख करून ही कथा व तिच्या बरोबरच साऱ्याच विधवांच्या कथा खऱ्या, अगदी खऱ्या आहेत, त्यांच्या वर्णनात अतिशयोक्ती

नाही अशी ग्वाही दिली आहे.[१२]

'जरी पुस्तकाची रचना व कथाभाग कल्पित आहेत तरी त्यांतील सर्व गोष्टींस खरेपणाचा पाया आहे आणि बहुतेक तर खरोखर घडून आलेल्या आहेत. आतां त्यांतील सर्व प्रकार एकाच कुटुंबात किंवा एकाच गावात व एका काळी दिसण्यात येईल असे नाहीं. परंतु देशाची साधारण स्थिति व बहुत विधवांचा जन्मादारम्य वृत्तांत ही पाहिलीं असतां या पुस्तकांत कोणत्याही गोष्टीची अतिशयोक्ति आहे असे दिसणार नाही.[१३]

या आपल्या प्रास्ताविक मनोगतातून बाबांनी आपली भूमिका अगदी स्पष्ट केलेली आहे. 'विधवांच्या स्थितीचे वर्णन करतांना त्यांच्या दुर्गुणावर व दोषांवर काळया रंगाचा कुंचा फिरवला आहे किंवा त्यांच्या सद्‌गुणांवर व सदाचरणांवर मौन्याची छाया पाडली आहे असे नाही.[१४] ह्या वाक्यात बाबांनी जणू काही आपल्या निःपक्षपाती व तटस्थ दृष्टीकोणाचीच ग्वाही दिलेली आहे. कादंबरीच्या दृष्टीने कित्येक वास्तव गोष्टींनाही कल्पिताचे रूप द्यावे, नावे बदलावीत, प्रत्यक्ष नावनिशीवार उदाहरणे घेऊ नयेत याचे भान बाबांना कित्येक वेळा राहात नाही. कुरुंदवाडकर, मिरजकर, कोल्हापूरकर महाराज यांच्या घरातील विधवांच्या अनाचाराची उदाहरणे बाबांनी ज्या पद्धतीने नोंदली आहेत ती पाहिली असता केवळ प्रखर वास्तवाचाच देखावा उभा करण्याची त्यांची जिद्द लक्षात येते.

कुरुंदकरांनी या कादंबरीबद्दल लिहिताना एक विलक्षण विधान केले आहे. ते म्हणतात :

बाबा पदमनजींची ही कादंबरी आर्थिक दृष्टीने फारच यशस्वी म्हणावी लागेल. कारण त्या काळात हिच्या लेखनाबद्दल बाबांना २०० रुपये मिळाले. आजच्या भावाने ही रक्कम फारच मोठी ठरणारी वाटणे स्वाभाविक आहे. पण हा मोबदला कादंबरीच्या कलागुणाचा नव्हता किंवा तिच्या शक्य खपाच्या आधारे योग्य मानधनाचाही नव्हता. या मोबदल्याचे स्वरूप 'न्यू चर्च'च्या ख्रिस्ती धर्म प्रसाराच्या कार्यातील एक साधन ताब्यात घेणे इतकेच दिसते.[१५]

दत्तो वामन पोतदारांच्या चुकीच्या विधानामुळे एक भ्रामक मत त्यानंतरच्या अनेक समीक्षकांच्या लेखनातून पुनरावृत्त होत गेले. तसेच पोतदारांच्या त्याच विवेचनाच्या आधाराने कुरुंदकरांनी आणखी एक नवे व दिशाभूल करणारे मत या वरील विधानातून प्रसृत केले आहे. वास्तविक न्यू चर्चचा व या कादंबरीलेखनाचा काहीच संबंध नाही. न्यू चर्चने बाबांना या कादंबरीरेलेखनासाठी काही पैसा दिला असेही नाही; उलट कादंबरी प्रसिद्ध करण्यासाठी बाबांनी लोकसमुदायाला आवाहन केले व जाणत्या वाचकांनी मोठ्या प्रमाणात ती विकत घेतल्याने त्यांना तिच्यापासून दोनशे रुपये फायदा झाला. एखादी भलती कल्पना पक्की मनात ठसली की तिच्यापासून निर्माण होणारी अनुमान परंपरा किती विकारग्रस्त असू शकते याचा कुरुंदकरांचे हे विधान म्हणजे उत्तम नमुना होय.

बाबांनी ख्रिस्ती झाल्यावर ही कादंबरी लिहिली व मूळ कादंबरीतून विधवांच्या दुःस्थितीवर उपाय म्हणून ख्रिस्तानुकरणाचा मार्ग सुचविला त्यामुळेच कित्येक वेळेला या कादंबरीबद्दल समालोचकांच्याकडून काहीशा अनादराचे उद्‌गार निघून भलत्या मुद्यांवर कादंबरीतील दोष

दिग्दर्शीत केले जातात. श्री. वि. ह. कुलकर्णी यांनी ती बाटगी निपजल्याबद्दल खंत व्यक्त करणे[३६] व इतर काही समीक्षकांनी तिचे आद्यत्व हिरावून घेणे, हे या पोटी घडते. श्री. नरहर कुरुंदकरांनी यामुळेच कादंबरीतील काही महत्त्वाच्या प्रसंगवर्णनात बाबांचा ख्रिस्ती धर्मप्रचारापोटी निर्माण झालेला अतिरेक दिसतो. ते म्हणतात :

> कोणतेही कारण नसताना या कादंबरीत त्यांनी दासबोधातील रामदासांचा एक व गुरुचरित्रातील एक असे दोन उतारे घेतलेले आहेत व जणू रामदास भीक मागत जगण्याचे समर्थन करणारा आहे असे भासवले आहे. विधवांचे केश वपन करणे किती रास्त आहे हे सांगण्यासाठी म्हणून कधी हिंदूंच्यामध्ये गुरुचरित्र वापरले जाते काय? त्यासाठी धार्मिक निर्णय देणारे ग्रंथ आहेत. मराठी साधूसंतांची भक्तिमार्गी पदे तुच्छतेचा विषय करण्याची बाबांना गरज नव्हती. . .हिंदुधर्मात सुधारणा व्हावी आणि विधवाविवाह रुढ व्हावेत यात बाबांना फारसा रस नाही. विधवांना श्रद्धा ठेवण्यासाठी 'तारण' येशू ख्रिस्त उपलब्ध असावा यात त्यांना रस आहे. सुधारक विचारसरणीच्या लोकहितवादींच्या विषयीसुद्धा त्यांच्या मनात तुच्छताच आहे. या सर्व विवेचनाचा खरा अर्थ हा आहे की विधवांचा प्रश्न हा *यमुनापर्यटना*चा निमित्तभूत प्रश्न आहे. विधवांच्या प्रश्नाच्या निमित्ताने ख्रिस्तीधर्मप्रसार हे या हेतूचे खरे रूप आहे.

प्रा. कुरुंदकरांचे कादंबरीबद्दलचे सारे आक्षेप आजच्या वाचकांना प्रातिनिधिक वाटावेत असेच आहेत. परंतु त्यांचे हे विवेचन कालसापेक्ष नसल्यामुळे कादंबरीकर्त्याच्या हेतूंबद्दल बरेचसे गैरसमज निर्माण करणारे आहेत. बाबांनी कोणत्या परिस्थितीत, कोणत्या काळी व कोणत्या भूमिकेतून ही कादंबरी लिहिली याचा मागोवा घेतला तर कुरुंदकरांच्या विवेचनातील आवेशपूर्णतेची अनावश्यकता लक्षात आल्याखेरीज राहत नाही. विधवांच्या प्रश्नावरती इ. स. १८५६ सालापर्यंत कर्त्या पुरुषांच्यामध्ये जी केवळ वैचारिक रणे माजली होती त्याचा बारकाईने अभ्यास केल्यानंतर १८५६ साली सरकारने केलेला पुनर्विवाहाचा कायदाही प्रचलित रूढीपुढे निष्प्रभ होईल हे त्यांच्या लक्षात आले आणि नुकतेच ख्रिस्ती झाल्यामुळे तारुण्याच्या उत्साहाने विधवादुःखनिर्मूलनार्थ ख्रिस्तीधर्मप्रवेश हा एक आपणास नवा मार्ग सुचल्याचे त्यांना आवर्जून सांगावयाचे होते. हे सांगण्यासाठी त्यांनी कादंबरी हा कथात्मक वाङमयप्रकार स्वीकारला. आणि प्रत्यक्ष कादंबरी लिहिली त्यावेळी तर मराठीत जॉन बन्यनची *यात्रिक-क्रमण* हीच एक अनुवादीत कादंबरी उपलब्ध होती. या कादंबरीमध्ये स्वप्नमय *यात्रिक-क्रमणा*त नायकाच्या मनात ख्रिस्तसंदेश कसा प्रकाशत गेला हे दाखविण्यासाठी कादंबरीकाराने सबंध कादंभरीभर बायबलमधील वचनांची साधार पेरणी केली आहे. *यमुनापर्यटन*मधील विनायकराव व यमुना यांच्या मनात विधवांच्या अंतःकरण पिळवटणाऱ्या देखाव्याने वेळोवेळी परमेश्वराची आठवण येते, त्या वेळी बायबलमधील त्यांना दिलासा देणारी अनेक वचने आठवतात. असे जे वर्णन येते ते *यात्रिकक्रमणा*च्या अनुकरणाने हे लक्षात घ्यावे लागते. *यात्रिकक्रमणा*चे चित्र एका आध्यात्मिक स्वप्नदर्शनाचे आहे तर बाबांना *यमुनापर्यटन*मध्ये एक प्रखर वास्तव उभे करावयाचे होते, परंतु ते उभे करीत असतांना बाबांची आत्यंतिक पार-

मार्थिक श्रद्धा केवळ व्यावहारिकतेच्या भूमिकेवर उतरणे कधीच शक्य नव्हते. केवळ विधवांचे पुनर्विवाह होऊन हा प्रश्न सुटणार नाही तर त्यासाठी त्यांचे ऐहिक कल्याणाबरोबर पारमार्थिक कल्याणही व्हावे ही त्यांची तळमळ होती. समाजाचे प्रेयस् कोणते यापेक्षा त्याचे श्रेयस् काय असावे यातच बाबांची दृष्टी रमलेली आहे. म्हणूनच साऱ्याच विधवांचे पुनर्विवाह व्हावेत किंवा साऱ्याच विधवांना आध्यात्मिक श्रेयस्‌ची प्राप्ती होईल असे त्यांना वाटत नाही. नागपूरच्या विधवेला यमुनेने ख्रिस्तसंदेश पोहोचविण्याचा जरी प्रयत्न केला असला तरी तिच्या मनापर्यंत तो पोहोचतच नाही आणि तिची ओढ केवळ साध्यासुध्या अशा तारुण्यसुलभ ऐहिक सुखप्राप्तीकडे कशी आहे हे बाबांनी दाखविले आहे. हिंदुधर्मामध्ये यमुनेसारख्या अत्यंत सात्त्विक वृत्तीच्या विधवेची केशवपनासारख्या दुष्ट चालींनी विटंबना होते तर अनीतीच्या गर्तेत लोळणाऱ्या पंढरपूरच्या विधवेने अनेक प्रकारच्या धार्मिक संस्थांशी संबंध असलेल्या सामाजिक दृष्ट्या मूर्धाभिषिक्त अशा व्यक्तीशी संबंध येऊनही तिच्या उद्धाराचा किंचितही किरण तिला न दिसता, दर वेळी ती एका नव्या अनीतीच्या गर्तेत लोटली जाते. यमुनेसारख्या श्रेष्ठ भक्तांना व शिवरामच्या आईसारख्या अनीतीच्या कर्दमात लोळणाऱ्या अशा दोघांनाही ऐहिक व पारलौकिक सुखाचा मार्ग दाखवण्याचे ख्रिस्ती धर्माचे सामर्थ्य बाबांनी मोठ्या कलात्मकतेने सुचविले आहे. एक श्रेष्ठ ख्रिस्तभक्त म्हणून यमुनेचे चित्रण रेखाटावयाचे असल्यामुळे बाबांनी अगदी लहानपणापासून मिशनरी शाळेत गेल्यामुळे तिच्या मनावरचे ख्रिस्तीधर्माचे संस्कार प्रस्थापित केले आहेत. तत्कालीन तरुणांच्या मनामध्ये ख्रिस्ती धर्माबद्दलचे जे वारे वाहत होते त्यांचे विनायकराव एक प्रतीक आहेत. एका अर्थाने यमुना व विनायकराव यांचे चित्रण म्हणजे बाबांच्या धर्मवेड्या मनातून निर्माण झालेले एक उत्कट स्वप्नरंजनच होय. स्त्रीसुधारणेच्या ध्यासाने अशा तऱ्हेचे स्वप्नरंजन जवळ जवळ पाऊण शतकभर महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांनी आपल्या कलाकृतीतून केले आहे. मराठीतील या पहिल्या कादंबरीनेच सबंध मराठी वाङ्मयाला झपाटून राहिलेल्या स्वप्नरंजनाची पायवाट घालून दिली आहे असेच म्हटले पाहिजे. पुनर्विवाह प्रकरणी आणि केशवपनाचे समर्थन करण्याच्या कामी गुरुचरित्रासारख्या धार्मिक ग्रंथाचा उपयोग करण्यात येत होता का या प्रश्नाचे ऐतिहासक दृष्ट्या उत्तर अस्तिपक्षीच द्यावे लागते. बाबांनी तर हे वर्णन मित्राने पत्ररूपाने पुरविलेल्या माहितीच्या आधारावरच रेखाटले आहे. तत्कालीन मध्यमवर्गीय वाचकांच्या मर्यादा नीट समजावून घेतल्या तर त्यांची मजल *गुरुचरित्र*, *दासबोध*, तुकारामादि संतांचे अभंग यापलीकडे फारशी जात नाही, असे आढळून येईल. *यमुनापर्यटन*मधील यासंबंधीचे उल्लेख म्हणूनच तत्कालीन समाजाचे अंतरंग स्पष्ट करणारे आहेत. *दासबोधा*तील भिक्षेबद्दलची वचने विनायकरावांच्या तोंडी बाबांनी घातली आहेत हे खरे आहे पण त्याचबरोबर यमुनेच्या तोंडी 'भिक्षापात्र अवलंबणे, जळो जिणे लाजिरवाणे' ही संत तुकारामाची उक्ती टाकली आहे, हे कुरुंदकरांच्या लक्षात आलेले दिसत नाही. लोकहितवादींचा कादंबरीतला उल्लेख तर लोकहितवादींच्या भावी कर्तुत्वाच्या दृष्टीने मला मोठा अर्थपूर्ण व दूरदृष्टीचा वाटतो. लोकहितवादींच्या *प्रभाकर*मधील लेखाने विधवांच्या मनात पुनर्विवाहाविषयक जर काही

आशावाद निर्माण झाला असेल तर लोकहितवादींसारख्यांकडून कृतीची जोड त्याला न मिळाल्यामुळे विधवांची झालेली दारुण निराशा इतक्या परिणामकारकतेने व सूचकतेने मराठीत क्वचितच व्यक्त झालेली असेल! म्हणूनच बाबांच्या वर्णनातील प्रत्येक घटनेमागे काही ना काही एक सुसंगती आहे हे लक्षात येईल. हळबेशास्त्र्यांच्या *रत्नप्रभा* या कादंबरी-मध्ये पुनर्विवाहाचाच प्रश्न आहे. तेथेही वातावरणनिर्मितीसाठी अनेक प्रकारच्या विधवांच्या व्यभिचाराची पार्श्वभूमि कादंबरीकाराने भडकपणाने व अतिरेकी वर्णनातून उभी केली आहे. समीक्षकांचे तिकडे लक्ष जात नाही. परंतु बाबांच्या कादंबरीतील त्याच प्रकारची व त्याहून सौम्य अशी वर्णने मात्र अतिरेकाची व प्रचारी वाटतात याचे कारण बाबा ख्रिस्ती झाले हेच होय. बाबांच्या मुलाने *यमुनापर्यटन*च्या चवथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत आवर्जून सांगितले आहे की :

> तत्कालीन समाजातील समाजसुधारणेच्छूंपुढे विधवांचे अनुकंपनीय, हृदयविदारक, पण चित्रोपम असे दृश्य दाखविणे व त्यांच्या ह्या स्थितीची समाजाला जाणीव करून देऊन त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टीकोण समाजाने बदलणे व त्यांच्या हिताकडे, त्यांच्या नैतिक व मानसिक सुधारणेकडे व जीवनक्रमाकडे आपले लक्ष लावणे, या विविध उद्देशांनी बाबांनी हे पुस्तक लिहिले असावे, अशी माझी श्रद्धा आहे. ख्रिस्तीधर्माचा वारंवार पुरस्कार करून त्याचा जो यात गौरव केला आहे, त्याचा उद्देश बाबांच्या मताने त्या धर्मातील उदार-मनस्कतेची जाणीव, तत्कालीन सनातनी या नावाखाली खऱ्या मानवी धर्माला पराङमुख झालेली व मानवी व कोमल मनोवृत्तींना फारकत झाल्यामुळे आपल्याच समाजातील तरुण, पण असहाय, अनाथ व गांजलेल्या अशा विधवांच्याकडे अमानुष व आसुरी वृत्तीने पाहणाऱ्या समाजाला करून द्यावी, हाच होता. ते स्वतः ख्रिस्ती असल्यामुळे त्यांना व्यक्तिशः त्या धर्माबद्दल प्रेम वाटावे व त्याची त्यांनी महती गावी, हा मानवी स्वभाव होय; पण त्यावरून लोकांनी ख्रिस्ती व्हावे, असा त्यांचा खरा हेतू होता, असे जे वारंवार उच्चार-ण्यात येते, ते खरे नाही, असे मला वाटते.[१८]

कादंबरीचा सूक्ष्मपणे अभ्यास केल्यानंतर बाबांच्या चिरंजीवांचे हे मत अधिक साक्षेपी व महत्त्वाचे वाटते.

अकलात्मतेच्या मुद्यावरून *यमुनापर्यटन*च्या आद्यत्वाचा मान हिरावून घेण्याच्या प्रयत्नाचाही या ठिकाणी थोडाबहुत विचार करावयास हवा. कादंबरीचे व्यवच्छेदक असे घटक *यमुनापर्यटन*मध्ये सापडत नाहीत. कादंबरीचा आकारही साधारण मोठ्या गोष्टी-एवढा आहे, म्हणून बापट गोडबोल्यांनी त्यानंतर चार वर्षांनी प्रसिद्ध झालेल्या हळबेशास्त्र्यांच्या *मुक्तमाला* या कादंबरीला आद्यत्वाचे स्थान दिले आहे.[१९] रा. श्री. जोगांसारख्या विलक्षण समीक्षकाने 'तिचे लेखन कादंबरीलेखनाच्या जाणिवेने झाले असावे असे वाटत नाही . . . त्यादृष्टीने हळबेशास्त्री यांची *मुक्तमाला* हीच पहिली कादंबरी म्हणावी लागेल' असे सावध विधान केले आहे.[२०] एखाद्या पहिल्यावहिल्या कृतीतून प्रगत अशा कादंबरीतंत्राची अपेक्षा करणे व त्या अपेक्षेने एका महत्त्वाच्या कृतीचे आद्यत्व अमान्य करणे या दृष्टीकोणामागची भूमिका अशावेळी समजणे कठीण होऊन जाते. *मुक्तमाला* ही कादंबरी रचनाकौशल्य व

स्वभावदर्शन या बाबतीत *यमुनापर्यटन*हून सरस आहे असे नाही. उलट स्वभावदर्शनात तर ती हिणकसच ठरेल. 'समाजपरिवर्तनाबद्दल उत्कट आकांक्षा, सहृदयता व भाषेची अनलंकृत सरलता या सर्व गोष्टींत बाबा पदमनजींची *यमुनापर्यटन* ही कादंबरी म्हणजे हरी नारायण आपटयांच्या वाङमयकृतीचे पूर्वचिन्ह होय'[२१] असा कुसुमावतीबाई देशपांडे यांनी निःसंदिग्धतेने या कादंबरीचे महत्त्व व तिचे आद्यत्व यासंबंधी निर्वाळा दिला असल्याने त्या बाबतीत यापुढे वाद असण्याचे काही कारण नाही. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांच्या बाबतीत अकलात्मकतेचा हाच आरोप करण्यात आला. त्याचे निरसन करण्यासाठी श्रीमती दुर्गा भागवत यांनी आपल्या *केतकरी कादंबरी* या ग्रंथाला एक अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहिलेली आहे. ती बाबांच्या *यमुनापर्यटन* या कादंबरीला जशीच्या तशी लागू केली असता काही बिघडणार नाही. 'काल्पनिक पात्रे व घटना यांचा परामर्ष घेणारा गद्य प्रकार' या जे. बी. प्रीस्टलेच्या स्थूल कादंबरीच्या व्याख्येत[२२] बसणारी कोणतीही कृती कादंबरी या संज्ञेस पात्र ठरते. किंबहुना पाश्चात्य कादंबरीचा इतिहास पाहिला असता अठराव्या शतकातील फ्लॉबर्थपूर्वीच्या साऱ्या कादंबऱ्यांची अवस्था कलात्मकतेच्या दृष्टीने पाहू गेल्यास मोठी केविलवाणी ठरते. म्हणूनच आर्नोल्ड बेनटने कादंबरी या वाङमयप्रकाराची व्याख्या करण्याऐवजी खरा कादंबरीकार कोणाला म्हणावे हे सांगितले आहे. तो म्हणतो : 'The novelist. . . having seen life. . . Life of course is the basic raw material of all art, but no artist is too close to his raw material as the novelist. It is all around him all the time : people, incidents, scenes, sense impressions, conversations—anything can arouse his curiosity, his excitement, his compulsion to transmit it into language and thus relieve his own feelings and communicate them to others.'[२३]

हे बेनेटचे मत प्रमाण मानले तर हळबेशास्त्री, रिसबूड यांना कादंबरीकार कसे म्हणावयाचे असा प्रश्न मनात उभा राहतो. मराठीतील पहिले कादंबरीकार बाबा पदमनजी आणि बाबा पदमनजीच होत. आता कोणी अशी शंका उपस्थित करू शकेल की बाबांनी *यमुनापर्यटन*चा उल्लेख प्रस्तावनेत वा अन्यत्र कादंबरी म्हणून का केला नाही? हा प्रश्न महत्त्वाचा आहे आणि त्याचे उत्तरही देता येते. इंग्रजीतील 'नाव्हेल' या शब्दास 'कादंबरी' हा योजलेला पर्याय उत्तरकालीन आहे. बाबांच्या काळी तो मुळीच रूढ नव्हता. अगदी १८७२ साली लिहिलेल्या आपल्या निबंधात रावबहादूर का. बा. मराठे यांनी या वाङमयप्रकारास 'नावल' असेच म्हटले आहे.[२४] तेव्हा बाबांनी कादंबरी हा शब्द *यमुनापर्यटन* च्या संदर्भात इ. स. १८५७ साली वापरला नसल्यास नवल ते काय ?

अर्थातच जीवनदर्शनाच्या व वास्तवतेच्या दृष्टीने मराठीतल्या या पहिल्याच कादंबरीचा आवाका खूप मोठा असला तरी अभिव्यक्तीच्या दृष्टीने तिच्यामध्ये दोषही अनेक आहेत. कादंबरी वाचताना कित्येक ठिकाणी चित्रमयतेचा व कथनात्मकतेचा धागा सुटतो व आपण एखाद्या वैचारिक पातळीवरचा निबंध वाचत आहोत असे वाचकाला वाटू लागते. महत्त्वाची

व्यक्तीचित्रणे कादंबरीकार म्हणून पूर्णपणे प्रस्थापित करण्याची खबरदारी बाबांनी घेतली नाही. विशेषत: 'यमुना' व 'विनायकराव' यांचे ख्रिस्तीप्रेम व त्यांची मानसिक अशी ज्वलंत ख्रिस्तनिष्ठा बाबांनी पूर्णपणे प्रस्थापित केली नाही. शिवरामसारख्या एका उडाणटप्पू मुलाकडून कादंबरीच्या शेवटी पत्ररूपाने जे दीर्घ मनोगत व्यक्त करण्यात आले आहे त्यामुळे कादंबरीचा बाबांना अपेक्षित असलेला परिणाम शबल होतो इकडे त्यांचे लक्ष राहत नाही. मुख्यत्वेकरून कादंबरीचा शेवट बाबांनी ज्या पद्धतीने केला आहे त्यावरून हा वाङमयप्रकार शेवटपर्यंत त्यांना पेलता आला नाही हे लक्षात येते. कादंबरीचा शेवट म्हणजे शिवरामच्या मुखातून वदवलेला हिंदू विधवांच्या दु:स्थितीचा एक नीरस असा पाढाच आहे. पहिल्यावहिल्या कृतीत अशा प्रकारचे दोष क्षम्यच मानावयास हवेत.

योगायोगाने हरिभाऊंच्या नायिकेचे नावही यमुनाच आहे. हरिभाऊंनी हे नाव बाबांच्या नायिकेवरून उचलले असेल काय? कोण जाणे?[२५] अशा तऱ्हेने अनेक प्रश्न कुरूंदकरांच्या मनात उभे राहिले आहेत. हरिभाऊंच्या *पण लक्षात कोण घेतो?* ह्या कादंबरीचा *यमुनापर्यटन*चा ठसा इतका स्पष्ट आहे की खरोखर अशा तऱ्हेचा प्रश्न यापुढे निर्माण करण्याची आवश्यकता नाही. या परिणामाचा आणखी एक निर्णायक पुरावा उपलब्ध आहे. या कादंबरीच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशनाच्या सुमारास मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या स्त्रियांच्या सभेत कोणी सुज्ञ व विचारवंत बाईने वाचलेल्या निबंधात या कादंबरीसंबंधाने काही प्रश्न निष्पन्न केले होते. त्यांना दुसऱ्या आवृत्तीच्या परिशिष्टात उत्तर देताना बाबांनी 'ज्याचे दु:ख त्याला चांगलें समजतें. स्त्रियांच्या स्थितीचें वर्णन स्त्रियांशिवाय दुसऱ्यास चांगले करता येत नाही. *यमुनापर्यटन* हे पुस्तक कोणी सुक्षिशित यमुनाबाईनें लिहिले असतें तर फारच उत्तम होऊन त्याची योग्यता व उपयोगही त्याच मानानें शतगुणीत झाला असता' असे म्हटले आहे. *पण लक्षात कोण घेतो?* मध्ये हरिभाऊंनी आत्मनिवेदन पद्धतीचा जो उपयोग करून घेतला आहे तो बाबांच्या या दुसऱ्या आवृत्तीतील कल्पनेवरून घेतला आहे हे स्पष्ट आहे.

बाबांनी *यमुनापर्यटनात* यमुनेचे चित्रण एका विशिष्ट परिणामाच्या हेतूने विस्ताराने केले आहे. तत्कालीन स्त्रियांच्या तुलनेने सुशिक्षित, सुधारक, सुसंस्कारित अशी सहचरी दाखविली असून ती पतीसमवेत प्रवास करताना दाखविली आहे.

गरिबी आणि तिच्या वडिलांचा विनयकरावांच्या वडिलांशी असलेला स्नेह व शेजार हे तिला वरदान ठरतात. गरिबीमुळे तिला मिशनऱ्यांच्या ख्रिस्ती शाळेत नादारीने शिकता येते व या शिक्षणामुळेच तिच्या मनातील सारे लोकभ्रम वितळू लागतात. सत्य बोलणे, परमेश्वरावर श्रद्धा असणे, सहनशील राहणे व दुसऱ्यांच्या मदतीला सहानुभूतीने धावून जाणे व त्यांच्या दु:खांची कारणमीमांसा करून त्यावर इलाज शोधणे हा नव्या मनूचा नवा धर्म तिच्या अंगी पूर्णपणाने बाणलेला दिसतो. यमुनेच्या रूपाने एक 'नवी स्त्री'च जन्माला आल्याचे बाबांनी दाखविले आहे. तत्कालीन परिस्थितीत हिंदू संस्कृतीत अशी स्त्री दिसणे अशक्यप्राय होते. म्हणून तिला ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या शाळेत शिकलेली दाखविल्याखेरीज गत्यंतर नव्हते.

एका दृष्टीने तिच्या निर्मितीमध्ये बाबांनी पन्नास-पाऊणशे वर्षांची उडी मारली आहे यात शंका नाही. एकीकडे तिच्या नव्या जाणिवा आणि दुसरीकडे जुनी समाजरचना यांच्या कोंडीत ती सासरी अल्पकाळ सापडली आहे. त्यातून ती लवकरच मुक्त होते आणि एकत्र कुटुंबपद्धतीतून बाहेर पडून स्वतंत्र असा स्वतःचा संसार ती पतीबरोबर मोकळ्या मनाने उभा करते. हे तिचे सुख काळाला फार काळ बघवत नाही आणि पतिनिधनामुळे ती सनातन अशा भयंकर वैधव्याच्या खाईत लोटली जाते. त्यातून ती बाहेर पडू शकते ती लहानपणातील तिच्यावरील ख्रिस्ती शाळेतील संस्कारामुळेच, असे दाखवून बाबांनी तिच्या साऱ्या व्यक्तीचित्रणात एक फार मोठी संगती साधली आहे.

यमुनेच्या अगदी बालपणापासूनच्या स्वभाववर्णनातून तिचे सत्यवादी व सुसंस्कृत व्यक्तीमत्व साकारले आहे. तिचे छापखान्यातील अक्षरासारखे सुरेख बाळबोध वळणदार अक्षर, रेखीव मोडी लेखन, गणितासारख्या विषयातील तिची गती, तिचे आकर्षक भरतकाम यांनी ती सर्वांच्यावर छाप पाडते. परंतु शिक्षणाने तत्कालीन समजुतीप्रमाणे ती वाया गेली नाही. तर अधिक संवेदनक्षम व कर्तव्यदक्ष बनली. गरिबीमुळे तिच्या वडिलांनी कर्जबाजारी होऊन विनायकरावांशी तिचा शरीरसंबंध जोडला. लहानपणीच मातेचे निधन झाल्यामुळे व कर्जबाजारीपणामुळे परागंदा व्हावे लागल्यामुळे विवाहानंतरचा तिचा माहेरचा संबंध कायमचा तुटतो आणि तिच्या समजूतदार पतीचे अंतःकरण हेच तिचे सासर-माहेर ठरते. तिच्या सत्यवादित्वामुळे व्यावहारिक दृष्टया सासूचा तिच्यावर रोष ओढवतो व पुस्तकांपासून तिला दूर करण्यासाठी सासरचे अघोरी मार्ग सुरू होतात. त्याचा तिच्या संवेदनक्षम मनावर विलक्षण परिणाम होतो. भयाने, काळजीने तिच्या व्यक्तीमत्वाचा कब्जा घेतला जातो व ती अंथरूण धरते. अशा परिस्थितीत तिला मृत्यूचे स्वप्न पडू लागते. सुशिक्षित व सुसंस्कृत स्त्रीच्या व्यक्तीमत्वाचा जुन्या रूढीच्या जाचामुळे होणारा संकोच हा मृत्यूसम दाखविण्यात बाबांनी या ठिकाणी असाधरण कौशल्य दाखविले आहे. पतीच्या प्रेमळपणाने, आस्थेने, दक्ष औषधयोजनेने तिला तशा प्रसंगीही दिलासा मिळतो. पण तिच्या व्यक्तीमत्वाला खऱ्या अर्थाने धुमारे फुटतात ते पतीच्या नोकरीच्या निमित्ताने स्वतंत्र बिऱ्हाड करून, ती नव्या उमेदीचा संसार करू लागते त्या वेळीच. तिच्या आशाआकांक्षा, तिचे शिक्षणप्रेम, तिची जिज्ञासा व तिची स्वतंत्र वृत्ती या नव्या स्वतंत्र संसारात अनेक अंगांनी विकसित होतात.

चूल व मूल किंवा रांधा-वाढा या स्त्रीजन्माच्या कहाणीपेक्षा यमुनेची कहाणी वेगळी व वेधक आहे. तिच्या सासरच्या शेजारची गोदावरी, प्रवासात भेटलेली वेणू किंवा पंढरपूरकरीण विधवा यापेक्षा यमुनेचे चित्र बाबांनी निराळे रेखाटले आहे. यमुना शिकलेली असल्यामुळे तिने तिच्या दृष्टिपथात आलेल्या अन्य विधवांच्या वैधव्यदशेपासून योग्य तो बोध घेतला आणि स्वतःवर वैधव्याची कुऱ्हाड कोसळली असता ती बावरली नाही किंवा कल्पित दुःखाच्या भयाने तिने कोणतीही प्रत्यक्ष कृती केली नाही. परंतु सासरी प्रत्यक्ष छळ सुरू झाल्यावर मात्र ती केशवपनाचा बळी झाली नाही. तर पतिनिधनोत्तर 'या लोकांत मला सुखाने राहता येणार

नाहीं' अशी तिची खात्री होताच, प्रत्यक्ष मारपीट, शिव्याशाप, उपासमार सुरू होताच, मोठ्या निर्धाराने, विचारपूर्वक पुढली राहण्या-उतरण्याची सोय झाल्यावरच तिने आपले घर सोडलेले बाबांनी दाखविले आहे. तसेच शिवरामाची आई, शिवराम यांच्यासह ती आपल्या पतीचा स्नेही दाजिबा याच्या घराचा आश्रय घेते. दाजिबा हे एक प्रेमळ ख्रिस्ती आहेत. त्यांनी शिवरामबरोबर विनायकाच्या निधनानंतर सांत्वनपर पत्र पाठविले होते. याशिवाय यमुनेस ख्रिस्ती मिशनच्या शाळेत प्रेमाचा प्रत्यक्ष स्वानुभवच होता. त्यामुळे दाजिबांच्या घरी जाण्यास यमुनेस कोणताही धोका वाटला नाही. केशवपनाची जुलुमजबरदस्ती तिच्यावर दाजिबांच्या घरी कोणीच करणार नव्हते. यमुना व शिवरामच्या आईने ख्रिस्ती दाजिबाच्या घरचा आश्रय घेतला ही बातमी गावात सर्वत्र पसरली. यमुनेच्या उदाहरणाने जणू काही विधवांच्या पुढे एक आशेचा किरण चमकू लागला.

हिंदू विधवांना त्यांच्या दारुण, हृदयद्रावक व अमानुष अशा हालअपेष्टातून बाहेर पडण्यासाठी त्यांच्या पुढे कोणताच मार्ग नव्हता. गोदावरीने परसातल्या विहिरीचा आश्रय घेतला. वेणू मुक्यानेच मरणप्राय यातना सहन करीत होती व शिवरामच्या आईने या वैधव्याच्या भयंकर दशेतून बाहेर पडण्यासाठी कोणतीही गोष्ट करण्याचे बाकी ठेवलेले नाही. आपल्यासमोर आलेल्या प्रत्येक संधीचा उपयोग तिने या संकटातून बाहेर पडण्यासाठी केला, हा प्रयत्न केविलवाणा ठरला. जिवाभावाच्या, आईच्या ठिकाणी असणाऱ्या व माहेरूनच पाठराखीण म्हणून आलेल्या कुणबिणीवर तिने वैधव्यावस्थेत विश्वास ठेवला. पण या बाईनेच तिचा केसाने गळा कापला. प्रत्यक्ष कुंटिणीलाच तिने विकले. प्राप्त परिस्थितीत म्हणून ती तेथे वेश्येचे जीवन जगू लागली. हेतू हा की निदान वैधव्यदशेतील विटंबना व केशवपनाचा प्रसंग आपल्यावर येऊ नये. पण त्याही जीवनात ती रमू शकत नाही. एका गायनशिक्षकाच्या बरोबर ती काशीस पळून जाते. तेथे ती त्याची रखेली म्हणून राहते. याप्रकारे का होईना, आपणास सुखाने आयुष्य घालविता येईल असा भरवसा तिला वाटत असावा. तिला तेथे एक मुलगा होतो. कौतुकाने त्याचे शिवराम नाव ठेवण्यात येते. परंतु वैधव्याने जणू या बाईचा पाठलागच चालविला आहे. दुर्दैवाने शिवरामचा बाप मरतो. परत एकदा शिवरामच्या आईच्या जीवनात परवड सुरुवात होते. काशीत तर ती बिचारी केशवपनदेखील स्वीकारते. नंतर पुण्याच्या सुधारकांच्या वार्ता तिच्या कानावर गेल्यामुळे म्हणा किंवा तिचे दुर्दैव म्हणा ती त्या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी मोठ्या भाविकतेने पुण्याच्या बेलबागेत आली. बेलबागेत पुराणीकबावांचा कावाच तिच्या दृष्टोत्पत्तीस आला. विधवांच्या जीवनाची फटफजिती टाळण्यासाठी ती तीर्थक्षेत्राची, पंढरपूरची वाट धरते. निदान देवाच्या द्वारी तरी तिला नीटपणे जगता यावे की नाही? पण ते देखील भाग्य तिच्या नशीबी नाही. पंढरपूरला तर प्रत्यक्ष विठोबाच्या पुजाऱ्याची–बडव्याची रखेली म्हणून तिला जगावे लागते. शिवरामच्या भवितव्याच्या आशेने ती हा सारा जाच सहन करीत असते. नरक यातना भोगीत असते. शेवटी कर्मधर्मसंयोगाने विनायकराव व यमुना यांची तिला भेट होते. शेवटी विनायकरावच तिला कर्दमातून सोडवतो. या शिवरामच्या आईने वैधव्यदशेतून बाहेर पडण्यासाठी

खरोखरच शब्दातीत यातना सोसल्या. भगीरथ प्रयत्न केले. धर्म जागविणाऱ्यांच्या सान्निध्यात राहूनही ती पापाच्या गर्तेतून बाहेर येऊ शकली नाही. शेवटी ती विनायक-रावांच्या भेटीमुळे या पापाच्या खाईतून बाहेर येऊ शकली. तसेच दाजिबासारख्या ख्रिस्ती माणसाच्या संगतीत तिला सरतेशेवटी का होईना मार्ग सापडला. तिच्यामुळे यमुनेसही नव्या मार्गाने जाण्याचे धाडस झाले. हिंदूधर्मात राहून व हिंदूधर्मीय लोकांकडे राहून यमुनेस पतिनिधनोत्तर कोणताच खात्रीचा सुखाचा मार्ग नाही हे ती खात्रीपूर्वक व स्वानुभावाने सांगू शकते. यमुनेच्या वाटयाला आपल्या स्वतःच्या वाटयाला आलेला विषाचा प्याला येऊ नये अशा भावनेपोटी यमुनेस ती मदत करते. गोदावरी, वेणू व पंढरपूर-करीण विधवा यांच्या कर्मकहाण्यांनी सावध होऊन यमुनेने ख्रिस्ती लोक व ख्रिस्ती धर्म यांच्या आश्रयाने वैधव्यदशेतून बाहेर पडण्याचा व सुखासमाधानाने माणूस म्हणून जगण्यासाठी मार्ग शोधल्याचे बाबांनी दाखविले आहे. हिंदू विधवांच्या जाचाचे निरूपण करून बाबांनी यमुनेचे उदाहरण या समस्येचे उत्तर म्हणून सुचविले आहे. यमुनेच्या या कल्पित कहाणीचा परिणाम इतका जबरदस्त ठरला की त्यानंतर एका वर्षाच्या आतच पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेवर वाद-विवाद झाले. विधवाविवाह सशास्त्र आहे की नाही याचा विचार जोराने आपल्याकडे सुरू झाला. यानंतरच पहिला पुनर्विवाह घडून आला. विधवाविवाहाचा कायदा पण याच सुमारास झाला. अशा प्रकारे स्त्रीसुधारणाविषयक एका महत्त्वाच्या अंगाचा श्रीगणेशा बाबांच्या या कादंबरीने केला असे म्हणावयास हरकत नाही.

गोदावरी, वेणू व पंढरपूरकरीण विधवा यांच्या जीवन दर्शनाने यमुनेचे चित्रण एक उत्तर म्हणून बाबा पुढे मांडण्याचा प्रामाणिक प्रयत्न करतात. *यमुनापर्यटनात* यमुनेचा निर्णय म्हणजे एक हिंदू विधवांना जाचातून, जुलूमातून, विटंबनातून बाहेर पडण्याचा मार्ग होय. यमुनेच्या पावलावर पाऊल ठेवून जर हिंदुधर्मातील विधवांनी आचार सुरू केला तर हा प्रश्न हिंदू सना-तन्यांना भेडसावू लागला असणे सहज शक्य आहे. जणू 'यमुनेचे उदाहरण' हा तत्कालीन हिंदुधर्माभिमान्यांना एक धोक्याचा 'लाल कंदीलच' ठरला असे म्हणता येईल.

बाबा ख्रिस्ती झाले होते. त्यांना जो स्वतःच्या उद्धाराचा पापमुक्तिचा मार्ग पटला होता तो त्यांनी निर्भयपणे—परिणामांची तमा न बाळगता पत्करला होता. एक प्रकारे बाबांनी स्वतःस सुचलेली, पटलेली सुधारणा कृतीत आणली होतीच. तसेच आपणास पटलेला मार्ग त्यांनी *यमुनापर्यटन* ही कादंबरी रचून समदुःखितांना, समानशीलांना कथनात्मक पद्धतीने सुचविला होता. या त्यांच्या साहजिक कृतीने तत्कालीन समाज मात्र जागा होण्यास मदत झाली. *यमुनापर्यटना*मुळे एक प्रकारे तत्कालीन विचारवंतांना हालविले. या कादंबरीनंतर त्यातील, सूचक व कल्पित का होईना, उदाहरणातील धोका तत्कालीन विचारवंतांना पटला आणि स्त्रीशिक्षण, बालविवाह बंदी, अनाथ बालिकाश्रम, विधवाश्रम, पुनर्विवाहास मान्यता, तद्-विषयक कायदा इत्यादी समाजपरिवर्तनात्मक घटना पाठोपाठ घडून येऊ लागल्या. या दृष्टीने *यमुनापर्यटन*चे हे यश निःसंशय पहिल्या प्रतीचे आहे. यमुनेचे नायिका या दृष्टीने महत्त्व व तिचा त्या काळाच्या संदर्भातला हा आवाका फार मोठा ठरतो. सुशिक्षित, साहसी, प्रसंगाव-

धानी, सत्यवादी, कनवाळू, सहृदयी अशी ही मराठी कादंबरीतील पहिली नायिका समाज-परिवर्तनकर्ती ठरते. विधवांच्या हालांना तिने वाचा फोडली, त्यातून बाहेर पडण्याचा मार्ग दाखविला. त्या दृष्टीने बाबांची यमुना हरिभाऊंच्या यमूपेक्षा किती तरी पुढे गेलेली आहे. लिहिता वाचता येणारी, कलाकुसर जाणणारी, निसर्गश्री अवलोकन करणारी, पतीशी हितगुज करणारी, सुशील, प्रेमळ, मनमोकळी व तत्कालीन सुशिक्षित सुधारक तरुणांच्या स्वप्नात शोभणारी अशी सखी, सहचरी असणारी 'यमुना' बाबांच्या पहिल्या वहिल्या कादंबरीतील नायिका आहे. बाबांनी आपल्या पहिल्याच कादंबरीत, मराठीतील पहिल्यावहिल्या कादंबरीत अशी समर्थ नायिका रंगवावी हे महत्त्वाचे आहे.

बाबांची यमुना ही मराठीतल्या महत्त्वाच्या नायिकांमध्ये वेगळेपणानेच उठून दिसते. ती एक समर्थ नायिका आहे. नायिकाप्रधान कादंबरी हे मराठी कादंबऱ्यांचे डोळयात भरण्यासारखे वैशिष्टय अगदी पहिल्या कादंबरीपासूनचे आहे. यमुनेचा हा ठसा अगदी बाबांच्या काळापासून मराठीतील बहुतेक कादंबऱ्यातून आढळून येतो. मराठी कादंबऱ्या नायिकाप्रधान असल्याचे एक कारण *यमुनापर्यटन* ही अगदी प्रारंभीची कादंबरी तशी होती असेही देता येईल. तिच्याच अनुकरणामुळे पुढील बहुतेक कादंबऱ्या नायिकाप्रधान झाल्या असे म्हणण्यात फारसे चुकेल असे वाटत नाही.

*यमुनापर्यटनात* यमुनेच्या खालोखाल महत्त्वाचे व्यक्तिचित्रण विनायकरावांचे आहे. प्रथमच लाजाळू विनायकाचे दर्शन भटजीकरवी आपणास घडते. बायकोवरून भटजी विनायकाची थट्टा करतात पण तो लाजेने काहीच बोलत नाही. यमुनेच्या मानाने तो कोमल मनाचा नव्हता, पण तो अविचारीही नव्हता. पत्नीचे म्हणणे तो ऐकून घेई. फावल्या वेळी तिला पुस्तके वाचून देई. यमुना स्वसुखदुःखे मोकळेपणाने विनायकरावांस सांगे. तो पत्नीचे दुःख दूर करण्यासाठी म्हणतो, 'हे दुःख निवारण करावयास मजपाशीं कांहीं उपाय असला तर सांग, मी तुझ्यासाठी आपला प्राण खर्च करण्यासही तयार आहे.' पत्नीने मरणाच्या गोष्टी काढताच त्याच्या डोळयातून अश्रू येतात. पत्नीची काळजी करणारा, धीर देणारा, तिने आरोग्य सुधारावे असे इच्छिणारा विनायक प्रथम आपल्यापुढे येतो. नंतर यमुना व विनायकराव नागपूरच्या प्रवासास बरोबर जातात. प्रवासात तो पत्नीला बरोबरीच्या नात्याने वागवितो. विधवा, त्यांचे प्रश्न, त्यांची दुःखे यांजबद्दल तो तिच्याशी अगदी मोकळेपणाने चर्चा करतो. तिला आपले म्हणणे समजावून देतो, तिचे अनुभव आपण समजावून घेतो व तिच्या बुद्धीमत्तेने प्रभावित होतो. चर्चेमधून विधवांच्या हालातून त्यांची सुटका झाली पाहिजे असे दोघांनाही वाटते. नागपुरास विनायकास निकडीच्या उद्योगाने कधी कधी फार उशीर होई. नागपुरास दौलतराव या तरुणाची व विनायकाची मैत्री होते. एकदा फिरावयास गेले असताना सर्पाच्या दंशापासून ते वाचतात. सर्प चावला असता तर यमुनेस वैधव्य आले असते, तिचे फार हाल झाले असते अशी त्यास काळजी वाटली. विधवांच्या हालाने, जाचाने तो फारच व्याकुळ होई. आपणास व पत्नीस ज्ञान मिळाले याचे त्यास भाग्य वाटते. लाखो लोकांच्या अज्ञानाची त्यास कीव येते. लोक उपासतापास, नवससायास, जप, तप, कौल वगैरे करतील पण देवाची

भक्ती करणार नाहीत. याचे त्यास वाईट वाटते. विनायकास शिवरामाच्या आईचा संशय येताच त्याने तिचे प्रकरण उघडकीस आणलेच. परक्या बाईशी एकाएकी बोलण्याचे त्यास अवघड वाटते. त्याने पंढरपूरच्या बाईची सर्व व्यथा सहानुभूतीने ऐकून घेतली व तिला मदत करण्याची तयारी दर्शविली. बाईने त्याला आपले गुपित सांगितले यातच त्याच्या स्वभावाचा चांगुलपणा व सहृदयता व्यक्त होते. तो त्या पंढरपूरच्या बाईस व तिच्या मुलास सन्मार्गास लावतो. पापभीरु विनायक त्या विधवेच्या दुःखाची आपल्या पत्नीशी चर्चा करितो. हजारो वर्षांच्या या दुष्ट चालीवर विचार करतो. सक्रिय सहानुभूति असणारा विनायक शिवरामच्या शिक्षणाची व्यवस्था करतो व बाईच्या अन्नवस्त्राची सोय लावतो. तिला आपला स्वयंपाक करण्याची कामगिरी देतो. श्रद्धाळू विनायक पत्नीकडून बाप्तिस्मा घेतो. स्वमरणोत्तर तिला पुनर्विवाह करण्याविषयी सांगतो. विनायकाकडून, त्याच्या मित्रांकडून आपणास अनेक विधवांच्या हकीगती समजतात. यमुनेचा पती व विधवांचा कैवारी, केशवपनविरोधक, विचारी, सहृदय, पापभीरु अशा विनायकरावांचे दर्शन आपणास *यमुनापर्यटन*मध्ये घडते.

यमुना आणि विनायकरावयांच्या अंतरंगात, मनात असलेली खळबळ ठिकठिकाणी व्यक्त झाली आहे. विनायकरावांच्या मनात विधवांविषयी सहानुभूति आहे. ती त्याच्या बोलण्या-चालण्यात, वागण्यासवरण्यात व्यक्त होते. मरतेसमयीदेखील तो आपल्या पत्नीच्या वैधव्य-दशेची चिंता करतो. तिच्या भावी केशवपनाचे तिच्या छळाचे चित्र त्याला अस्वस्थ करणारे आहे. त्याच्या मनातले वादळ आपणास चांगलेच जाणवते.

विनायकरावाच्या मनात येशू ख्रिस्ताविषयी भक्तिभाव पत्नीच्या—यमुनेच्या सुस्वभावाने व मधुर भाषणाने व तिच्या प्रयत्नाने निर्माण झाला होता. विनायकराव यमुनेप्रमाणे ख्रिस्ती शाळेत गेला नव्हता पण पत्नी मनासारखी असल्याने तो तिच्या आवडीनिवडीप्रमाणे तिच्याच इच्छेनुसार ख्रिस्ती तारणावर विश्वास ठेवू लागतो. त्या देवावर विश्वास ठेवू लागतो. मरण-समयी तर आपली आत्मतारणाबाबत झालेली दिरंगाईही तो यमुनेजवळ कबूल करतो. तो म्हणतो, 'जरी मी सद्‌गुणी व सदाचरणी होतो तरी मी देवाचा भक्त नव्हतो.' नंतर तो तारण व पाप-क्षमा इत्यादींची विचारपूस करतो. यमुना त्यास देवावर विश्वास ठेवावयास सांगते. ती त्याच्यासाठी प्रार्थना करते. विनायकराव उपासनागीत ऐकतो. तसेच आपल्या मरणोत्तर यमुनेस वाटले तर तो तिला पुनर्विवाहाची पण परवानगी देऊन ठेवतो. तिच्या सुखाच्या चिंतेत तो आपल्या शेवटच्या घटका घालविताना बाबांनी दाखविला आहे. अखेरच्या क्षणी विनायक-राव प्रभूने आपला अंगीकार करावा अशी इच्छा व्यक्त करीत असताना दिसतो. मनासारखी पत्नी मिळाली असतांना तिच्या संगतीत मरण देखील किती उदात्त असते हे बाबांनी विनायक-रावाच्या चित्रणात दाखविले आहे. एक प्रकारे यमुनेचे चित्रण बाबांनी असे काही केले आहे की तिच्यामुळे तिच्या पतीलाही आपल्या आत्मोद्धाराचा—पापमुक्तीचा मार्ग सापडला. त्याला सुखाचे मरण येऊ शकले. एका अर्थाने तिच्या सान्निध्यात विनायकास जीवन तर सुखाने घालविता आलेच पण प्रत्यक्ष मरणाला देखील सामोरे जाण्याचा, सुखासमाधानाने मरण स्वीकारण्याचा मार्ग विनायकरावास सापडला. हे दाखविण्यात बाबांनी यमुनेचा प्रभाव

वाचकांवर सतत ठेवण्यात यश मिळविले आहे. विनायकरावांचे चित्रण करतानाही यमुनेचा प्रभाव यत्किंचितही कमी होत नाही.

विनायकाला अपघाती मरण येते हा प्रसंग एका अर्थाने या कादंबरीचा मध्यबिंदू आहे. कादंबरीच्या कथानकाला या प्रसंगाने एकदम कलाटणी दिली आहे. साऱ्या विधवांच्या दुःस्थितीचे आकलन झाल्यानंतर दुर्दैवाने यमुनेवरही तोच प्रसंग कल्पिण्यात दैवाच्या अतर्क्यतेचा प्रत्यय कादंबरीकाराला घडवावयाचा होता. एक शोकात्म कथा या दृष्टीने या कलाटणीमुळे कादंबरीला सघनता येते. म्हणूनच विनायकाचा मृत्यू ही कादंबरीत एक अपरिहार्य घटना ठरते. ती नेमक्या ठिकाणी करण्यात बाबा चुकले असते तर बाबांच्या मनातील हेतूला आकार देता आला नसता!

यमुना-विनायकरावांच्या मुख्य कथेला उपकथांची जी जोड आहे, ती मुख्यत्वेकरून विध-वांच्या दुःस्थितीचीच आहे. त्यांचे स्वरूप थोडक्यात पाहता येते. या उपकथांनी यमुनेच्या मनावर केलेल्या आघातांची कल्पना येते.

या उपकथातील यमुनेच्या शेजारीच रहाणाऱ्या शिवराम गोपाळच्या बायकोचे विहिरीत जीव देणे ही एक छोटी कथा आहे. यमुनेच्या शेजारणीने—शिवराम गोपाळच्या विधवेने गोदावरीने—आपण अपशकुनी व आता आपले केशवपन खंडू न्हावी करणार या भीतीने परसातल्या विहिरीत जीव दिला. पतीच्या निधनाने अगोदरच दुःखी झालेल्या गोदावरीस तिच्या जावेने सळो की पळो करून सोडले. तशातच मामा`पत्र आले, केशवपनासाठी खंडू न्हावी पण आला व गोदावरीने विहिरीत जीव दिला. यमुनेला जाणवलेला हा पहिला धक्का. काहीसा 'परदुःखशीतल' असा वाटावा या प्रकारचा.

त्यानंतर पतीसमवेत नागपूरच्या प्रवासात यमुनेस वेणूची कथा कळते. वेणूस घरात सर्व वेणे म्हणतात. कपाळकरंटी वेणू अश्रुपूर्ण नयनांनी आपली व्यथा, पूर्वकथा सांगते. ही एक बालविवाह झालेली स्त्री. प्रथम तिचे लाड होत. नंतर तिचा पती आजारात वारला. त्यानंतर वेणूस मोलकरणीसारखे काम करावे लागले. तिची वस्त्र-पांघरुणे सासरच्यांनी घेतली. दागदागिने घेतले. तिला नागवले. काबाडकष्ट, अपुरे अन्न व अपमानीत शब्द याशिवाय सुख म्हणजे काय हे तिला माहीत नव्हते. नंतर यमुना तिला स्वतःजवळचे काहीबाही देऊ करते, पण घरचे लोक मला काही वापरू देणार नाहीत, असा खुलासा वेणू करते. मग यमुना तिला येशू ख्रिस्त, त्याची प्रार्थना, कृपा इत्यादीविषयी सांगते. तिच्यासाठी यमुना प्रार्थना करते. तिच्यावर त्याचा फारसा परिणाम होत नाही. मात्र पौगंडावस्थेतील तिच्या तारुण्यसुलभ आशाआकांक्षा कशा निष्ठुरपणे पायदळी तुडविल्या जातात हे पाहून ती कळकळते. अशी ही वेणूची दुसरी कथा यमुनेने नागपुरास जाताना वेणूच्या तोंडून ऐकली. यातूनही एका विधवेच्या विविध हालअपेष्टांचे, तिच्या उपेक्षित जीवनाचे, छळाचे व जाचाचे दर्शन घडते. यमुनेच्या मनावर हा दुसरा आघात.

विनायकाचा नागपूरचा मित्र दौलतराव याने आपल्या मामेबहिणीची कथा विनायकरावास कथन केली. ही मामेबहीण विधवा होती पण आईबाप तिचा चांगला सांभाळ करीत. अन्न-

वस्त्राची ददात नव्हती. ते तिचे लाड करीत, पण पती नसल्याने ती सतत दुःखी असे. रडे. त्यामुळेच वडील पण दुःखीच असत. तिच्या वडिलांना कोणी तरी सल्ला दिला, 'मुलीला देवा धर्माचा नाद लावा.' त्यासाठी वडिलांनी पुराणिक लावला. तो गोपी व कृष्णाच्या कथा तिला ऐकवी. नंतर त्याच गावात एक कथेकरी गोसावी आला. त्याची ख्याती गावात पसरली. ती मामेबहीण पण त्याच्या कथास जाऊ लागली. चातुर्मासात देवधर्म वाढले. रात्री पूजेस उशीर होऊ लागला. वडिलांना वाटले, मुलगी साधूच्या भजनी लागून पावन झाली. पण प्रत्यक्षात या बावाने कावा करून त्या मुलीसह पलायन केले. बरोबर जाताना मुलीने घरातील हजार दीड हजारांचा वित्तविषयही नेला होता. तिचा पत्ता लागला नाही. या बावाने अशाच दोन–तीन स्त्रियास पूर्वी पळविले होते ही माहिती मात्र नंतर मिळाली. पुनर्विवाह रूढ नसल्याने ही मामेबहीण पळाली. मामांच्या तोंडास काळे फासले. विधवांच्या व्यभिचाराचा हा एक सर्वसामान्य मासला. दौलतरावाने विधवांच्या आणखी दोन छोटया कथा सांगितल्या. त्यापैकी एक उच्च कुलातली तरुण विधवा, शेजारच्या तरुणाबरोबर तिची मैत्री झाली. पोट वाढले. हवा बदलण्यास गेली. बाळंत झाली. पोर कुळंब्यास दिले. बरोबर एक मुलगा होता तो बोभाटा करील म्हणून त्यास तिने नदीत ढकलले व तो वाहून गेला असे उठविले. स्वैराचाराची ही पुढची पायरी. तिच्यापुढे भ्रूणहत्येसारखे अघटित प्रकार म्हणजे काहीच नव्हेत! मुंबईची एक शेणवी स्त्री एका लग्न झालेल्या माणसाबरोबर राही. तिची ही सवय मारहाण करूनही गेली नाही. तिला लोणच्याच्या खोलीत कोंडली, तरी तिने ऐकले नाही. हा मुर्दाड स्वैराचाराचा नमुना. अशा प्रकारे दौलतरावानेच विधवांच्या तीन कथा विनायकरावास ऐकवल्या आहेत. या कथांचे आघात सर्वसाधारण स्वरूपाचे आहेत.

खरा मोठा व विलक्षण आघात पंढरपूरच्या विधवेचा. ही विधवा रात्रीच्या वेळी केसाचा टोप घालून जारकर्म करते आणि तेही देवाच्या पुजाऱ्याशी! केवळ आपले व आपल्या उनाडटप्पू मुलाचे पोट जाळण्यासाठी या बाईने हा वाममार्ग पत्करला. ही मुळची कुलीन होती. परंतु वैधव्यामुळे ती एका दुष्ट चक्रात सापडली होती. प्रथम ती वैधव्याच्या हालाच्या कल्पित वर्णनाने घरातून पळाली. नंतर तिची रवानगी नाचगाणी करणाऱ्या कलावंतीणीच्याकडे झाली. तेथून ती गाणे शिकवणाऱ्याबरोबर पळाली. पण तोही पुढे निधन पावला. पोराच्या मुंजीसाठी व पतीच्या प्रेतकर्मासाठी ती विकेशा झाली. पोटापाण्याचे हाल होऊ लागले. तशी मग ती पुण्यास आली. वेलबागेत तिची व विष्णु पुराणिकाची गाठ पडली. पण पुण्यास इतर विधवांची फजिती पाहून ती एका कार्तिकात बडव्याकडे पंढरपुरास आली. त्याच्याकडे चोरी झाल्यामुळे ती दुसऱ्या बडव्याकडे स्वयंपाक करी व ती केसाचा टोप घालून त्याच्याकडेच रात्री जाई व जारकर्म करी. त्याचे कारण तो बडवा तिच्या मुलाचे लग्न करून देणार होता. मुंज तर त्याने केलीच होती. विनायकाने ह्या बाईची तिने कबुलीजबाब दिल्यावर त्या चिखलातून सुटका केली.

पुढे प्रत्यक्ष यमुनेवर वैधव्याची कुऱ्हाड कोसळते. तिच्यावर पण केशवपनाचा प्रसंग येतो, पण ती शिवरामाच्या मदतीने व सासऱ्याच्या सहाय्याने यातून वाचते. ती पुनर्विवाह करते.

अशा प्रकारे मुख्य कथानक व उपकथानके विधवांच्या स्थितीच्या निरूपणाची आहेत. उपकथानकांनी कथेच्या हेतूस बळकटी आणली. कथेतील चित्रण परिणामकारी बनविण्यासाठी बाबांनी आपल्या उपकथानकांचा उपयोग करून घेतला. यमुनेच्या कथेच्या सूत्रात ही उपकथानके गुंफलेली आहेत हे महत्त्वाचे आहे. या उपकथांनी यमुनेच्या कथेस बळकटी आणली आहे. ही उपकथानके कथानकाशी एकजीव झालेली नाहीत; पण परस्परांशी शृंखलाबद्ध खासच आहेत. गोदावरीची कहाणी आपातत: यमुनेच्या कानावर पडते. वेणूची कर्मकहाणी यमुना प्रयत्नपूर्वक तिच्याचकडून वदवून घेते, पंढरपूरची विधवा स्वत:च्या मुखानेच विनायकरावाला आपली स्वत:ची चित्तरकथा सांगते. विनायकरावाचा मित्र दौलतराव आपल्या मामेबहिणीची वैधव्यकथा सांगतो. तर इतर मित्रांच्या पत्रव्यवहारातून आणखी काही विधवांच्या कथा या पतिपत्नींना कळून येतात. अशा रीतीने या उपकथांच्या निवेदनपद्धतीत वैचित्र्य साधण्यात आले आहे. या सर्व उपकथा एकीतून दुसरी जन्म घेते अशा प्रकारच्याच आहेत. त्यांची गुंफणी कथा विषयाला बऱ्याच प्रमाणात गती देते.

*यमुनापर्यटन अथवा हिंदू विधवांच्या स्थितीचे निरूपण* हे नाव प्रस्तुत कादंबरीस बाबांनी दिले आहे. ते सर्वस्वी योग्य आहे. कारण या ग्रंथात तत्कालीन हिंदूंच्या विविध विधवांच्या परिस्थितीचे यथातथ्य चित्रण शब्दांनी साकार केलेले आहे. यमुनेने पतीबरोबर प्रवास केला ते तिचे पर्यटन. तसेच तिने ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला हा तिच्या अंतरंगाचा प्रवास. म्हणून *यमुनापर्यटन* हे नाव पण योग्य आहे. प्रत्यक्ष कादंबरी व शीर्षक याचा अन्योन्य संबंध आहे हे उघड आहे. त्यानंतर प्रत्येक प्रकरणास एक एक शीर्षक दिलेले आहे. त्यावरून देखील त्या प्रकरणाच्या अंतरंगाचा बोध होतो. वाचकांची दिशाभूल होत नाही. उदाहरणार्थ, 'लग्न' प्रकरणात यमुनेचा व विनायकरावांचा विवाह, तर 'खंडू न्हावी' या प्रकरणात गोदावरीच्या केशवपनाचा प्रसंग, 'वेणू' या प्रकरणात यमुनेची शेजारीण वेणू हिची वैधव्यकथा आहे. 'बावाचा कावा' यामध्ये मामेबहिणीस फसवणाऱ्या गोसावी बुवाचे कपट आहे. 'केशाचा टोप' यामध्ये शिवरामची आई केसाचा टोप स्वैराचारार्थ कसा घाली याची कथा आहे. तिलाच माहेरी कुळंबिणीने कशी फसविली ही हकीगत कुळंबिणीच्या कथेत 'भूलथापे'मध्ये आहे. सुटसुटीत व सार्थ अशी ही शीर्षके आहेत.

आपले म्हणणे बाबा साधार मांडतात. त्यासाठी पुराणे, दासबोध, गीते वगैरेतून पोषक उतारे व वाक्ये यांची मदत ते घेतात. विधवांच्या हकीगती आपण कथन केल्या त्या अतिशयोक्तीच्या, कल्पित नव्हत्या, एतदर्थ त्या कथांना पुष्टी देणाऱ्या पुरवण्या बाबांनी या कादंबरीस जोडल्या आहेत. आठ पुरवण्या जोडून बाबांनी या विधवांच्या निरूपणास वजन आणले आहे. 'एका विधवेचे आत्मकथन', 'एका बाईचा निबंध', 'विधवा-विवाहास वेदांचा आधार', 'पुनर्विवाहांची संख्या', 'न्हावी बांधवांस सूचना', 'केशवपन', 'पंढरपुरातील विधवा', 'पुनर्विवाहाचा कायदा' या अष्ट पुरवण्या *यमुनापर्यटना*तील विषयास भक्कम आधारभूत ठरल्या आहेत. पहिल्या आवृत्तीस मात्र फक्त पहिल्या दोनच पुरवण्या होत्या !

याप्रकारे या कादंबरीत स्वभावरेखाटन व व्यक्तिचित्रण यांनी रंग भरला आहे. आत्म-

निवेदन, संवाद, पत्रलेखन, कथनप्रसंग यातून हे स्वभावरेखाटन सहजगत्या झालेले आहे. यमुनेचा सासरा, वादविवाद करणारे शास्त्री, दौलतराव, त्याच्या मामेबहिणी, मोरभट वगैरे इतर व्यक्तीचित्रणेही समाजातील प्रातिनिधीक स्वरूपातील व्यक्तींचीच आहेत. १९ व्या शतकाच्या मध्य कालातील समाजाचे प्रतिबिंब जणू या कादंबरीत या व्यक्तींच्या रूपाने आपणास *यमुनापर्यटनात* आढळून येते.

*यमुनापर्यटन* या कादंबरीचे कथानक तत्कालीन समाजाला अस्वस्थ करण्याइतके चित्तवेधक आहे. यमुना व विनायकराव प्रवासास जातात. तत्पूर्वी गोदावरी या विधवेची शोकान्त कथा, वाटेत वेणूची व्यथा, पंढरपूरच्या विधवेची अद्‌भुतरम्य पण कल्पितालाही मागे टाकणारी हृदयद्रावक कथा, दौलतरावांच्या मामेबहिणीचा बळी इत्यादी उपकथांनी या यमुनेच्या कथानकास बळकटी आणली. यमुना, विनायकराव, वेणू, शिवराम व त्याची आई, दौलतराव इत्यादी व्यक्तींची स्वभावरेखाटने यांनी या कादंबरीस उठाव आला. पण मूळ यमुना व विनायकराव यांच्या कथानकाने व अनुषंगाने हिंदू विधवांच्या स्थितीचे निरूपण बाबांना करावयाचे होते. त्यासाठी यमुनेचे पर्यटन आहे. विविध दृष्यांनी, प्रसंगांनी, घटनांनी, विधवांचे हाल त्यांनी साकार केले. पुनर्विवाहाचे तत्त्व वाचकांच्या गळी उतरविले. यातील संघर्ष हा केवळ सनातनी व सुधारक यांच्यातील ढोबळ विरोधावर आधारलेला नाही. त्यापेक्षा तो अधिक व्यापक व सूक्ष्म आहे.

सुष्ट आणि दुष्ट पात्रांमध्ये कथानकाची विभागणी, संकटांच्या अनेक अतर्क्य प्रसंगातून नायक-नायिकेचा प्रवास व त्यातून अद्‌भूत मार्गांनी झालेली त्यांची सुटका, खलपात्रांचे आकस्मिक हृदयपरिवर्तन व पश्चात्तापदग्धतेत त्यांनी होरपळणे, सुष्ट–दुष्ट पात्रांना कवितेतील सांकेतीक न्याय (poetic justice) देणे इत्यादी कृत्रिम वैशिष्ट्यांनी मराठी कादंबरी इतकी जखडली गेली आहे की, अद्यापिही ती त्यामधून बाहेर पडली आहे असे नव्हे. *यमुनापर्यटन* ही एक विशुद्ध व निखळ वास्तवाचाच वेध घेणारी स्वतंत्र प्रवृत्तीची कादंबरी आहे.

प्रा. कुरुंदकरांनी म्हटल्याप्रमाणे रचनेच्या दृष्टीने या कादंबरीचे काही लक्षणीय विशेष विचारात घेण्यासारखे आहेत :

'कोणतेही निसर्गवर्णन किंवा प्रास्ताविक न घेता फडक्यांच्या आधुनिक कादंबरीप्रमाणे पात्रांच्या संवादापासून ही कादंबरी सुरू होते व कथानकाच्या ओघातच मागचा इतिहास बाबा सांगून जातात. या कादंबरीच्या शेवटच्या प्रकरणापर्यंत 'वाचकहो' असे वाचकांना मुद्दाम आवाहन करण्याची गरज बाबांना वाटली नाही. सामाजिक कादंबरीत सुद्धा वाचकांची उत्कंठा वाढविण्यासाठी एखादे रहस्य आणण्याची इच्छा लेखकांना होत असते. तशी इच्छा बाबांना झालेली नाही. ही कादंबरी ज्या पद्धतीने बाबांनी संपविलेली आहे ती पद्धती सुद्धा विचार करण्याजोगी आहे. यमुना ख्रिस्ती झाली व तिचा पुनः विवाह झाला असा मुख्य कथानकाचा बाबा पूर्ण शेवट करतात. पण सगळ्याच पात्रांचा परिपूर्ण शेवट दाखविण्याचा मोह त्यांनी आवरला आहे. शिवरामच्या आईचे पुढे काय झाले, शिवरामचे काय झाले, याचा उपसंहार करीत ते बसले नाहीत. बाकीची पात्रे कथेप्रमाणे येतात व

जातात. त्यांचा उपसंहार करण्याचे कारणच नव्हते. जणू त्या विधवांच्या कहाण्या तशाच अनुत्तरित उभ्या आहेत. त्यांचे प्रश्न सुटलेले नाहीत. कथानक मांडणीच्या या पद्धतीमुळे *यमुनापर्यटन* हा प्रवाही जीवनातला नजरेसमोर आलेला एक तुकडा वाटतो. कृत्रिम रीत्या कापून बेतशीर केलेला ठाकठिकीचा नकली आकार वाटत नाही. केतकर वाचताना जसा त्या निवेदनाला कलाहीनतेबरोबर खरेपणाचा जोर जाणवतो तसा खरेपणाचा प्रभाव येथेही जाणवतो. बाबा पदमनजींचा वास्तववाद म्हणजे लीलाचरित्राप्रमाणे शैलीचा वास्तववाद नाही. प्रचाराने डागाळलेला असला, बौद्धिक आवाक्याने उथळ वाटला, आणि कलात्मकता फारशी नसली तरी तो आशयाचा वास्तववाद आहे. नाडलेल्या विधवा अतिसद्‌गुणी व अतिसुंदर दाखविण्याचा मोह त्यांना होत नाही. यमुनेचा सासरा ती घरातून निघून गेल्यावरही अनुकंपाशीलच राहातो असे दाखवितांना त्याना हरकत वाटत नाही. पहिल्याच मराठी कादंबरीत बाबांनी कादंबरीच्या दृष्टीने जेवढा प्रवास केला आहे त्या प्रवासाचे आजही कौतुक वाटल्याशिवाय राहात नाही.[२६]

व्यक्तिचित्रणानंतरचा *यमुनापर्यटना*मधील महत्वाचा विशेष म्हणजे ठायी ठायी तिच्यामध्ये कादंबरीकाराने योजिलेले सहज संवाद. व्यक्ती, प्रसंग, व्यक्तींचे समाजातील स्थान इत्यादिकांनुसार हे संवाद वास्तवरूप घेऊन कादंबरीत जिवंतपणा निर्माण करतात. यमुनेचे लग्न ठरल्याची वार्ता घेऊन राघोपंत भटजी येतात आणि वधूपिता आणि भटजी यांच्या संवादानेच कादंबरीला सुरुवात होते. यमुनेच्या विवाहानंतर तिची सासू व नणंद यांच्यामधल्या संवादाने तिच्या सासरचे दर्शन घडते आणि पहिल्या प्रकरणाचा शेवटही विनायक-यमुना या आदर्श दांपत्याच्या प्रेमळ वार्तालापाने होतो. गोदावरीच्या वैधव्याने 'पांढऱ्या पायाची अवदसा' म्हणून शेजारच्या आयाबाया आपापसात कशा बोलतात आणि त्या साऱ्या गोष्टी कानावर पडल्यामुळे यमुना आपल्या पतीशी भांबावलेल्या मनःस्थितीत कशी अस्वस्थपणाने बोलते याचा प्रत्यय पतिपत्नींच्या संवादातून येतो. नागपूरची बालविधवा वेणू व यमुना यांच्यामधला संवाद म्हणजे बालविधवांची दुःखे स्त्रीसुलभ अंतःकरणातून कसे कारुण्यपूर्ण रूप धारण करतात याचा उत्तम नमुनाच. तिच्या बालसुलभ आशाआकांक्षा कशा मारल्या जातात हे तिच्या तोंडून ऐकतांना अंतःकरण पिळवटते. विशेषतः 'महिन्यातून तीन रात्री एका लुगड्यावरच कोरड्या भुईवर' कसे निजावे लागते आणि रात्री कशा खायला उठतात, याचे तिचे वर्णन म्हणजे साक्षात अशा एखाद्या विधवेच्या अंतःकरणातूनच साकारलेले आहे, असे वाटायला लागते. विनायकरावांच्या दोन गड्यांमधला संवाद पृ. ७३–७४ वर बाबांनी रंगविला आहे. बोलभाषेचा हा पहिला-वहिला रांगडा आविष्कार अतिशय भेदक व नेमका परिणाम करवून जाणारा आहे. पंढरपूरच्या विधवेला पूर्वायुष्यात ग्वाल्हेरच्या कुंटणखान्यात खितपत पडावे लागते. या कुंटणखान्याचे चित्रही धेडगुजरी हिंदी–मराठी संवादातून बाबा उभे करतात. शास्त्री–पंडितांचे, सनातनी सुधारकांचे वादविवाद पुस्तकी पांडित्याच्या थाटावर वर्णिलेले आहेत, तर आकाशातील तारक बापाबद्दल बोलताना यमुना व तिचा पती अपरिहार्यपणे मराठी बायबली

वळणाची भाषा बोलतात; आणि बोलता बोलता 'स्वसंतोष पाखराप्रमाणे माणसाने मिळवावा' असा बोधवादाचा ठसाही त्यांची भाषा उमटवून जाते.

स्त्रियांच्या भाषेची विविध रूपे या संवादातूनच आविष्कृत होतात. यमुनेच्या संवादातून तिची अपार सहानुभूति जाणवते, तर वेणूचे बोलणे अपार करुणा जागृत करते. पंढरपूरच्या विधवेचे बोलणे म्हणजे तिच्या विटंबनेच्या जाणीवेने निर्माण झालेल्या दाहक वाणीचा विलासच. आपल्या दुर्दैवाचे दशावतार वर्णिताना ती सहजगत्या उपरोधाने म्हणते :

काय तुम्ही आम्ही विधवांचे बरे केले आहे? मी पुण्यात होते तेव्हा रोज संध्याकाळी 'दीपमाळीपाशी' फुलवाती करीत बसले म्हणजे तुमच्यासारिखे, ज्यांना तेथे सुधारलेले म्हणतात, ते येऊन नित्य कागद वाचीत, त्यात विधवांची दुःखे पाहणारा, विधवांचा कळ-वळा जाणणारा, अमका तमका यांजकडून आलेली पत्रे मोठ्याने आसपासच्या लोकांनी ऐकण्याजोगे वाचीत. त्यात लोकहितवादींची पत्रे मी पुष्कळ ऐकली. त्याचे नावही मी पाठ करून ठेवले आहे. तेव्हा मला वाटे की आम्हा विधवांचा उर्जित काळ येत आहे. सरकार हे छापीत आहे पण त्या गोष्टीला वर्षांची वर्षे लोटली तरी कोणीच पुढे पाऊल टाकीत नाही. तेव्हा आम्ही करावे तरी काय? ते लोकहितवादी बुवा आता कोठे लपले? पुढे ब्राह्मणांच्या सभा मिळवून कांही तरी निर्णय का करीत नाहीत? आता हातात काकणे घालून चुलीपाशी का बसले आहेत? केवळ कागद शाईचाच मात्र खर्च केला. पण विचारा-प्रमाणे आचार काहीच झाला नाही तर त्यापासून कोणाचे कल्याण होणार आहे?

विविध पात्रप्रसंगांना उठाव देणारी भाषा या कादंबरीने चांगली पेलली आहे. त्या काळाच्या दृष्टीने हे संवादयोजनेचे व भाषाशैलीचे वैशिष्टय चांगलेच लक्षात राहाते. प्रा. सरदारांच्या शब्दात सांगावयाचे तर: 'बाबांची भाषा शुद्ध व सुबोध असून तिच्यात एक तऱ्हेचा प्रेमळपणा आहे.'[२७]

म. म. दत्तो वामन पोतदारांनी या कादंबरीच्या संदर्भात बाबांच्या भाषाशैलीची खालील प्रकारे महती सांगितली आहे :

'बाबांची भाषापद्धती खरोखरच फार गोड आहे. त्यात भक्तीचा जिव्हाळा आहे, समाजसुधारणेची तळमळ आहे. वाक्ये साधी, शुद्ध, सरस व चटकदार आहेत. लिहिणे गंभीर व प्रौढ आहे. शब्द वेचक आहेत. वळण जरा कोकणी आहे. त्यांची गोड, सुंदर व टाप-टीपीची भाषा पाहाता बाबांची गणना उत्तम मराठी लेखकांत केली पाहिजे.'[२८]

'वळण जरा कोकणी आहे' या शब्दप्रयोगाने बाबांच्या मराठी भाषेतील बेळगावी कोकणीची छाप पोतदारांनी नेमकी टिपली आहे. म्हणजे मराठीतल्या या पहिल्यावहिल्या कादंबरीला काही एक प्रादेशिकतेचे वारेही लागले आहे तर!

बाबांची ही पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली तेव्हा तत्कालीन वृत्तपत्रातून बरीच उलट-सुलट चर्चा झाल्याचे *ज्ञानोदया*तील परीक्षणावरून व पत्रव्यवहारावरून लक्षात येते. दुर्दैवाने ही सारी चर्चा आज प्रयत्नांतीही उपलब्ध होऊ शकली नाही. मात्र *ज्ञानोदया*तून या चर्चेचे जे प्रतिबिंब पडले आहे, त्याचे विवेचन करणे या ठिकाणी उद्‌बोधक वाटेल असे वाटते.

पहिली आवृत्ती हाती पडल्यानंतर *ज्ञानोदय*कारांनी पहिली प्रतिक्रिया ही की, 'या कादंबरीमुळे या देशात पुनर्विवाहाची चाल चालू होण्यास अनुमोदन सहाय्य होईल व या मनोरंजक व लोकोपयोगी ग्रंथामुळे बाबा पदमनजी यांची पहिल्यापेक्षा अधिक वाहवा होईल.'[२९] *ज्ञानोदया*ने या कादंबरीच्या विस्तृत परीक्षणाच्या निमित्ताने कादंबरीचे कथानकच पुन्हा सांगितले आहे आणि 'खंडू न्हाव्याचे' प्रकरण वाचकांच्या सोयीसाठी जसेच्या तसे उतरवून सादर केले आहे.

कादंबरीमुळे जी उलटसुलट चर्चा झाली, त्याची ख्रिस्तप्रेमिकांनी बाबांची घेतलेली बाजू *ज्ञानोदया*तील त्यांच्या पत्रव्यवहारात स्पष्ट झाली आहे. ही बाजू खालील प्रकारे प्रगटलेली आहे.

*ज्ञानोदया*त *यमुनापर्यटन* वाचणारा एक' या सहीने दोन तीन पत्रे प्रसिद्ध झाली त्यापैकी पहिल्या पत्रात तो वाचणारा लिहितो :

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस. . .विनंती विशेष. महाराज अलिकडे राजश्री बाबा पदमनजी यांनी *यमुनापर्यटन* या नावाचा जो ग्रंथ केला आहे त्याजविषयी इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रांमध्ये पुष्कळ वादविवाद आले आहेत. जरी मराठी भाषेमध्ये अशा उत्कृष्ट प्रकारचा हा पहिलाच ग्रंथ आहे, तरी त्याचा गुणग्रहण करून त्याची प्रशंसा करण्यापेक्षा, तो ख्रिस्ती मनुष्याने रचिला व त्यात ख्रिस्ती धर्माविषयी पुष्कळ लिहिले आहे एवढ्यावरून दुराग्रह करून त्याच्या विरूद्ध लिहिणारे असे फार आहेत. ज्यापक्षी हा ग्रंथ एतद्देशीय लोकांकरिता लिहिला आहे. त्यापक्षी जे काही इंग्रजी वर्तमानपत्रांमध्ये लिहिले गेले ते मराठी पत्रांमध्येही लिहिले असते तर बरे होते. असो. या ग्रंथाविषयी आपणही काही लिहावे असे माझ्या मनात आल्यावरून ह्या पुढील चार ओळी आपणांकडे पाठविल्या आहेत. त्यास कृपा करून आपल्या अमूल्य पत्रामध्ये जागा द्यावी'.

असे म्हणून तब्बल चार पानी मजकूर त्याने लिहिला आहे.[३०]

तोच पत्रलेखक पुढे लिहितो :

या पुस्तकाची प्रस्तावना फारच सुरस आहे. तिजमध्ये आमच्या देशामधील सांप्रतच्या सुधारणुकीच्या विराट स्वरूपाचे जे वर्णन केले आहे ते शब्दशः यथार्थ आहे, असे जे निःपक्षपाताने विचार करून पाहतील त्यांस दिसून आल्याशिवाय राहणार नाही.

त्यानंतर पत्रलेखकाने स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, जातिभेद, बालविहाह, विधवाविवाह, मूर्तीपूजाविषयक अज्ञान या बाबतीत एतद्देशीय लोक कर्ते सुधारकत्व दाखवीत नाहीत; केवळ लेख लिहितात, पत्रके काढतात याबद्दल असंतोष व्यक्त करून बोलक्या सुधारकांपेक्षा कर्त्या सुधारकांची आवश्यकता प्रतिपादन करून शेवटी तो पत्रलेखक म्हणतो :

*यमुनापर्यटन*च्या विरूद्ध लिहिल्याने यांचे हेतू सिद्धीस जातील काय? मिस्तर बाबा पदमनजी यांनी हा ग्रंथ जो लिहिला आहे तो काय सुधारलेल्या लोकांच्या प्रयत्नास विघ्न करण्याकरिता लिहिला आहे काय? नाही नाही. त्यात ख्रिस्ती धर्मसंबंधी मते आहेत एवढ्यावरून कोणी असे बळेच बोलू लागेल तर लागो. मला तर असे अगदी वाटत नाही. तेणे-

करून बाबांनी एवढेच दाखविले आहे की ज्या प्रकारचे उद्योग तुम्ही चालविले आहेत त्यासहित करून तुमचे हेतू सिद्धीस जाणे कठीण आहे. ख्रिस्ती धर्म जसा तुमच्या कामास अनुकूल होईल तसा दुसरा कोणताही धर्म किंवा कोणतेही मत होणार नाही. आणि हे खरेच आहे. जेव्हा जेव्हा मी आपल्या देशातील सांप्रतच्या सुधारणुकीविषयी आणि आपल्या तरुण विद्वान देशबंधूंच्या प्रयत्नांविषयी विचार करितो, तेव्हा तेव्हा 'ख्रिस्ती धर्मविरहित जी सुधारणुक ती रानटी अवस्था होय' अशी जी इंग्रजीमध्ये एक म्हण आहे तिची नेहमी आठवण होती. वास्तविक सुधारणुक म्हणून जिला म्हणतात ती ख्रिस्ती धर्मावाचून होणे दुर्घट . . .

एकंदरीत या पत्रव्यवहारात *यमुनापर्यटनात* जो काही ख्रिस्ती धर्म आला त्याचे मंडन केलेले दिसते. हाच वाचणारा आणखी दुसऱ्या एका पत्रात लिहितो :

*यमुनापर्यटना*च्या प्रारंभी, अहमदनगर येथील डेप्युटी कलेक्टर व मॅजिस्ट्रेट रावबहादूर दादोबा पांडुरंग यांनी विधवांच्या पुर्नविवाहाविषयी संस्कृत भाषेत रचिलेला निबंध प्राकृत भाषांतरासह वर्तमान छापिला आहे. मला संस्कृत भाषेचे ज्ञान नाही म्हणून हा निबंध वाचून पाहून तो कसा आहे हे सांगवत नाही. त्याच्या मराठी भाषांतरावरून सांगावे तर आपण आपल्या पत्रात मागे असे लिहिले होते की, हे भाषांतर दादासाहेबांनी केले नाही, कोणी दुसऱ्यानेच केले आहे, आणि मलाही असेच वाटते कारण मी ते वाचू लागलो तेव्हा ते संपण्यापूर्वीच मला त्याचा कंटाळा आला. पण जरी भाषांतर वाईट असेल तरी मूळ निबंधातील विचार त्यावरून समजण्याला काही अडचण पडणार नाही असे मनात आणून म्या तो सर्व वाचला...ह्या निबंधाचा जो मुख्य विषय त्याविषयी त्याच्या उत्तरार्धात काही लिहिले आहे आणि पूर्वार्धात तर हिंदुशास्त्रांचा परस्पर विरोध कसा आहे हे दाखविण्याकरिता श्राद्धादि विधिसंबंधी पुष्कळ मजकूर उतरून घेतला आहे. त्यावरून जरी हिंदू शास्त्रांचा परस्पर विरोध पाहून फार हसू येते आणि कोणी म्हणतो की 'श्राद्धास ब्राह्मण बोलावणे झाले तर खरेदी करताना जशी घोडयांच्या अंगावरील खोडी वगैरे पाहून परीक्षा करून मग त्यास आमंत्रण द्यावे' व कोण म्हणतो 'ब्राह्मण कसाही असला तरी भस्मात पुरून ठेविलेल्या अग्नीचे तेज कमी होत नाही, असे समजून त्याची परीक्षा न करता त्याला आमंत्रण द्यावे.' हे पाहून हिंदू शास्त्रातील पोरकटपणाविषयी पुष्कळ माहिती होती. तथापि हा निबंधाचा मुख्य विषय नाही, म्हणून इतकी जागा न अडवता ही उदाहरणे थोडक्यात द्यावयाची होती.[३१]

एकूण मुख्य विषय बाजूला ठेवून त्याची प्रस्तावनाच फार मोठी केली असे दादोबांच्या निबंधाबाबत या पत्रकर्त्याचे म्हणणे आहे. घरापेक्षा दपेडी मोठी आणि नाकापेक्षा मोती जड ही म्हण वापरून ही प्रस्तावना या विषयास अगदी शोभत नाही असे तो एक वाचणारा म्हणतो. हा एक वाचणारा पुढे लिहितो :

हा निबंध लिहिण्याचा मुख्य उद्देश मराठी भाषांतरांमध्ये येणेप्रमाणे दाखविला आहे— 'विधवा स्त्रियांस आपल्या पतीच्या मरणापासून जी दुःसह दुःखे प्राप्त होतात त्याविषयी बाबा पदमनजींनी सुसंवाद रूपाने प्राकृत भाषेत हा पुढील ग्रंथ रचिला आहे. परंतु ती भाषा

या देशातील शास्त्री पंडितास निरस वाटते. यावरून या ग्रंथातील विषयाची गोडी त्यास लागणार नाही असे या ग्रंथकर्त्यास वाटून त्याने मला विनंती केली की त्याचा ग्रंथ विद्वान लोकांस ग्राह्य व्हावा म्हणून आपण संस्कृत भाषेत ह्या विषयावर काही लिहावे यावरून मी हा लहानसा निबंध लिहिला आहे.'

प्रस्तुत उद्देश चांगला आहे असे त्या पत्रकर्त्याचे मत असून निबंधामुळे सनातन्यांना सुधारणांविषयी समजेल व सुधारकांना आचरण्याचे धैर्य येईल असे त्याला वाटते. भटाभिक्षुकांच्या मनात याविषयी संस्कृत भाषेतील निबंधाने आस्था उत्पन्न होईल असे त्याचे म्हणणे आहे. त्यानंतर शेवटी हा पत्रकर्ता म्हणतो :

'*ज्ञानोदय*कर्ते महाराज, काही दिवसांमागे आपण आपल्या पत्री असे म्हटले होते की, जरी निबंधकर्त्याने पुनर्विवाह शास्त्रोक्त आहे असे सिद्ध केले की तो करण्याची मोठी आवश्यकता आहे व तो करण्यास काही बाधा नाही. परंतु मला तर असे दिसून आले की निबंधकर्त्याने पुनर्विवाह शास्त्रोक्त आहे असे सिद्ध करून दाखविले आहे. आणि हिंदूंच्या ग्रंथात पुनर्विवाहाच्या विरुद्ध ज्या उक्त्या आहेत त्यांचे खंडन सयुक्तिक विचार करून उत्तम प्रकारे केले आहे. यावरून आपण असे अनुमान काढावे की, जे ब्राह्मण व दुसरे हिंदू पुनर्विवाहास प्रतिकूल होऊन आपापल्या जातीतील विधवांस हाकनाक वैधव्यरूप दुःखार्णवात लोटून देतात त्यांचे निर्दय आचरण त्यांच्याच शास्त्राच्या विरुद्ध आहे व म्हणून ते ब्राह्मण किंवा हिंदू या संज्ञेस अपात्र आहेत. ते आपल्या मनात कदाचित असे समजतील की दादोबा पांडुरंग यांना हिंदू शास्त्राची काय माहिती आहे? पण त्यांचे हे म्हणणे खोटे आहे. मला वाटते की हिंदू शास्त्राची माहिती जशी दादोबास आहे, तशी भटभिक्षुकादि घोटाळ्यातून देखिल फार थोडक्यांस असेल, मग खुर्दा विकण्यात व कायदा शिकण्यात ज्यांचे आयुष्य जाते त्यांची तर गोष्ट बोलायलाच नको. ज्यास अशी किंवा इजहून चांगली माहिती असती ते त्यातील परस्परविरोधी त्यांनी विचार केला असता जी मते त्यांना नापसंत वाटण्याजोगी आहेत ती सरसकट सर्वच कबूल करितात पण त्याविषयी कधी इतके तारतम्य पाहत नाहीत. जर एखादा वज्र हृदयाचा कठोर मनुष्य निःपक्षपाताने हा निबंध व *यमुनापर्यटन* वाचून पाहिल तर तोहि आपले मत बदलून विधवांचा पुनर्विवाह चालू करण्यास प्रवृत्त प्रवृत्त होईल. तथापि आमचे 'दक्षिणा सावडणारे मंडळ' निर्दयतेच्या इतक्या परिसीमेस जाऊन पोहोचले आहे की येणे करून त्यांच्या अंतःकरणास यत्किंचितहि द्रव घेणारा नाही. आणि यावरून मला असे वाटते की, या निबंधाचा हेतू कदाचित सिद्धीस जाणार नाही. तरी निबंधकर्त्याने आपल्याकडून जेवढे व्हावयाचे तेवढे केले. झाले. तरी सुधारलेल्या लोकांच्या म्हणण्याप्रमाणे पुनर्विवहास हिंदू शास्त्राची जसी संमती असावी तसी आहे असे दिसत नाही. यास्तव सुधारलेल्या लोकांस माझे असे सांगणे आहे की, भटांच्या तोंडाकडे पाहण्यात काही लाभ नाही. तुम्ही मनावर धरून बंगाल्यातील सुधारलेल्या लोकांप्रमाणे काही कराल तर मात्र विधवा सधवा होतील. नाही तर वृथा बडबड करणे तरी सोडून द्या. जरी दादोबांनी आपल्या बुद्धिकौशल्याच्या योगाने पुनर्विवाहास हिंदु

शास्त्रांचा आधार आहे असे दाखविले आहे, तरी ही शास्त्रे विधवांस खचित अपंगतील अशी आशा अगदी धरू नका. सर्व प्रकारे विनधवांचे कुशलचिंतक असे काय ते एक ख्रिस्ती शास्त्रच आहे हे पक्के समजा.

*ज्ञानोदय*कर्ते महाराज, आतपावेतो सुधारलेले लोक हिंदू शास्त्राच्या भ्रमावर भारी उड्या मारीत होते. यास्तव पुर्नविवाहास शास्त्राची कितपत संमती आहे याचा निर्णय कळावा असी माझी मोठी इच्छा होती. सबब पत्रविस्तार फार झाला याची क्षमा असावी. ही विनंती.

*यमुनापर्यटन* वाचणारा एक[३२]

अशा प्रकारे *यमुनापर्यटन* वाचून 'एका वाचणाराचे' मत त्या काळात झाले होते. पहिल्या पत्रात पुर्नविवाह व सुधारलेले लोक व दुसऱ्या पत्रात विधवा आणि हिंदू शास्त्रे या संदर्भात *यमुनापर्यटन*च्या अनुषंगाने त्याने आपले विचार प्रगट केले आहेत. त्यानंतर याच पत्रकर्त्याने *यमुनापर्यटन*वरचे दोषारोपखंडन केले आहे. एवढयाने त्याचे समाधान झाले नाही. तो आणखी एका पत्रात लिहितो :

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस . . विनंती विशेष. महाराज, म्या आपल्या पत्री असे लिहिले होते की मराठी भाषेत अशा प्रकारचा उत्कृष्ट ग्रंथ हा पहिलाच आहे. असे म्हणण्याचे कारण हे की ग्रंथपठनाने किंवा हिंदूलोकांशी संगठन ठेवल्याने त्यांच्या ज्या ज्या चालींची माहिती गोऱ्या लोकांस आणि ज्या एतद्देशीय ख्रिस्ती लोकांचा हिंदू धर्मात जन्म झाला नाही त्यास होण्याजोगी नाही. त्यांचे ज्ञान या ग्रंथावरून त्यास प्राप्त होईल. एवढेच नाही तर त्या चाली ज्यांस चांगल्या माहित आहेत त्यांस देखील, त्यापासून काय परिणाम होण्यासारिखे आहेत हे पूर्वीपेक्षा फार चांगल्या रीतीने समजून येईल. यास्तव ज्यांस या ग्रंथापासून पुष्कळ नवीन गोष्टी समजून आल्या त्यांनी त्यांची तारीफ करावी हे योग्य आहे. तसेच पुर्नविवाह चालू झाल्याने ज्या भटास आपली पोटगी बुडण्याचे भय आहे त्यांनी आणि मुंबई *ग्याझेटां*च्या कर्त्यासारिखे ज्यांस हा ग्रंथ प्रारंभापासून समाप्तीपर्यंत स्वतः वाचून पाहण्याचे साधन नसून दुसऱ्यांनी इकडील तिकडील एकदोन प्रकरणांचे इंग्रजी भाषांतर पाठवून द्वेषबुद्धीने पांढऱ्याचे काळे करून भासवले त्यांनी त्यांच्या विरुद्ध व्हावे यात काही आश्चर्य नाही.[३३]

या पत्रलेखकाने सुधारलेल्या लोकांचे या ग्रंथापासून काही एक नुकसान नाही, अशी ग्वाही देऊन, नाही नाही ते आरोप करावेत याबद्दल खंत व्यक्त केली आहे. त्याच्या मते बाबा पदमनजींनी सुधारकांची अमर्यादा केली आणि म्हणून त्यांनी बाबा पदमनजींच्या ग्रंथावर दोषारोप केले. *यमुनापर्यटन*वर टीकाकारांनी कोणते आरोप केले हे या पत्रलेखकाने स्पष्ट केले आहे. ते म्हणजे (१) त्याची भाषा चांगली नाही. (२) त्यातील कित्येक गोष्टी निराधार व असंभव आहेत. (३) त्यातील कित्येक गोष्टी इतक्या बीभत्स आहेत की तेणे करून वाचणाऱ्यांच्या मनात फारच वाईट भावना उत्पन्न होतात, आणि (४) त्यात ख्रिस्ती धर्माविषयी पुष्कळ लिहून आमचा विश्वासघात केला व आमचा पैसाही लूटून घेतला. पत्रकर्त्याने हे दोषारोप कसे

निष्फळ आहेत हे दाखविले आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे बाबा पदमनजींनी सर्वास सुलभ अशा मराठीत ग्रंथ रचला आहे. तसे पाहिले तर लोकहितवादींची भाषा देखील वाईट आहे. पण तसे कोणी म्हणत नाहीत. छापणाऱ्याच्या हातून, ग्रंथकर्त्याच्या हस्तदोषाने किंवा नजरचुकीने काही चुका *यमुनापर्यटनात* सापडतातही. परंतु तेवढयावरूनच ग्रंथाची भाषा सर्व चांगली नाही असे म्हणून तो आपल्या उद्देशास अनुकूल असताही अव्हेरावा हे शोभत नाही. आपण स्वत: व मित्रांनी *यमुनापर्यटन* वाचिले तेव्हा त्यातील एखादी गोष्ट असंमभाव्य किंवा वाढवून लिहिलेली असेल असे आम्हास अगदी वाटले नाही, असे तो म्हणतो. हेच मत ख्रिस्तेतरांचे असल्याचा निर्वाळा तो देतो. मुख्य यमुनेची कथा व इतर कथा कल्पित नाहीत. याप्रमाणे *यमुनापर्यटनात* घडलेले सर्व प्रकार हिंदू लोकात घडतात. याचा पुरावा देता येईल. त्यानंतर पुस्तकातील बीभत्स गोष्टींविषयी तो म्हणतो की, संदर्भाशिवाय काही वर्णने यातील वाचल्यास ती बिभत्स वाटतात, पण संदर्भाने त्याचे वाचन बिभत्स ठरत नाही. संदर्भाशिवाय वाचल्यास कित्येक गोष्टी बिभत्स ठरणे शक्य असते. अगदी पवित्र शास्त्रातही अशा प्रकारे काही गोष्टी बिभत्स ठरतील. त्याचप्रमाणे *यमुनापर्यटनात* ख्रिस्तधर्माविषयी लिहिले आहे याबाबत तो म्हणतो की "लेखक ख्रिस्ती धर्माचा आहे त्यामुळे त्याच्या लेखनात अल्प स्वल्प ख्रिस्ती भाषा, ख्रिस्ती धर्म येणारच. तो दोष ग्रंथास लावण्यात काहीच अर्थ नाही." अशाप्रकारे *यमुनापर्यटन* वाचणाऱ्या एकाने त्यावरील तत्कालीन दोषारोपाचे मंडन केले आहे. त्याच्या मताने *यमुना-पर्यटन* हा ग्रंथ उत्कृष्ट आहे व ख्रिस्ती धर्माशिवाय खरी सुधारणा व या देशाचे कल्याण होणार नाही असेही त्याचे मत या पत्रात व्यक्त झाले आहे.[३४]

*यमुनापर्यटन* या ग्रंथाची दुसरी आवृत्ती इ. स. १८८२ साली प्रसिद्ध झाली. तिचे परीक्षण *ज्ञानोदय*कारांनी पुढीलप्रमाणे केले आहे. ते लिहितात :

> *यमुनापर्यटन* अथवा हिंदूंच्या विधवांच्या स्थितीचे निरूपण हा ग्रंथ रे. बाबा पदमनजी यांनी सुमारे २५ वर्षांमागे लिहिला होता तेव्हा तो लोकांनी घेऊन वाचला व त्यावरून बराच गवगवा झाला होता. त्यात हिंदू लोकांच्या ऊंच म्हटलेल्या जातींतील विधवांच्या दु:खाचे फार चांगले वर्णन केले आहे. त्यावरून सुधारणा पक्षाच्या हिंदु लोकांस तो चांगला वाटला. परंतु जुन्या पक्षाच्या लोकांस तो चांगला वाटला नाही. बहुदा असा नियमच आहे की, जो ग्रंथ किंवा जी गोष्ट अयोग्य पक्षाच्या लोकांस नापसंत वाटली ती वास्तविक चांगली असती त्याप्रमाणे ह्या ग्रंथाची गोष्ट होती. असो. पुढे या ग्रंथाच्या सर्व प्रति मिळेनाशा झाल्यावरून बहुतांशी अशी इच्छा होती की हा ग्रंथ पुन: छापला जाईल तर बरे होईल.[३५]

बाबांनी त्याप्रमाणे ही दुसरी आवृत्ती तयार केली याबद्दल आनंद व्यक्त करून *ज्ञानोदय*कार लिहितात :

> ह्या ग्रंथाची भाषा चांगली रसाळ असून वर्णनशैली मनोवेधक आहे. आता हे पुस्तक चांगले तपासले आहे आणि जरी ग्रंथ वाढविला नाही तरी भाषेच्या व विषयाच्या संबंधाने कित्येक फेरफार केले आहेत आणि शेवटी पुरवणीत सहा वेचे घेतले आहेत. तर बहुतेक फार चांगले व उपयुक्त आहेत. विशेषकरून स्त्रियांच्या सभेत वाचलेला निबंध 'केशवपन',

'पंढरपुरातील विधवा' हे फार उत्कृष्ट आहेत. तसाच शेवटी पुनर्विवाहासंबंधी कायदा उतरून घेतले आहे ते ठीक केले. सरकारने तो कायदा विधवांच्या व विधवांस दुःखमुक्त करू इच्छिणारांच्या सहाय्यार्थ केला आहे. तरी त्याची माहिती फार थोड्या लोकांस आहे. या ग्रंथाची प्रथमावृत्ति प्रसिद्ध झाली तेव्हा विधवांचे पुनर्विवाह होत नव्हते. ते करण्यास स्त्रिया व पुरुष धजत नसत. आणि अडचणी व प्रतिबंधक फार होते. आता स्थिती फार निराळी झाली आहे. अलीकडे बहुत पुनर्विवाह झाले असून लोकांच्या मनातून जातिबहिष्काराची व शंकराचार्यांच्या कोपाची भीति कमी झाली. तरी अजून कित्येक न्यूनता आहेत. त्याविषयी पाचव्या पुरवणींत ज्या सूचना केल्या आहेत त्याकडे पुनर्विवाहोत्तेजक मंडळीने पुरते लक्ष द्यावे.[३६]

याच ग्रंथाची तिसरी आवृत्ती इ. स. १८९० मध्ये झाली. या ग्रंथाचा हेतू सांगत असताना दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेतील पुढील उतारा दिला आहे तो असा :

ह्याचा उद्देश हिंदू विधवांची व विशेषकरून महाराष्ट्र देशातील ब्राह्मणांच्या विधवांची स्थिती कशी आहे हे दाखविण्याचा व विधवा विवाहास जी अनुकूल कार्ये चालत आहेत त्यांस यथासामर्थ्य सहाय्य करण्याचा आहे. विधवांची दुःखे निवारण्याचा केवळ एकच उपाय म्हणजे त्यांचा पुनर्विवाह करणे हाच आहे, असे नाही. सर्वच विधवा विवाह करण्यास योग्य आहेत असे नाही. तर त्यांची जी दुःखे आहेत व त्यांचे शमन किंवा निवारण करण्यास जे अनेक उपाय योजले पाहिजेत, ते सर्व जरी या पुस्कात दर्शविले नाहीत. तरी जे वाचकांच्या मनात सहज उत्पन्न होतील अशा प्रकारे विधवा दुःख वर्णन करण्याचा यात प्रयत्न केला आहे. कुटुंबात व लोकांत विधवाचा जो अपमान होतो तो न व्हावा, त्यास इतर स्त्रियांप्रमाणे अन्नवस्त्र मिळावे, त्यांस करमणुकीची व मनोरंजनाची साधने असावीत, ज्या अनाथ विधवा आहेत त्यांस अन्नवस्त्राची सोय व्हावी, त्यांस सुशिक्षित करून लोकोपयोगी करावे, व त्यांस पारमार्थिक ज्ञानाची शिक्षा देऊन ईश्वरभजनी लावावे, ही जी आमची त्यासंबंधी कर्तव्ये आहेत ती केवळ तरुण विधवांची लग्ने केल्याने बजावली जातात असे नव्हे. . .

शेवटी ह्या पुस्तककर्त्याची स्वदेश बांधवांस हीच प्रार्थना आहे की, आपल्या देशात विधवांची संख्या वाढू नये अशी जर त्यांची इच्छा असली तर त्यांनी बालविवाहाची चाल मोडण्याचा झटून प्रयत्न करावा. दुसरे त्यांस हे सांगणे आहे की विधवाविवाहासाठी हिंदू शास्त्राचा आधार पाहात बसू नये. अशाप्रकारे ग्रंथकाराने स्वतः आपल्या पुस्तकाचा हेतू विशद केला आहे. प्रस्तुत कादंबरीच्या मुखपृष्ठावरच 'विधवेला जाचू नको' व 'विधवेची दाद लावा' ही दोन बोधवाक्ये दिली आहेत. त्यावरून पुस्तकाच्या अंतर्भागाची कल्पना त्वरित वाचकास यावी असा त्याचा—ग्रंथकर्त्याचा—हेतू लक्षात येतो.

*ज्ञानोदया*तील दोन्ही आवृत्त्यांची परीक्षणे आणि एका वाचकाच्या पत्रव्यवहारातून तत्कालीन वृत्तपत्रातील टीकेचे स्वरूप पाहिल्यानंतर श्रीपाद कृष्ण कोल्हाटकरांनी केलेल्या ह. ना. आपटे यांच्या *पण लक्ष्यात कोण घेतो* या कादंबरीच्या परीक्षणलेखनाची आठवण

होते.[३७] चोवीस पृष्ठांच्या या परीक्षणलेखात फक्त एकाद दुसरे पृष्ठ कादंबरी म्हणून विचार करणारे आहे. तर बाकी सर्व पृष्ठे सामाजिक सुधारणेची विशेषत: केशवपनाच्या चालीची चर्चा करणारी!

सुदैवाने १९३७ सालानंतर मुंबई विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात *यमुनापर्यटन*चा समावेश झाल्यानंतर तिची चौथी आवृत्ती प्रसिद्ध झाली[३८] व त्यानंतर ह्या कादंबरीची समीक्षकांकडून सातत्याने दखल घेतली गेली. त्यानंतर तिच्या आद्यत्वाबद्दल आक्षेप घेण्यात आले असले, क्वचित कुठे तिला 'कादंबरी' म्हणावी की नाही असा सूर निघाला, तरी म. वा. धोंड यांनी नि:संदिग्धपणे तिला 'पहिली मानाचे स्थान असलेली कादंबरी' म्हणावे व बाबांनी 'ती केवळ कादंबरी म्हणून लिहिली नाही'. . .तर या शब्दांत तिचे विवेचन करावे, आणि डॉ. केतकरांच्या कादंबरीशी तिचे नाते जोडावे,[३९] यातच आपल्या बदललेल्या स्वागतार्ह दृष्टिकोणाचे प्रत्यंतर येते, असे म्हटले पाहिजे.

* * *

## टीपा

१. अ. का. प्रियोळकर, *रावबहादूर दादोबा पांडुरंग*, मुंबई, १९४७, पृ. ३३३ वरून उद्‌धृत.

२. द. वा. पोतदार, *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार*, पुणे, १९२५, पृ. ९४. पोतदारांसारख्या मातबर संशोधकाची ही डुलकी मराठी वाङ्मयात जणू वज्रलेप होऊन बसली आहे! उदा. पहा : १) वि. ह. कुलकर्णी, 'मराठी कादंबऱ्या', *अर्वाचीन मराठी साहित्य*, संपा. मानेपाटील-जोशी-नेने, बडोदे, १९३५, पृ. ६८; २) ल. म. भिंगारे, "कथा-कादंबऱ्या", *मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड ४*, संपा. रा. श्री. जोग, पुणे, १९६५, पृ. २११.

३. *अरुणोदय*, पृ. ३२१.

४. 'विधवाश्रुमार्जनम्', *यमुनापर्यटन*, निबंधाची स्वतंत्र पृष्ठे, पृ. १.

५. कुसुमावती देशपांडे यांनी 'न्यायमूर्ति रानडे यांनी मराठी वाङमयाचा जो आढावा काढला त्यात *यमुनापर्यटन*चा प्रशंसापूर्वक उल्लेख आहे' असे स्पष्ट लिहूनही (*मराठी कादंबरी पहिले शतक*, मुंबई, १९५३, पृ. २३) त्याच्याच आधाराने लिहीत असताना नरहर कुरुंदकरांनी 'न्यायमूर्ति रानडे, इतिहासाचार्य राजवाडे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर इत्यादी मंडळींना ही कादंबरी ज्ञात असल्याचे दिसत नाही' असे लिहावे (*धार आणि काठ*, पुणे १९७१, पृ. ८) याचे मोठे आश्चर्य वाटते!

६. *विविधज्ञानविस्तार* कर्त्याचे हे मत मार्च १८६९ च्या अंकात पृ. १४२ वर व्यक्त झाले आहे.

७. वि. का. राजवाडे, 'कादंबरी', *ग्रंथमाला*, १९०२, कोल्हापूर, स्वतंत्र पृष्ठे, पृ. १६.

८. नरहर कुरुंदकर, उनि., पृ. १४.

९. *मराठी कादंबरी*, उनि., पृ. २३.

१०. *धार आणि काठ*, उनि. पृ. १२.

११. 'प्रस्तावना', *यमुनापर्यटन*, पृ. १२.

१२. 'प्रस्तावना', *यमुनापर्यटन*, आ. २, पृ. १२.

१३. 'प्रस्तावना', *यमुनापर्यटन*, पृ. १०.

१४. तत्रैव.

१५. *धार आणि काठ*, उनि. पृ. ८.

१६. *अर्वाचीन मराठी साहित्य*, उनि. पृ. ६८.

१७. *धार आणि काठ*, उनि. पृ. ९, १०.

१८. इ. वि. पदमनजी, प्रस्तावना–*यमुनापर्यटन*, आ. ४, मुंबई, १९३७, पृ. ४.

१९. बापट-गोडबोले, *मराठी कादंबरी (तंत्र व विकास)*, आ. र. पुणे, १९५७, पृ. २००.
२०. *मराठी वाङ्मयाचा इतिहास*, खंड ४, पुणे, १९६५, पृ. ५११.
२१. कुसुमावती देशपांडे, *मराठी कादंबरीचें पहिले शतक*, मुंबई, १९५३, पृ. २५.
२२. *TheEnglish Novel*, London, 1927, p. 5.
२३. Elizabeth Drew, *The Novel*, New-York, 1963, p. 13 वरून ऊद्धृत.
२४. पहा : *नावल व नाटक याजवरील निबंध*, मुंबई, १८६२.
२५. *धार आणि काठ*, उनि, पृ. ११.
२६. *धार आाणि काठ*, उनि. पृ. १६–१६.
२७. गं. बा. सरदार, *अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका*, पुणे, १९३७, पृ. ६७.
२८. द. वा. पोतदार, *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार*, पृ. ९५.
२९. *ज्ञानोदय*, १ जून १८५७, पृ. २०१.
३०. *ज्ञानोदय*, १५ ऑगस्ट १८५७, पृ. २५१–५४.
३१. *ज्ञानोदय*, २ नोव्हेंबर १८५७, पृ. ३२१.
३२ तत्रैव, पृ. ३२९
३३. ज्ञानोदय, पु. १६, १ डिसेंबर १८५७, पृ. ३५३ ते ३५८
३४. ज्ञानोदय, १ डिसेंबर १८५७, पृ ३५३ ते ३५८
३५. ज्ञानोदय, २३ फेब्रुवारी १८८२, पृ. ९४, ९५.
३६. ज्ञानोदय, २३ फेब्रुवारी १८८२, पृ. ९४, ९५.
३७. कोल्हटकरांचा लेखसंग्रह, मुंबई, १९३२, पृ. ३७–५९.
३८. ही चवथी आवृत्ती बाबांचे चिरंजीव इब्नायझर विश्वासराव पदमनजी यांनी १९३७ साली मुंबईस प्रसिद्ध केली.
३९. *ज्ञानोदय*, सप्टेंबर, १९७१, पृ. ८.

* * *

४

# शिक्षणविषयक पुस्तके

बाबा पदमनजींनी धर्मांतर केले व लवकरच ते पुण्यास गेले. तेथे फ्री चर्च मिशनच्या शाळेत ते शिक्षक म्हणून काम करीत होते. प्रत्यक्ष शाळेत शिकवणे, शिक्षणासाठी पुस्तके तयार करणे, मुलांसाठी व स्त्रियांसाठी कोशरचना करणे, कालोपयोगी धर्मशिक्षणाचा पुरस्कार करणे अशी विविध स्वरूपाची कामगिरी बाबांनी केलेली आढळते. स्त्रीशिक्षण हा त्या काळातील एक विशेष होय. त्या दृष्टीने केवळ स्त्रियांसाठी उपयुक्त अशी ग्रंथरचना बाबांनी केलेली आहे ती पुढीलप्रमाणे :

**स्त्रीविद्याभ्यास निबंध**

इ. स. १८५२ मध्ये बाबांनी *स्त्रीविद्याभ्यास निबंध* या नावाच्या पुस्तकाची रचना केलेली आहे. मुलींना शिकवण्याबाबत ज्या शंका आहेत त्या दूर करण्यासाठी व त्यांना शिकविण्यात काय लाभ आहे ते संवादाच्या माध्यमातून या पुस्तकात मांडण्यात आले आहे. स्त्रियास विद्या शिकवून त्यास त्याच्या योग्यतेप्रमाणे मान देणे, त्यांच्या कल्याणाची काळजी बाळगणे, यांचा हिंदू संस्कृतीतील अभाव लक्षात येऊन हरएक प्रयत्न करून त्यांस विद्या शिकविली पाहिजे, तरच त्यांचे अज्ञान दूर होऊन त्या आपल्या पतीच्या सहायकर्त्या होतील; आपल्या मुलास उत्तम बोध व शिक्षा करतील व आपला संसार दक्षतेने चालवितील असा उद्देश पुढे ठेवूनच या पुस्तकाची रचना झालेली आहे. 'आपल्या देशातील ज्येष्ठ पुत्राची आई म्हटली की बहुत करून अठरा किंवा वीस वर्षांच्या वयाची मुलगी असते. तिजजवळ ते मूल जनावराच्या बछड्याप्रमाणे शरीराने मात्र वाढते. ते काहीसे जाणते म्हणजे दोन किंवा अडीच वर्षांचे झाले नाही तो त्यास हात उचलावयास, कोणास छिः थू करावयास, लाथ मारावयास ती शिकविती. ही काय त्या लहान बाळकास सुशिक्षा म्हणावयाची ?' या प्रश्नाने व्यथित होऊन लिहिलेले हे पुस्तक

त्याच्या उपयुक्ततेमुळे लोकप्रिय झालेले दिसते. एका स्त्रीने प्रस्तुत पुस्तकातील वाक्येच्या वाक्ये आपल्या लेखात उतरवून घेतल्याची तक्रार एका पत्रलेखकाने केली आहे.[१] हीच गोष्ट ज्ञानप्रकाशात याच विषयावर छापलेल्या भाषणाच्या बाबतीत झाली. भाषणामध्ये अण्णा-साहेब विंचूरकरांनी बाबांच्या या निबंधातील वाक्येच्या वाक्ये स्वतःची म्हणून वापरली.[२]

या निबंधात प्रथम स्त्रीशिक्षणावरील आक्षेपांचा परामर्श घेतला आहे. स्त्रीशिक्षण म्हणजे कलीची निशाणी, धर्म बडाल्याचे ते लक्षण, स्त्रिया शिकल्यावर पंडितांनी काय करावयाचे, शिक्षणाने स्त्रिया व्यभिचारी होतील, अमर्याद होतील व पतीची अवहेलना करतील, लावण्या, कोकशास्त्रादी पुस्तके वाचून त्या चारित्र्यभ्रष्ट होतील वगैरे शंका कुशंका प्रस्तुत निबंधात कल्पून त्याची उत्तरे दिली आहेत. बालसंगोपन, संसारदक्षता, आर्थिक स्वावलंबन, मुलांवर संस्कार करणे, पतीची खऱ्या अर्थाने सहधर्मचारिणी बनणे व पुरुषाच्या खांद्याला खांदा लावून संसारभार हलका करणे इत्यादी गोष्टी स्त्री शिक्षणाने होतील असा प्रपंच लेखकाने मांडला आहे. स्त्रीशिक्षणास विरोध करणे मूर्खपणाचे असून आत्मघाताचे आहे. स्त्रियांचे अज्ञान दूर होण्यासाठी स्त्रीशिक्षण दिलेच पाहिजे असे बाबांचे म्हणणे आहे. स्त्रीला दासी म्हणून वागविण्यापेक्षा तिला पुरुषाप्रमाणे शिक्षण देणे विचारीपणाचे लक्षण आहे. पुरुषास वाटते की स्त्री म्हणजे आपणास ईश्वराने एक जनावरच कष्ट उपसण्यास व मसलत करण्यास दिले आहे! पण ते चूक आहे. पुरुषास जसे हात, पाय, डोके, पाचनशक्ती इ. दिले आहे तसेच स्त्रीसही दिले आहे. मग पुरुषास शिक्षण हवे व स्त्रीस मात्र शिक्षण नको असे का? तेव्हा स्त्रीस शिक्षण न देणे हा पुरुषाचा स्वार्थ व स्त्रीवर जुलूम आहे. पुरुषाची खऱ्या अर्थाने सहचरी, साहसी, संस्कारक्षम, संसारदक्ष, भिडस्त, मर्यादशील व संसारकुशल अर्धांगी होण्यासाठी स्त्रीस शिकविले पाहिजे, हे या पुस्तकात मनावर ठसविण्यात आले आहे.

**स्त्रीकंठभूषण**

इ. स. १८६८ साली बाबांनी स्त्रीशिक्षणास उपयुक्त असे आणखी एक पुस्तक रचिले. त्याचे नाव *स्त्रीकंठभूषण*. हे पुस्तक कसे शिकवावे याबाबत सुरवातीस शिक्षकास सूचना देण्यात आल्या आहेत. ह्या पुस्तकाचे महिन्याचा एक भाग असे सहा भाग केले आहेत. तीन आठवड्याकरिता नवे धडे आहेत. चवथ्या आठवड्यात उजळणी करावयाची आहे. धर्मसंबंधी व नीतीसंबंधी विषयाचे धडे सोमवारी व बुधवारी यावे अशी व्यवस्था केली आहे. आरोग्य या विषयीचे धडे मंगळवारी येतील. . .विद्येच्या विषयाचे धडे शुक्रवारी. पुष्कळ धड्यात शास्त्रातील ओव्या आहेत. हे पुस्तक बायकास शिक्षकावाचून समजावे म्हणून होईल तितक्या श्रमाने फार सोप्या भाषेत इंग्रजीवरून उतरले आहे हे बाबांनी पुस्तकाच्या प्रास्तावनेत स्पष्ट केले आहे. स्त्रियांच्या दैनंदिन जीवनातील विषयांना या पुस्तकात बरेच प्राधान्य देण्यात आले होते. विद्येचा उपयोग, आरसा, वाईट बोलणे, कैदाशिणी बायका, शकुन, मुहूर्त, मंत्र, ताईत, लग्नाच्या चाली, पतिव्रता धर्म, शेजारधर्म, बायकांचे वजन, जुनी व नवी घरे, याप्रकारे विविध व उपयुक्त विषयांवर पाठ आहेत. मुलांच्या आरोग्याचा विचार स्त्रियांना समजावा म्हणून

'आरोग्यता व रोगीपणा, दोन झोपड्यांतील अंतर, शिवण व धुणें, देवी काढणें, स्नान करणें, स्वच्छता, स्वच्छ हवा, जंत, खरूज, गोवर, डांग्या खोकला, थंडी, ताप, अतिसार व पटकी इ. माहिती व त्यावर इलाज, स्वच्छता वगैरे माहिती ' पाठात दिली आहे. धर्म व नीती-संबंधी प्रकरणात आज्ञेपेक्षा कित्ता बरा, आज्ञापालन, लेकरांस रडावयास कसे शिकवावे, मुलांस बक्षिस देणे, शिक्षा करणे, जिव्हेची पापे, चांगले व वाईट सोबती, उद्योग या विषयांवर पाठ आहेत. स्त्रियांच्या जीवनात उपयोगी पडणारे पाठ अभ्यासक्रमात, पुस्तकात टाकणे हे बाबा पदमनजींचे वैशिष्टच आपणास या पुस्तकात प्रत्ययास येते. स्त्रीशिक्षण हाच या पुस्तकाचा उद्देश आहे हे उघड. *ज्ञानोदय*कार या पुस्तकाबाबत म्हणतात :

> हें पुस्तक स्त्रियांसाठी केले म्हणून याची भाषा सरस व सुलभ आहे. हे सांगणे नलगे. . . यांत एतद्देशीय स्त्रियांस व मुलींस ज्या गोष्टींचे ज्ञान बरोबर नसते व ज्या गोष्टीची माहिती त्यांस झाल्याने त्याची सुधारणा होईल, त्यांची विचारशक्ती वाढेल, मने प्रकाशित होतील, त्यांस आपल्या घरांतील, संसारातील कामें योग्य प्रकारे करता येतील, मुलांचा संभाळ करून त्यांस सुशिक्षा लावतां येईल, अशा गोष्टीविषयी उत्कृष्ट बोध केले आहेत. . . प्रस्तुत पुस्तक नावाप्रमाणेच स्त्रियांच्या कंठांतील भूषणासारखे आहे. एखाद्या कथाकादंबरीसारखे हे रोचक व मनोरंजक पुस्तक असून वाचावयास घेतले की स्त्रिया हातांतून ते अगदीखाली ठेवत नाहीत.[३]

पुस्तकातील विविध विषय, त्यांचा विस्तार व स्त्रीजीवनातील त्यांची नित्य उपयुक्तता पाहता हे खरे वाटते. बाबा पदमनजींच्या जन्मापूर्वी इ. स. १८२४ च्या मार्च महिन्यात प्रथमच अमेरिकन मिशनच्या वतीने मुंबईला पहिली मुलींची शाळा निघाली. त्यानंतर केवळ मुलींसाठी, स्त्रियांसाठी पुस्तकरचना करण्याचा बाबा पदमनजींचा हा प्रयत्न विशेष महत्वाचा वाटतो.

### कोशरचना

याच संदर्भात बाबांनी रचलेल्या *स्त्रीयोपयोगी व गृहोपयोगी संकृत-मराठी शब्दकोशा*ची आठवण होते. दैनंदिन जीवनात घरात बायकामुले संस्कृत व संस्कृतोत्पक मराठी शब्द मोठ्या प्रमाणात वापरतात. पण त्याचा अचूक अर्थ त्यांना अवगत नसतो. त्यांनी 'सार्थ बोलावे' या दृष्टीने बाबांनी या शब्दकोशाची रचना केली आहे. या कोशात जे मराठी भाषेत रूढ व व्यावहारिक संस्कृत शब्द येतात त्यांचा संग्रह केला आहे. उदाहरणार्थ :

> आप्त: आप्त व मिळवलेला, लब्ध २, विश्वास ठेवण्याजोगा, सप्रमाण, ३ खरा ४ शहाण-पणाचा, समर्पक मित्र, २ सोयरा, संबंधी वाक्य विश्वासू, विश्वास ठेवण्याजोगे वचन प्रमा-णभूत वचन २ प्रचाराने ठरविलेली उक्ती. (पृ.४१)
>
> कर: कर हात, २ किरण ३ करणारा (प्रकाश-सुखकर) ४ सरकार देणे,पट्टी. ५ हत्तीची सोंड-तल तळहात-भिक्षा घरोघर जा न जे कोणी अन्न देतील ते तेथेच घेऊन खावे अशा नियमाची भिक्षा; तलामल (तळ हातावर स्थित जो आवळा.) २ला ज्याचे यत्किंचित

अंगीही अज्ञान नाही, डोळ्यापुढे मूर्तिमंत उभाच आहे काय, असा विद्यादि विषय त्यास आरोपनि—पल्लव हात २ हाताचे बोट. ३ हातने खुणावणे—भार खंडणी (पृ. ६५)

अशा प्रकारचे पुस्तक मराठी भाषेत नवीनच आहे असे बाबा प्रस्तावनेत म्हणतात ते खरेच आहे. या कोशाप्रमाणेच बाबांनी *शब्दरत्नावली* नामक एक नावीन्यपूर्ण कोश मराठीत रचला आहे. त्याच्या प्रस्तावनेत बाबा लिहितात,

जी मुले महाराष्ट्र भाषा शिकतात अथवा जे तरुण विद्यार्थी त्या भाषेत निबंध व ग्रंथ लिहितात त्यांस अति उपयोगी असे शब्द व विषय कोठून मिळणार व त्यांच्या कामास सहाय कोठून होणार? तर तरुण विद्यार्थ्यांतही पाकक्रिया शिकविण्याच्या स्तुत्य व उपयुक्त कामास जे लागले आहेत व ज्यांस आपल्या स्वदेशीय बांधवांच्या भोजनार्थ अनेक प्रकारची पुष्टीकारक अन्ने सिद्ध करावी लागतात त्या सर्व विद्वान गुरुंस, शिक्षकांस व गद्यपद्यादि ग्रंथकारांस हा अनेक द्रव्यमुक्त बाल कोश समर्पण केला आहे.

या कोशाची उपयुक्तता पटण्यासाठी पुढील शब्द त्यात कसे दिले आहेत ते पाहिले असता कळेल.

**यम** : (आठ) यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि.

**युगे** : (चार) कृत, त्रैता, द्वापार, कलि.

**अर्थ** : (४ पुरुषार्थ) धर्म, अर्थ, काम, मोक्ष,

**झोप** : निद्रा, नीज, शयन, सुप्ति, सुप्त, स्वाप, सर्वेन्द्रिव्यापार-अघोरी निद्रा, असूरी निद्रा, असूरी, गाढमूढ निद्रा—काळझोप, साकर झोप, सुषुप्ति.

अशा प्रकारे कोणताही शब्द पाहताक्षणीच वरील मूळ शब्द, उपशब्द व सांप्रदायिक शब्द इ. विद्यार्थ्यांच्या नजरेखालून जातात व त्याचे शिक्षण न कळत होते. म्हणून हा कोश शैक्षणिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे.

शेवटी अनुक्रमणिका आहेत. पहिली अनुक्रमणिका मराठी शब्द व त्यांचे इंग्रजी भाषांतर अशी तर दुसरी अनुक्रमणिका प्रथम इंग्रजी शब्द व त्याचा मराठी अर्थ अशी दिली आहे. यामुळे कोशाची उपयुक्तता वाढली आहे यात शंका नाही. एवढ्या छोट्या पुस्तकात इतका साक्षेप क्वचितच आढळतो.

याचप्रमाणे मोल्सवर्थकृत *मराठी-इंग्रजी कोशा*चा संक्षेप व क्यांडीकृत *इंग्रजी-मराठी कोशा*चा संक्षेप करणे हे कार्य पण बाबा पदमनजीचे एक मोठे शैक्षणिक कार्य ठरते. मोल्सवर्थचा किंवा कँडीचा शब्दकोश हाताळावयास सुलभ नव्हता, विद्यार्थ्यांना तो नुसता उचलणे देखील दुरापास्तच होय. मग त्यातून शब्द पाहणे तर दूरचीच गोष्ट. विद्यार्थ्यांना त्यातून हवा तो शब्द चटकन मिळणे कठीणच होते. विद्यार्थ्यांची ही अडचण ओळखून बाबांनी त्यांना पेलतील व पाहता येतील असे शब्दकोशांचे संक्षेप तयार करून एक अभूतपूर्व शैक्षणिक कार्यच केले असे म्हणावेसे वाटते. मोल्सवर्थच्या कोशाच्या संक्षेपाच्या कोशाच्या प्रस्तावनेत बाबा लिहितात, 'जे विद्येच्या व्यासंगात गुंतले आहेत, जे प्रपंचाला धन व परमार्थाला वैराग्य प्राप्तीच्या उद्योगास लागले आहेत, त्या सर्वांस ह्या ग्रंथापासून थोडे बहुत सहाय मिळाल्यावाचून राहणार नाही.[४]

यावत् महाराष्ट्र व इंग्लिश भाषांचा अभ्यास लोक करतील तावत् या कोशाचा उपयोग लोकांस होणारच. बाबांनी क्यांडीकृत *इंग्रजी-मराठी कोशा*चा संक्षेप इ. स. १८६० सालीच केला. त्याची जाहिरात *ज्ञानोदयात* 'शाळेतील विद्यार्थी व हापिसातील लोक यांच्या उपयोगार्थ' अशी आली आहे.[५] त्यावरून त्याचे स्वरूप त्व शैक्षणिक महत्व लक्षात येईल. कोशरचना व शैक्षणिक क्षेत्र या दोहोंचा अन्योन्य संबंध आहे. दीर्घ परिश्रमाचे हे कष्टसाध्य कार्य विद्यार्थी व शिक्षकांचा आधार असते. ते बाबांनी त्यांच्या कुवतीप्रमाणे तन-मन-धन लावून केले. बाबांच्या चारही कोशांची सविस्तर चर्चा कोशरचनाकार बाबा पदमनजी या प्रकरणात केली आहे.

### शिक्षकांना मार्गदर्शन

बाबा पदमनजींच्या नावावर शिक्षा पद्धती भाग १, २ या नावाचे एक पुस्तक आहे. ते प्रत्यक्ष पाहावयास सापडले नाही, पण *ज्ञानोदयात* प्रसिद्ध झालेल्या अभिप्रायावरून त्या विषयी काही अंदाज बांधता येतो. *ज्ञानोदयकार* लिहितात :

> शाळेतील शिक्षण योग्य प्रकारे चालावे व विद्यार्थी चांगले हुशार व्हावे म्हणून शिक्षकांनी काय केले पाहिजे हे या पुस्तकात सांगितले आहे. यात पाच प्रकरणे आहेत. शिक्षेचे प्रकार, व्यवस्था, प्रश्न विचारणे, वाचन, वर्णरचना व लेखन इ. विषयावर यात लेखन केले आहे. विद्यार्थ्यांस पढविण्यास बहुत पुस्तके होतात पण पंतोजीस पढविण्यासाठी थोडीच पुस्तके होतात. अशा पुस्तकाची गरज होती. आता हे झाले आहे फार उपयोगी पडेल. पंतोजी लोक याप्रमाणे आपली कामे चालवितील तर त्यांच्या हातून मुले सुशिक्षित होतील.[६]

शिक्षक हा घटक शिक्षणात महत्वाचा असतो. त्यास मार्गदर्शन हवे. विशेषत: विद्यार्थ्यांना शिकविताना शिक्षा व बक्षिसे महत्वाची ठरतात. वर्गव्यवस्थापन, वाचन, लेखनाचे शिक्षण याबाबत काही मार्गदर्शन शिक्षकांना उपयुक्त ठरते. ही शिक्षणक्षेत्रातील गरज ओळखून बाबांनी ही रचना केली असावी.

### शालेय इतिहास रचना

शालेय शिक्षणात इतिहासाच्या पुस्तकांचे महत्त्व अनन्यसाधारण असते. इतिहासाने मुलांच्या मनात पराक्रमाची प्रेरणा निर्माण होते. आत्मविश्वास वाढीस लागतो. मनोरंजन, कुतुहलपूर्ती इत्यादी गोष्टी इतिहासाने साधता येतात. स्वातंत्र्याची ज्योत यामुळे जागृत होते. त्या दृष्टीने इतिहासाची पुस्तके निर्माण करणे शिक्षणक्षेत्रात एक महत्वाचे कार्य आहे. बाबांच्या काळी या विषयावरची मराठीत दोनच पुस्तके शालेय अभ्यासक्रमात प्रचलित होती. एक म्हणजे *मराठ्यांची थोरली बखर* व दुसरे म्हणजे *मराठ्यांची संक्षिप्त बखर*. *थोरली बखर* फारच मोठी व तिची किंमतही जास्त होती. त्यामुळे सर्वत्रांस ती विकत घेऊन वाचता येत नसे. *संक्षिप्त बखर* लहान होती, त्यामुळे त्या पुस्तकावरून चांगली माहिती मिळत नसे. सबब एखादे मध्यम पुस्तक या विषयावरचे आवश्यक होते. ती गरज बाबांच्या *महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास* या पुस्तकाने भागविली. 'स्वदेशाच्या इतिहासाचे ज्ञान

इच्छिणाऱ्या सर्व मनुष्यांनी हे पुस्तक घेऊन वाचावे' अशी शिफारस *ज्ञानोदय*कारांनी त्या काळात केलेली सापडते.[७]

प्रस्तुत पुस्तकात एकूण दहा प्रकरणे आहेत. प्रथम प्राचीन वृत्तांतात इतिहास शिकण्याचे अगत्य, देशमर्यादा, प्राचीन आर्य बौद्धादि लोक, ग्रीस, मिस्री आदीकरून लोकांच्या स्वाऱ्या, शालिवाहनाचा शक ही माहिती दिली आहे. त्यानंतर महाराष्ट्र देशातील मुसलमानी राज्ये, मराठ्यांचा म्हणजे साताऱ्च्या राज्याचा इतिहास हा विषय आला आहे. शेवटी पेशव्यांचा इतिहास आणि उपसंहार. यात पूर्वीची राज्ये व त्यांची राज्यनीती, त्यापासून लाभ, हे सरकार इतके कशाने चांगले झाले आणि त्याचा धर्म व इथला धर्म इतक्या गोष्टींचा विचार करण्यात आला आहे. *ज्ञानोदय*कारांच्या मताप्रमाणे, 'प्रस्तुत पुस्तकात बाबांचे सूक्ष्मपणाचे व पोक्त विचार सुरस व प्रतिष्ठित भाषेत सापडतात.'[८] इतिहास शिकल्याने ईश्वरी सूत्राचा मार्ग बराच स्पष्ट दिसतो. ही बाबांची धार्मिक भूमिका या पुस्तकामागे आहे.[९]

इतिहास या विषयावर त्या काळात मिशनऱ्यांची अशी पुस्तके झाली नव्हती. शाळा पुस्तक मंडळीतर्फे तयार झालेल्या कुशाबा लिमये यांचे *महाराष्ट्र देशाचे वर्णन आणि इतिहास* याचा प्रश्नोत्तरावलीरूप ग्रंथ, हेच पुस्तक मिशनरी शाळांमधून वापरले जाई. इतिहास या विषयासाठी मिसेस विल्सन यांची *आशुरी आणि बाबेली लोकाचे वृत्तांत कथन, ग्रैकी लोकांचे वृत्तांत कथन, मेदी आणि पार्शी लोकांचे वृत्तांत कथन*, ही पुस्तके शाळात उपयोगांत आणली जात.[१०] याप्रकारे तत्कालीन शालेय शिक्षणातील इतिहास या विषयाच्या ग्रंथसंपत्तीत बाबांनी वरील पुस्तक लिहून एक मोलाची भर घातली हे निश्चित. ख्रिस्ती धर्माचे महत्व पटविण्याचा प्रयत्न यातून जर वगळला तर हे पुस्तक एक उत्तम इतिहासाचे पुस्तक ठरले असते. प्रस्तुत पुस्तकातील एखादा उतारा त्यातील ऐतिहासिक मूल्य स्पष्ट होण्याच्या दृष्टीने पाहणे उद्बोधक ठरेल. उदा.

> महाराष्ट्र देशास प्राचीन काळीं तिसरा एक वारिस उत्पन्न झाला होता असे दिसतें. ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकात मागध देशात अशोक नामक एक महापराक्रमी व नामवंत राजा राज्य करीत होता. तो बौद्ध मतानुसारी होता. त्याला सम्राट म्हणजे सर्व देशावर राज्य करणारा असे म्हटले आहे. त्याचे राज्य महाराष्ट्र देशावर होते यात संशय नाही. त्याने बौद्ध धर्म शिकण्यास महाधमराकितो यास महाराष्ट्र देशात पाठविले. त्या असद्धर्माच्या प्रेषितास ८४,००० शिष्य होते व त्यातून त्याने १३,००० स महाराष्ट्रदेशात उपदेशकांची दीक्षा दिली असे *महावंसो* नामक बौद्धधर्माच्या ग्रंथात लिहिले आहे. जैन किंवा बौद्ध यांच्या धर्माचे लोक सांप्रत या देशात आहेत इतकेच नाही तर त्यांच्या पूर्वीच्या सत्तेच्या व धर्माच्या वैभवांच्या खुणाही अद्याप इथें दृष्टीस पडतात. कारळी वगैरे ठिकाणची डोंगरात खोदलेली लेणीं व मोठाल्या शहरात बस्ती, या नावांची देवळेही त्याच्या गतश्रीची छाया दर्शवितात. पंढरपूर, कोल्हापूर ही क्षेत्रे पूर्वी त्यांची होती. शिवाय मराठी भाषेची उत्पत्ती मागधी भाषेपासून आहे. किंवा पूर्वीची मराठी हल्लीच्या मागधी भाषेसारखीच असावी, असें व्याकरणवेत्यांचे मत आहे.

अशा प्रकारे सम्राट अशोकाचा इतिहास व तत्कालीन स्थिती याचे थोडक्यात कथन प्रस्तुत पुस्तकात सापडते. उपलब्ध साधनांचा बारकाईने अभ्यास करून त्याची सुलभ मांडणी करण्याकडे असलेले बाबांचे लक्ष या एका उताऱ्यावरूनही लक्षात येते. *ज्ञानोदया*ने या इतिहासाच्या पुस्तकावर सविस्तर अभिप्राय दिला व वाचकांसाठी काही उतारेच दिले होते.[११] त्यावरूनही त्याचे त्या काळातील महत्व लक्षात येते.

### इतिहासाचे आणखी एक पुस्तक

बाबांनी आणखी एक इतिहासाचे पुस्तक लिहिले. त्याचे नाव *वेदधर्मी लोकांचा वृत्तांत*. प्रस्तुत पुस्तक रेव्ह. डॉ. विल्सनसाहेब यांनी केलेल्या *तीन हजार वर्षांमागचे हिंदुस्थान* या पुस्तकाच्या आधाराने केले आहे. अर्थात अन्य काही ग्रंथांची मदतही लेखकाने घेतली आहे. 'हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाची माहिती करून देणारे उत्तम पुस्तक' असा गौरव *ज्ञानोदय*कारांनी प्रस्तुत लेखकाचा केला आहे.[१२] त्या काळातील मिशन शाळातील शिक्षणक्रमात सदर पुस्तकाचा अंतर्भाव करून उत्तर अभ्यास करणारांना हे पुस्तक बक्षिस देण्याचा पण उपक्रम आखलेला होता.

> या पुस्तकावरून असे जाणवते की, वेदांचा अर्थ होत नाही हे खोटे आहे, तसेच वेद अनादि हे पण खरे नाही, वेद ईश्वरप्रणीत नाहीत कारण त्यात ईश्वरभक्ति व तारणोपाय नाही, प्राचीन वेदांमध्ये वेदांत मत नाही म्हणून वेदांतास वेदाधार नाही, ते मागून मनुष्याचे मत भ्रष्ट करण्यास झाले, वेद खोटे म्हणून त्याचे सार खरे नाही, आताच्या हिंदूंनी आपला पूर्वीचा धर्म सोडला यास्तव त्यातला कोणी अन्य धर्मात गेल्यास त्यांनी त्यास निंदू नये, हिंदूचा पौराणिक धर्म, शास्त्रीय धर्म, वेदधर्म यातून कोणतेच स्थिर नाही, हे सर्व चंचल होत. मनुष्याच्या कल्पनेचे बुडबुडे व त्यामुळे वेदांमध्येच विपरीत ज्ञानाचा कोंब फुटला, त्याचे फळ म्हणजे अज्ञान व सर्वनाश.

अशा प्रकारे *ज्ञानोदय*कारांनी त्या काळी प्रस्तुत पुस्तकावरचा आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. वेदांवरची ही परखड टीका वेदांची दुसरी बाजू समजण्यास उपयोगी आहे. वेदधर्मी लोकांचा वृतांत सांगताना प्रथम बाबांनी देशमर्यादा, कालमर्यादा, व आर्यलोक यांचा विचार केला आहे. त्यानंतर आर्य लोक परदेशातून भरतखंडात आले, ह्याविषयी प्रोफेसर विल्सन यांच्या विचाराचा परामर्श घेतला आहे.आर्य सिंधू नदीच्या काठी होते यास प्रमाणे दिली आहेत. आर्यांचा मध्यहिंदुस्थानात संचार, दक्षिणेत संचार, आर्यांचा उद्योग, स्थिती व रीती, त्यांची विद्या, यांचा विचार करून वेद, वेदांची उत्पत्ती हा विचार केलेला आहे. पुढे संस्कृत भाषेचा युरोपातील भाषांशी संबंध, आर्यांचा ब्रिटिश लोकांशी संबंध ही गोष्ट स्पष्ट केली आहे. वेदधर्मी लोक जातिभेद मानीत नव्हते, ब्राह्मण हे पूर्वी जातीचे नव्हते—धंद्याचे होते. वेदांचे कर्ते आपल्या उद्योगासाठी प्रार्थना करतात. ऋषींचा क्षत्रियादिकांशी शरीरसंबंध होत असे. क्षत्रिय शब्दांचा वेदातील अर्थ पराक्रमी असा होता. वैश्यांचा अर्थ गृहस्थ व शूद्राचे तर नावही वेदात नाही. वेदातील ब्रह्म म्हणजे अग्नी होय. वेदात सोवळ्याओवळ्याचा विधि-

निषेध नाही. वेदात मनुष्य व पशू यांच्या जातींचा संकर केलेला नाही. वेदधर्मी लोक पशुयज्ञ व मांसाहार करीत. अनेक जन्ममरणाचे मत आर्यांस ठाऊक नव्हते. सतीची क्रिया वेदोक्त नाही. नरमेध, लेकरांची लग्ने करण्याची चाल आर्य लोकात नव्हती. अद्वैतमत वेदात नव्हते, तसेच प्राचीन आर्य मूर्तिपूजक नव्हते. अशा प्रकारे प्राचीन वेदकालाचे दिग्दर्शन या पुस्तकात करण्यात आले आहे. अनेक प्रकारच्या पुरवण्यांनी पुस्तक उपयुक्त करण्यात आले आहे.

**क्रमिक पुस्तकांची रचना**

बाबांच्या पूर्वी ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी शिक्षा मंडळी अगर सरकारी विद्या खाते यांच्याप्रमाणेच शाळात वापरण्यासाठी बहुतेक विषयांवरील पुस्तके तयार केली होती. ही सर्व पुस्तके अभ्यासकांना आज प्रत्यक्ष पहावयास मिळत नाहीत. सरकारी विद्या खात्यातर्फे इ. स. १८५७ ते इ. स. १८६५ या काळात काही क्रमिक पुस्तके मेजर क्यांडी तयार करीत होते आणि पुढच्या काळात ख्रिश्चन व्हर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटीतर्फे ख्रिस्ती शाळातील मुलांसाठी क्रमिक पुस्तके तयार करण्याचे काम बाबा पदमनजींनीच मुख्यत्वे करून केले. त्यांच्या *मुलांकरितां चौथे पुस्तक* याची 'भाषा फार सोपी व विषयांची योजना व विवरणही फार सुज्ञपणाने केले आहे. . .हे सांगणे नको. अशा प्रकारची पुस्तके शाळांमध्ये चालू केल्याने फार फायदे होतात. मकल्लक्रत पुस्तके सरकारी इंग्लिश शाळेतून बंद झाल्याने एतद्देशीय विद्यार्थ्यांचा जो फायदा बुडाला तो या चौथ्या पुस्तकासारिख्या ग्रंथांच्या योगाने मराठी विद्यार्थ्यांस तरी प्राप्त होईल.' अशी शिफारस *ज्ञानोदयाने* केली आहे.[१३] त्यांच्या मुलांकरिता पहिल्या पुस्तकाच्या नव्या मांडणीचे *ज्ञानोदयाने* असेच कौतुक केले आहे.

> *लिपी धारा, लेकराची पहिली पोथी, बालाभ्यासाचे पहिले पुस्तक* वगैरे पुस्तकात मुळाक्षरांत पुढे बाराखड्या असतात, तशा या पुस्तकात नाहीत ही गोष्ट कदाचित चांगली असा प्रत्यय येईल, कारण मूळाक्षरानंतर बाराखड्या शिकण्यात मुलांचा बराच काळ खर्च होतो. त्यापेक्षा व्यंजनास स्वर कसे लागतात व जोडाक्षरे कशी तयार होतात याची थोडक्यात अटकळ दाखवून एकदम वाचन शिकविण्यास आरंभ करणे फार चांगले. बाराखड्यांकडून जे काय व्हायचे ते या नव्या पद्धतीच्या रचनेने सुलभ रीतीने होईल.
>
> नव्या मांडणीचे कौतुक करीत असतानाच, पहिल्याच धड्यापासून कठीण शब्द आढळतात. जातिभेद, मेघ, लागवड, (पृ. १३ या पाठात काही कठीण वाक्येही आहेत.) प्रति दिवशी (पृ. १६), सत्यवादी (पृ. १८), जीवित्व, संरक्षण, अंतःकरणापासून (पृ. १९), त्याग, स्नेहाने, अधिकाराखाली (पृ. ३०) इ. शब्द मोठ्या माणसास व शिक्षकास अवघड नाहीत पण पहिल्या पुस्तकाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना मात्र ते जड व भारी वाटतात.

असा शेरा *ज्ञानोदयाने* मारला आहे.[१४] मुलांकरिता चौथे पुस्तक यात १८० पाठ आहेत व ते विद्या, शास्त्रे, इतिहास, नीति, धर्म इत्यादी विषयांवर आहेत. अनेक प्रकारच्या बोधपर

कविताही यात घेतल्या आहेत. काही पाठ व कविता *ज्ञानोदया*वरून व दुसऱ्या पुस्तकावरून घेतल्या आहेत. इ. स. १८६२ मध्ये मुलांकरिता *पहिले पुस्तक*, *दुसरे पुस्तक* आणि *तिसरे पुस्तक* अशी पुस्तके तयार झाली. *चौथे पुस्तक* इ. स. १८६५ मध्ये रचले गेले. या पुस्तकांच्या प्रथमावृत्तीच्या प्रती पहावयास मिळत नाहीत, परंतु त्यांच्या पुढील आवृत्त्यांच्या प्रतींवरून मूळ पुस्तकांची कल्पना येते, असे डॉ. कृ. भि. कुलकर्णी यांनी म्हटले आहे.[१५]

ख्रिस्ती मिशनच्या शाळेत शिकविण्यासाठी बाबांनी ही पुस्तके तयार केली असल्याने त्यांची रचना मिशनच्या कार्याला उपयुक्त अशीच आहे. उदा. पंढरी या नावाने त्यांच्या क्रमिक पुस्तकातील खालील उतारा पाहाण्यासारखा आहे.[१६]

जाऊं म्हणताची पंढरी   नरकराज हर्ष करी   १
धरितां पंढरीची वाट   जरी मरी घेई पाठ   २
करितां चंद्रभागा स्नान   देहमळा पडे हान   ३
होतां पांडुरंग दर्शन   पडे दृष्टीसी पाषाण   ४
दास म्हणे रे केशवा   आम्हा नको रे तुझी सेवा   ५

या उताऱ्यामागची मिशनरी वृत्ति अगदी स्पष्ट आहे. तिच्यावर अधिक भाष्य करण्याची गरज नाही.

बाबा पदमनजींनी तयार केलेल्या या क्रमिक वाचन पुस्तकांपैकी पुष्कळशी पहावयास सापडली नाहीत परंतु *ज्ञानोदया*तील त्या पुस्तकांच्या अभिप्रायावरून त्यासंबंधी काही माहिती मिळते ती अशी :

उत्तर हिंदुस्थानांत बंड झाल्यावर विलायतेमध्ये ख्रिस्तियन वर्णाकूलर एज्युकेशन सोसायटी फॉर इंडिया (हिंदुस्थानातील लोकांस त्यांच्या जन्मभाषांच्या द्वारें ख्रिस्ती सुशिक्षा देणारी मंडळी) स्थापित झाली. हें आमच्या वाचणाऱ्यांस ठाऊक आहेच. या मंडळीस इकडे शाळा घालण्याची सध्यां सोय नाही, म्हणून सध्यां पुस्तकें तयार करण्याचे काम चालविलें आहे. जीं पुस्तकें या मंडळींच्या मार्फत मुंबईस होतात तीं आपल्या त्राक्ट सोसैटीच्या देखरेखीनें छापलीं जातात. या वर्षाच्या प्रारंभापासून *सत्यदीपिका* म्हणून लहानसें मासिक मराठी पत्र इकडील मुलांसाठीं चालू झालें. नंतर त्याच मंडळींकडून *मुलांकरितां पहिले पुस्तक*, *मुलांकरिता दुसरे पुस्तक* व *मुलांकरितां तिसरे पुस्तक* ही पुस्तके छापून झाली आहेत. हीं पुस्तकें सदरहू मंडळी पुढे या देशांत ज्या शाळा स्थापणार आहे त्यांत मुलांस शिकविण्याकरितां केलीं आहेत, आणि तीं या कामासाठीं जशी असावीं तशीच आहेत. यांतील विषय चांगले व उपयोगी असून ते शिकून मुलें शहाणी, प्रामाणिक, नीतिमान व देवकीस होतील अशी आशा आहे. मुलांनीं शाळेंत जावें, धडे शिकावे, आईबापें व पंतोजी यांच्या आज्ञा पाळाव्या, दुसऱ्यासी कसें वागावें इ. गोष्टींविषयी चांगला बोध केला आहे. कागद, धातू, झाडें, घरें, दगड, नद्या, पथ्वी, चंद्र, सूय, तारे वगैरे जे जे पदार्थ मुलांच्या पाहाण्यांत येत असतात, त्यांच्या उपयोगाविषयीं व उत्पत्तीविषयीं लहान विद्यार्थ्यांस जे सांगता येईल ते बहुत करून सुलभ रीतीनें चांगलें सांगितलें आहे. त्याचप्रमाणे

ईश्वराविषयीं, त्याच्या गुणाविषयीं, त्याचा न्याय, दया, आज्ञा, शास्त्र, मनुष्याची पापावस्था, ख्रिस्ताने केलेला तारणोपाय, जातिभेद, खऱ्या देवाला सोडून निर्जीव मूर्ति व जनावरें यास भजणें वाईट आहे वगैरे अगत्याच्या गोष्टीविषयींही बालबोध रीतीनें लिहिले आहे.[१७]

महाराष्ट्रात इंग्रजी सत्ता दृढमूल झाल्यावर परकी सत्तेने एतद्देशियांच्या मदतीने शिक्षणप्रसाराचे कार्य सुरू करून त्यासाठी आवश्यक ती शालेय पुस्तके मराठी भाषेत रचली गेली. त्यातला एक मोठा प्रयत्न म्हणजे बाबा पदमनजींची क्रमिक पुस्तके होत असे म्हणावेसे वाटते. मराठी शालेय पुस्तके रचून मुलांच्या मनावर ख्रिस्ती धर्माची महती बिंबवणे हाच एक उत्कृष्ट मार्ग पुष्कळशा धर्मोपदेशकांसमोर होता. त्याचाच अवलंब बाबांनी पण केला यात आश्चर्य नाही. वरील गोष्ट सिद्ध करण्यासाठी बाबांच्या तिसऱ्या पुस्तकात 'दाहा आज्ञे'विषयी एक अभंग आहे. तो पुढीलप्रमाणे :

| | | |
|---|---|---|
| ऐका सर्व खरे भक्त | दाहा आज्ञा ईश्वरोक्त | १ |
| देव तुला नसो दूजा | नको करु मूर्तिपूजा | २ |
| व्यर्थ घेऊ नको नाम | विश्रामवारीं नसो काम | ३ |
| मानी माय बापां लागी | नरहत्या सर्व त्यागी | ४ |
| होऊं नको व्यभिचारी | कधी करू नको चोरी | ५ |
| देऊ नको खोटी साक्ष | ठेवू नको लोभ कक्ष | ६ |

या अभंगावरून बाबांच्या क्रमिक पुस्तकात जाणता अजाणता ख्रिस्ती धर्मप्रसार होता हे स्पष्ट होते. अर्थात मिशनरी लोकांच्या शाळेतील अभ्यासक्रमात ख्रिस्ती धर्मप्रसार असणे स्वाभाविकही होते!

**सर्वसंग्रही ऊर्फ निबंधमाला**

इ. स. १८५२ मध्ये बाबांनी *सर्वसंग्रही* या नावाचे एक पुस्तक रचले. त्याचेच पुढे *निबंधमाला* असे नामकरण झाले. प्रस्तुत ग्रंथात विविध विषयांवर निबंधलेखन केले असून या पुस्तकास दक्षिणा कमिटीचे बक्षिसही मिळाले होते.[१८] अलेक्जांद्रिया शहरातील पुस्तकसंग्रहाचा नाश, अर्धी सोडून सगळीला धाऊ नको, इंग्रजी लोक, कोंबडीच्या पिलाच्या उत्पत्तीविषयी, स्त्रीविद्याभ्यास, मुसलमान लोक, मुसलमानी राज्यकृती, पूर्णिमेच्या रात्रीवर विचार, सृष्टीतील गुह्य गोष्टी, चहा, स्वदेशप्रीति, पारशी लोक, निरनिराळ्या लोकांचे शक, विलायतेची लक्ष्मी, बाजीराव पेशवे यांच्या अमलातील मराठी राज्याची व देशाची स्थिती' इत्यादी विषयांवर त्याचप्रमाणे निती व धर्मसंबंधी विषयांवर निबंधरचना बाबांनी या ग्रंथात केलेली आहे. विरामचिन्हांचा परिणामकारक वापर प्रथमच या लेखनात बाबांनी केला आहे. अधून मधून दिलेली संवादाची व मार्मिक सुभाषितांची जोड यांमुळे या संग्रहाचा वेगळेपणा लक्षात येतो. स्पष्टीकरणार्थ जियेतिथे तळटिपा दिलेल्या आहेत. निबंधलेखन कसे करावे यासंबंधीच्या मार्गदर्शनाचे कार्य बाबांच्या *निबंधमाले*ने साधले आहे. असे म्हटले असता अतिशयोक्ति होणार नाही. विविध असे पन्नास एक विषय निवडून त्यावर मुद्देसूद व शैलीदार लेखन

या ग्रंथात बाबांनी करून जणू विद्यार्थ्यांच्या पुढे निबंधलेखनाचा आदर्श ठेवला आहे. *ज्ञानोदया*ने विशेष करून बाबांच्या या ग्रंथाचे कौतुक केले आहे.[१९]

### वाचनपाठावली

इ. स. १८५४ मध्ये बाबांनी *वाचनपाठावली* नामक एक वेच्यांचा संग्रह प्रसिद्ध केलेला आढळतो. ज्ञानोदयाच्या जुन्या अंकातून जवळजवळ पन्नास उतारे बाबांनी वरील पुस्तकात संग्रहित केले आहेत. बाबांनी निवडलेल्या विषयास उत्तर सदरे (शीर्षके) घातली. काहींचे स्वरूप वर्तमानपत्रातील उताऱ्यांचे होते, त्यांना पुस्तकातील लेखांचे स्वरूप दिले. धर्म, नीती, रीती, लोक सुधारणा वगैरे गोष्टींत फेरफार व वृद्धी कशी होत आहे हे त्या उताऱ्यांवरून लक्षात येते. हे पुस्तक कुटुंब व शिक्षण देणाऱ्या शाळात उपयुक्त आहे असे *ज्ञानोदय*कार म्हणतात.[२०] हा ग्रंथ वाचणारास बहुत बोध व ज्ञान होईल असे प्रस्तावनेत म्हटले आहे. ब्राह्मणधर्माची अर्वाचीन उत्पत्ति, यात्रा व जरीमरी, गुरु कृपेची किंमत, गुजराथी लोकांचे महाराज, माहीमची गंगा, सतीविषयी, हिंदु लोकांचे नवेनवे देव, भविष्य कसोटी, तामस पण याचे वर्णन, रेवाळेश्वर, बाळ गंगाधर शास्त्री, मोर, चोर धरण्याची युक्ति, राममोहनराय, सौम्यता, वगैरे विषयांच्या नावांवरून या वेच्यातील विविधतेची कल्पना येते. विद्यार्थ्यांचे रंजन करता करता त्यांना ज्ञानदान करणे अशा वेच्यांच्या संग्रहाने सहज शक्य होते. वाचनाचा व्यासंग वाढविण्याच्या दृष्टीने ही अशा प्रकारच्या वाचनपाठावली उपयुक्तच होत. विविध लेखक, विविध प्रकारचे वाङ्मय व विविध कालखंडातील लेखन विद्यार्थ्यांच्या, वाचकांच्या पुढे ठेवण्याच्या दृष्टीने सदर पुस्तक फारउपयुक्त ठरते. शिक्षणक्षेत्रात विविध वेच्यांचे संग्रह मुद्दाम अभ्यासार्थ लावलेले असतात. त्यांचा जो शैक्षणिक उपयोग तोच या वाचनपाठावलीचा असे थोडक्यात म्हणता येईल. भाषा, शैली, विचारधन, वाङ्मयप्रकार या सर्वच दृष्टींनी *वाचनपाठावली*त विविधता आलेली असल्याने पाठ्यपुस्तक या दृष्टीने त्यात रोचकता निर्माण होते. विद्यार्थ्यांना अशी पुस्तके वाचण्याचा कंटाळा येत नाही. आपणहून जिज्ञासेने मुले असे संग्रह वाचतात, असा या पुस्तकांचा त्या काळी लौकिक होता.

### सुभाषितवजा संग्रह

बाबांनी इ. स. १८७६ मध्ये *साहित्य शतक* या नावाची एक रचना केली. या पुस्तकात अलंकार, चातुर्य, धर्म, नीति, परमार्थ, प्रपंच, व्यवहार, विज्ञान वगैरे शंभर विषयांवर संस्कृत, प्राकृत ग्रंथांतरीचे वेच्यांचा संग्रह आहे. शिक्षणात सुभाषितांचा जो उपयोग व मूल्ये तेच या *साहित्य शत*काचे आहे. स्मरणशक्तीची जोपासना, पाठांतराची सवय लावणे, हजरजबाबीपणा बाणवणे, उच्चार व आचारशुद्धतेविषयी मुलांच्या मनात आवड उत्पन्न करणे इ. गोष्टी या *साहित्य शत*काने विद्यार्थ्यांच्या अंगी बणवता येतील. सत्याचे मंडण व असत्याचे खंडण प्रस्तुत संग्रहातील वेच्यांवरून होईल असे लेखकास वाटते.[२१] उपदेशक, कवि, कीर्तनकार, ग्रंथकार, पाळक, वादक (वाद करणारा), शिक्षक व विद्यार्थी आणि संभाषणकर्ते इत्यादिकांना हे

*साहित्य शतक* उपयोगी आहे. त्यामुळे लेखकाने त्यांनाच ते समर्पण केले आहे. त्यातील विषयनिवडीत श्रम, सूक्ष्मपणा, संशोधन करावे लागले आहे असे *ज्ञानोदय*कार मुद्दाम सांगतात.[२२] अंगात येणे, जातिभेद, लोक सत्य इत्यादी विषयांचे विवेचन या पुस्तकात आहे. उदा. अंगात येणे या विषयावर पुढे दिलेल्या पंक्ती आहेत :

जोशी वाढवुनी केश – भुतें आणिती अंगास
तरी नव्हती ते संतजन – तेथें नाही आत्मसुख . . .

पृ. १३ वर जातीभेद हा विषय आहे त्यापुढे पुढील ओवी आहे :

जो माझ्या नामी – मी नेणें मांग अथवा धेड चांभारु . . .
बळेच निघे त्याचे धरु – भक्त आपला म्हणुनी . . .

पृ. ३५ वर लोकांचे वर्णन आहे ते असे :

गतानुगतिको लोको न लोकः परमार्थिकः
वालुका लिंग मात्रेण गतं मे ताम्र भाजनं.

अशा प्रकारे विविध शंभर विषयांवर संस्कृत व प्राकृत ग्रंथांतरीचे वेचे या संग्रहात एकत्रित केले आहेत. 'सर्व मानवी धर्मांमध्ये कमीजास्त सत्यांश आहेतच, ते फुलांतील मधुबिंदुप्रमाणे ज्ञात्यांनीं शोधून काढावे व आपल्या कामास लागावे' असा या ग्रंथलेखनाचा उद्देश्य प्रस्तावनेत सांगितला आहे तो सफल झाला आहे.

## अनेक निबंध, भाषणे व लेख

पुस्तके, कोश, क्रमिक पुस्तके, वेचे इत्यादीप्रमाणे बाबांनी अनेक छोटया पुस्तिका व निबंध शिक्षणाच्या दृष्टीकोणातून लिहिले आहेत. त्यात केवळ शाळेतील मुलांच्या शिक्षणाचा दृष्टिकोण होता असे जरी नाही तर एकूण समाजशिक्षण–लोकसुधारणा हा उद्देश्य त्यापाठीमागे होता यात शंका नाही. हिंदुलोकांच्या सणांविषयी निबंध, ख्रिस्ती लोकांनी छापखान्याचा उपयोग कसा करावा ?, ख्रिस्ती लोकांनी देवळात कसे वागावे?, होळी, रामनवमी, श्रावणी व नारळी पौर्णिमा, गणपती, गोकुळ अष्टमी, व्यभिचारनिषेधक बोध, बोधपर निबंध, स्त्रियांकरिता दाखले व गोष्टी, प्राचीन काळच्या कथा, चित्रांसुद्धा शास्त्रांतील कथा अशा अनेक छोटया मोठया पुस्तकांचा उल्लेख या संदर्भात करणे योग्य होईल. याशिवाय इ. स. १८६१ ते इ. स. १८७३ या १३ वर्षात प्रत्येक महिन्यास एक अंक याप्रमाणे *धाकटी सत्यदीपिका* केवळ लहान मुलांसाठी बाबा पदमनजींनी चालविली. स्वतःच्या खर्चाने व जिद्दीने केवळ लहान मुलांसाठी एकादे नियतकालिक शंभर वर्षांपूर्वी चालवणे हे बाबा पदमनजींचे सर्वात महत्वाचे कार्य आहे. एक शिक्षक किती प्रकारे या क्षेत्रात काम करू शकतो याचे हे उदाहरण आहे. या सर्व व्यापांवरून बाबा पदमनजी एक खरे शिक्षक होते, हाडाचे जिवंत शिक्षक होते हेच पटते, मनाला वारंवार जाणवते.

* * *

## टीपा

१. *ज्ञानोदय*, पु. १६, अं. १, १ जानेवारी १८५७, पृ. १०.

२. तत्रैव.

३. *ज्ञानोदय*, १ ऑक्टोबर १८६८, पृ. २९२.

४. *A Compendium of Molesworth's Marathi and English Dictionary*, Ed. Baba Padmanji, Bombay, 1863, pp. x, xi.

५. *ज्ञानोदय*, १५ फेब्रुवारी १८५९, पृ. ५८.

६. *ज्ञानोदय*, १६ डिसेंबर १८६१, पृ. ३७२.

७. ८. *ज्ञानोदय*, १ सप्टेंबर १८६६, पृ. २६२.

९. १०. कृ. भि. कुलकर्णी, *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति*, मुंबई १९५६, पृ. ३३६.

११. *ज्ञानोदय*, १ ऑक्टोबर १८६६, पृ. २९९.

१२. *ज्ञानोदय*, १ जानेवारी १८६२, पृ. ६.

१३. *ज्ञानोदय*, २ मार्च १८६२, पृ. ६६, ५७.

१४. *ज्ञानोदय*, पु. २०, अं. २४, १६ डिसेंबर १८६१, पृ. ३७०.

१५. कृ. भि. कुळकर्णी, *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति*, मुंबई, १९५६, पृ. ३३०, ३१.

१६. *मुलांकरितां दुसरे पुस्तक*, आ. ५, १८७२, पृ. ७३.

१७. *ज्ञानोदय*, १६ डिसेंबर १८६१. पृ. ३७०.

१८. *ज्ञानोदय*, २ मार्च १८६२, पृ, ६६.

१९. *ज्ञानोदय*, १ ऑगस्ट १८६०, पृ. २९९.

२०. *ज्ञानोदय*, ५ जून १८८४, पृ. २६१.

२१. *साहित्य शतक*, मुंबई, १८७६, प्रस्तावना, पृ. २, ३.

२२. *ज्ञानोदय*, ११ जानेवारी १८७७, पृ. १८.

* * *

५

## बाबांनी संपादलेली नियतकालिके

बाबांच्या जन्मानंतर एका वर्षाच्या आतच मराठीतील वृत्तपत्रसृष्टीचा जन्म झाला. बाबांचा जन्म १८३१ चा तर मराठीचे पहिले वृत्तपत्र *दर्पण* हे बाळशास्त्री जांभेकर यांच्या संपादकत्वाखाली १८३२ पासून निघू लागले. *दर्पण*मध्ये मराठी मजकूर लिहिण्यासाठी भाऊ महाजन हे सहकारी त्यांना लाभले. जांभेकरांनी दर्पणनंतर पाच वर्षांनी म्हणजे १८३७ मध्ये *दिग्दर्शन* नावाचे नियतकालिक सुरू केले. हे मराठीतले पहिले नियतकालीक. भाऊ महाजनांनी जांभेकरांच्या पावलावर पाऊल टाकून १८४१ मध्ये *प्रभाकर* हे साप्ताहिक व १८५४ मध्ये *ज्ञानदर्शन* हे त्रैमासिक सुरु केले.

भाऊंच्या *प्रभाकर*मध्ये पंचविशीतल्या गोपाळ हरि देशमुख या तरुणाने *लोकहितवादी* या नावाने जी पत्रे लिहिली, ती *लोकहितवादींची शतपत्रे* या नावाने आज ओळखली जातात. १८४९ साली पुणे येथे *ज्ञानप्रकाश* हे साप्ताहिक सुरू झाले. याच्या संपादन कार्यात सुरुवातीला लोकहितवादी यांचा मोठा वाटा होता. जांभेकर, महाजन, देशमुख या उमेदीतल्या तरुणांनी आपल्या समाजाला जागे करण्यासाठी आणि इंग्रजांनी आणलेली विज्ञाननिष्ठा समाजाच्या ठायी प्रतिबिंबित करण्यासाठी वृत्तपत्रांचे व नियतकालिकांचे एक नवे व्रत, एक नवे निष्ठेचे जागरण सुरू केले आणि तत्कालीन महत्वाकांक्षी तरुण लेखक व कर्ते पुरुष या जागरणात सामिल झाले. बाबांसारखा लेखणीबहाद्दर त्यात सामील न झाल्यासच नवल!

१८४१ हे वर्ष मराठी वृत्तपत्रसृष्टीमध्ये महत्त्वाचे मानले पाहिजे, कारण याच वर्षी भाऊ महाजनांचे जसे *प्रभाकर* हे साप्ताहिक सुरू झाले, तसेच ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्यासाठी मिशनऱ्यांनी याच वर्षी आपले *ज्ञानोदय* हे महत्त्वाचे साप्ताहिक सुरू केले.

*प्रभाकर*च्या रूपाने नव्या विचाराच्या सुशिक्षितांचा आणि *ज्ञानोदय*च्या रूपाने ख्रिस्ती मिशनऱ्यांचा असा दुहेरी मारा हिंदु समाज आणि संस्कृतीवर सुरू झाला. हिंदु संस्कृतीतील

लोकभ्रमावर आणि सनातनी, रूढिप्रिय विचारसरणीवर नव्या विचाराच्या तरुणांनी कितीही ताशेरे झाडले तरी ख्रिस्ती मिशनऱ्यांचा हिंदुधर्मविरोधी प्रचार त्यांना सहन होण्यासारखा नव्हता, त्यामुळे भाऊ महाजन यांनी १८४४ मध्ये सुरू केलेल्या *उपदेशचंद्रिका* या वृत्तपत्रापासून एक नव्या संघर्षाला सुरुवात झाली. १८५२ मध्ये *विचारलहरी* हे वृत्तपत्र काढून कृष्णशास्त्री चिपळूनकरांनी ख्रिस्ती धर्मप्रसारविरोधी जोरदार आघाडीच उघडली. याखेरीज मोरभट दांडेकर, विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचेही कार्य सुरू होतेच. बाबा सुरुवातीपासूनच या संघर्षाच्या ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या बाजूने उभे राहिले व त्यांनी काढलेल्या नियतकालिकातून हयातभर ख्रिस्ती धर्ममताचा निष्ठेने प्रचार व प्रसार करण्यातच धन्यता मानली.

बाबांना लेखनाची लहानपणापासूनच हौस. मुंबईत आल्यावर १८४७ सालीच भाऊ महाजनांच्या *प्रभाकर*मध्ये दस्तुरी संबंधाने पत्रव्यवहार करावयास सुरुवात केली. त्यापूर्वी बेळगावास असतानाच बाबांना *प्रभाकर*, *ज्ञानोदय* व *ज्ञानप्रकाश* ही वृत्तपत्रे नियमितपणे वाचण्याची गोडी लागली होती. या तीन पत्रांच्या वाचनाकडून मला धर्म व नीतिसंबंधी गोष्टींचा जो लाभ झाला तो पुरतेपणी सांगता येत नाही, असे बाबा म्हणतात.[१] या तिन्ही पत्रात तरुणपणी बाबांनी लिहिलेले अनेक निबंध वारंवार प्रसिद्ध होत.[२] बाबांचे *स्त्रीविद्याभ्यास निबंध* हे पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर *ज्ञानप्रकाश*ने त्याचे कौतुक करून एक चर्मी जोडा व पितळेची वाटी बक्षिसादाखल पाठविली होती.[३]

*विचार लहरी*तील सडेतोड मजकुराने बाबा अस्वस्थ होत. त्यातील विचार फारच हलकट व पोरकट होते, या शब्दात त्यांची प्रतिक्रिया व्यक्त झाली आहे.[४]

ख्रिस्ती धर्माविरुद्ध हिंदुधर्ममताभिमान्यांनी चालविलेल्या चळवळीकडे बाबांचे चांगलेच लक्ष होते. ही सर्व वृत्तपत्रे ते काळजीपूर्वक वाचीत असत. ख्रिस्ती धर्मविरोधी व्याख्यानांनाही ते हजर राहात. १८५२ च्या सप्टेंबर महिन्यात ठाकुरद्वारी वे. शा. सं. कृष्णशास्त्री साठे यांची ख्रिस्ती धर्मविरोधी व्याख्याने सुरू झाली. त्यांना बाबा नियमितपणे हजर राहून त्यांचे वृतांत लिहून *ज्ञानोदयास* पाठवू लागले. अशी बाबांची सुमारे २५ वृत्तें इंग्रजी भाषांतरासह *ज्ञानोदयात* प्रसिद्ध झाली आहेत.[५] बाबांचे हे सर्व कार्य त्यांच्या धर्मांतरापूर्वीचे आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे. त्यामुळे धर्मांतरानंतर बाबांनी स्वतः या नियतकालिकांच्या क्षेत्रात उडी घेणे क्रमप्राप्तच होते.

*ज्ञानोदया*चे संपादक रेव्ह. ह्यूम हे होते. 'ह्यूमसाहेबांची आपल्याशी केवळ कोरडी ओळख नव्हती, ते मजवर फार लोभ करीत. त्यांच्या छापखान्यात जी सुंदर व उपयुक्त मराठी पुस्तके छापली जात, त्यांची एक प्रत ते मला कृपा करून देत, शिवाय *ज्ञानोदया*चे उत्तम बांधणीचे पुस्तक दरवर्षी देत', असे बाबांनी म्हटले आहे.[६] याच काळात मुंबईस विल्सनसाहेबांच्या संपादकत्वाखाली *ओरिएंटल ख्रिश्चन स्पेक्टॅटर* हे इंग्रजी मासिक जोरात चालू होते. त्या मासिकाचे एजंट म्हणून गोविंद नारायण माडगवकर हे काम करीत. गोविंदजी नारायण काही ख्रिस्ती झाले नव्हते. परंतु तरीही ख्रिस्ती मासिकाचे काम करण्यात ते धन्यता मानीत. तीच गोष्ट हरि केशवजी क्षत्रिय पाठारे यांची. त्यांनी

१८५० पासून *तारका–प्रसारक* हे मासिक काढले होते व ख्रिस्ती धर्मविषयक लेख मोठ्या निष्ठेने प्रसिद्ध करीत. तेही ख्रिस्ती झाले नव्हते. हरि केशवजी, डॉ. विल्सन यांच्याशी बाबांचे पुढे घनिष्ठ संबंध आले. गोविंदजी नारायण हे तर बाबांचे शिक्षकच होते. तसेच धर्मांतर केलेले रे. नारायण शेषाद्री हेही त्यांचे शिक्षक होते.

**उदयप्रभा व प्रभोदय**

धर्मांतर केल्यानंतर आपण एखादे नियतकालिक काढावे, असे बाबांना तीव्रतेने वाटू लागले व १८५६ साली त्यांनी *उदयप्रभा* नावाचे मासिक पत्र सुरू केले. याच वर्षी त्यांचे शिक्षक नारायण शेषाद्री यांचे *प्रभोदय* नावाचे मासिक सुरू होते. १८५६ च्या जानेवारीत पहिला अंक निघाला. 'The Rising of Light' या इंग्रजी शब्दाचा पर्याय म्हणून *उदयप्रभा* हे नाव घेण्यात आले आहे, याची पहिल्याच अंकावर नोंद आहे. *ज्ञानोदय*कारांनी पहिला अंक निघाल्यावर लिहिले की, 'चालत्या वर्षाच्या आरंभापासून *उदयप्रभा* या नावाचे एक नवे पत्र निघू लागले आहे. हे *ज्ञानोदया*एवढे असून प्रति महिन्यास एकदा निघणार आहे. याचे लिहिणारे नेटिव्ह ख्रिस्ती आहेत. आणि त्यांच्या उपयोगाकरिताच काढिले आहे.'[७] शिळा छापावर हे छापले जाई. घेणारास सुलभ जावे म्हणून त्याची ठेविलेली अल्प किंमत, सुबोध मराठी भाषा, बायबलमधील व ख्रिस्ती वाङमयातील उत्तमोत्तम उताऱ्यांचे भाषांतर करून छापण्याचा बेत वगैरे या मासिकाबाबातच्या वैशिष्टचपूर्ण बाबींचा उल्लेख *ज्ञानोदयाने* केला आहे. त्या काळातही बरेच वर्गणीदार या मासिकास लाभले होते. इ. स. १८५८ साली हे मासिक बंद पडले.[८]

*उदयप्रभा* मासिकात इंग्रजी पत्र *ब्रिटिश मेसेंजर* वरून घेतलेली 'भयंकर स्वप्न' या नावाची एक सुताराची गोष्ट छापलेली आहे. ती सत्यकथा असावी असा निर्देश *ज्ञानोदय*-कारांनी केला आहे. मनुष्य आपल्या दुर्व्यसनाने कसा नाश पावतो, दारू पिणे किती घातक आहे, दारू न पिता परमेश्वरावर, येशूवर कसा विश्वास ठेवावा हा सद्‌भाव वाचकांच्या मनात निर्माण व्हावा म्हणून *उदयप्रभे*त छापलेली सुताराची कथा *ज्ञानोदयाने* पुनः छापली आहे.[९] इ. स. १८५९ मध्ये *ज्ञानोदयात* या *उदयप्रभे*च्या अस्ताच्या संदर्भात पुढील वृत्त छापले आहे. त्यावरून नव्या नियतकालिकाच्या आगमनाची कल्पना येते.

> सन १८५६ च्या जानेवारीपासून *उदयप्रभा* या नावाचे मासिक पत्र चालू झाले होते. हे आमच्या वाचकास माहिती आहेच. ते दोन वर्षेपर्यंत चालले. पण तिसऱ्या वर्षी म्हणजे सन १८५८ साली कित्येक कारणावरून ते अगदी मोडकळीस आले होते. त्याचा शिळाछाप बरोबर उमटत नसे व दुसऱ्या काही कारणावाचून त्याचे जे नाना प्रकारचे वाचणारे होते त्यांस त्याचा कंटाळा येत चालला होता. आणि त्याचा छापणारा हिंदू होता. त्याने हे ख्रिस्ती पत्र छापण्याचे सोडून दिले. त्यामुळे पत्र अगदी बुडाले असते पण मुंबई इलाख्यातील उदार ख्रिस्ती गृहस्थांनी सुसमयी प्रत्याश्रय दिला. तेणेकरून ते तीन मास निद्रा घेऊन आता रूपांतर व नामांतर पावून जागृत झाले, मार्च महिन्यापासून पुनः मार्गक्रमण करू

लागले.[१०]

तात्पर्य *प्रभोदय* या मासिकाचा पूर्वावतार *उदयप्रभा* हा होय. तीन वर्षे *उदयप्रभा* बाबांनी मोठ्या अडचणीत चालवली. या कामी बाबांना जो आर्थिक ताण पडत होता तो पाहून *ज्ञानोदय*कारांनी इ.स. १८५७ मध्ये 'बाबा पदमनजी हे विद्वान, अनुभवी व पोक्त विचारांचे आहेत. त्यांनी आजवर बहुत उपयुक्त ग्रंथ रचले व पत्रकर्त्याचे कामही केले आहे. . .परंतु त्यांच्या नियतकालिकाचे खर्चाचे ओझे कोणी तरी अंगावर घ्यावे व फक्त पत्रकर्त्याचे काम म्हणजे विषय पुरविण्याची जबाबदारी मि. बाबांकडे राहू द्यावी', अशी कळकळीची सूचना केली होती.[११] नव्या अंकाच्या सुरूवातीला बाबांनी लिहिले, 'आमच्या वाचणारापुढे *उदयप्रभा* नवे नाव व नवे रुप धारण करून आली आहे. पूर्वी *उदयप्रभा* शिळेवर छापत असे आता टाईपावर छापत आहे. गेल्या वर्षी तीन महिने या मासिकाला ग्रहण लागले होते.'[१२] 'ईश्वराचे ज्ञान व उपयुक्त विचार ह्यांचा लाभ व्हावा म्हणून ह्या पुस्तकाचा हेतू आहे'.[१३] असे बाबांनी मासिकाच्या मलपृष्ठावरच स्पष्ट केले आहे. *प्रभोदय* या नावाला साजेसेच त्यातील लेखांचे स्वरूप आहे. हिंदुधर्मातील अनेक संस्कारांचा परामर्श बाबा न चुकता घेतात. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्यासारख्या हिंदुधर्माभिमान्यांशी मिशनऱ्यांनी जो संघर्ष चालविला होता, त्याचे प्रतिबिंब अंकात सर्वत्र पडले आहे. त्याखेरीज अनेक प्रकारच्या उपयुक्त विषयांची चर्चा चालू आहेच. *ज्ञानोदया*च्या विविध अंकात *प्रभोदया*तील निरनिराळी वृत्ते पुनः प्रसिद्ध केलेली सापडतात. उदा. काही उल्लेखनीय पुढीलप्रमाणे आहे. 'दाक्तर भाऊ दाजी यांनी थोड्या दिवसांवर मोठ्या कुशलतेने एका सात वर्षाच्या मुलाचा मुतखडा काढिला. त्याचे वजन तीन तोळे होते.'[१४] *प्रभाकरा*दी वृत्तपत्रंप्रमाणे लोकहिताची नवी नवी वृत्ते छापणे, काही रंजक, रोचक व माहितीपूर्ण वृत्त प्रसिद्ध करणे हा उद्योग *प्रभोदय* करीत होता. *ज्ञानोदयाने प्रभोदया*-वरून या सदराखाली अनेक वृत्ते प्रसिद्ध केली आहेत. *प्रभोदया*तील वृत्तांच्या लोकहितैषी दृष्टीमुळे *ज्ञानोदया*स ती वृत्ते जशीच्या तशी घेण्याचा मोह होतो. संपादकाजवळ लोक-स्थितीचे निरीक्षण, निवड, लोकमताचा अभ्यास लागतो, तो बाबांच्या अंगी होता आणि त्यामुळेच *ज्ञानोदयाने प्रभोदया*तील वृतांना पुनः प्रसिद्धी दिली. हा जणू बाबांच्या संपादकीय कार्याचा *ज्ञानोदयाने* सन्मानच केला असे म्हणावसे हवे. बाबांची चतुरस्त्र दृष्टी प्रगट करणारी *प्रभोदया*वरून घेतलेली अनेक प्रकराची जी वृत्ते *ज्ञानोदया*त प्रसिद्ध झाली आहेत, त्यावरून बाबांना तरुणपणापासून *ज्ञानोदया*शी राखलेला ऋणानुबंध त्यामुळे दृढ होण्यास मदत झाली आहे यात शंका नाही. अगदी सामान्य वाटाव्या परंतु मनोरंजकतेमुळे लक्षात राहाव्या, अशा अनेक वृत्तांतांना *ज्ञानोदयाने* पुन्हापुन्हा *प्रभोदया*चा उल्लेख करून प्रसिद्धी दिली आहे. पुण्यातील फ्री चर्च विद्यालयात चारशे मुले इंग्लिश विद्या व ख्रिस्ती धर्म शिकतात, हिंदुस्थानातील शाळा व पाठशाळा यांमध्ये ख्रिस्ती शास्त्र शिकविण्याविषयी वादविवाद पार्लमेंटमध्ये झाला, विलायतेत सरजम शेटजीची मालमत्ता १,७०,००० रुपयांची आहे, अशा साध्या बातम्याही[१५] लक्षवेधी आहेत. ज्ञान व मनोरंजन व लोकहित हा त्रिवेणी संगम बाबांच्या संपादकत्वाखाली चालणाऱ्या *प्रभोदया*त झाला होता.

सत्यदीपिका (धाकटी)

बाबा पदमनजींनी इ. स. १८६१ मध्ये *सत्यदीपिका (धाकटी)* या नावाचे लहान मुलांसाठी मासिक सुरू केले. आकार, किंमत या सर्वच दृष्टीनी प्रस्तुत मासिक लहान होते आणि त्यातील विषयदेखील केवळ लहान मुलांना उपयुक्त असे होते. या नियतकालिकाच्या पहिल्या अंकाच्या निमित्ताने *ज्ञानोदयाने* त्याचे स्वरूप, त्याचा हेतू, त्याच्या कार्याचा अधिकार यासंबंधाने विस्ताराने लिहिले आहे.[१६] इंग्लंडमधील 'ख्रिस्तियन वर्नाक्युलर एज्युकेशन सोसैती' या नावाच्या परोपकारी मंडळीच्या खर्चाने हे मासिक चालू झाले होते आणि येथील पुस्तके व निबंध करणाऱ्या मंडळींकडे त्याची देखरेख करण्याचे व बाबा पदमनजींकडे त्याच्या कर्त्याचे काम सोपविण्यात आले होते. बालकांकरिता जी पुस्तके व नियतकालिके यूरोप व अमेरिकेत निघतात, त्याचा उपयोग त्यातल्या बहुत नव्या, उपयोगी व हितावह माहितीमुळे प्रौढांनाही होतो. अशा प्रकारचे बाल व प्रौढ या दोघांनाही उपयुक्त ठरेल असा *सत्यदीपिके*चा अंक निघाल्याचे *ज्ञानोदयाने* म्हटले आहे. त्याचा १६ पृष्ठांचा अंक आकर्षक तर होताच परंतु त्यात विषयही चांगले होते, लाभदायक होते व सुरस भाषेने लिहिलेले हे पुस्तक सर्वांना घेता यावे म्हणून त्याची किंमतही थोडीच, म्हणजे आगाऊ दिल्यास सालिना चार आणे व दर अंकास एक फद्या व चार पैसे, इतकीच ठेवली होती. लहान मुलांवर संस्कार करण्याचे *सत्यदीपिके*च्या कर्त्याचे सामर्थ्य व त्याचा अधिकार याबद्दल *ज्ञानोदया*प्रमाणेच अनेकांची खात्री होती.[१७] या मासिकामुळे

आजची मुले उद्या विद्याचार प्रवृत्तीत येतील, ते समजण्यास समर्थ होऊन त्यावरून त्यास आनंद व लाभ होईल आणि आपल्या देशबांधवांच्या कल्याणासाठी जो प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे, तो करण्यासही ते लायक होतील. ती सांप्रतकाळच्या भट्टांच्या व कुणब्यांच्या मुलांप्रमाणे अडाणी राहाणार नाहीत. म्हणून या देशातील मुलांनी हे पुस्तक अवश्य घ्यावे व त्यांच्या आईबापांनीही त्यांना ते घेण्याचें व वाचण्याचें उत्तेजन द्यावे

अशी सूचना प्रथमांकाच्या निमित्ताने *ज्ञानोदयाने* मुद्दाम केली आहे.[१८]

*ज्ञानोदया*च्या या सूचनेतील 'भट्टांची मुलेही कुणब्यांच्या मुलांसारखी अडाणी' असल्याची माहिती तत्कालीन सामाजिक परिस्थितीच्या संदर्भात फार महत्वाची आहे. केवळ ब्राह्मण जातीत जन्माला येणे हे विद्याचार प्रवृत्तीचे लक्षण नव्हे, म्हणून लोकहितवादींसारख्यांनी ब्राह्मण व भट यांच्यावर जे कोरडे ओढले होते, त्याची या प्रसंगी आठवण येते. बाबांच्या *सत्यदीपिके*सारख्या मासिकांचे यश त्यांच्या धर्मप्रचाराच्या दृष्टीबरोबरच व्यापक ज्ञानप्रवृत्तीत व संस्कारसंपन्नतेत होते.

प्रथमदर्शनी त्याचे बहिरंग विद्यार्थ्यांना, लहान मुलांना आवडेल असे होते. मुखपृष्ठ व मलपृष्ठ रंगीत असे. मलपृष्ठावर हे पुस्तक लहान मुले व मुली यांसाठी महिन्यातून एकदा निघत असते अशी सूचना असून पुढे मासिकाच्या किंमती व त्यातील सवलती दिल्या आहेत. मासिकाचा आकार ५३/४" × ४" असा होता. थोडक्यात, रंगीत कव्हर, खाऊच्या पैशातूनही विकत घेण्यासारखे व सहज खिशात ठेवण्यासारखे आणि चित्रांनी युक्त असे हे मासिक पुस्तक मुलांच्या मनाची मशागत योग्य प्रकारे करीत असताना दिसते.

*सत्यदीपिके*च्या ऑक्टोबर १८६३ च्या अंकात 'प्रथम वनस्पतीविद्या पाठ' या लेखात पानांची माहिती दिली आहे. ब्राह्मणभोजनाविषयीचा संवाद देऊन त्यात अतिभोजनाचे तोटे विशद केले आहेत. ब्राह्मणभोजने घालण्यात पुण्य नाही, तोच पैसा शाळा वगैरे चालविण्यासाठी वापरता येईल, हा विचार मुलांच्या मनावर बिंबविण्याचा उद्देश दिसतो. अशा भोजनामुळे आळशीपणा वाढतो, असा पण सूर या लेखाचा आहे. मुलांच्या मनात श्रमाचे महत्त्व बिंबवणे, त्यांना चांगली सवय लावणे हा हेतू व लहान मुलांच्या मनावर चांगला संस्कार यामुळे घडावा अशी या पाठीमागची संपादकीय इच्छा आहे. हा लेख संभाषणात्मक असून थोडक्यात लिहिलेला आहे. तिसरा लेख 'Light of Mercy—दयाप्रकाश' असा आहे. ही एक कथा असून त्यात चोरांच्या तडाख्यात सापडलेल्या माणसाला प्रभू कशी दया दाखवितो हे स्पष्ट केले आहे. विशेष म्हणजे ही कथा गंगाजमनी हिंदीत असून 'आमच्या लहान वाचणारांस हिंदी भाषेची माहिती व्हावी' म्हणून ती दिली आहे व 'ज्या शब्दांचा अर्थ समजत नसेल तो शिक्षकांस किंवा ज्यास हिंदी भाषा येती त्यास विचारावा' अशी सूचना दिली आहे. मराठी मुलांना हिंदी भाषा यावी हा या मासिकाचा दृष्टीकोण पाहिला तर राष्ट्रभाषेच्या प्रश्नाची मराठीतील या पहिल्यावहिल्या प्रयत्नाची दखल घेणे आवश्यक ठरते. 'मुलांचे खाजे—Children's food' या मथळ्याखाली—(१) हे प्रिय मुला तू पाप करितोस तेव्हा तुला दुःख होते काय? (२) पापामुळे दुःख झाले असता तू येशु ख्रिस्ताची प्रार्थना करितोस काय? (३) प्रार्थना केल्यावर (उत्तर मिळेल) असा विश्वास धरितीस काय? विश्वास धरिल्यावर तुला नम्रता व आज्ञांकितपणा ही येतात काय?—अशी प्रश्नमालिका दिली आहे. तिचा हेतू उघडच आहे. हिंदू सणातील दोषदिग्दर्शनही आहेच. याच अंकात गौरी सणाची माहिती देऊन त्या सणामुळे मुलींना शिव्या देण्याचे पाठ मिळून त्यावर आईबापच कुसंस्कार कसा करितात हे स्पष्ट केले आहे. प्रारंभी गौरी सणाचे नदीकाठचे चित्र दिले आहे. मुलांना चित्रे व रंग यांचे आकर्षण असते व म्हणून चित्रांचा व रंगांचा उपयोग *सत्यदीपिका* कर्त्यांनी मोठ्या कौशल्याने करून घेतलेला दिसतो. त्यानंतर 'तेरा गोष्टी'मध्ये १३ असभ्य गोष्टी कथन केल्या आहेत त्या अशा : (१) मोठ्याने हसणे, (२) दुसरे बोलत असता वाचणे, (३) चौघात दाताने, चाकूने नखे काढणे अथवा कुरतडणे, (४) सभा उठण्यापूर्वी उठून जाणे, (५) परकी मनुष्यास बसावयास जागा देण्यापूर्वी त्याला सोडून जाणे, (६) आपल्याहून थोरांचा सन्मान न करणे, (७) सांगितल्यावाचून मंडळीत मोठ्याने वाचणे, (८) कोणी काही दिले असता त्याचा उपकार मानण्याची चिन्हे दर्शविल्यावाचून ते घेणे, (९) दुसऱ्याच्या चुकीला हसणे, (१०) आपल्यापेक्षा वडील, विशेषतः आईबापांची चूक नीट करणे, (११) दुसऱ्याचे बोलणे संपण्यापूर्वी मध्येच बोलू लागणे, (१२) दुसऱ्यास विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर देणे, (१३) पाटावर बसताच जेवावयास लागणे, अशा प्रकारे ज्या गोष्टी मुलांनी करू नयेत त्या तेरा गोष्टींची नुसती यादी देऊन त्या असभ्य एवढेच सांगितले आहेत. पण तुम्ही ह्या गोष्टी करू नका असे मुद्दाम सांगितले नाही याचे कारण कदाचित हे असावे की करू नका सांगितल्या-वर मुले मुद्दाम ती गोष्ट करू पाहातात. मुलांच्या वर्तनाचा मानसशास्त्रीय विचार लक्षात

घेऊन त्यांचा विकास घडविण्याचे उत्तम कार्य *सत्यदीपिकेने* स्वीकारले होते त्याचा हा पुरावाच होय. 'मुलांची बुद्धी' या शेवटच्या चुटक्यात खालील प्रकारे एक गमतीशीर घटना कथन करून त्यावर मार्मिक भाष्य एका वाक्यातच केले आहे.

> शनिवारवाडा बांधतांना पायाच्या नारळाचा प्रसाद मुलांना टाळून वाटला. मुलें पेशव्यांकडे गेलीं व म्हणालीं मुलांना टाकून प्रसाद वाटला तसा चिपा गाळून वाडा बांधा. अशी मुलांची बुद्धी कधी कधी मोठी असती.

असे *सत्यादिपिका (धाकटी)* चे अंतर्बाह्य स्वरूप होते. *सत्यदीपिका* मासिकातील विषयांकडे जरा बारकाईने पाहिल्यास त्यातील विविधता, कल्पकता व उपयुक्तता सहज लक्षात येते. विद्यार्थ्यांचे मनोरंजन करता करता त्यांच्या पदरात ज्ञानाचे माप टाकणारे हे विषय दिसतात. लहानमोठया कथा, छोटया छोटया कविता, अल्प स्वल्प निबंध, शास्त्रीय लेख, मुलांचे खाजे, मुलांचे जुगदान, यासारखी अद्‌भूत वा आश्चर्यकारक माहिती देणारी सदरे, वनस्पतिविद्या पाठ, विविध विषयांवरचे संवाद; संभाषणे, पत्रव्यवहार, म्हणी, उखाणे, सुभाषिते, सुविचार, जाहिराती, पुस्तकपरिचय व परीक्षणे इ. विविध सदरे या मासिकात होती. इंग्लंड, फ्रान्स, अबीसिनिया, स्पॅनिअर्ड, जर्मन इत्यादी देशांची माहिती दिली असून, लूथर, दुसरा हेन्री, स्टिफन्स, बाबू केशवचंद सेन, इत्यादींचा अल्पपरिचय *सत्यदीपिकेने* करून दिला आहे. वनस्पतिविद्या पाठ या सदरामधून पाने, खोड, झाड अशी झाडांच्या विविध भागांची शास्त्रीय माहिती दिली आहे. याच सदरातून अंजिराच्या झाडाची संपूर्ण माहिती प्राप्त होते. 'धुरांचे दिवे' हा छोटा लेख अशा पद्धतीने लिहिला आहे,[१९] की त्यातून लेखनातील चुका कोणत्या व शुद्ध व चांगले लेखन कोणते हे कळावे.

> *मुलांचे जुगदान* या सदरात आश्चर्यकारक घटनांची माहिती येत असे. 'प्रिन्स ऑफ वेल्स'चे लग्न झाले. त्या मंगलकार्याच्या स्मरणार्थ मुंबईत मे महिन्याच्या पहिल्या तारखेस शाळेत जाणाऱ्या सर्व मुलांस (मुलगे व मुलग्या) तेथील बडया लोकांनी बडी मेजवानी केली. त्या प्रसंगी आठ हजार तीनशे मुले, वाजत गाजत मोठया गजराने बावटे मिरवीत एके ठिकाणी जमली होती. त्यात २२०० ख्रिस्ती मुले होती व ६१०० हिंदु व पारशी यांची होती. त्यास नाना प्रकारची मेवा मिठाई, चहा, कॉफी वगैरे करावयास व चंद्रज्योति, नळे वगैरे दारु जाळून दाखविण्यास एकंदर खर्च ११५७५ रुपये आला.

पृथ्वी प्रदक्षिणा, मुलांची बुद्धी, पृथ्वीवरील भाषांची संख्या वगैरे गोष्टी या सदरात सांगितलेल्या असत. करमणूक व ज्ञान यांचा संगम प्रस्तुत सदरात झालेला दिसून येतो. याच सदरात काही ठिकाणी पुढीलप्रमाणे गंमतीशीर म्हणी दिल्या आहेत : (१) माळ्याचा मळा कोल्ह्याचे भांडण, (२) मोठा कुला तिकडे जग भला, (३) मोठा डौल घराला नाही कौल, (४) महाराचे लाडके गळयात हडके, इत्यादी.[२१] 'ज्ञानाची वचनें' (wise sayings) या सदरात पुढीलप्रमाणे सुभाषिते आहेत : (१) जो गरिबास देतो त्याला उणे पडणार नाही, (२) वाईटापासून आपली जीभ सांभाळ, (३) सुज्ञ मनुष्य मूर्ख मनुष्याशी वाद करिती व तो चडकडतो व हसतो व शांति पावत नाही, (४) दगड जड व वाळू भारी आहे, परंतु

हेव्यापुढे कोण उभा राहील. याच अंकात *नवीन पुस्तके* या सदरात पुस्तकांचा थोडक्यात मार्मिक व सडेतोड परिचय करून दिला जात असे. त्यामध्ये ज्ञाननिष्ठेचे, स्त्रीशिक्षणाचे, सुबोध भाषेचे कौतुक असे. उलट गोष्टीवर सडकून टीका असे. उदा. :

*श्रीकंठ भूषण* बायकांकरिताच म्हणून शिकायाची किंवा वाचायाची मराठींत फार थोडी पुस्तकें आहेत. तेव्हां त्यांच्याकरिता जे कांही नवें पुस्तक तयार होते ते पाहून स्त्री शिक्षणाची वृद्धी इच्छिणारास आनंद झाला पाहिजे. सदरहू पुस्तक ख्रिश्चन वर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटीने छापिले आहे. त्यातील विषय सर्वोत्कृष्ट असून स्त्रियांच्या घरकार-भारांत व कुटुंबाच्या सुधारणुकीत उपयोगी पडण्याजोगे आहेत. या पुस्तकांत एकंदर ९० धडे आहेत. व याची पृष्ठे सुमारे १५० आहेत. याची भाषा फारच सुलभ आहे.

*विविधज्ञानविस्तार पुस्तक १* ले याचे परीक्षण पुढीलप्रमाणे आहे :

ह्या पुस्तकाचे प्रथम वर्ष पुरे होऊन दुसऱ्या वर्षास आरंभ झाला. यावरून आम्हास फार संतोष वाटतो. यातही बायकांकरिता विषय येत असतात. परंतु त्यांत संस्कृत शब्द फार कठिण असतात ही मोठी चूक आहे. स्त्रीशिक्षणाचा आमच्या देशात नुकताच आरंभ आहे. आणि त्यासाठी कठिण संस्कृत शब्दांनी भरलेली पुस्तके लिहिणे हे दात न आलेल्या मुलास बदाम व खारका खावयास दिल्याप्रमाणे आहे. *विविधज्ञानविस्तार* यांच्या अंकात आरोग्य-रक्षणावर फार चांगले, अतिउपयोगी विषय येत चालले आहेत, परंतु त्याची भाषा विना-कारण कठिण केली आहे. तेणेकरून त्यांचा अर्धा उपयोगही होणें कठिण आहे. जसी सडकेवरील खडी पायास रुतते तसे हे संस्कृत शब्द त्या पुस्तकाच्या कोमल वाचकांस रुततात. उदा. जर प्रसूतिका (बाळंत) फारच ग्लान झाली असली तर. . .ज्यांना मांसाचा प्रति-बंध नसेल त्यांनी त्यांना कुक्कुट किंवा अजा मांसरस द्यावा.

अशा परखड परीक्षणातून अधूनमधून *सत्यदीपिकेने* भांडणे ओढवून घेतलेली दिसतात. *विविधज्ञानविस्ताराच्या* पहिल्या अंकावरच्या या वरील टीकेकडे *विविधज्ञानविस्ताराने* मुद्दाम दुर्लक्ष केले होते. कारण ख्रिस्ती धर्मप्रचारात्मक वाङमयाकडे लक्ष देण्याची आपणास गरज नाही अशी त्यांची भूमिका होती.[२३] परंतु *सत्यदीपिकेच्या* मार्च १८६९ च्या अंकात *सन्मार्गप्रकाशक* नावाच्या पुस्तकाचे परीक्षण करताना बाबांनी लिहिले की,

*विविधज्ञानविस्तारातील* मोचनगडासारख्या गोष्टी न लिहितां त्यांनी इंग्लंड देशातील प्रख्यात प्रख्यात लोकांची चरित्रें लिहावीत, कारण कल्पित गोष्टींची संख्या हल्ली पुष्कळ झाली आहे.

या बाबांच्या अनाठायी उपदेशाने आपली पूर्वीची भूमिका काहीशी सोडून *विविधज्ञान-विस्तारने सत्यदीपिकेचा* समाचार घेतला आहे. *विस्तार* म्हणतो की,

मुंबईमध्ये *सत्यदीपिका* म्हणून एक ख्रिस्ती मताचे लहानसे पुस्तक प्रसिद्ध होत असते; हे कित्येकास ठाऊक असेल. ज्या हेतूने ते पुस्तक निघते, त्या हेतूकडे, व त्याच्या योग्यायोग्य विचाराकडे, आम्हास लक्ष देण्याची गरज नाही. कारण आमचा विषय वेगळा पडला. असे असता आमचा *विविधज्ञानविस्तार* निघूं लागल्यापासून त्या *सत्यदीपिकेस* सवति-

मत्सरासारखी कांहींशी व्यथा उत्पन्न झाली आहे. याचे कारण काय असेल ते असो एकदोनदा तिच्या कर्त्याने *विविधज्ञानविस्तारा*विषयी आपले खुजट खुजट विचार प्रगट करून आपला मोठेपणा दाखविला होता. परंतु त्याकडे लक्ष देणे अयोग्य वाटले म्हणून आम्ही दिले नाही. हल्ली चालत्या महिन्याच्या अंकामध्ये त्यांनी आपली विशेष विद्वत्ता व उप-देशकता दाखविली आहे म्हणून तिकडे लक्ष देणे अवश्य झाले आहे. आम्ही असे ऐकले आहे की आमच्या पुस्तकाच्या मस्तकावरील "श्री" हे अक्षर पाहिल्याबरोबर त्यांचे मस्तक उठते. हे खरे असेल तर फारच दुःखकारक गोष्ट खरी. महाराष्ट्र देशाच्या व भाषेच्या सुधारणेला जर महाराष्ट्र देशातील लोकांचे देशाचार व कुलाचार, त्यांच्यातील ऐकीव कथा, इतिहास इत्यादि गोष्टी केवळ निरुपयोगी, व फक्त इंग्लंडांतील मोठ्या लोकांचीं चरित्रेंच काय तीं उपयोगी, असें जर यांचें म्हणणे आहे, तर त्यापेक्षां चांगली गोष्ट आम्ही सुचवितो ती ही, की जगाच्या जीवनाकरिता सतत झटण्याचा बाणा बाळगणारे जे लोक त्यांच्या ज्ञानामृताची चव घेऊन, त्याच्याप्रमाणेंच महाराष्ट्र देशाच्या जीवनाकरितां सतत झटण्याचा बाणा बाळगणारे जे *सत्यदीपिका*कर्ते त्यांचेच चरित्र कोणी लिहिलें तर त्यापासून उपयोग होईल.[२४]

पाश्चात्यांच्या चरित्रांचा बाबांचा सोस व एतद्देशियांच्या चरित्रांकडे त्यांचे असलेले काहीसे दुर्लक्ष यांवर वरील लेखात नेमके बोट ठेविण्यात आले आहे.

साधारणतः प्रत्येक वर्षी कोणकोणत्या महत्त्वाच्या घटना घडल्या त्याची यादी एखाद्या अंकात देऊन वाचकांना त्यांचा संग्रह करण्याचा लोभ उत्पन्न करणे, जागरुक करणे *सत्यदीपिका* करीत असे. इ. स. १८६६ मधील महत्त्वाच्या पुढील घटना दिल्या आहेत त्या अशा : (१) ओरिसा वगैरे प्रांतात मोठा दुष्काळ, (२) सिंधू नदीस महापूर—मनुष्य, जनावरे व मालमत्तेची हानी, (३) मद्रासचा दुष्काळ व तेथील गव्हर्नरची जातीने पहाणी, (४) आग्रा व पुणे येथील दरबार, (५) मोठा उल्कापात, (६) बंगालमधील ब्राह्मो समाजात दोन तट, (७) दुष्काळ, व्यापारी व पेढ्यांची मुंबईत दिवाळी, (८) महाराष्ट्रात पाटबंधारे बांधून जमीन शिंपण्याचे काम, (९) मिस कारपेंटर व आलिक्झांडार या स्त्रिया इथले स्त्रीशिक्षण प्रसारात आल्या, (१०) विद्यावृद्धीच्या कामात युनिव्हर्सिटीच्या परीक्षेत कित्येक तरुण पसार (पास), (११) मध्य आशियात रशियन लोकांचा पगडा . . . अशा प्रकारे त्या वर्षातील ठळक घटना स्मरणात राहाव्यात म्हणून एकत्र करून दिल्या आहेत. ही वाचकांची फारच मोठी सोय *सत्यदीपिके*ने केली हे स्पष्ट आहे.[२५] धर्म विचाराची जडणघडण करणे, मुलांना ज्ञानप्राप्तीसाठी प्रवृत्त करणे, त्यांना वाचनासाठी उद्युक्त करणे, त्यांना सत्प्रवृत्त करणे, त्यांची अभिरूची संपन्न करणे, सामान्यज्ञान वाढविणे, शास्त्रीय ज्ञानाची आवड उत्पन्न करणे, त्यांची भाषा संपन्न करून त्यांना इतर भाषांची गोडी लावणे इत्यादी अनेक उद्दीष्टे बाबांच्या *सत्यदीपिका* मासिकाने आपल्यासमोर ठेवून त्यानुसार विषयांची मांडणी केली होती असे म्हणावेसे वाटते. बाबा पदमनजी शिक्षक व संपादक अशा दुहेरी भूमिकेतून काम करीत होते. त्यामुळेच अशी चौफेर दृष्टी त्यांच्या मासिकात आढळते. *सत्यदीपिका (धाकटी)* या मासिकाने सतत १३ वर्षे

लहान मुलांना मार्गदर्शन केले. त्यांची करमणूक केली. मुलांच्या सर्वांगिण विकासास मदत केली. मराठी नियतकालिकांच्या इतिहासाचा मागोवा घेत असता हा असा प्रयत्न या मासिकाचाच पहिला ठरतो. *सत्यदीपिका* हे केवळ लहान मुलांच्यासाठी चालविलेले मासिक होते, ही गोष्ट मान्य करावी लागते. याच्या अगोदर दोन वर्षे केवळ मुलींसाठी चालविलेले *सुमित्र* नावाचे मासिक होते पण केवळ लहान मुलांसाठी चालविलेले मासिक म्हणता येणार नाही. तसेच *विचारदर्पण* आणि *एलफिन्स्टन स्कूल पेपर* ही दोन नियतकालिके इ. स. १८६१ च्या पूर्वी होती पण त्यातील मर्यादा लक्षात घेता तीही लहान मुलांची मासिके ठरत नाहीत. त्यामुळे इ. स. १८६१ साली सुरू झालेले *सत्यदीपिका* हेच केवळ लहान मुलांसाठी चालविलेले पहिले मासिक ठरते. इ. स. १८६१ ते इ. स. १८७३ पैकी पहिली पाच वर्षे *सत्यदीपिकेस* ख्रिश्चन व्हर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटीची मदत मिळे. पण पुढे ही मदत बंद झाली. त्यानंतर बाबांनी स्वखर्चाने व स्वतःच्या कर्तृत्वाच्या जोरावर इ. स. १८७३ पर्यंत लहान मुलांना खाऊ इतकेच प्रिय असणारे हे मासिक चालू ठेवले. इ. स. १८७३ च्या *सत्यदीपिकेच्या* फेब्रुवारीच्या अंकात एक अत्यंत करुण व दुःखद वार्ता प्रसिद्ध झाली. ती अशी :

> सूचना. आम्हास कळविण्यास अतिशय दुःख होत आहे की ही *सत्यदीपिका* पुढले महिन्यापासून बंद होईल. हिला द्रव्यापत्ती नामक क्षयाची भावना झाली होती हें आम्हास समजले नाही. तिच्या वैद्याने थोडे दिवसांमागे तिची नाडी परीक्षा करून सांगितले की ही एका महिन्याचे वर वाचणार नाही. अशी ही आमची बारा वर्षांची प्रिय कन्या व आमच्या वाचकांची प्रिय बहिण मृत्युपंथास लागली. हिला नुकताच एक भाऊ झाला व हिचा काळ आला . . .ह्या जुन्या *सत्यदीपिकेच्या* सुज्ञ व प्रिय आश्रयदात्यांस व वाचकांस आमचा हा शेवटचा सलाम.

*सत्यदीपिकेला* झालेला भाऊ म्हणजे *ज्ञानोदयाने* आपल्या या अंकात *सत्यदीपिका* बंद होणार म्हणून सुरु केलेला बालविभाग. *सत्यदीपिकेची* प्रेरणाच त्यास कारणीभूत झाली.

### सत्यदीपिका थोरली

मुलांसाठी चालविलेली *सत्यदीपिका* बंद पडण्याची वेळ आली तरी नियतकालिकांच्या संपादनाचे व्यसन बाबांना गप्प बसू थोडेच देणार होते.? *धाकट्या सत्यदीपिकेच्या* मावळत्या अंकात त्यांनी *थोरल्या सत्यदीपिकेची* कल्पना जाहीरच करून टाकली आहे. *धाकट्या सत्यदीपिकेच्या* दुप्पट मोठे, अष्टपत्री साच्याचे, स्वतंत्र विचाराचे, प्रौढ वाचकांना उद्‌बोधक ठरावे असे आणि छापखान्याचा व टपालाचा खर्च भागेल इतकी माफक व अल्प किंमत इ. या नव्या मासिकाची वैशिष्ट्ये त्यांनी अगोदरच सांगून ठेवली आहेत.[२६]

१८७४ ते १८७६ या काळातील *सत्यदीपिकेचे* अंक उपलब्ध झाले आहेत, त्यावरून बाबांनी आश्वासिलेल्या वैशिष्ट्यांनिशी हे नवे मासिक मोठ्या उमेदीने व कर्तृत्वाने चालविल्याचे दिसते. उदा. मे १८७५ च्या अंकात प्रथम 'The reformation of the offender is not the 'primary' object of punishment' हा इंग्रजी भाषेतला

महत्त्वाचा लेख आहे. शिक्षा व गुन्हेगाराची सुधारणा या संदर्भात हा निबंध फारच उपयुक्त मार्गदर्शनपर आहे. 'पाण्यास अनंत कालिक शिक्षा' या लेखात *सुबोधपत्रिके*च्या कर्त्यावर टीका झाली असून त्याच्या मताचे खंडन आढळते. नंतर कबीरपंथाची माहिती दिली असून नवीन पुस्तक या सदरात रा. भि. गुंजीकरांच्या *लाघवीलिपि* या पुस्तकाचे थोडक्यात परीक्षण केले आहे. 'वृत्त व अभिप्राय' या मथळ्याखाली तत्कालीन काही महत्त्वाच्या घटना व त्यावर मल्लिनाथी केलेली सापडते. सातारची राणी मरण पावली, म्हणून तत्कालीन वर्तमान पत्रांची ओरड व त्यावर टीका या सदरात आहे. शेवटी स्फुट विषयात 'पाकशास्त्र' या सदराखाली विविधपाककृती कशा कराव्यात ह्या विषयी अल्प माहिती दिलेली असून त्यात श्रीखंड, दुधाची खीर, भरीत, धीवर, केशरीभात इत्यादी पाककृती दिल्या आहेत. नंतर शतमूर्खांची काही लक्षणे दिलेली आढळतात. जून १८७४ च्या अंकात 'The Family' नावाचा इंग्रजी निबंध छापलेला आहे. नंतर आफ्रिकेतील रानटी जमातीच्या विलक्षण चालींचे वर्णन केले आहे. तिसरा निबंध जातिभेदासंबंधाने आहे. पुढे हिंदु लग्नसमारंभाचे वर्णन असून त्यात वाङ्निश्चय, लग्न, सप्तपदी वगैरे लग्न समारंभातील प्रसंगांचे खोचक व भाष्ययुक्त वर्णन आहे. 'ब्राह्मणउपाध्यारहित लग्न' यात सत्यशोधक समाजामार्फत लागलेल्या एका लग्नाची हकीगत आहे. प्रस्तुत वृत्त या सदरात इंग्लिश सरकारविरुद्ध आरडाओरडा करणाऱ्या ग. वा. जोशी यांची चांगलीच हजेरी घेतली आहे. शेवटी सत्यशोधक समाजाच्या सभासदांची यादी दिली आहे. यादीत काही ठिकाणी नुसतेच क्रमांक आहेत. 'तेथील सभासद काही कारणाने आपली नावे प्रकट करू शकले नाहीत' अशी *सत्यदीपिका*कर्त्याने टीप मारली आहे ती लक्षात घेण्यासारखी आहे.

*धाकट्या सत्यदीपिके*ने *विविधज्ञानविस्तारा*ची जशी आगळीक काढली होती, तशीच थोरलीने *दंभहारक* व *निबंधमाला* यांना वेळोवेळी डिवचले होते व ह्या दोन्ही पत्रांनी *सत्यदीपिके*चे पुरेपूर वाभाडे काढले होते. विशेषतः *दंभहारका*शी *सत्यदीपिके*चे वारंवार खटके उडत ते बाबांनी त्याच्याशी वारंवार दोन हात करण्याची सुरसुरी दाखविली म्हणूनच. बाबांच्या यासंबंधीच्या उपरोधपूर्ण लेखनाचा जून १८७६ च्या अंकातील पुढील नमुना लक्षात राहाण्यासारखा आहे :

> *दंभहारक* आम्हाला तीनचार महिन्यांपासून येत नाही. ह्या आमच्या बंधूची प्रकृती बिघडली आहे किंवा त्याने मृत्यूलोकाची वस्ती सोडली आहे हे काहीच समजत नाही. आम्हास आमचा बंधू *दंभहारक* काही महिन्याने भेटला नाही, म्हणून आम्ही त्याच्या समाचारास एक दूत पाठविला होता. तेव्हा आम्हास अशी खबर लागली की त्याने मागेच 'राम' म्हटला. हे ऐकून आम्हांस दुःख वाटले. कारण जरी आमचा बंधू सत्याच्या पक्षाचा नव्हता, बोध करण्याविषयी आळसी असून मोठ्या शोधकाचा दंभ मिरवणारा होता आणि वाद करण्याच्या कामी पक्षपाती, दुराग्रही, वाचाळ व शिवरा होता, तरी त्याच्या योगाने लोकांत धर्मसंबंधी गोष्टींची थोडी तरी चर्चा होत असे आणि आम्हांस व आमच्या दुसऱ्या ख्रिस्ती बंधूस ख्रिस्ती धर्माच्या पक्षाने उत्तर व प्रमाण देण्याचे प्रसंग

वारंवार मिळत असत. म्हणून हा विरोधी बंधू गत झाल्यावरून आम्हास वाईट वाटते. तथापि तो काही दिवसांनी दुसरा जन्म धारण करून पुनः ह्या मृत्यूलोकी काही काळ वस्ती करून आपले माप भरण्याकरिता येणार आहे, ही दुःखात एक समाधान मानण्यासारखी गोष्ट आहे. ती आम्ही आमच्या पुणेकर प्रिय बंधूस कळविण्याची त्वरा करतो.

*सत्यदीपिके*ने *निबंधमाला*कारांशी जो सामना केला, त्याचे प्रतिबिंब *माला*कारांच्या तीक्ष्ण शरसंधानात फार चांगल्या रीतीने पडले आहे.[२७] *सत्यदीपिके*ने जानेवारी १८७४ च्या अंकात ख्रिस्ती धर्म शास्त्राच्या *माला*कारांच्या अभ्यासाभावाचे चित्र रंगविले होते. 'युनिव्हर्सिटीच्या परीक्षेच्या वेळी *माला*कारांनी ऊंटाच्या ओझ्याची पुस्तके जरी वाचली तरी त्याच्या योगाने त्यांस ख्रिस्ती मंडळीच्या १८०० वर्षांच्या इतिहासाचे ज्ञान प्राप्त झाले असेल असे नाही' असा *माला*कारांना टोमणा मारला होता. याच अंकात *सत्यदीपिके*ने *निबंधमाला*कारांच्या राजनिष्ठेच्या अभावाचे भांडवल करून आपली सरकारनिष्ठा प्रगट करण्याची संधी या निमित्ताने घेतली होती. 'एक पुणेकर हिंदु मित्रा'चे या संबंधाचे त्यांनी इंग्रजी पत्रही याच अंकात छापले आहे. *बॉम्बे गॅझेट* या इंग्रजी पत्रात २९ सप्टेंबर १८७६ साली 'एलिफास' या सहीने प्रसिद्ध झालेले पत्र बरेच गाजलेले आहे. तशाच प्रकारचे पत्र त्यापूर्वी दीड वर्षे *सत्यदीपिके*मध्ये प्रसिद्ध झाले होते, हे लक्षात घेण्यासारखे आहे. त्यानंतर बाबांनी *निबंधमाला*कारांच्या ख्रिस्तद्वेषावर वारंवार लिहिले असले तरी आपल्या नोव्हेंबर १८७६ च्या अंकामध्ये त्यांनी *निबंधमाला*कारांच्या अंगी पक्षपातित्व किती पूर्णपणे बिंबून गेले आहे हे स्पष्ट करण्यासाठी खालील प्रमाणे दिली आहेत :

(१) इंग्रजी भाषेत जो ग्रंथसंग्रह आहे त्याविषयी सांगताना ज्यांच्या योगाने ती भाषा इतक्या उत्तम दशेप्रत येऊन पोचली आहे असे जे धर्मसंबंधी गद्यपद्यात्मक ग्रंथ त्यांचा तर मुळीच कोठे उल्लेख दिसत नाही. ह्यूम, गिबन, जॉन स्टुअर्ट मिल्ल इ. ची नावे दृष्टीस पडतात. परंतु कौप, बनियन, पेली, व्हेटली वॉटस, जॉन न्युटन चामर्स, रॉबर्ट हॉल, बटलर इ. जे नामांकित ग्रंथकार व वक्ते झाले व ज्यांच्या ग्रंथांकडून इंग्लिश भाषेला मातबरी व माधुर्य आले त्यांची ह्या नि. क. स कशी माहिती नाही? तसेच ख्रिस्ती मताच्या मंडनार्थ व नास्तिक मताच्या खंडनार्थ जी शेकडो पुस्तके इंग्रजी भाषेत आहेत त्यांतून काही तरी सांगायची होती.

(२) चॉसर, मिल्टन वगैरे दोन चार धर्मसंबंधी ग्रंथकारांची नावे लिहिली आहेत. परंतु त्यांचे ग्रंथांचे विषय काय होते व धर्माच्या योगाने इंग्लिश कवितेला केवढे साह्य झाले आहे हे काहीच सांगितले नाही.

*सत्यदीपिका*कारांच्या या सर्व आगळिकेला एकदाच परंतु अतिशय खोचऱ्या व बोचऱ्या प्रभावी लेखन शैलीत मालाकारांनी जे सणसणीत उत्तर दिले आहे ते मुळातूनच पाहाण्यासारखे आहे.[२८]

बाबांनी जिद्दीने, आत्मविश्वासाने व आपल्या लेखनगुणाच्या बळावर *सत्यदीपिका* चालविली असली, आणि *ज्ञानोदया*ने लिहिल्याप्रमाणे 'त्यांची लिहिण्याची शैली फार उत्कृष्ट,

विषय प्रतिपादन करण्याची व प्रमाण देण्याची त्यांची हातोटी उत्तम प्रकारची आहे. व त्यांचे ग्रंथ व वर्तमानपत्रे लोकांस फार मनोरंजक व ज्ञानकारक, लाभकारक होतात.'[२९] हे जरी खरे असले तरी आर्थिक हानीमुळे बाबांना हे मासिक बंद करावे लागले. डिसेंबर १८७७ च्या अंकात बाबा लिहितात :

> ह्या पुस्तकाचा खर्च भागवण्यापुरते जरी वर्गणीदार आहेत तरी त्याजकडून वेळच्या वेळेस पैसा येत नसल्यामुळे छापखान्याचे बिल दरमहा देणे दिवसान दिवस कठिण पडत चालले आहे. आणि भिक्षा मागून हे पुस्तक चालविण्याची आमची अगदी इच्छा नाही... त्यापेक्षा आपले पुस्तक बंद करावे हाच आम्हास हल्लीच्या स्थितीत उत्तम मार्ग दिसतो ...पुण्यात असताना स्वखर्चाने मासिक चालविणे शक्य होते. मुंबईच्या वस्तीत तोटा सोसून मासिक चालविणे अशक्य आहे.

आपल्या सर्व वाचकांचा प्रेमळ व दुःखी अंतःकरणाने ह्याच अंकात त्यांनी निरोप घेतला. परंतु निराशाजनक परिस्थितीमुळे बाबांचे धैर्य खचले नाही. मासिक बंद पडले तरी अन्य मार्गाने आपण स्वदेशहित व लोकसेवा यात अंतर पडू देणार नाही असे आवर्जून कथन केले. त्यांच्या मनात काही विचारचक्र चालूच होते. व त्यातूनच इ. स. १८८२ मध्ये त्यांचे नवे मासिक सुरू झाले.

### सत्यवादी (पाक्षिक)

इ. स. १८८२ मध्ये जे नियतकालिक बाबांनी सुरू केले ते एक पाक्षिक होते. त्याचे नाव *सत्यवादी*. केवळ एक रुपया वर्गणीत *ज्ञानोदया*च्या आकाराची आठ पृष्ठे देण्याचे ठरवून बाबा पुन्हा या व्यवसायात पडले. मात्र हे पाक्षिक केवळ 'ख्रिस्ती लोकांसाठी' होते व अंकात किरकोळ वर्तमानांची भरती केली जाणार नाही ही भूमिका होती. *सत्यदीपिका (थोरली)* इ. स. १८७७ ला बंद पडली. पण बाबांनी नव्या दमाने व उमेदीने हे नवीन पाक्षिक पाच वर्षानंतर का होईना परत चालू केले. त्यांची संपादकीय जिद्द प्रशंसनीय होय. *सत्यवादी*चे अंक पाहावयास मिळाले नाहीत.

### कुटुंबमित्र

इ. स. १८८४ साली बाबा पदमनजींनी *कुटुंबमित्र* या नावाचे मासिक सुरू केले. याचा साचा चतुष्पत्री असून प्रत्येक अंकात २४ पृष्ठे होती. निर्णयसागर छापखान्यात छापले जाऊ लागल्याने छपाईही आकर्षक होती. वर्गणी सालिना दीड रुपया व दर अंकास दोन आणे ठेवण्यात आली होती. *कुटुंबमित्र* मासिकाचा उद्देश असा होता की मासिक पुस्तकांचा प्रसार व्हावा व मराठी वाचकास नाना ख्रिस्ती धर्मविषयक विशयांचे ज्ञान प्राप्त व्हावे. त्याचप्रमाणे या मासिकात प्रसिद्ध स्त्रीपुरुषांची चरित्रे, प्राचीन रीतीभाती, सांप्रतकाळच्या लोकांचे रिवाज, पदार्थ विज्ञानशास्त्र व शाब्बाथ शाळास उपयुक्त वाचनपाठ, गोष्टी, चुटके वगैरे असे त्याचे स्वरूप राहील असे *ज्ञानोदया*ने अगोदरच सांगून ठेवले होते.[३०] *कुटुंबमित्र*चेही अंक पाहावयास

मिळाले नाहीत. मात्र *ज्ञानोदयावरून* ते १८८७ मध्ये बंद पडल्याचे लक्षात येते. 'पनवेल येथील काही हकीगत' या मथळचाखाली *ज्ञानोदयात* एक पत्र छापले गेले आहे.[३१] प्रस्तुत पत्र म्हणजे एक निबंधच आहे. हा निबंध *कुटुंबमित्र*कडे प्रसिद्धीसाठी पाठविण्यात आला होता. पण *कुटुंबमित्र* मासिक बंद पडल्याने *ज्ञानोदयाने* हा निबंध प्रसिद्ध केला व म्हटले की,

> हा निबंध *कुटुंबमित्राचे* कर्ते यांजकडे गेल्या वर्षाच्या शेवटच्या महिन्यात पाठविला होता, परंतु ते पत्र ज्यानुअेरीपासून मरणार व सन १८८६ हे त्या मासिक पुस्तकाचे शेवटचे वर्ष होणार हे त्या निबंधकारास माहीत नव्हते. परंतु ते मेले असे जेव्हा त्याला समजले तेव्हा त्यांनी तो निबंध आम्हांकडे पाठविला. तो आम्ही त्या मासिक पुस्तकाच्या सदरासुद्धा तसाच छापला आहे....त्या उपयुक्त मासिकाच्या मरणाने खिस्ती वाचक अश्रू ढाळतील. पण त्यास आमचा उपाय नाही. ज्या सोसैटीच्या हाती त्याची देखरेख होती त्यांनी जर त्याची योग्य निगा करण्याची तजवीज केली असती तर ते कदाचित मेले नसते, असे आम्हास वाटते. लेकरू आजारी पडले. फार रडते. दुःसह त्रास देते म्हणून जर आई त्याला केजी वगैरे पाजण्याची हयगय करिते किंवा त्याला लवकर आराम पडत नाही म्हणून दाक्तर त्याला औषध देणे बंद करितो अगर अर्सनिकचा एक डोस देऊन त्याचे प्रकरण आटोपतो तर त्या आईला व दाक्तरला काय म्हणावे? ज्या पुस्तकावरून सोसैटीला नका (द्रव्य) होत नाही उलट खर्च पडतो, ती मराठी पुस्तके बंद करावी असा जर क्रम ठेवला तर आज मराठीच्या द्वारे चालणारे धर्मसंबंधी पुष्कळ लेखन बंद करावे लागेल. जरी त्या मासिकाचा खर्च दुःसह असला तरी असहाय होता असे आम्हास वाटत नाही. चांगले दूध पाजले असते (अधिक वर्गणीदार मिळविण्याची कळकळ बाळगून प्रयत्न केले असते) तर इतर लेकरांपेक्षा (मराठी पुस्तकांपेक्षा) याचा भार अधिक न वाटता, हे अधिक वाचले (चालले) नसते काय?[३२]

बाबा पदमनजींचा संपादकीय आवाका, जिद्द व प्रयत्न *ज्ञानोदय*कारांना माहीत होते. म्हणून ते या दुर्दैवी घटनेबद्दल हळहळताना दिसतात.

### ऐक्यप्रदर्शक पत्रिका

बाबांनी एक नियतकालिक सुरू केले. त्याचे नाव होते *ऐक्यप्रदर्शक पत्रिका*. या मसिकाच्या जन्मापूर्वी *ज्ञानोदयात* एक जाहिरात आली ती अशी : '*ऐक्यप्रदर्शन पत्रिका* नामक एक मासिक-पत्र येत्या जानेवारीत निघणार आहे. किंमत दर अंकास अर्धा आणा. ह्या पत्राची एजन्सी खिस्ताप्रीत्यर्थ ज्यास पत्करण्याची ईच्छा असेल त्यांनी त्याच्या एडिटरास "मुसा बिल्डिंग ग्रँट रोड मुंबई" ह्या पत्यावर लिहून पाठवावे.'[३३] एडिटरचा पत्ता हा बाबा पदमनजींचाच पत्ता होय. यावरून प्रस्तुत मासिक बाबांनी सुरू करण्याचा घाट घातला हे उघड होय. दुर्दैवाने या *ऐक्यप्रदर्शक पत्रिकेचे* अंक उपलब्ध झाले नाहीत. मराठी नियतकालिकांच्या सूचितही प्रस्तुत मासिकाचा फक्त उल्लेख येतो. परंतु *ज्ञानोदयात* मात्र पुढील जाहिरातवजा सूचना प्रसिद्ध झाली आहे. ती अशी : 'ज्या मित्रांकडे *ऐक्यप्रदर्शक पत्रिकेच्या* पहिल्या अंकाच्या प्रति

गेल्या आहेत त्यांस पुढील अंकापासून किती प्रती लागतील हे कृपा करून वेळेवर कळवावे. *ऐक्यप्रदर्शक* पत्रिकेचे सेक्रेटरी.' यावरून प्रस्तुत मासिक सुरू झाले व त्याचे एडिटर बाबा पदमनजी होते व त्याचे स्वरूप धार्मिक स्वरूपाचे असावे असे म्हणता येते, कारण याच्या संदर्भात ख्रिस्ताप्रीत्यर्थ एजन्सी स्वीकारण्याची विनंती करण्यात आली होती.

### तात्पर्य

थोडक्यात असे म्हणता येईल, की बाबा पदमनजींनी सुमारे तीस पस्तीस वर्षात पाच-सात नियतकालिके प्रयत्नपूर्वक चालविलेली दिसतात. त्यात काही मासिके, काही पाक्षिके आहेत. काहींचा आकार लहान तर काहींची किमत अल्प. काहीत केवळ लहान मुलांचे विषय, तर काहीत स्त्रिया व प्रौढ माणसांना उपयुक्त विषय आढळतात. समाजहित, चालरीत, धर्मज्ञान व मनोरंजन इ. संबंधी लेख त्यांच्या नियतकालिकात सापडतात. शास्त्रीय ज्ञान, निबंधलेखन, कथा, चुटके, म्हणी, उखाणे, सुभाषिते, कविता असे विविध वाङमयप्रकार त्यात सापडतात. ही नियतकालिके सर्वांगसुंदर व समृद्ध वाटतात कारण त्या पाठीमागे बाबांची संपादकीय शक्ती उभी होती. यापैकी काही दहाबारा वर्षे चालली, तर काही अल्पायू ठरली. काहींना संस्थांनी मदत दिली, तर काही बाबांनी कर्ज काढून चालविली. प्रत्येक नियतकालिकाचे काही उद्दिष्ट होते. काही ब्रीद होते. ही नियतकालिके चालविण्यात बाबाचा आशावादी, यत्नवादी दृष्टिकोण दिसतो. त्यावरून त्यांचा प्रामाणिकपणा, ज्ञानलालसा, श्रद्धाळूपणा, श्रमांची आवड, सेवेकडे कल, जीवनाची शिस्त इत्यादी गुणांची ओळख होते. त्यांनी सतत तीसपस्तीस वर्षे हा उद्योग चालविला बाबांनी एखाद्या आवडत्या छंदासारखी या उद्योगाची जोपासना केलेली दिसते. नियतकालिक सुरू करावे, ते बंद पडल्यास दुसरे सुरू करावे. त्यात काही नवेपणा आणावा, नवे नवे प्रयोग करावे हे जणू बाबांना व्यसनच जडले होते! आयुष्याचा मोठा काळ त्यांनी या व्यसनाची धुंदी चाखली.

* * *

## टीपा

१. *अरुणोदय*, पृ. १६०, ६१.
२. ३. तत्रैव, पृ. १६४.
४. तत्रैव, पृ. १६३.
५. तत्रैव, पृ. १६५.
६. तत्रैव, पृ. १६२.
७. *ज्ञानोदय*, १ फेब्रुवारी १८५६, पृ. ४५.
८. *ज्ञानोदय*, १५ एप्रिल १८५९, पृ. ११२.
९. *ज्ञानोदय*, १५ फेब्रुवारी १८५६, पृ. ७१.
१०. *ज्ञानोदय*, १५ एप्रिल १८५९, पृ. ११२.
११. *ज्ञानोदय*, १३ डिसेंबर १८७७, पृ. ५९४.
१२. *प्रभोदय*, वर्ष ४, अंक १, पृ. ४.
१३. *प्रभोदय*, ऑगस्ट १८५९, मलपृष्ठावरून.
१४. *ज्ञानोदय*, १ मार्च १८६०, पृ. ८०.
१५. *ज्ञानोदय*, १५ डिसेंबर १८६०, पृ. ३८४.
१६. *ज्ञानोदय*, १ मार्च १८६१, पृ. ७१.
१७. रे. नारायण शेषाद्री यांनी लिहिले आहे, 'आम्हांस अनुभवावरून असे ठाऊक आहे कीं, मिस्तर बाबा लहान लेकरांवर विशेष प्रेम करतात म्हणून हे जे काम त्यांजवर सोपविले आहे ते आनंदाने व हर्षाने ते करतील.'
*ज्ञानोदय*, १ मार्च १८६१, पृ. ७१.
१८. *ज्ञानोदय*, १ मार्च १८६१, पृ. ७१.
१९. *सत्यदीपिका (धाकटी)* पु. ३ अं. १०, ऑक्टोबर १८६३, पृ. १५१–१५३.
२०. उनि अं. ३, जून १८६३, पृ. ९५.
२१. उनि पु. १३, अं. २, फेब्रुवारी १८७३, पृ. ३०.
२२. उनि पु. ८ अं. १०, ऑक्टोबर १८६८, पृ. १५८.
२३. *विविधज्ञानविस्तार*, पु. २, अं. ९, मार्च १८६९, पृ. १४२.
२४. तत्रैव.
२५. *सत्यदीपिका (थोरली)* पु. ८, अं. २, फेब्रुवारी १८६८, पृ. ३१.
२६. *सत्यदीपिका*, फेब्रुवारी १८७३, पृ. ३१, ३२.
२७. *निबंधमाला*, वर्ष ३, अंक ३६. (चित्रशाळा प्रकाशित ३ री आवृत्ती, १९३६, पृ. ६४९–५९ पाहा).

२८. तत्रैव. पृ. ६४९–५० पाहा.
२९. ज्ञानोदय, २३ डिसेंबर १८७७, पृ.५९४.
३०. ज्ञानोदय, २६ जानेवारी १८८२, पृ. ६८.
३१. ज्ञानोदय, ३ फेब्रुवारी १८८७, पृ. ७३, ७४.
३२. तत्रैव, पृ. ७४, ७५.
३३. ज्ञानोदय, २२ डिसेंबर १८९२, पृ. ४१६.

६

# कोशरचनाकार बाबा पदमनजी

### परिश्रमपूर्वक केलेली रचना : एक वार्ता

'प्रसिद्ध डिक्शनरीकर्ते रेव्ह. बाबा पदमनजी हे गेल्या मंगळवारी रात्री १२ वाजता ख्रिस्तवासी झाले हे कळविण्यास दिलगिरी वाटते. त्यांचे इंग्रजी व मराठी शब्दांचे कोश प्रसिद्ध झालेले असून सर्वमान्य झालेले आहेत.' प्रस्तुत वृत्त *सयाजी विजय* या पत्रात प्रसिद्ध झाले होते व *ज्ञानोदया*ने ते वृत्त पुनः छापले आहे.[१] त्याचप्रमाणे दि. ८ सप्टेंबर १९०६ चा *दीनबंधू* लिहितो, 'बाबांनी परिश्रमपूर्वक कोश तायार केले ते उपयुक्त आहेत. योग्य अर्थाचा अचूक शब्द व योग्य शब्द पाहण्यास लोक बाबांचे कोश वापरतात. त्यांच्या कोशांत विनासायास व बिनचूक शब्द मिळतात.' सदर *दीनबंधू*तील वृत्त देखील *ज्ञानोदया*नेच प्रसिद्ध केले आहे.[२] बाबा पदमनजींच्या मृत्यूनंतरच्या लेखात त्याच्या जीवनातील महत्त्वाचे कार्य, उपयुक्त कार्य म्हणून त्याची विरचिलेल्या कोशांचा उल्लेख वृत्तपत्रांनी केला आहे. बाबा पदमनजींनी विविध व विपुल वाङ्मयनिर्मिती केली तरी त्यांच्या कोशरचनेच्या कार्याचा ठसाच समाजमनावर मोठ्या प्रमाणावर ठसलेला आहे. कारण त्यांचे कोश घरोघरी जाऊन सर्वांना मोठे उपयुक्त ठरले होते. म्हणूनच बाबांनी हे कोश ज्या उद्देशाने केले, ज्यांच्यासाठी ते रचिले इत्यादी गोष्टी लक्षात घेऊन तत्कालीन पार्श्वभूमीवर त्यांच्या कोशांचा सापेक्ष विचार करणे अगत्याचे आहे.

### भारतीय कोशपरंपरा

भाषेच्या समृद्धीबरोबरच व्याकरण व कोश या प्रकारच्या ग्रंथाची आवश्यकता भासू लागते. संस्कृतमध्ये 'शब्दानुशासन' व 'निघंटु' या शब्दप्रयोगाने प्राचीन काळापासून या तऱ्हेचे वाङ्मय निर्माण होत असल्याचे दिसते. या दोन्ही प्रकारच्या वाङ्मयास वेदांगात स्थान मिळून त्यांचे

महत्त्व व त्यांची प्रतिष्ठा ही अपरंपार मानली गेली आहे. 'निघंटु' किंवा 'कोश' या नावाने संस्कृतमधील शब्दसंग्रहांचा व्यापार फार मोठा असला तरी आजच्या शास्त्रीय दृष्टीकोणाने सिद्ध होत असलेल्या, वर्णानुक्रमे रचलेल्या कोशवाङ्मयाशी त्यांची तुलना होऊ शकणार नाही. त्यांचे स्वरूप मूलतः विषयानुरूप वर्गीकरणाच्या तत्त्वावर निर्माण झालेल्या शब्द-संग्रहांचे, तसेच शब्दांचे अनेक पर्याय एकत्र मांडणाऱ्या ग्रंथांचे, म्हणजे एकभाषीय, एकार्थवाची, पर्यायशब्दसंग्रहाचे, इंग्रजीत ज्याला समानार्थी शब्दकोश (thesaurus) म्हणतात तसे आहे.

वेदातील दुर्बोध होत असलेल्या शब्दांचा अर्थ सांगण्यासाठी यास्काचार्यांनी सांगितलेले *निरुक्त*, *ऋग्वेदसंहिते*वरील महर्षि कश्यपांचा *निघंटु* हे संस्कृतातील या प्रकारचे महत्त्वाचे आद्य कोशग्रंथ होत. इ. स. पूर्व काळात निर्माण झालेल्या अशा प्रकारच्या सर्व प्रकारच्या कोशग्रंथांचा साकल्याने विचार करून निर्माण झालेला इ. सनाचाच्या तिसऱ्या चौथ्या शतका-तील अमरसिंहाचा अनुष्टुभ् छंदात रचलेला *नामलिंगानुशासन* किंवा *अमरकोश* हा संस्कृत कोशग्रंथातील महत्त्वाचा कोशग्रंथ मानावा लागेल.

## मध्ययुगीन मराठी कोशरचना

मराठीमध्ये संस्कृतच्या तुलनेने कोशग्रंथांचा प्रपंच बराच अव्यवस्थित व क्षीण आहे असे म्हटले पाहिजे. उपलब्ध असलेल्या महानुभावीय ग्रंथांचे शब्दसंग्रह *टीपग्रंथ* या नावाने ओळखले जातात. या टीपग्रंथांचा शब्दकोश या दृष्टीने विचार केला तर त्यांचा अव्यवस्थित-पणाच लक्षात राहतो. *ज्ञानेश्वरी*सारख्या महत्त्वाच्या ग्रंथातील शब्दांचे अर्थ स्पष्ट करण्या-साठी निर्माण झालेले टिपणग्रंथ किंवा जमाखर्चाच्या आवश्यकतेतून निर्माण झालेली मेस्तके, शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून तयार झालेला *राज्यव्यवहारकोश* इत्यादी कोशग्रंथांचे स्वरूप भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने व्यापक नसून मर्यादीतच आहे. एकभाषिक शब्दार्थकोश म्हणून *भाषाप्रकाश* व *अकारादी प्राकृत भाषेचा निघंटुकोश* इत्यादी जी कोशरचना उपलब्ध झाली आहे त्यांची रचना अशीच मर्यादित स्वरूपाची आहे. *भाषाप्रकाश* मुख्यत्वेकरून लहान मुलास शिकविण्यासाठी व *अकारादी निघंटु* तंजावरसारख्या द्राविड प्रांतात राहणाऱ्या मराठी भाषिकांना उपयोगी पडावा यासाठी रचलेला आहे.

## शास्त्रीय बैठकीची जोड

म्हणूनच कोशरचनेचा शास्त्रीय दृष्टीकोणातून विचार करावा लागतो तो पाश्चात्यांच्या भारतातील आगमनानंतरच. अठराव्या शतकात भारतात आलेल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांना व अभ्यासकांना संस्कृत व प्राकृत भाषा अनेक कारणांमुळे अभ्यासाव्या लागल्या. एतद्देशियांच्या भाषा व संस्कृती चांगल्या रीतीने आत्मसात केल्याखेरीज त्यांच्यावर न्यायाने व नीतीने राज्य करता येणार नाही असे त्यांना वाटले. या अभ्यासातूनच या देशात ख्रिस्तसंदेश व ख्रिस्ताचे राज्य सुरू होईल या प्रबळ विश्वासापोटीच कोश व व्याकरणरचनेचे प्रचंड कार्य त्यांनी या देशात केले असले तरी यंत्रयुगाच्या उदयामुळे सोळाव्या शतकापासून पाश्चात्य राष्ट्रात जी

एक विलक्षण ज्ञानलालसा जन्माला आली होती तिच्यातूनच त्यांनी भाषा व व्याकरण यांच्या अभ्यासाचे एक अभिनव पर्व सुरू केले. शास्त्रीय अभ्यासाचा काही शतकांचा परिपाक त्यांच्या हिंदुस्थानातील कोशरचनेच्या कार्यामागे उभा होता. त्यामुळे सुमारे ३०–४० वर्षातच मराठी कोशरचनेचा एक प्रचंड उद्योग त्यांनी महाराष्ट्रात केला. त्यापाठीमागची शास्त्रीय दृष्टी, जिद्द, ईर्ष्या, जिज्ञासा इतकी मोठी आहे की त्यानंतरच्या १००–१२५ वर्षांत त्यांनी केलेल्या कामाचे स्थूल संक्षपीकरण, अनुकरण यावरतीच आपल्या कर्तृत्वाची इतिश्री होत असताना दिसते.

**अव्वल इंग्रजीतील सुरवातीचे प्रयत्न**

मराठी भाषेच्या कोशवाङमयाची सुरूवात महाराष्ट्राबाहेर झाली. कलकत्याजवळ सेरामपूरजवळ राहणाऱ्या डॉक्टर विल्यम कॅरे या ख्रिस्ती मिशनऱ्याने इ. स. १८१० मध्ये मराठी भाषेचा पहिला कोश रचला. तो छापण्यासाठी त्याला देवनागरी टाईप उपलब्ध न झाल्याने त्याने तो मोडीत छापला आहे. हिंदूस्थानातल्या प्रचलित असलेल्या भाषा समजण्यासाठी संस्कृत भाषेची आवश्यकता आहे अशी त्याची धारणा होती त्यामुळे त्याने आपल्या कोशात संस्कृत शब्दांना प्राधान्य दिले. हा कोश रचताना कॅरेला नागपूरकडच्या विद्यानाथ किंवा वैजनाथ पंडित नावाच्या मराठी गृहस्थांची मदत झाली होती. कॅरेची मराठी भाषेबद्दलची अनभिज्ञता, कलकत्त्यासारख्या दूरच्या ठिकाणी त्याचे वास्तव्य, यामुळे त्याच्या कोशात मराठी लोकांच्या बोलण्यात न येणारे अनेक शब्द आले आहेत व त्याबद्दल त्याला नंतरच्या कोशकारांनी दोषही दिला आहे.[३].

यानंतर कॅप्टन केपन याने एक मराठी-इंग्रजी कोश तयार करण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी त्याने रजा व मदतही मागितली होती. व्यापक प्रमाणावर, सर्व प्रकारच्या उपयोगासाठी सर्व प्रकारच्या लोकांशी संबंध आणून कोश तयार करण्याची त्याची योजना होती. भाषा समजून घेऊन शब्द गोळा करून कोश तयार करण्यास त्यास रजा हवी होती. पण सरकारने त्याची योजना उचलून धरली नाही व अन्य सहकार्य मिळाले नाही. त्यामुळे हा कोश तयार झाला नाही.[४]

कॅप्टन केपनपूर्वी दिपनायगम नावाच्या एका इसमाने इ. स. १८१३ पासून डॉ. जॉन्सनच्या इंग्रजी कोशाचे मराठीत भाषांतर केले होते. सुमारे वीस हजार शब्दांची त्याची योजना होती· मालवण शहरात त्याचे काम सुरू होते. सरकारकडून काही मदत मिळावी म्हणून त्याने आपल्या कोशाचा काही भाग अवलोकनार्थ इ. स. १८२४ मध्ये पाठविला. सरकारी तज्ज्ञांनी तो कोश सदोष ठरविला. पुढील कोशरचना सोपी होईल म्हणून तो कोश विकत घेण्यास सरकार तयार होते. तज्ज्ञांच्या मताप्रमाणे कोशकर्त्याचे इंग्रजी व मराठी पक्के नसल्याने कोशातील शब्द, म्हणी, वाक्प्रचार यांचे अचूक अर्थ दिले नव्हते. शब्दांची निवड असमंजस, काही नित्याच्या वापरातले तर काही क्वचित वापरातले, तसेच अर्थ देताना पद्धत व अर्थ शहाण्यांना शोभणारा नव्हता. म्हणी, वाक्प्रचार यांचा इंग्रजी अर्थ अचूक नव्हता. शब्दार्थ अचूक देणे हे शब्दकोशाचे कार्य उपरोक्त कोश पूर्ण करू शकत नव्हता हा

मथितार्थ. शब्दकोशकर्त्याचे इंग्रजी व मराठीचे ज्ञान प्रभुत्व आलेले नाही म्हणून प्रस्तुत कोश छापला गेला नाही.[५]

इ. स. १८१५ साली कॅप्टन हचिन्सन याने एक इंग्रजी-मराठी कोश रचण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. त्याने युद्धात सेनापतीचा दुभाषी म्हणून काम केले होते. त्यावेळी त्यास मराठी भाषेच्या ज्ञानाचा खूपच उपयोग झाला होता. महाराष्ट्रात पेशवे राज्य करीत होते. पेशव्यांचे व इंग्रजांचेमध्ये युद्धजन्य परिस्थिती निर्माण झाली होती. त्यामुळे हचिन्सच्या कोशरचनेची आवश्यकता निर्माण झाली होती. त्याचप्रमाणे मराठी भाषा विस्तृत प्रदेशात बोलली जात होती व मराठ्यांशी इंग्रजांचे राजकीय संबंध वाढत होते. त्यामुळे मराठी भाषेच्या सुलभ ज्ञानप्राप्तीसाठी असा कोश रचण्याचे हचिन्सनच्या मनात आले. आपल्या सैन्यातील नोकरीतील कामात त्याला मराठी भाषेचा पुष्कळ अनुभव आला होता. त्याचा उपयोग करुन घेऊन जॉन्सनच्या कोशाप्रमाणे आपल्या कोशाची रचना करावी असे त्याने ठरविले होते. विज्ञानविषयक पारिभाषिक शब्दांना मराठीत प्रतिशब्द नाहीत म्हणून तेवढे शब्द वगळून वरीलप्रमाणे हा कोश त्यास रचावयाचा होता. असा शब्दकोश चांगला व उपयुक्त होईल अशी त्याची खात्री होती. या शब्दकोशाचा नमुना त्याने मुंबई सरकारच्या परीक्षणार्थ पाठविला. देखील. सरकारने त्यावर अभिप्राय मिळावा म्हणून एक त्रिसदस्य समितीकडे तो पाठविला. आर. टी. गुडविन, जॉन टेलर व एफ्. बार्डन हे तिघेजण समितीत होते. इंग्रजी-मराठी शब्दकोशाप्रमाणेच मराठी-इंग्रजी शब्दकोश तयार करण्याचा विचार हचिन्सन करीत होता. त्या कोशात ५० हजार शब्द, म्हणी व वाक्संप्रदाय अंतर्भूत करण्याची त्याची योजना होती. यासाठी खर्चाचा अंदाज ७५,००० रुपये त्याने बांधला होता. त्यासाठी ईस्ट इंडिया कंपनीने आर्थिक मदत करावी किंवा वर्गणी काढून संक्षिप्त छापावा अशा त्याच्या काही कल्पना या कोशाबाबत होत्या. हचिन्सनने सरकारला सर्व कळवूनही प्रस्तुत कोश प्रसिद्ध झाला नाही. सरकारने या कोशाच्या दोनशे प्रती घेण्याचे समितीच्या सल्ल्याने मान्य केले होते. शिवाय प्रतींची विक्रीची किंमत पण अगाऊ देण्यात येणार होती. हचिन्सन इ. स. १८२४ मध्ये निधन पावला. त्याच्या हातून या शब्दकोशाचे काम झाले नाही.[६]

त्यानंतर व्हॅन्स केनेडी याने मराठी-इंग्रजी व इंग्रजी-मराठी हा जोडकोश इ. स. १८२४ मध्ये तयार करून सरकारकडे पाठविला.या कोशाबद्दल सरकारने केनेडीस धन्यवाद व १५,००० रुपये बक्षीस दिले. कोशाच्या एक हजार प्रती छापविल्या. प्रत्येक प्रतीची किंमत अकरा रुपये ठेवण्यात आली होती. प्रस्तुत कोशात आठ हजार शब्द असून त्यात देवांची नावे, धार्मिक चालीरीती इत्यादी देखील आले आहेत. ऑस्किंन कॉकचा शब्दसंग्रह, विल्सनचा संस्कृत भाषेचा कोश, *अमरकोशाच्या* मराठी भाषांतराचा कोश वगैरेच्या मदतीने प्रस्तुत कोश करण्यात आला. सुशिक्षित एतद्देशियांच्या बोलण्यात असलेल्या मराठी भाषेचा हा शब्दकोश आहे. यात संस्कृत शब्द कमी तर अरबी, फारशी व हिंदी शब्दांचा प्रभाव जास्त दिसून येतो. परभू या शब्दाचा अर्थ केनेडीने आपल्या कोशात 'A name assumed by the men of the Shenava caste whose general occupation is that of clerks. They

consider themselves to be brahmin' असा दिला आहे. त्या काळी या अर्थाबद्दल काही लोकांनी आक्षेप घेतला. पण सरकारने त्याची दाद घेतली नाही.[७] केनेडीच्या या कोशाचे आधारग्रंथ म्हणजे सरकारी कागदपत्रातून व अर्ज वगैरेतून त्यास आढळून आलेले शब्द. याशिवाय ऑस्किंन कॉकच्या जवळचे त्याच्या मुन्शीनी तयार केलेले हस्तलेख होते. केनेडी यास मराठी भाषेचे फारसे ज्ञान नव्हते कारण कोशाच्या प्रस्तावनेतच त्याने म्हटले आहे की, मराठी 'नुसती बोली आहे; तीत गद्यपद्य ग्रंथ मुळीच नाहीत व ही बोलणारे लोक शेतकरी असल्याने शास्त्र, धर्म इ. च्या कल्पना दुसऱ्या भाषेतील उसन्या आहेत!' याला ज्ञानेश्वर, मुकुंदराज, रामदास, एकनाथ वगैरे मागील काळातील कवी जरी ठाऊक नसले तरी होनाजी, निदान त्याच्या वेळी जिवंत असलेला शाहीर प्रभाकर हा सुद्धा माहीत नसावा हे मोठे आश्चर्य आहे! त्याच्या कोशात घोडागाडी, शेतवाडी, नोकरचाकर असले सामासिक शब्द आढळत नाहीत. कारण 'मराठी भाषेत एकही सामासिक शब्द नाही' अशी त्याची धारणा होती. या कोशावर, त्याच्या अपुरेपणावर स्टीव्हनसन याने टीका केली. त्याच्या म्हणण्याचा आशय असा की प्रस्तुत कोश मराठी भाषेच्या अभ्यासकांची शब्दार्थाची भूक भागविण्यास अपूरा आहे. प्रचारातील व अनेक उपयुक्त शब्दांचा अर्थ त्याने दिलेला नाही.

### शास्त्रीमंडळींचा कोश

सुरवातीच्या या प्रयत्नानंतर या देशातील शास्त्रीमंडळींनी तयार केलेला पहिला अतिशय महत्वाचा असा *महाराष्ट्र भाषेचा कोश* या नावाचा एकभाषीय कोश जन्माला आला. '१९ व्या शतकापासून आजतागायत कोश या प्रौढ नावाला शोभणारा असा हा कोश आहे.'[८] या कोशाचा प्रथम भाग (अ ते न) इ. स. १८२९ मध्ये मुंबई शिक्षण मंडळीच्या शिळा छापखान्यात छापला आहे. जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, रामचंद्रशास्त्री जानवेकर, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामशास्त्री गोडबोले यांनी शिक्षा मंडळीच्या आज्ञेवरून हा कोश रचला. या कोशाला आधारभूत ग्रंथ दिले नाहीत. 'महाराष्ट्र भाषा म्हणजे महाराष्ट्र प्रदेशी राहाणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलावयाची प्राकृत भाषा' याप्रमाणे कोशकारांनी मराठी भाषेची व्याख्या केली आहे. 'आजपर्यंत ह्या भाषेवर कोश, व्याकरण करावयास कोणी प्रवृत्त झाला नाही हे मनात आणून सर्व लोकांचे कल्याणार्थ राजकार्य धुरंधर प्रजापालनैकरत हानरबल मौंट स्युवर्त एलफिस्तन-साहेब पात्रण आणि गवर्नर यांनी मुंबईतील शिक्षा शाळामंडळीस आज्ञा करून हा ग्रंथ आरंभिला. जनरल सिरजान मालकमसाहेब यांच्या हातून शेवटास नेला', अशी सुरवातीसच भूमिका दिली आहे. लोकव्यवहारात आढळत असलेल्या शब्दांची जोड या कोशात मोठ्या कसोशीने व जाणकारीने केली आहे प्रमाणभाषा व बोलीभाषा यातील शब्दांचे वेगळेपण याचे त्यांना चांगले ज्ञान आहे. पुणे व पुण्याच्या आसपास बोलली जाणारी मराठी ही साधारणतः प्रमाणभाषा मानण्यात आली आहे व बाकीच्या प्रांतिक भाषात आढळणाऱ्या वेगळेपणाची नोंद केली आहे. फारशी, अरबी वगैरे भाषाशब्दांवर त्यांचा विशेष कटाक्ष आहे. राजकीय

व्यवहार म्हणून ते मराठी भाषेत आले असले तरी पण प्रौढभाषेत अयोग्य म्हणून ते वगळण्यात आले आहेत. कोकणी, राजापुरी, वाडी या तीन पोटभाषातील शब्द, म्हणजे पर्यायाने आज ज्याला कोकणी म्हणतो त्याच्यातील शब्द फारच थोडे घेतले आहेत, तसेच वनस्पती, खाद्य, प्राणी इत्यादीबद्दलचे फार थोडे शब्द यात आले आहेत. प्राचीन काव्यातील तुरळक शब्द यात आढळतात. व्युत्पत्ती तर जवळ जवळ नाही. तसेच अवतरणे, ऐतिहासिक व इंग्रजीरूढ शब्द घेतलेले नाहीत. शब्दांचे अर्थ व्याख्यारूपाने पंडिती भाषेत दिलेले असल्याने ते क्लिष्ट व बोजड झाले आहेत. युरोपियन पंडितांच्या उपयोगासाठी हा कोश झाल्याने व अशा प्रकारचा तो पहिलावहिला असल्याने हे वरील दोष निर्माण होणे साहजिकच आहे. इ. स. १८३१ मध्ये या कोशाला पुरवणी खंड जोडण्यात आला. हा कोश अत्यंत विस्तृत असून त्यात महाराष्ट्राच्या सर्व भागात प्रचलित असलेले अधिकात अधिक शब्द समाविष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. या कोशासंबंधी तत्कालीन वाङमयात अनेक गैरवापर उल्लेख आढळतात. याची प्रस्तावना प्रौढ व मार्मिक आहे'.[५]

## मोल्सवर्थचा अनुल्लंघ्य मानदंड

त्यानंतरचा महाराष्ट्रातील कोशवाङमयाचा सर्वात लक्षणीय प्रयत्न म्हणजे मोल्सवर्थचा होय. *A Dictionary Marathi and English* ही ती रचना. याचे संपादन जे. टी. मोल्सवर्थ यानी केले. त्याचे मदतनीस मेजर कँडी होते. तो कोश बॉम्बे एज्युकेशन सोसायटीने इ. स. १८३१ मध्ये प्रसिद्ध केला. प्रस्तुत कोश व शास्त्र्यांचा कोश बरोबरच तयार होत होते. पण शास्त्र्यांचा मराठी-मराठी कोश अगोदरच इ. स. १८२९ ला बाहेर आला. मोल्सवर्थने आपल्या कोशरचनेस पुढील ग्रंथांचा आधार घेतला होता.

(१) विल्सनकृत *संस्कृत-इंग्रजी कोश*, (२) एल्. डी. रीडकृत *कोंकणी शब्द* (हस्तलिखित), (३) डॉ. कॅरेचा *कोश*, (४) बापुदेव याचे *ज्योतिषविषयक संस्कृत शब्द* (५) गणेश मनोहरचे *वाक्प्रचार व म्हणी*, *साईक्स व वनस्पति शब्द*, स्टीव्हन्सनचे *शेतकी शब्द* इ. इ.

मोल्सवर्थला पहिल्या आवृत्तीचे काम करण्यास सहा वर्षे लागली. सरकारी मदत होती म्हणून खेड्यापाड्यातून सरकारी शब्द जमविण्यात आले. याही कोशात शास्त्रीमंडळींप्रमाणे प्राचीन काव्यातील फारसे शब्द घेण्यात आले नाहीत. मात्र शास्त्रीमंडळींचे मराठी भाषेचे ज्ञान व मोल्सवर्थ-कँडी यांचे कोशविज्ञान यांचा विलक्षण परिणामकारक संयोग या कार्यात झाला आहे. शास्त्र्यांनी सांगितलेले शब्द आत्मसात करून त्याचे नेमके इंग्रजी पर्याय देण्याच्या कामी मोल्सवर्थच्या भाषाज्ञानाचे खरे सामर्थ्य या ठिकाणी पणास लागले आहे.

मोल्सवर्थ हा लष्करात भाषापंडित (linguist) काम करीत असे. हॉन्स केनेडीच्या कोशातील अपुरेपणा लक्षात घेऊन अतिशय व्यापक बैठकीवर कोशरचना करण्याचे त्याने ठरविले व आपल्या योजनेचा विस्तृत आराखडा त्याने शासनाला सादर केला. त्याच्या अविरत प्रयत्नाने शासनाने अखेर तो संमत केला व त्याच्यावर ही प्रचंड कामगिरी विश्वासाने

सोपविली. कामाचा व्याप इतका प्रचंड आणि तो अचुक अशा शास्त्रीय पद्धतीने मांडण्याची त्याची जिद्दही अशी विलक्षण, की त्याच्या हाती काम करणाऱ्या शास्त्रीमंडळींना तो झेपेनासा झाला, म्हणून त्याच्या विनंतीनुसार शासनाने थॉमस कँडी याची त्याच्या हाताखाली नेमणूक केली. मोल्सवर्थबरोबर काम करता करता कँडीही आजारी पडला व प्रकृतिस्वास्थ्यासाठी त्याला विलायतेस जावे लागले, तेव्हा शासनाने मोल्सवर्थच्या विनंतीनुसार जॉर्ज कँडी यास मदतीस दिले. अशा भगीरथ प्रयत्नाने हा कोश एकदाचा सिद्ध झाला. तो मोल्सवर्थला हव्या त्या स्वरूपात मुद्रित करणे हे त्यापुढचे सगळयात मोठे दिव्य होते. मराठी-मुद्रणकलेच्या इतिहासातील एक चमत्कार असे त्याचे आज वर्णन करावे लागते. कै. अ. का. प्रियोळकर यांच्याशी या कोशाबाबत त्यांच्या मृत्यूपूर्वी बोलण्याचा प्रसंग आला होता. मोल्सवर्थच्या कोशाचे पुनर्मुद्रण करण्यासंबंधी त्यांना विचारण्यात आले असता मोल्सवर्थने तो जितका शुद्ध छापून घेतला आहे तितका आज छापला जाईल, याची त्यांना शाश्वती वाटत नव्हती. म्हणूनच हा कोश यथामूल पद्धतीने छापण्याची व्यवस्था आता पुण्याच्या 'सारस्वत' प्रकाशनाने हाती घेतली आहे. मोल्सवर्थ हा मराठी भाषेत चांगला मुरलेला होता व त्याच्याबरोबर त्यास 'संस्कृत, हिंदुस्थानी, फारशी, ग्रीक, लॅटीन इ. भाषा चांगल्या अवगत होत्या'[१०] व इंग्रजी भाषेचा व जॉन्सनच्याकोशरचनेचा त्याचा अभ्यास अतिशय सूक्ष्म होता, म्हणूनच एवढे मोठे कार्य तो करू शकला. मोल्सवर्थने हा कोश तयार करण्यासाठी एवढे श्रम घेतले होते को त्यास नंतर प्रकृती सुधारण्यासाठी सहा महिन्यांची रजा काढावी लागली.

या कोशात साधित शब्द, शब्दाचे वाक्प्रचार, म्हणी, त्या त्या शब्दाखाली दिले आहेत. व्युत्पत्तिदर्शक अरबी, फारसी, उर्दू, हिंदी शब्द कंसात फारसी लिपीत लिहून पुढे अर्थ इंग्रजीत दिला आहे. दुसऱ्या आवृत्तीत प्रांतिक पोटभाषेतील व देशी शब्दांचा भरणा पहिल्यापेक्षा थोडा जास्त आहे. यात अवतरणे थोडी असून ग्रंथातील अवतरणांचा स्थलोल्लेख नाही. दुसरीमध्ये पहिलीतील अनावश्यक संस्कृत शब्द गाळले आहेत. दुसरी आवृत्ती इ. स. १८५७ मध्ये प्रसिद्ध झाली असून तीतील शब्दसंख्या ६० हजार आहे. पहिलीत ४० हजार शब्द होते. इंग्रजी अपभ्रष्ट शब्द जे पुष्कळ प्रचारात होते त्यापैकी काही घेतले आहेत; पण रैटर, सक्रटारी, प्रभुसर, कलकटर असे सोडले आहेत. व्युत्पत्ति जेथे सहज आढळली तेथे दिली आहे. अशिष्ट शब्दही दिले आहेत. कारण खालच्या वर्गातील लोकांच्या तोंडी ते पुष्कळ आढळतात. शब्दाचा अर्थ देताना प्रथम धात्वर्थ आणि जुना अर्थ व मग त्याचे लाक्षणिक वगैरे इतर अर्थ दिले आहेत. मराठी मूळ शब्द २० हजार असावेत व मग साधारणत: पुढे साधितरूपाने किंवा लाक्षणिक रूपाने त्यांचा पुष्कळ विस्तार झाला असावा. असल्याप्रकारचे जितके जमविले तितके शब्द दिले आहेत. महाराष्ट्रात ठिकठिकाणी ब्राह्मण लोक नेमून त्यांच्याकडून त्या त्या ठिकाणचे शब्द गोळा केले, ते पुष्कळ होते. त्यातील द्विरुक्तीचे, बिनकामाचे इ. शब्द गाळून एकंदर २५ हजार झाले. नंतर त्यावर निरनिराळे संस्कार होऊन (क्रियापदे, विशेषणे, साधित शब्द, सामाजिक शब्द इ.) त्यांची संख्या ४० हजार झाली. ही संख्या पहिल्या आवृत्तीत

होती. तपासण्यासाठी ३ वेळा शब्दाची छाननी होई. प्रथम शब्दाचे व्याकरण, अर्थ, प्रांत वगैरे ठरवीत; नंतर त्याचे आधार, अवतरणे, म्हणी, वाक्प्रचार घेत आणि शेवटी सर्व प्रकारचा मजकूर जुळवून जेथील तेथे लिहून काढीत. यासाठी संपादकांचे तीन वर्ग केले होते. हा अवाढव्य कोश रचण्याचा खरा हेतू ख्रिस्ती धर्मप्रचार (प्रोपेगेशन ऑफ दि गॉस्पेल) असून तो लपविलेला नाही.[११]

मोल्सवर्थच्या या कोशाची पहिली आवृत्ती संपल्यानंतर त्याच्या दुसऱ्या आवृत्तीच्या परिष्करणासाठी मोल्सवर्थला सरकारने पुन्हा भारतात बोलाविले.[१२] त्यानंतर मोठ्या प्रमाणात परिष्करण करून मोल्सवर्थने पुन्हा तितक्याच शुद्ध रीतीने ह्या कोशाची दुसरी आवृत्ती इ. स. १८५७ मध्ये गव्हर्नमेंट छापखान्यात छापली. मोल्सवर्थने त्यात पूर्वीपेक्षा पुष्कळ फेरफार केला आहे. याच्या आरंभी डॉक्टर विल्सन यांचा अभिप्राय आहे. मोल्सवर्थचे हे कोशरचनाकार्य त्याची कीर्ती भरतखंडात अक्षय ठेवणारे राहील असा सार्थ विश्वास *ज्ञानोदयाने* व्यक्त केला आहे.[१३]

### मोल्सवर्थकडून कँडीकडे

मोल्सवर्थच्या हाताखाली कोशकार्यात तयार झालेल्या थॉमस कँडीला स्वतंत्र रीतीने कोशसंपादन करण्याची एक महत्त्वाची संधी मिळाली व त्या संधीतून आणखी एक महत्त्वाचा कोशग्रंथ साकार झाला. तोच कँडीचा इंग्रजी मराठी कोश होय. या शब्दकोशाची योजना मोल्सवर्थनेच केली होती व शब्दकोश तयार करण्यास कँडी त्यास सहाय्य करीत होता. परंतु पुढे मोल्सवर्थ आजारी पडल्याने या शब्दकोशाचे काम तसेच अपूरे राहिले. अखेर मुंबई सरकारने तो पुरा करण्याचे काम कँडीवरच सोपविले. कँडीने या शब्दकोशाचे काम सुरू केल्यानंतर तो पूर्ण करण्यास त्यास सात वर्षे लागली. अशारीतीने मोल्सवर्थच्या नादुरूस्त प्रकृतीमुळे अपुरा राहिलेला हा कोश कँडीने पुरा केल्यावर सरकारमार्फत तो इ. स. १८४७ मध्ये प्रसिद्ध झाला. आपल्या दृष्टीपुढे या देशातील इंग्रजी भाषा शिकणारे एतद्देशीय लोक व मराठी भाषा शिकणारे युरोपियन लोक ठेवूनच कँडीने त्याची रचना केली आहे. इंग्रजी भाषेतील फळे, फुले, पशु व पक्षी या गोष्टी मराठी भाषेत नाहीत व ज्या शब्दांना मराठी भाषेत प्रतिशब्द नाहीत असे शब्द या शब्दकोशातून कँडीने गाळले आहेत. टॉडकृत जॉन्सनचा इंग्रजी कोश, प्रथम उतरवून त्यापुढे मोल्सवर्थने आपल्या मराठी-इंग्रजी कोशातील मराठी शब्द निवडून तो जॉन्सनच्या शब्दापुढे ठेवण्याची मोल्सवर्थची मूळ योजना होती; तीच कायम ठेवून कँडीने हे काम पुरे केले. त्यामुळे क्रियापदाच्या विविध रूपांची मांडणी जॉन्सनच्या धर्तीवर आहे. 'समानार्थक शब्दांपैकी जे विशेष प्रचारात आहेत त्या ठिकाणी सर्व निरनिराळ्या तऱ्हेचे अर्थ देऊन पुढील निरनिराळ्या समानार्थक शब्दांचा अर्थ देताना त्या पहिल्या शब्दाचा संदर्भ दिलेला आहे. त्यामुळे जागा बरीच वाचली. इंग्रजी भाषेत मराठी भाषेतल्या पुष्कळशा वाक्प्रचारांना व बोलीतील शब्दांना समानार्थक वाक्प्रचार व शब्द मुळातच आढळत नाहीत. परंतु मराठी भाषेचा अभ्यास करणाऱ्या इंग्रज विद्यार्थ्यांना या मराठीतील खाचाखोचांचा पूर्ण

परिचय व्हावा म्हणून त्यांची इंग्रजीत भाषांतर करून सोय केली आहे. मोल्सवर्थच्या मनात प्रथम थिसॉरस (समानार्थक शब्दकोश) च्या धर्तीवर प्रस्तुत कोश रचावयाचा होता परंतु ते न जमल्याने सांप्रतच्या स्वरूपात कोश तयार केला. पण कोशाचे बरेचसे स्वरूप थिसॉरसच्या धर्तीवर राहिले. त्यामुळे ज्या इंग्रजाला मराठीचे थोडेफार ज्ञान असेल त्यालाच या कोशाचा उपयोग होण्याची शक्यता आहे.[१४] कँडीच्या या कोशाच्या १,४०० प्रती छापल्या होत्या. त्यापैकी १८५२ सालापर्यंत १,०१३ प्रती खपल्या व ३८७ प्रती शिल्लक राहिल्या तेव्हा या कोशाची नवी आवृत्ती काढण्याचा सरकारने विचार सुरू केला. पण नंतर शालेय कोशच करावा व त्याची किंमत १ रुपयाहून अधिक नसावी असे ठरले.

### तळेकरांचा कोश

इ. स. १८५८ मध्ये विद्याखात्याच्या प्रमुखाने मेजर कँडीकडे कलकत्याला छापलेला एक इंग्रजी-उर्दू कोश पाठवून दिला व त्या धर्तीवर विद्यार्थ्योपयोगी एक कोश तयार करण्यास सांगितले. त्याप्रमाणे कँडीने श्रीकृष्ण रघुनाथ तळेकर यांच्याकडून एक कोश तयार करवून घेतला आणि तो *इंग्लिश व मराठी कोश* या नावाने इ. स. १८६१ मध्ये छापला. या कोशात तत्कालीन इंग्रजी शाळांमधून वापरल्या जाणाऱ्या सर्व इंग्रजी पुस्तकातील सर्व शब्द यावेत अशी काळजी कोशकर्त्याने घेतली. त्यासाठी कँडी, मोल्सवर्थ, वेब्स्टर वगैरेंच्या कोशांचा तळेकरांनी उपयोग करून घेतला. शक्य तितके संस्कृत शब्द टाळून इंग्रजी शब्दास जास्त सुटसुटीत असे मराठी पर्याय देण्याची धडपड तळेकरांनी केली आहे.

### बाबांचा पहिला कोश

तळेकरांचा कोश एकीकडे तयार होत असतानाच बाबांच्या मनात कँडीच्या धर्तीवर परंतु सर्वसामान्यांना परवडेल अशा पद्धतीने कोशरचना करण्याचे घाटत होते. कँडीशी घनिष्ठ संबंध असलेला लक्षात घेऊन कँडीच्याच कोशाचा संक्षेप करावा, या भूमिकेने त्यांनी आपल्या कामाला सुरुवात केली व *ज्ञानोदयात* पुढीलप्रमाणे जाहिरातही दिली.

> या कोशांत २२,००० पेक्षां अधिक इंग्लिश शब्द आहेत. म्हणजे मूळ ग्रंथापैकी केवळ एक अष्टमांश इतके मात्र सोडले आहेत. इंग्लिश शब्दांचे सर्व अर्थ मराठीत सांगितले आहेत. मराठी उपशब्द किंवा पर्यायशब्द उपयोगी पडण्याजोगे निवडून घेतले आहेत.
>
> | किंमत | रुपये |
> |---|---|
> | आगाऊ देणारास | ३॥ |
> | मागाहून विकत घेणारास | ४ |
>
> आगाऊ पैसा देणारास पुस्तकाचे टपाल हशील पडणार नाही. हा शब्दकोश मि. थॉमस ग्राहम याच्या नामांकित छापखान्यात तयार होत आहे.[१५]

कँडीच्या कोशाचे संक्षेपीकरण करीत आहोत. असे सोयीसाठी बाबांनी म्हटले असले तरी त्यांनी हा कोश रचताना कँडीबरोबरच मोल्सवर्थ, वेब्टर, रीड, क्लार्क, रिचर्डसन् कोश,

बायबल, इंग्रजी भाषेतील विविध शास्त्रीय ग्रंथ यांचा भरपूर उपयोग करून घेतला होता. या कार्यात त्यांना किती प्रयास पडले व मनःस्ताप झाला हे त्यांनी प्रस्तावनेत खालील प्रकारे नमूद केले आहे.

ग्रंथकर्त्यापाशी बहुत विद्या नाही. जे अल्पस्वल्प विद्याधन व बुद्धिधन त्याजपाशी आहे त्याच्या भांडवलावर लोकहितार्थ हा व्यापार केला आहे. त्याला कोणी विद्वानांनी या कार्यात सहाय्य केले नाही. ग्रंथाच्या आरंभी असे सहाय्य मिळावे म्हणून पैसा खर्च करून वर्तमानपत्रात जाहिराती दिल्या होत्या. परंतु त्याजकडे कोणी लक्ष दिले नाही. त्यामुळे जे काही करावयाचे होते ते एकट्यानेच पुस्तकाच्या सहाय्याने व स्वतःच्या शोधाने करावे लागले. तथापि ग्रंथकर्त्याने आपल्याकडून होतील तितके श्रम व शोध करण्यांत काही कसर केली नाही.[१६].

तसेच बाबांनी या संदर्भात प्रस्तावनेतच

"भग्न पृष्ट कटि ग्रीव स्तब्ध दृष्टिरधोमुखं
कष्टेन लिखितं ग्रंथं यत्नेन प्रतिपालयेत्"

हा श्लोक देऊन आपली व्यथा व भूमिका स्पष्ट केली आहे.

या कोशाची पहिली आवृत्ती इ. स. १८६० मध्ये तयार झाली.[१७] त्यानंतर सुधारून वाढविलेली आवृत्ती (दुसरी आवृत्ती) तयार करण्यासाठी बाबा पदमनजींनी पुढील जाहिरात *ज्ञानोदयात* दिली. त्यावरून दुसऱ्या आवृत्तीचा विशेष लक्षात येतो.

**Compendium of the English and Marathi Dictionary : Notice**

**इंग्लिश आणि मराठी कोशाचा संक्षेप**

ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्ती पुष्कळ सुधारून व वाढवून तयार होत आहे. तरी तिच्या कर्त्याची सर्व विद्वज्जनास अशी विनंती आहे की, त्यांच्या विद्याभ्यास क्रमांत अथवा वाचन क्रमांत त्यांस सांपडलेले, जे अनेक विषयांचे पारिभाषिक शब्द त्यांच्या संग्रहास असतील व जे आजपर्यंत छापून प्रसिद्ध झालेल्या कोणत्याहि इंग्लिश व मराठी कोशांत नसतील ते (इंग्लिश व मराठी अर्थसहित) त्याजकडून कृपा करून पाठवून द्यावे म्हणजे त्यांचा समावेश या आवृत्तीत केला जाईल. सूचनार्थ कित्येक विषयांची नांवे लिहितो. वैद्यकशास्त्र, रसायन-शास्त्र, खगोल, कृषिकर्म, शारीरमनोधर्मशास्त्र, पशुपक्ष्यांची नांवे, कायदेप्रकरणी शब्द इत्यादी. याबद्दल पत्र पाठविणे झाल्यास तिकीट लावून खाली सही करणारास इंदापूर येथे पाठवावे. ज्यान्युअेरी सन १८६५. बाबा पदमनजी.[१८]

या जाहिरातीवरून बाबा पदमनजी आपला हा कोश तयार करताना किती दक्ष होते व कोशात अद्यावतपणा यावा म्हणून किती प्रयत्नशील होते हे दिसून येईल. दुसरी आवृत्ती प्रसिद्ध होण्यापूर्वी वेळोवेळी त्यासंबंधाने *ज्ञानोदयात* माहिती प्रसिद्ध होत असे. १ ऑक्टोबर १८६८ च्या *ज्ञानोदयात* दुसऱ्या आवृत्तीची सविस्तर माहिती आली आहे. १८६९ मध्ये 'इंग्लिश आणि मराठी कोश छापण्याचे काम ¾ झाले आहे. बाकीचे काम पूरे होण्यास सुमारे दोन महिने लागतील' असे म्हटले आहे.[१९] इ. स. १८७० च्या एप्रिल महिन्यात या दुसऱ्या

आवृत्तीचे *ज्ञानोदयात* परीक्षण आले होते. *ज्ञानोदय*कार म्हणतात,

> हा ग्रंथ आम्ही लक्ष्यपूर्वक पाहिला. त्यावरून आम्हांस आनंद झाला. आम्हास वाटते की, आजवर या प्रकारचे जे ग्रंथ झाले त्यांत सर्वांत हा उत्तम आहे. या कोशाची रचना अशी उत्कृष्ट केली आहे की, तेणेकरून थोडक्यामध्ये पुष्कळ शब्द वगैरेच समावेशा करता आला. तरी छाप इतका स्वच्छ व मोकळा आहे आणि मुख्य शब्द असे ठळक आहेत की पहिजे तो शब्द व पाहिजे ती व्याख्या पटकन सापडती. ग्रंथकर्त्याने वेळवेळ तितक्या ग्रंथांचे सहाय्य घेतले व कोश केला. हे फार चांगले केले. त्यांनी वेब्स्टरकृत थोरल्या अमेरिकन इंग्लिश कोशाची शेवटची आवृत्ती व अलीकडेस झालेले दुसरे कोश वगैरे ग्रंथ यांची यथेच्छ मदत घेतली, यावरून शब्दाचे अर्थ व व्याख्या भरपूर उत्तम प्रकारच्या झाल्या आहेत. तरी पण दुसऱ्या ग्रंथांतून उतारे घेऊन यांत भरणा केला आहे, असे अगदी नाही. एकंदरीने पहातां, हा ग्रंथ नूतनच आहे, असे म्हणावयास हरकत नाही. कारण दुसऱ्या ग्रंथावरून मिळालेल्या माहितीखेरीज ग्रंथकर्त्याने पुष्काळ श्रम व शोध करून व विचार करून नवीन शब्द व शब्दार्थ घातले आहेत असे प्रत्येक पृष्ठावरून दिसून येते. जे एतद्देशीय लोक इंग्लिश भाषेचा अभ्यास करतात, त्यांस आणि ज्या युरोपियन लोकांस इंग्रजीवरून मराठीत भाषांतर करावयाचे आहे त्यास हा कोश जसा उपयोगी पडेल तसा आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्यापैकी कोणताही पडणार नाही असे आम्हास वाटते.[२०]

'याची किंमत फार थोडी म्हणजे केवळ ५ रुपये व पृष्ठे ६८० व सर्व मिळून सातशे आहेत . . . ग्रंथ किती उपयोगी व तो करण्याकरिता किती श्रम घेतले व तो इतका स्वस्त मिळतो' याबद्दल *ज्ञानोदयाने* त्याचे कौतुक केले आहे. दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत जनतेने उत्स्फुर्तपणे आपल्या पहिल्या आवृत्तीचे जे स्वागत केले त्याबद्दल बाबांनी धन्योद्गार काढले आहेत. कोशाची उपयुक्तता त्या वेळी लोकांना पटली असावी असे दिसते. दुसऱ्या आवृत्तीत बरेच फेरफार करण्यात आले आहेत. प्रथम सोपी व्याख्या व सोपा शब्द दिला आहे. ज्याची स्वभाषा मराठी नाही अशा शिकणाऱ्यास सुलभ पडण्याकरिता पहिली योजना आहे. आणखी एक विशेष म्हणजे भाषांतर करणारे ग्रंथ व ग्रंथलेखन करणाऱ्यांना प्रसंगी सहाय्य मिळावे म्हणून जेथे मराठी उपशब्द मिळाला नाही तेथे संस्कृत शब्द व जेथे तोही मिळाला नाही तेथे हिंदुस्थानी शब्द घातला आहे. 'कोशरचनेत तात्त्विक वा तांत्रिक गोष्टीपेक्षा (दृष्टीपेक्षा) व्यावहारिक दृष्टी बाबांनी कशी ठेवली होती याचा हा कोश एक उत्तम पुरावा आहे', असे डॉ. प्र. न. जोशी या कोशाची माहिती देताना म्हणतात.[२१]

या कोशाची तिसरी आवृत्ती १८८९ साली प्रसिद्ध झाली. ही आवृत्ती एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यात छापली. किंमत कमी करून ती १२ आणे ठेवण्यात आली आहे. ग्रंथकर्त्याने ही आवृत्ती उइलसन कॉलिजचे प्रिन्सिपल व मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हैस चॅन्सेलर रे. डॉ. मकीकन यास परमादराने समर्पिली आहे. *ज्ञानोदयाने* या तिसऱ्या आवृत्तीचे सविस्तर समीक्षण केले आहे. ते लिहितात,

> या कोशाची दुसरी आर्वत्ती तपासून ही तिसरी आवृत्ती प्रसिद्ध केली आहे. ही तपासणी

काही वर वर केली आहे असे नाही तर नवीन नवीन शब्दांचा भरणा अधिक घालणे, पूर्वीच्या शब्दांचे अधिक अर्थ, नवीन अर्थ व स्पष्टीकरणे देणे वगैरे पुष्कळ नवीन सुधारणा करून पूर्वीपेक्षा प्रचुरतर माहिती दिली आहे.

या आवृत्तीचे विशेष खालीलप्रमाणे आहेत : (१) शब्दाचा अर्थ देताना त्याच्या व्युत्पत्तीकडे अधिक लक्ष देऊन व्यवस्था केली आहे. उदा. lock म्ह. कुलूप व lock म्हणजे झुलूप, यांची व्युत्पत्ती काही भिन्न असल्यामुळे ते शब्द भिन्न केले आहेत. (२) शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. म्हणजे अमुक शब्दाचा अमुक अर्थ इतकेच सांगितले असे नाही तर त्याचा अर्थ असा होण्याचा प्रघात कसा पडला हेहि सांगितले आहे. उदा. lazar म्हणजे कोडी. हा अर्थ नव्या करारातील एका मनुष्याच्या नावावरून प्रचारात आला आहे असे सांगितले आहे व ज्या ठिकाणी तो शब्द आढळतो त्या ठिकाणचा हवालाही दिला आहे. (३) एका शब्दाचा अनेक अर्थ होतात ते देताना त्या अर्थाचा प्रयोग ग्रंथात ज्या ठिकाणी आढळतो ते ठिकाण दर्शविले आहे. उदा. light म्हणजे दिवस job xxiv 14, light म्ह. सुख is lviii 6, hight म्हणजे विजयी Ex xiv 8 इ. (१४) प्रसंगी त्या त्या अर्थाचा प्रयोग ज्या वाक्यांत केला आहे ती वाक्येही ग्रंथातून दिली आहेत. उदा. kiss याचा एक अर्थ हळूच ममतेने स्पर्श करणे. 'When the sweet wind did gently kiss the tress' हे शेक्सपिअरचे वाक्य दिले आहे. (५) शब्दाचा अर्थ देताना काही म्हणी देऊन त्याच्या अर्थाची मराठी म्हणही दिली आहे. उदा. Penny wise and pound foolish : इडा मोडून खिळा करणे. (६) एका शब्दाखाली मोडणारे अनेक शब्द किंवा संयुक्त शब्द त्या त्या शब्दाखालीच दिले आहेत. उदा. high शब्दाखाली hign-noon (ऐन दोन प्रहर), high–colour गहिरा रंग, high–heat कडक उन (आग), high–relief उर्ध्वस्थ, high–treason राजद्रोह, high–antiquity, high–day, high–life, high–mass, high–priest, high–tide, high–church, असे पुष्कळ शब्दार्थ दिले आहेत. (७) परंतु ग्रंथविस्तार होऊ नये म्हणून त्या मुख्य शब्दाच्या स्पेलिंगची पुनरावृत्ती न करता केवळ त्याचे पहिले अक्षर लिहून पुढे दुसरा शब्द लिहिला आहे. उदा. वरील उदाहरणात h–noon म्हणजे high–noon होय. (८) तरी तोच शब्द जर दिलेल्या उदाहरणात किंवा म्हणीत बहुवचनी येत असेल तर, किंवा कांही दुसरा प्रत्यय लागत असला तर त्याचा प्रयोग स्पष्ट समजण्याकरिता त्याचे सर्व रूप दिले आहे. उदा. day या शब्दाखालील now–a–d असे न लिहिता now–a–days असे लिहिले आहे. ग्रंथकर्त्याने ग्रंथविस्तार न करता अल्प स्थळात बव्हर्थ, देण्याचा प्रयत्न केला आहे. *ज्ञानोदय* म्हणतो,

> तिसऱ्या आवृत्तीपेक्षा (दुसऱ्या आवृत्तीपेक्षा असे हवे) या आवृत्तीचा साचा, टैप, व्यवस्था छापणावळ वगैरे फार सोईचे आहे. विद्यार्थ्याला व गृहस्थाला हा ग्रंथ सारखाच उपयोगी पडून वापरणाऱ्यास किंवा शेल्फावर ठेवण्यास फारच सुबक आहे. या कोशाचे अवलोकन करून, इतर कोशांशी हा ताडून पाहिला असता असे दिसून येते की, शब्दांची व शब्दार्थांची जी व्यवस्था व योजना यात केली आहे तो फार सूक्ष्म आहे. हे काम

थोरल्या कोशातून कोणते शब्द घ्यावेत व कोणते न घ्यावेत या सारखेंच किंबहुना त्यापेक्षा कठिण आहे. तथापि महाराष्ट्र देशात बाबांचा कोश सुप्रसिद्ध आहे म्हणून या आवृत्ती-विषयी नव्याने लिहिण्याचे प्रयोजन नाही. सरकारने याही आवृत्तीस उदार आश्रय दिला आहे. यावरून संतोष वाटतो, डॅरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन मेहेरबान चाटफिल्दसाहेब यांनी या आवृत्तीच्या सर्व प्रतीं विकत घेतल्या आहेत. इंग्रजी व मराठी जाणू इच्छिणाऱ्या प्रत्येक गृहस्थाच्या संग्रहास, प्रत्येक इंग्रजी शाळेत रेफरन्सकरिता व चवथीपासून सातव्या इयत्तेचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याच्या हाताशी हे गृहरत्न असणे इष्ट आहे.[२३]

**शब्दरत्नावली : अभिनव स्वतंत्र कोश**

कँडीच्या कोशाचे संक्षिप्तीकरण करता करताच बाबांनी एका अभिनव अशा छोटचा स्वतंत्र कोशाची निर्मिती केली. *शब्दरत्नावली* या नावाने हा कोश स्वतंत्ररित्या इ. स. १८६० मध्येच प्रसिद्ध झाला. इंग्रजीतल्या प्रसिद्ध *रॉजेट थिसॉरस*च्या धर्तीवर या शब्दकोशाची मांडणी करण्यात आली आहे. कोशाच्या मुखपृष्ठावरच प्रथम 'Help to Marathi students and authors' असे छापले आहे. मलपृष्ठावर याच कोशकर्त्याच्या अन्य पुस्तकाची एक एक यादी दिली आहे. त्यात इंग्लिश मराठी कोशाचा संक्षेप कर्त्याने स्वतंत्रपणे छापल्याची नोंद आहे. यावरून कँडीच्या कोशाचा संक्षेप म्हणजे *शब्दरत्नावली* हा कोश नव्हे. पण म. म. दत्तो वामन पोतदार मात्र म्हणतात की, 'इ. स. १८६० मध्ये कँडीच्या इंग्रजी-मराठी कोशाचा संक्षेप *शब्दरत्नावली* नावाचा केला'.[२४] हे अर्थातच बरोबर नाही. *शब्दरत्नावली*च्या प्रस्तावनेत लेखक स्वतःच लिहितात,

> क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप करितांना मला त्या शब्दसमुद्राच्या संपूर्ण प्रदेशातून पर्यटन करीत जावे लागले. तेव्हां महाराष्ट्र भाषेतील शब्दरूप रत्नाची जी बेटे जागोजागी आढळली, ती पाहून चित्तास बहुत आनंद व आश्चर्य वाटू लागले. आणि अशी ही आपली मातबर भाषा आपल्याच लोकांस माहीत नसावी, आणि तिचा इंग्लिश लोकांनी शोध करावा व इंग्लिश शिकणारास मात्र तिचा लाभ व्हावा म्हणून दुःखही वाटते. पुढे इंग्लिश कोषाचे काम झाल्यावर अवकाशानुसार मोलस्वर्थकृत महाराष्ट्र व इंग्लिश कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीचे अवलोकन करू लागलो, तीतही अनेक प्रकारचे शब्द व अनेक विषय व त्यांची उत्पत्ती व व्याख्या ही दृष्टीस पडू लागलीं. ते सर्व शब्द जर कोणी इतर ठिकाणी शोधू लागला तर त्यास शेकडो ग्रंथ मिळविण्याशिवाय व शेकडो मनुष्यास विचारपूस केल्याशिवाय सापडणार नाहीत असे आहेत. अशांचा संग्रह त्या महाग्रंथात त्याच्या महाविद्वान कर्त्याने केला आहे. ह्या शब्दांचाही वर सांगितल्याप्रमाणेच सर्व लोकांस लाभ होणे दुर्लभ आहे. मुळीं इंग्लिश भाषा सर्व महाराष्ट्र लोकांस येत नाही, आणि ज्यांस ती येती त्यातून स्वभाषेवर भक्ति ठेवणारे असे फार थोडे, आणि त्यातही ज्यास स्वभाषेची अभिरूची आहे त्यांतून क्यांडीकृत व मोलस्वर्थकृत कोश घेण्यास समर्थ किती थोडे निघतील! हजारांतून एकापाशीही हे भारतप्राय ग्रंथ मिळणे कठीण. तेव्हा अशा कारणाने जी गुलें

महाराष्ट्र भाषा शिकतात अथवा जे तरुण विद्यार्थी त्या भाषेत निबंध व ग्रंथ लिहितात त्यास अतिउपयोगी असे शब्द व विषय कोठून मिळणार व त्यांच्या कामास सहाय कोठून होणार! हा विचार मनात आणून पूर्वोक्त दोन्ही ग्रंथात जे सहस्त्रावधि महाराष्ट्र शब्द आहेत त्यातील कित्येक निवडून एक लहानशी *शब्दरत्नावली* नामक वही केली आहे.

### रॉजेटचा थिसॉरस

*शब्दरत्नावली* हा कोश *रॉजेट थिसॉरस*च्या धर्तीवर असल्यामुळे याच ठिकाणी *रॉजेट थिसारस*च्या शब्दकोशाचा थोडासा विचार करणे उपयुक्त ठरेल. इंग्रजी शब्द व भाषणसंग्रह व भाषणसंप्रदाय यांचा संग्रह करणारा पीटर रॉजेट याचा थिसॉरस कोश सुविख्यात असून १८२१ पर्यंत त्याच्या २९ आवृत्ति निघाल्या. मराठीत याचे *राजकोश* नावाचे रूपांतर चालू होते. पण संपादकाच्या मृत्यूमुळे ते बंद पडले. रॉजेटसारखा दुसरा क्रॅबचा इंग्रजी समानार्थक शब्दांचा कोश इ. स. १८८२ मधील आहे. पीटर मार्क रॉजेट हा एक इंग्रजी वैद्य होता. त्याचा जन्म सन १७७९ मध्ये व मृत्यू सन १८६९ मध्ये झाला. त्याने छंद म्हणून शब्दलेखन केले. शब्द लिहिता लिहिता तो समानार्थक, विरुद्धार्थाचे व परस्परसंबंधित शब्दांचे गुच्छ तयार करी. उदा. illegal, unlawful, असे समानार्थी, peaceful व warlike असे विरुद्धार्थी व परस्परसंबंधित—एकाच्या स्मृतीने दुसऱ्याची स्मृती होईल असे उदा. father, mother या सर्वांचे एकत्रीकरण करून सरतेशेवटी रॉजेटने अशा प्रकारे हजारापर्यंत शब्दविभाग पाडले. त्याला ज्ञात प्रत्येक शब्द, डिक्शनरीत आढळणारा प्रत्येक शब्द तो वरील शब्द विभागात घालू शकला. इ. स. १८५२ मध्ये रॉजेटच्या शब्दांची यादी प्रसिद्ध झाली. त्याने आपल्या संग्रहाचे नाव *थिसॉरस* किंवा 'शब्दांचा खजिना' असे ठेविले. रॉजेटच्या प्रथम शब्दसंग्रहात शब्दांचा भरणा सध्याच्या थिसॉरसइतका नव्हता परंतु त्याचा कोश हा समानार्थी, विरुद्धार्थी, व परस्परसंबंधित शब्दांचा पहिला शब्दसंग्रह होता. लेखकांनाच नव्हे तर इतरांनाही तो उपयुक्त ठरला. आतापर्यंत रॉजेटच्या चिरंजीवांनी व इतर दहाबारा संपादकांनी मूळ थिसॉरसची सुधारून आवृत्ती काढली आहे. नवीन शब्दांची भर घालून त्याचे स्वरूप अद्यावत ठेवण्यात आले आहे. (रॉजेटच्या थिसॉरसमधले बरेच शब्द आता कालबाह्य ठरले आहे व अनेक शब्द आता त्यात आढळणार नाहीत.) प्रत्येक आवृत्तीस अद्यापही रॉजेटस् थिसॉरस असेच नाव देतात कारण त्याने ही कल्पना प्रथम अमलात आणली. त्याची स्मृती म्हणून असे करतात. या शब्दकोशात समानार्थी, विरुद्धार्थी, व परस्परसंबंधित शब्द एकत्र सापडतात. अशा प्रकारे एक शब्द पाहाता पाहता पाच पन्नास शब्द पाहिले जातात व ज्ञानात सहज भर पडते. केवळ शब्दार्थ देण्यासाठी या कोशाचा जन्म झालेला नाही तर समानार्थी, विरुद्धार्थी व संबंधित अशा शब्दांचा एकत्रित साठा या कोशामुळे जिज्ञासूंना व अभ्यासकांना उपलब्ध होतो.

अशा प्रकारच्या रचनेत एक शब्द पाहता पाहता शे–पन्नास शब्द पाहिले जातात, तेही नकळत. पुनरावृत्ती टाळता येते. एकातून दुसरा या क्रमाने अनेक शब्द क्रमाने सहजगत्या

पाहिले जातात. 'थिसॉरस'ची जाहिरातच त्याचे वैशिष्टय दाखविण्यास पुरेशी आहे. वरील रॉजेटच्या कॉलेज थिसॉरसच्या मलपृष्ठावर ही पुढील अर्थाची जाहिरात आहे :

> चांगले बोला, चांगले लिहा, योग्य वेळी योग्य शब्द वापरून हे जमेल *दी न्यू अमेरिकन* रॉजेट कॉलेज थिसॉरस हे अेकमेव पुस्तक असे आहे की, ज्यावर कटाक्ष टाकताच तुम्हाला योग्य शब्द, वाक्प्रचार, म्हणी, तुम्हाला तुमची नेमकी कल्पना मांडण्यास सापडतील. अचूक व प्रभावीपणाने कल्पना मांडण्यास थिसॉरस आहे. येथे समानार्थी व विरुद्धार्थी शब्दांचे माहेरघर सापडेल. सोयिस्कर वर्णानुसारी रचना आहे. तुमचे शब्दसामर्थ्य वाढविण्यास शब्दांवर प्रभुत्व मिळविण्यास, आत्माविष्कार सामर्थ्य मिळविण्यास हा रॉजेट कॉलेज थिसॉरस वापरा.[२६]

ही जाहिरात मोठी बोलकी आणि थिसॉरसचे स्वरूप स्पष्ट करणारी आहे. याच धर्तीवर बाबा पदमनजींनी आपली *शब्दरत्नावली* तयार केली.

### मसाल्याच्या थैलीप्रमाणे उपयोग

*शब्दरत्नावली*चा उपयोग काय व कोणास हे सांगताना बाबा पदमनजी म्हणतात,

> ह्या दोन्ही भागांतील शब्दांची गरज महाराष्ट्र भाषा शिकणारांस, व महाराष्ट्र ग्रंथ व कवन करणारांस किती आहे हें येथे सांगावयास नको. त्यांस त्या लहानशा चोपडींत बहुत विषयांचा संग्रह व बहुत शब्दांचा भरणा सांपडेल, व जर त्यांनीं कुशलतेने त्यांचा अुपयोग केला तर त्यांच्या लेखास रस, लालित्य, चेतना इत्यादी गुणांची शोभा येअील. विशेष काय सांगावें, ही चोपडी अनेक प्रकारच्या मसाल्याच्या व किराण्याच्या थैलीप्रमाणें आहे. ही जर कुशल स्वयंपाक्याच्या हातीं पडली तर तो परोपरीचीं अन्नें सिद्ध करण्यांत जे जिन्नस पाहिजेत तेच परिमित मानानें घेऊन आपल्या पाकास सुवास, रुचि, माधुर्य व पुष्टता आणील. परंतु ज्यास ही अन्नसिद्धी कशी करावी हें माहित नाही त्याच्या हाती ही चोपडी गेली असता तो कसा काला करील हे सांगावयास नको. तर तरुण विद्यार्थ्यांस ही पाकक्रिया शिकविण्याच्या स्तुत्य व उपयुक्त कामास जे लागले आहेत, व ज्यांस आपल्या स्वदेशीय बांधवाच्या भोजनार्थ अनेक प्रकारची पुष्टिकारक अन्नें सिद्ध करावीं लागतात त्या सर्व विद्वान गुरुंस, शिक्षकांस व गद्यपद्यादि ग्रंथकारास हा अनेक द्रव्ययुक्त बालकोश समर्पण केला आहे. . . सर्व विद्यावृद्धीच्छू लोकांसही अशी विनंती आहे कीं, जर त्यांनी ह्या त्याच्या प्रयत्नरूप अंकुरास आपल्या आश्रयाचें पाणी घातलें तर लवकरच एक मोठा वृक्ष त्यांच्या दृष्टीस पडेल आणि त्याचीं फळें त्यांस बारमाही मिळतील.[२७]

### शब्दरत्नावलीचे स्वरूपाविष्करण

*शब्दरत्नावली*चे एकूण तीन भाग आहेत. त्यातील पहिले दोन फार महत्वाचे आहेत, पहिल्या भागात मोल्सवर्थच्या महासागरासम कोशातील विखुरलेल्या काही विशेष प्रकारच्या पारिभाषिक संज्ञा त्यांच्या साऱ्या संकेतासह मोठ्या परिश्रमाने व साक्षेपाने एकत्र केल्या आहेत.

असे मूळ पारिभाषिक शब्द ३५८ असून त्यांचे अर्थविस्तारप्रदर्शक शब्द ४८५३ आहेत. दुसऱ्या भागात मुख्यत्वेकरून कँडीच्या कोशात असलेल्या पर्यायवाचक शब्दांचा संग्रह केला आहे. दुसऱ्या भागात मूळ शब्द २६५ आहेत व त्यांचे उपशब्द व पर्यायवाचक शब्द मिळून ६,८५२ आहेत. असे एकंदर शब्द १३,००० आहेत.

या दोन्ही भागांच्या शेवटी दोन तऱ्हेच्या सार्थ सूची किंवा अनुक्रमणिका दिल्या आहेत. त्यांतील पहिल्या सूचीत सर्व शब्दांचे इंग्रजी अर्थ स्पष्ट केले आहेत व दुसरीत इंग्रजी शब्दावरून पुस्तकातील पर्यायी शब्दाचे मूळ पाहता यावे, अशी सोय, इंग्रजी भाषेवरून मराठीचा अभ्यास करण्यासाठी उपयुक्त व्हावी, यासाठी करण्यात आली आहे. *ज्ञानोदय*कार म्हणतात,

> *शब्दरत्नावली* हें पुस्तक किती निर्मल व सुंदर रीतीनें छापले आहे व त्याची बांधणी किती चांगली आहे हे सांगणे नको. या प्रकारे जर सर्व मराठी पुस्तकें होऊ लागलीं तर एक मोठीच सुधारणूक होईल. या पुस्तकाची किमत अमळ फार आहे, खरी पण विचार करून पाहिले असतां ती फार म्हणायची नाहीं. कारण हेंच पुस्तक मोठ्या अक्षरांनी छापिलें असतें तर या किमतीस शोभण्याएवढें झालें असतें पण त्यांत शब्दांचा भरणा ज्यास्ती झाला असतां असें अगदीं नाहीं. यास्तव सूज्ञजनांनीं पुस्तकाच्या जाडी पातळीकडे पाहूं नये, आंतील विषय लाभदायक आहे किंवा नाहीं हे पाहावें.[२८]

केवळ १०० पानांचे हे पुस्तक माहितीच्या दृष्टीने भरगच्च, छपाईच्या दृष्टीने नमुनेदार व सूचीसह परिपूर्ण आहे.

*शब्दरत्नावली*च्या आवृत्त्या निघालेल्या दिसत नाहीत, यावरून तत्कालीन समाजाला त्याचे महत्त्व कळले नाही, असेच म्हटले पाहिजे. 'ही केवळ पुढे उभारावयाच्या एका मोठ्या इमारतीची भूमिका किंवा पाया आहे, असेच समजावे'[२९] या शब्दांत भावी काळात अशा प्रकारचा कोश मोठ्या स्वरूपात तयार करण्याची बाबांची मनीषा साकारलेली दिसत नाही. त्यांच्या इतर कोशांप्रमाणेच याही कोशाला प्रोत्साहन मिळते तर एक मोठे व महत्त्वाचे कार्य शंभर वर्षापूर्वीच होऊन गेले असते, असे वाटते.

*शब्दरत्नावली*चे स्वरूप स्पष्ट होण्यासाठी वानगीदाखल काही नमुने पाहण्यासारखे आहेत.

## भाग पहिला

**अलंकार**

प्र. (पुरुषाचे) अंगठी, कंठी, कडें, कलगी, गेठा, गाठा, गौरीशंकर, चौकडा, जिगा, तुरा, तोडा, दंडपेटी, पवित्रक, पोंहची, भिकबाळी, गोप, शिरपेंच, तोंगल, लवंग (स्त्रियांचे) अडकण, अनुवट कंठा, कर्णफूल, कमरपट्टा, कांकण, कांची, कांडोळें, काप, कारलें, कुईरी, कुरडूं, केतक, केवडा, खड्गपात्र, खपटा, खटूं, गळसरी, गेंद, गुळखी, गोट, गोप, घोंसबाळी, चंद्रकोर, चंद्रहार, चांदणी, चिंचपेटी, चितंग, चितांग, चुकटी, चुडा, छंद, जवा, जुगणी, जोडवें, ठुशी, तकट, तांदळीपोत, तानवड, तायतळें, तिदाणें, तोडा, तोरडी, ताळेबंदी,

थुशी, दडकडी, नग, नथ, नाग, पाटली, पायजिमी, पैंजण, पोत, पोल्हार, फूल, भैरव, बांगडी, बाजूबंद, बाळी, बिजवरा, बिंदी, बिरी, बुगडी, बुलाक, भांगसळ, मंगळसूत्र, मासोळी, माळ, मुखडा, मूद, राखडी, लफा, वज्रटीक, वांकी, वाळा, विरचळी, विरवधी, शिसफूल, समती, सांकळी, सरी, हार.

**खोतवेठ**

बा. वरंडीगवत, पानपेंढा, शाकारणी माणूस, रवळी, पाठीं, सूप, शिपली, हवसा, वाढवण, हातरी, तटया, हातर, नागरजोत, भाऱ्यालांकडें, मानसंबंधें, नारळ सुपारी, बाबभाडें, अर्धेली तिर्धेली.

**चौचाकी पांढर**

देशमुख, देशपांड्या, कुळकरणी, पाटील. २ सूर्य, कुंभाराचें चाक, मोटेचें चाक, गाड्याचें चाक. ३ सरकार, पाटील, कुळकरणी, देशपांड्या, देशमुख, मिरासदार, शेतकरी, बलुतेदार.

**पंचद्रविड**

तैलंग, द्राविड, कर्नाटक, महाराष्ट्र, कोंकण. २ द्राविड, महाराष्ट्र, तैलंग, कर्नाटक, गुर्जर.

**ब्राह्मण**

(गोत्र) कपि कौंडिन्य, कौशिक, भारद्वाज, गार्ग्य, बाभ्रव्य, काश्यप, शांडिल्य, नित्युंदन, वत्स, अत्रि, वसिष्ठ, विष्णु, वर्ध्दन, जामदग्न्य; (शाखा) वाजसनी, तैतिरी, शाकल, बाष्कळ, यजुर्वेदी अ. यजुशाखी, अपस्तंभ, (जाती) करवत, कऱ्हाडा, कुडाळ देशकर, कोकणस्थ अ. चित्तपावन अ. चिपळुणा, गौड, चौबा, जवळ, तिरगूळ, तुळवा, तैलंग, देवरुखा, देशस्थ, गुर्जर, मध्यदिन अ. माध्यंजन, मिश्र, मैत्रायणी, मोताळा, सवाशा, सारस्वत, गोळक, पळशा, (अुपनाम) गद्रे, वैशंपायन, देव, रानडे, महाजन, फडके, काळे, भडभडे, खरे, नेने, थत्ते, दाताडें, रास्ते, परांजपे, जांभेकर, बिवलकर, आठवले, नाटेकर, गोखले, ओक, गोडबोले.

**विवाहोत्सव**

(तत्संबंधी कार्ये) नवरीकडील – आगती, कन्याशुल्क, जाणवसा, जाणवसघर, देज, द्विरागमन, परतवण पाट पासोडा, पाठराख्या, पावण, पावता, भांगसळणी, मंगळसूत्र, माघारपण, माघारी, माघारीण, मुहूर्तमणी, मून्हाळी, मुन्हाळीपान, मूळ, लग्नचुडा, लाह्यांचा मान वधूप्रवेश, वधूवस्त्र, वीध, गुनमुख, हातपाणी, शुल्क, करवली. नवऱ्याकडील नवरदेव, जाणवसा, वरस्थान, वरबाप, मुंडावळ, अ. मंडावळी, वरधावा, वरमाय, सीमांत-पूजन, वरपक्ष, वरदक्षिणा, लाडाचा तांब्या, भेटदकरा, वरघोडा, पाल, छत्र, वरात, घरभरणी, वरनिश्चित करणे, करवला.

**स्नान**

(प्र.) अंगस्नान, शिरस्नान, कटिस्नान, कंठस्नान, पादप्रक्षालन, मुखप्रक्षालन, प्रातःस्नान, तीर्थस्नान, समुद्रस्नान, अभ्यंगस्नान, नाहाण, मानसस्नान, मृत्तिकास्नान, गोमयस्नान

मंत्रस्नान भस्मस्नान गणस्नान — भुडभुडगंगा, दंडस्नान, मुसलस्नान शास्त्रास स्नान, धुपटस्नान, नावास स्नान, म्हणायास स्नान.

## भाग दुसरा

**अलंकार**

भूषण, वस्त, डागिना, दागिना, नग, नगोटे, आभरण.

**आक्रोश करणे**

रडणें, ओरडणें, आकांत करणें, दळ – ढळला – भळभळ – भळभळां - खळखळ- घळघळ– टच टचून रडणें, डचाचून, पाणी डोळयांत येणे, गाया पाण्यावर – नदीवर आणणे – अुक्शा बुक्सी रडणे, चळ घेणे, चेकळणे, रडण्याची टक लावणे, रडण्याचा टाहो – लाहो घेणे, रडून आकांत – अनर्थ – दंगा करणें, रड – रडे घेणें – मांडणें – लावणें – अुससणें, स्फुंदणें, हूडके घेऊन – काढून – उमासे येऊन – उमाडे काढून रडणे – (मुलाचे) केंकणें, टचाहा टचाहा – टेंटें – रडूंरडूं करणे, कोकलणे, किरकरणें, पिरंगणें, कुसमुसणें, फुसफुस करणें, किंकिरणें, पिरपरणें, मिणमिणणें, पिठपटणें, कन्हेरागाणें, टाहो करणें – जनावराचें) आरडणें, पुकारणें, बोहणें शब्द करणें, किकळणें, किकळी फोडणें रोराण करणें, भोकणें, म्याऊ म्याऊ करणें, हिसणें, गर्जन करणें, डुरकी फोडणें, ठूडू करणें, चूचकरणें, चूळचूक करणे, हूक घालणें, शेऊळ घालणें – (पक्ष्यांचे) किलबिलणें, आरवणें, किरकरणें.

**कपाळकरंटा**

दैवाचा भोपळा, आकाबाईचा बंधु – भाऊ – वडील – भाऊ, आकाबाईचे कूळ, फुटक्या दैवाचा, फुटक्या कापाळाचा, कपाळफुटका, अष्टकपाळचा, हाडकपाळचा, भद्र कपाळाचा, भऱ्या, रवळनाथाचे कळ, शंख्या, बळभद्रा हतभाग्य, काजळतोंडचा, काळतोंडचा, बोंबील-भिक्या, पांढरेपायांचा, खुरंटपायाचा, अपेशी, फत्तेलस्कर, कमबख्ता, हलाख, जगत्सेट, घरनादार आणि देवळींबिऱ्हाड, खैशा, जन्मकरंटा, खापरतोंड्या, करंटा, दलभंजन, रंक, खरखर मुंडा, भणंगभिकारी, पालथाजन्मला, उताणा पडलेला, घाले धन्यांचा लेंक, बिचारा, लाचार, दग्धहस्त, दग्धहस्ती, निखोरडा, शुद्धस्फटिक, शुद्धबुद्ध.

**खाऊंनिदक**

भा. सं. खादनिंदक, गाईचा गोहोरा, अस्तनींतला साप, खाल्या घरचे वासे मोजणारा, खाल्या अन्नावर उठणारा, खाल्या अन्नावर माती घालणारा, बारा वर्षे खांद्यावर वागविलें असता अस्ते उतार, दूध पिऊन विष ओकणारा, पोसल्या पोरा काय करशील- तर म्हातरीचे डोळे काढशील, ज्याचा मंत्र त्याच्या मस्तकावर हात ठेवणारा, जेथें खाल- तेथें हगाल, वाळूवर मूतल्याने फेस ना पाणी, ओली ना खोली, आईच्या खाटल्यावर चढणारा, माय न ओळखी तो गाय काय ओळखी, बापास बाप म्हणत नाही तो चुलत्यास काका कोठून म्हणणार.

गारूड

गौडबंगाल, भानामती, भानामतीचा खळ, बाजेगरी, नजरबंदी, दृष्टिबंधन, दृष्टिबंद, इंद्रजाल, छांछू, जंतरमंतर, हातचलाखीचा खेळ, हस्तलाघव, माया, बुचदृष्टी.

ढपळवणी

बिरबिटी, थिरबिटी, पेजवणी, फजीता, गंजवणी, घुमंडगुळवणी, पळकवणी, झुळकवणी, गरगट, डुळकवणी, कळकळवणी, शंखवणी.

धास्ती

वचक, बाज, अपधाक, घोसरा, हैबत, भेदरा, आत, धडती, धपका, दचका, दचक, त्रास, वित्रास – गात्रभंग, अंडत्रास, त्रेधा तिरपीट, तिन्हड, भयभाग्य, घोरभय, धैर्यभंग, निक्षेप, वैचित्य, (धरणें) भा. सं. अंडब्रह्मांडास अथवा कपाळीं जाणे, मुलीचें झाड भेटणें, देवान्यांत देव नाहीसे होणें, गर्भगळित होणें, धाबे दणाणणें, गांड फाटणें, मलमूत्र होणें, मृतप्राय होणें, गतप्राण होणें, लेंडी गाळणें, हगूट लावणें, हांवहरी होणें, पांचावर धारण बसणें, हगमूत लागणें – सुटणे, तजावजा होणें, प्राण कालवणें, चकली गुंग होणें, चकरभकर भुलणें, हातापायांचे ढीग होणें, बावरणें, कावराबावरा होणें, कहावणें.

पाणचट

पचपचीत फळफळीत, फिका, फिकट, गळगळीत, कळकळीत, खळखळीत, पाणवल, बिरबिरीत, मचमचीत, मळमळीत, मुळमुळीत, डुळडुळीत, लबलबीत, कवकवीत, वाहवरा, ऊंबला.

मुशाफरी बाता

सातहात तवसें नवहात बी, सांगासांगी वडाला वांगी, सात हात लाकूड, नऊ हात ढल्पी, नीळनासली, निळीचा रंग नासला, त्वा लंका पाहिलीस तर काय झालें म्या पडलंका पाहिली.

शरीर

अंग, देह, काय, कुड, कुडी, तनु, तन, कलेवर, पिंड, वपु, मूर्तिभूतात्मा, धाम, क्षेत्र, पंजर, विग्रह, झाड, भोगायतन, रोगभू, प्रागसप्न, इंद्रियायतन, इंद्रियग्राम, भूतग्राम, कायापूर, अहंकाराशय, अहंकारास्पद, जायजणेंघर, जायजणीवस्तु, मुरकुंडी, गोळा, मोधागोळा, मोट, गठडी, लोट.

मराठी इंग्लीश कोश

वरील दोन्ही कोशांचे काम हातावेगळे केल्यानंतर बाबांनी मोल्सवर्थच्या मराठी–इंग्रजी कोशाचा संक्षेप करण्याचे काम हाती घ्यावे हे साहजिकच होते. कँडीच्या कोशाचा संक्षेप करण्यापेक्षा हे काम फार कठीण व जिद्दीचे होते. याची कल्पना बाबास होतीच. 'It was a comparatively easy task for the Editor to prepare an abridgement of

the admirable work of MAJOR CANDY, but to prepare this Compendium was by no means a light labour' असे बाबांनीच म्हटले आहे.[३०]

या कोशासंबंधाने जून १८६३ च्या *ज्ञानोदयात* प्रसिद्धीपूर्वी पुढील बातमी आली होती :

**मराठी व इंग्लिश कोश** : मोल्सवर्थकृत *मराठी व इंग्लीश कोशाचा* संक्षेप बाबा पदमनजी तयार करीत आहेत हे आमच्या वाचणाऱ्यांच्या लक्षात असेलच. या संक्षिप्त कोशाचें काम कोठवर आले आहे असे बहुत विचारतात. सबब आम्हास मि. बाबांनी असे जाहीर करण्याविषयी विनंती केली आहे कीं, सदरहू कोश सुमारे अेका महिन्यानें तयार होअील.[३१]

या बातमीनंतर एका महिन्याने १८६३ साली *A Compendium Of Molesworth Marathi and English Dictionary* या नावाने हा कोश प्रसिद्ध झाला. याची १८७५ मध्ये दुसरी सुधारून वाढविलेली आवृत्ती प्रसिद्ध झाली. *सुबोध पत्रिकाकार* या आवृत्तीबाबत लिहितात,

या कोशाची उपयुक्तता आहे म्हणूनच दुसरी आवृत्ती निघाली. यात त्यांनी अधिक श्रम, उपयुक्त सुधारणा, अधिक शब्दसंग्रह, व अधिक चांगले टिकाअू सामान यांचा वापर केला. पूर्वीच्या आवृत्तीतील शब्दांची बिनाखी करून अप्रसिद्ध व अनुपयुक्त शब्द गाळून मराठी शब्दाच्या इंग्रजी लांब लांब व्याख्या कमी करून श्रमाने शब्द अधिक घातले. त्यांनी लोकोपयोगार्थ हे काम केले व त्यांना विशेष द्रव्यलाभ झाला नाही.[३२]

त्याचप्रमाणे नोव्हेम्बर १८८२ मध्ये या कोशाची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली.

*ज्ञानोदयाने* या कोशावर आपला मोठा अभिप्राय लिहिला आहे. *ज्ञानोदयकार* म्हणतात,

मि. बाबा पदमनजी यांनी मोल्सस्वर्थकृत *मराठी व इंग्लिश कोश* या प्रख्यात व थोरल्या पुस्तकाचा संक्षेप करून हा लघुकोश तयार केला तो नुकताच छापून प्रसिद्ध झाला आहे. याची अष्टपत्री पृष्ठे सुमारे ५०० आहेत. हा अेज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यात छापिला आहे. छाप निर्मल, ठळक व बहुतकरून बिनचूक आहे. हा ग्रंथ त्याच्या कर्त्याने रे. दा. मरे मिचल यांस नजर केला आहे. हा ग्रंथ दोन प्रतींच्या कागदावर छापला आहे. सुंदर जाड कागदावर छापलेल्या दर प्रतीस ६ रु. आणि साधारण पातळ कागदावर छापलेल्या दर प्रतीस ५ रु. किंमत ठेविली आहे. ह्या कोशात मूळ कोशातील शब्दसंख्येच्या सुमारे अर्धोअर्ध शब्द आहेत व शब्दार्थ बहुतकरून सर्व दिल्हे आहेत, क्वचित अेखादा उपयोग व अर्थ गाळला आहे. यावत् लोक मराठीचा अभ्यास करतील तावत् त्यास मोल्सवर्थ या नामाभिधानाचें विस्मरण होणार नाही. अस्तु. अशा महाशब्दार्णवात तीन वर्षे संचार करून त्यातील पूर्ण साठ सहस्त्र शब्दांचे व त्याच्या चतुर्गुणित अर्थाचे मंथन करून हे नवनीत काढले आहे. त्याच्या दोषांकडे लक्ष न देता सुज्ञांनी गुणग्रहण करावे.[३३]

बाबांनी या कोषात शेतीवाडी, उदीम व्यापार, वसूल वासलात, देवघेव इ. व्यवहारातील उपयोगी विषयांचे शब्द निवडले आहेत. 'या देशातील महाराष्ट्र भाषा बोलणारी प्रजा व तिजवर राज्य करणारे इंग्लिश सरकार यामध्ये परस्पर सख्यत्वाची वृद्धि होण्यास व ज्यांत अक्षय जीवनाचे शब्द आहेत असे जे पवित्रशास्त्र त्याचा या देशांत प्रसार होण्यास हा लहान ग्रंथ

कांही अंशी कारणीभूत होवो' या शब्दात बाबांनी आपल्या मनातला हेतू विशद केला आहे.[३४]

प्रस्तुत शब्दकोशाचे रसग्रहण करताना *ज्ञानोदय*कारांनी त्यातील काही दोषांचा उल्लेख केला आहे, तो असा,

> या लघुकोशाच्या योगानें बहुत अडचणी दूर होतील, तरी कधीं कधीं असेंही होईल की, बहुत शब्द व कित्येकांचे कांहीं कांही अर्थ सांपडणार नाहींत, त्यामुळें थोडी अडचण वाटेल. कोठें कोठें कांहीं चुकाही विस्मृतीनें राहिल्या आहेत असें दिसून येईल. उदाहरणार्थ फक्कड हा शब्द काढून पाहा. तेथें फकड हा शब्द पाहावयास सांगितला आहे. पण फकड हा शब्द मुळीं सांपडत नाहीं. अशा आणखीही कांहीं चुका आढळतील.

पुढे *ज्ञानोदय*कार म्हणतात,

> कोणतेंही काम पूर्ण नसतें. आणि प्रस्तावनेत ग्रंथकर्त्यानें जी विज्ञप्ति केली आहे, तिकडेही लक्ष द्यावें. तसेंच हें काम किती मेहनतीचें आहे हेही पाहिलें पाहिजे. मि. बाबा यांस आपली दुसरी बहुत निकडीचीं कामे करून हें काम करावे लागलें. त्यांत महाराष्ट्र शब्दांचें परभाषेंत स्पष्टीकरण करावयाचें तें थोडक्यांत असून शुद्ध व गोड उतरणें ही सामान्य गोष्ट नव्हे. या कोशांत २९ हजारांहून जास्त शब्द आहेत. अशा लहान व स्वस्त्या कोशाची गरज किती आहे हे सर्वांस माहीत आहे. जे अेतद्देशीय विद्यार्थी इंग्लिश भाषेचा अभ्यास करतात व जे भाषांतराचे काम करतात, त्यांतून बहुतेक गरीब असल्यामुळे त्यांच्यानें मोल्सवर्थकृत मराठी–इंग्लिश, ३६ रुपये किंमतीचा थोरला कोश घेववत नाही, म्हणून त्यांस फार अडचण पडती. ज्या थोडया लोकांना व मराठी भाषा शिकणाऱ्या साहेब लोकांना सामर्थ्य आहे त्यांनी जरी तो थोरला कोश घेतला आहे तरी तो मनस्वी जड असल्यामुळे त्यास तो वापरण्याचा फार त्रास वाटतो असे सर्व लोक आपल्या लघुकोशाची मार्गप्रतीक्षा करीत होते, आणि मिस्टर बाबा हे असला कोश तयार करणार असे अैकले तेव्हा त्यांस (लोकांस) मोठा हर्ष वाटला आणि बहुतांनी वर्गणीदार होऊन दर प्रतीस ४ रुपयेप्रमाणें पैसा भरला, अेवढेंच नव्हे तर, आगाऊ पैसा देण्याची मुदत सरल्यावर ५ रुपये पडू लागले तरी देखील कोणी कोणी दिल्हे. हा ग्रंथ तयार होवून आमच्या हातीं केव्हां येईल असे जे आज वर्ष सव्वा वर्ष चातकाप्रमाणे वाट पहात होते ती त्यांची इच्छा आता पूर्ण झाली आहे. इंग्लिश आणि मराठी कोशाचा संक्षेप करताना त्याच्या कर्त्यानें अशी आशा बाळगिली होती कीं, जर हे पुस्तक लोकमान्य व लोकोपयोगी झाले तर मराठी व इंग्लिश कोशाचाही संक्षेप करण्याचें काम हातीं घ्यावें. ही त्याची आशा व्यर्थ गेली नाहीं म्हणून तो आतां ईश्वराचें आनंदाने मनःपूर्वक आभार मानतो. मराठी भाषेंत व इतर भाषांत विद्वान पुरुषांनीं जे महाकोश केले आहेत त्यांचा संक्षेप करून लोकांच्या हातीं लघुकोश देण्याचें केवढें अगत्य आहे हें अभिव्यक्तच आहे. ह्या पुस्तककर्त्याचा पहिला लघुकोश प्रसिद्धीस आल्यापासून आतापर्यंत महाराष्ट्र व गुजराथी भाषांत मिळून चार लघुकोश तयार झाले हे एक विद्यावृद्धीचें सुचिन्हच मानलें पाहिजे. कोणी एका ग्रंथकाराने भाषेला सेतूची उपमा दिली

आहे आणि ती खरोखर अर्थदर्शक व अनुरूप आहे. ज्या देशात पुष्कळ पूल बांधावयाचे काम दृष्टीस पडतें तेथे व्यापाराची वृद्धी होण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणें विद्येच्या प्रदेशात सेतूंची संख्या वाढत चालली असता ज्ञानाची अभीवृद्धी होणार नाही काय?[३५]

ह्या कोशासंबंधाने काही महत्त्वाची माहिती डॉ. कृ. भि. कुलकर्णी यांनी दिली आहे :

मोल्सवर्थच्या कोशाच्या आधारे पण त्याच्यापेक्षा लहान असा हा कोश होता. या कोशास काही सरकारी मदत मिळाल्याचे प्रस्तावनेवरून लक्षात येते. कोशासारखा ग्रंथ धार्मिक म्हणता येणार नाही. म्हणूनच बाबांनी पवित्र शास्त्रप्रसाराची इच्छा व्यक्त केली असताही सरकारने या कोशाच्या ५० प्रती विकत घेतल्या व बाबांच्या इच्छेनुसार अडीचशे प्रती सरकारी दप्तरखान्यात विक्रीसाठी ठेवल्या. तसेच तत्कालीन दक्षिणा प्राईज कमिटीने देखील मदतीचा हात पुढे केला होता. स्वतःच्या यापूर्वीच्या कोशानी त्यांना प्रस्तुत कोश-रचना करण्यास स्फूर्ती मिळाली होती. आपल्या वृद्धापकाळात बाबांना आपल्या दोन्ही कोशांच्या सुधारणेचे व पुनर्मुद्रणाचे काम करणे शारिरीक व आर्थिक दृष्टया अशक्य झाले. म्हणून इ. स. १८९० मध्ये त्यांनी विद्याखात्याकडे आपल्या शारीरिक व मानसिक दुर्बलतेची कहाणी कळविली. ते म्हणतात, 'डोळयात मोतीबिंदू पडले आहेत. स्मरणशक्ती क्षीण झाली आहे.बुद्धिमांद्य आले आहे.' 'इत्यादी' कथन करून दोन्ही कोश विद्याखात्याने सहा हजार रुपयांस विकत घ्यावेत व आपणास मुक्त करावे अशा अर्थाचा अर्ज केला. त्याच अर्जात बाबा लिहितात, 'My great desire is to see these two children of mine settled as it were in home like Government Educational Department and to continue with more vigour to carry on their course of fruitful activity and usefulness for the generations to come.' या बाबांनी केलेल्या विनंतीचा उपयोग झाला की नाही हे समजत नाही.[३६]

इ. स. १८९० पर्यंत मोल्सवर्थकृत *मराठी इंग्रजी कोशाच्या* चार आवृत्या निघाल्या होत्या. इंग्रजी–मराठी व मराठी–इंग्रजी हे बाबांचे संक्षिप्त तरीही मोठेच कोश होते. त्यांचे रचनाकार्य व पुनर्मुद्रणाचे कार्य श्रमाचे, दीर्घोद्योगाचे, कष्टाचे, चिकाटीचेच होते. शिवाय बाबा आता साठीत प्रवेश करते झाले होते. त्यामुळे बाबा वरीलप्रमाणे त्या कोशांच्या व्यापातून मुक्त होण्याच्या प्रयत्नात असताना दिसतात. पण तरीदेखील त्यांचा हा कोशरचनेचा छंद सुटला होता असे नाही. बाबा हाडाचे शिक्षक होते. मुलांसाठी, विद्यार्थ्यांसाठी व स्त्रियांच्या शिक्षणाच्या तळमळीने बाबांनी इ. स. १८९१ मध्ये एक आणखी छोटासा शब्दकोश तयार केला. त्या कोशाचे नाव *संस्कृत–मराठी कोश* होय.

### संस्कृत–मराठी कोश

मार्च १८९१ मध्ये *ज्ञानोदयात* पुढील वृत्त स्फुट विषयात प्रसिद्ध झालेले आढळते :

**नवीन कोश :** प्रचारात येणाऱ्या संस्कृत शब्दाचा एक नवीन कोश, रे. बाबा पदमनजी यांनी तयार केला आहे. तो लवकरच छापून प्रसिद्ध होईल. त्यांनी छापलेली कांही पृष्ठे

आम्ही पाहिली आहेत. त्यावरून कळते की, या शालोपयोगी कोशाने मराठीच्याच द्वारे मराठी भाषा शिकणाऱ्यांची एक मोठी उणीव भरून काढली जाईल.[३७]

त्याप्रमाणे बाबा बदमनजींनी इ. स. १८९१ मध्ये शालोपयोगी व गृहोपयोगी *संस्कृत–मराठी कोश* सिद्ध केला. मुंबईच्या निर्णयसागर प्रेसने तो छापला असून लेखकाने सर्व हक्क स्वाधीन ठेवले आहेत. आकाराने पॉकिट साईज असून किंमत १२ आणे दिली आहे. पाने १४ + ३४० असून पानाचा आकार ४.५" × ३.५" असा आहे. प्रत्येक पानांत अंदाजे १५ शब्द असून सर्व शब्दांची संख्या ५,००० च्या आसपास आहे. अशा प्रकारचा कोश मराठीत नवीनच आहे. हा बहुत विचाराने, श्रमाने व काळजीने तयार केला आहे. ह्यात अनेक कारणांनी दोष पडले असतील, ते वाचकांनी कर्त्यास कळविले असता त्याचे उपकार मानून 'दुसऱ्या आवृत्तीत नीट केले जातील' असे प्रस्तावनेत लिहून शेवटी बाबा म्हणतात,

कृपाळू परमेश्वराने ग्रंथकर्त्यास हे काम सिद्धीस नेण्यास आयुष्य, आरोग्य व बुद्धी दिली म्हणून तो त्याची भक्तिपुरःसर उपकार स्तुति करतो. ह्या उद्योगाच्या योगे प्रभूचा महिमा वाढो व त्याच्या शुभवर्तमानाच्या प्रसारार्थ हा अत्यंत लघुप्रयत्न किंचित तरी सहाय्यभूत होवो.[३८]

प्रस्तुत कोश करताना कोणकोणत्या कोशांचे साहाय्य आपणास झाले याचा स्पष्ट उल्लेख बाबा पदमनजींनी केला आहे. त्याप्रमाणे कोशाची व्यवस्था, कोशात कोणत्या चिन्हांचा वापर कशासाठी केला आहे हे पण प्रथमच स्पष्ट केले आहे.

*ज्ञानोदयात* या *संस्कृत–मराठी कोशावर* पुढीलप्रमाणे परिचयवजा परिक्षण आले होते :

**नवीन पुस्तके :** नवीन *संस्कृत–मराठी कोश* रेवरंड बाबा पदमनजीकृत. किंमत १२ आणे. शब्दांच्या लांब लांब व विद्यार्थ्यांस समजण्यास कठिण अशा व्याख्या दिल्याने कोश मोठा व दुर्गम होतो. या कोशात अशा व्याख्या मुळीच दिल्या नाहीत. प्रथम संस्कृत शब्द घेऊन, त्याचे निरनिराळे मराठीत अर्थ दिले आहेत. इंग्रजी वगैरे भाषेच्या द्वारे मराठीचा अभ्यास न करता मराठीच्याच द्वारे मराठीचा अभ्यास करण्याकरिता हा कोश फार उपयोगी पडण्याजोगा आहे. कवितेचा अर्थ करताना, संस्कृत शब्दांचा अर्थ समजण्याच्या कामी, त्याचप्रमाणे वर्तमानपत्रातून जे संस्कृत शब्द येतात त्यांचा अर्थ समजण्यास या कोशाचा उपयोग चांगला होईल. अलीकडे मराठी भाषा वाढविण्याविषयी वर्तमानपत्रांतून पुष्कळ चर्चा चालली आहे. अशा लोकांनी अवश्य या कोशाचा आश्रय घ्यावा. शाळांतून विद्यार्थ्यांस जी पुस्तके बक्षिसाऐवजी दिली जातात ,त्यांच्या यादीत हा कोश दाखल करावा अशी दैरेक्तरसाहेबांनी मंजूरी दिली आहे. हा कोश निर्णयसागर छापखान्यात उत्तम प्रकारे छापला असून किंमतही फार नाही. म्हणून विद्यार्थ्यांस अगर शिक्षकांस संग्रही ठेवण्यास तो कठीण पडू नये. अशा प्रकारचा कोश असावा अशी बाबांची पुष्कळ दिवसांपासून इच्छा होती. ती पूर्ण करण्यास परमेश्वराने त्यांस शक्ति पुरवली यावरून संतोष वाटतो.[३९]

या कोशाच्या मुखपृष्ठावर 'शालोपयोगी व गृहोपयोगी' असे मुद्दाम छापले आहे. त्यावरून मुलांच्या व घरातील स्त्रियांच्यासाठी हा कोश आवर्जून तयार केला आहे, हे लक्षात येते. रोजच्या व्यवहारात आपण अनेक संस्कृत शब्द मराठी बोलताना, लिहिताना व वाचताना

येतात. त्याचा चटकन अर्थ या लहानशा कोशात सापडतो व तो कोश पाहून अडचण दूर होते. कोशरचनेत व्यवहारात तो कसा उपयोगी ठरेल याकडे बाबा नेहमीच लक्ष देतात. मोल्सवर्थ व कँडी यांच्या कोशांचा संक्षेप करताना ही दृष्टी त्यांनी ठेविली होती हे आपण पाहिलेच आहे. प्रस्तुत कोश बाबांनी सुप्रसिद्ध निर्णयसागर छापखान्यात छापला आहे. हे त्यांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. कारण संस्कृतात शुद्धतेला महत्व आहे. आपल्या कोशात अचूकता यावी, त्याची छपाई सुंदर व सुरेख असावी या दृष्टीने उज्वल परंपरा लाभलेल्या निर्णयसागर छापखान्यात ही छपाई त्यांनी केली. त्यासाठी त्यांना निर्णयसागरमधील शास्त्र्यांचे सहाय्य मिळाले. बाबा पदमनजींनी अपल्या कोशरचनेत छपाई, (टाईप) मुद्रा व कोशरचनाशास्त्र या सर्वांचा फार चांगला उपयोग करून घेतला आहे असे दिसून येते. या कोशात मराठी भाषेत जे रूढ व व्यावहारिक शब्द येतात त्यांचा संग्रह केला आहे. प्रथम त्यांचे सर्व व्यावहारिक अर्थ दिले आहेत. नंतर फक्त संस्कृतात मात्र आहेत तेही कित्येक स्थळी दिले आहेत. उदाहरणार्थः जय फत्ते विजय (२ संबोधनवाचक शब्द) जयदेव. ३ जिंकणे (वाद, खेळ) – घोष ध्वनि शब्द – जयाचा शब्द – जयकार. ईश्वर, राजा इ. ची वाखाणणी, दुंदुभी, जयवाद्य. २ ढोल वाजवून जयाची जाहिरात देणे – पत्र (न.) विजयी, जितपत्र – जयवान – जयवंत – जयप्रद – हित-कारक – जयंति – रामकृष्णादि अवतारांचा जन्मदिवस.

बाबांनी म्हटल्याप्रमाणे अशा प्रकारचा कोश मराठीतच नवीन आहे. कारण मराठीत बाबांनी लेखनपद्धती, कोशरचना इत्यादीची काही शिस्त आणली आहे. व्यवहारात उपयोगी शालेय व गृहोपयोगी या शब्दांचा विचार या कोशात त्यांनी केला याचा प्रत्यय कोशातील कोणताही शब्द पाहता येतो. उदा. द्रव, असिपत्रवन, स्वर्गीय, भोग, जय, तुच्छ इ. नित्य परिचित शब्दांचे अर्थ कसे व किती आहेत ही कल्पना प्रत्यक्ष शब्द पाहिल्यानंतरच येते. त्याप्रमाणेच स्वल्पविराम, अर्धविराम, अपसरणचिन्ह, गोल कंस, चौकोनी कंस, अवतरणे, उदाहरणे व शब्दांचा गुच्छात संग्रह करणे हे या कोशाचे आणखी एक महत्वाचे वैशिष्टय आहे.

या शब्दकोशाची काही वैशिष्टये पुढीलप्रमाणे आढळतात :

१) सर्व मुख्य शब्द जाड काळया टाइपात दिले आहेत. उदा. जय, द्रव, द्रवीकरण, द्रावक, द्रावण, द्राव्य पृ. १२८.

२) बहुतेक सर्व अर्थभेद अंकांनी चिन्हित केले आहेत. कित्येक अर्थांच्या मध्ये अर्धविराम ( ; ) चिन्ह मात्र घातले आहे. अर्थाचे बारीक पोटभेद अथवा एकदा नामवाचक अर्थ अंकभेदाने दर्शविल्यावर त्याच्या विशेषणांचे तेच अर्थ अर्धविराम चिन्हाने दाखविले आहेत. उदा. पृ.१९८ वर भोग शब्द पुढीलप्रमाणे दर्शविला आहे. भोग : सुखदुःखाचा अनुभव; सुख; दुःख; २ उपभोग, मुक्ति, ३ सुख दुःख भोगण्याचा विषय. ४ दैवदशा, पाळी, भोक्तृत्व (भोग फिरे व वैद्य भेटे, भोग असेल तितका भोगून सरला पाहिजे) ५ संभोग, अंगसुख, विषयसुख. ६ भरणे, पूर्ण करणे (सूर्य प्रायः दिवसात एका राशिचा भोग करितो) ७ नैवेद्य – भूमि, – स्वर्ग लोक. भोक्ता भोगणारा, वहिवाटणारा. २ खाण्यापिण्याचे

सुख घेणारा, भक्षावयाविषयी ज्याला शरीर प्रकृति अनुकूल असते तो पोटबाबू, स्वादुनंदन. ३ गुणग्राहक भोगतव्य व भोगण्यास योग्य, भक्षणास योग्य अनुभवण्यास योग्य असे जे सुख दुःख अथवा त्यापासून होणारा परिणाम. भोक्तृत्व n सुखदुःखाचा वाटा. २ भोगणे, सोसणे, अनुभवणे. भोगी व भोगणारा, वहिवाटणारा, व सुखदुःखादि भोगणारा. ३ चैनी, विलासी, शोकी.

तसेच 'थिसॉरस' पद्धतीची रचना, f, m, n या इंग्रजी अक्षरांचा लिंगविशेष, वचनविशेष वा शब्दविशेष दाखविण्यासाठी उपयोग, अपसरण, कंस विसर्ग, गोल इ. खुणांचा वापर या कोशात दिसून येतो. परिस्फुटतेसाठी उदाहरणे दिली आहेत. वाक्यात उपयोग करून दाखविले आहेत. उदा. पृ. २०८ राजा दुष्ट झाला आता येथे राहण्याचे भान राहिले नाही वगैरे वगैरे. 'धर्मप्रसार, शुभवर्तमान प्रसार या कोशाने होवो' असे लेखक प्रस्तावनेत म्हणतो परंतु तसा खास प्रयत्न कोठे आढळत नाही. स्वर्ग, नरक, पाप, पवित्र, परमेश्वर, लेकरू, आकाशातील बाप, येशू, तारक, भाकर इत्यादी शब्द मुद्दाम कोठे वापरलेले दिसत नाहीत. त्यामुळे धार्मिकतेचा छाप यावर मारता येणार नाही.

प्रस्तुत कोशाची रचना कशी झाली हे सांगताना बाबा पदमनजी या कोशाच्या प्रस्तावनेत म्हणतात,

It was my great desire for the last sixteen years to compile a purely Marathi dictionary for the use of schools and families. But various circumstances prevented me from the undertaking the work. The desire, however, was not given up; it only assumed different form. Considering the exegencies of the marathi student and the inroads which Sanskrit vocables are daily making upon the domain of the Marathi language I was led and urged by friends to compile a practical and popular Sanskrit Marathi Dictionary.

यावरून कोशाच्या पाठीमागची तळमळ व तपश्चर्या लक्षात येते. बाबा पदमनजींचे हे स्वनिवेदन. पण लोकही त्यांच्याकडून असलीच अपेक्षा करीत होते. हे आपणांस पुढील वृत्तावरून समजून येते. हे वृत्त म्हणजे एका सुज्ञ वृत्तपत्रकाराचा अभिप्राय आहे.

बाबांनी मराठी भाषेचा नवीन कोश करावा. विद्यार्थ्यांस, मराठी ग्रंथ लिहिणारास, मासिक पुस्तके, वर्तमानपत्रकर्ते यांस उपयुक्त होईल अशा कोशाची आज अडचण आहे. तो कोश जॉन्सनच्या पॉकेट डिक्शनरीच्या घाटाचा हवा. मोल्सवर्थच्या कोशाचा आधार घेऊन उद्योगधंदे, सरकारी कामे वगैरे संबंधाच्या शब्दांचा संग्रह त्यात करून बारीक टैपांनी लहान साच्याचा कोश तयार करावा ही त्यांना (बाबांना) सूचना.[४०]

अशा प्रकारच्या वाचकांच्या आकांक्षांना १५–१६ वर्षे खपून बाबांनी मूर्त रूप दिले आहे. *विविधज्ञानविस्तारात* म्हटल्याप्रमाणे,

क्यांडीकृत व मोल्सवर्थकृत कोश जरी छापले किंवा सुधारले तरी मराठी लोकांना ज्या

प्रकारचे कोश पाहिजेत त्या प्रकारचे होऊं शकत नाहीत. त्यापासून सरकारला व प्रथमतः चांगले इंग्रजी समजणाराला उपयोग. कँडीच्या कोशांत इंग्रजी शब्दापुढे मराठी व मोल्सवर्थच्या कोशांत मराठीपुढे इंग्रजी शब्द लिहिले आहेत. मराठी किंवा इंग्रजी भाषा चांगली अवगत असल्याशिवाय त्यांचा फारसा उपयोग नाही.[४१]

ही उणीव बाबांनी दूर केली यात शंका नाही. बाबांनी मोल्सवर्थ व क्यांडी यांच्या कोशांचेच संक्षिप्त कोश असे दोन कोश रचिले पण *शब्दरत्नावली* व *संस्कृत मराठी* कोश मात्र स्वतंत्रपणे रचले आहेत. या सर्व कोशांचा मराठी अभ्यासकांनी पुरेपूर उपयोग करून घेतला आहे.

भाषेच्या दृष्टीने बाबा पदमनजींची आणखी महत्वाची कामगिरी म्हणजे त्यांची कोशरचना. मोल्सवर्थ आणि कँडी यांचे कोश सर्वसामान्य अभ्यासकांच्या आवाक्याबाहेरचे होते. म्हणून त्यांच्या आधाराने बाबा पदमनजींनी *मराठी इंग्रजी* व *इंग्रजी मराठी* असे दोन आटोपशीर कोश तयार केले. याशिवाय त्यांनी *संस्कृत मराठी कोश* रचला आणि *शब्दरत्नावली* या पुस्तकात शद्वाखाली भिन्न भिन्न गटांचे दिग्दर्शन केले.

हे प्रा. गं. बा. सरदारांचे उद्‌गार बाबांच्या कोशरचनेच्या कार्याचे यथायोग्य मूल्यमापन करणारे आहेत.[४२]

बाबांचे हे कोश रचनेचे कार्य मोल्सवर्थ–कँडी यांच्या तुलनेने दुय्यम दर्जाचे आहे, परंतु बाबांच्या इतकाही साक्षेप त्यांच्यानंतर प्रसिद्ध झालेल्या मराठी–इंग्रजी कोशांत दिसत नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

* * *

## टीपा

१. *ज्ञानोदय*, ६ सप्टेंबर १९०६, पृ. २९४.
२. तत्रैव.
३. श्री. म. पिंगे, *युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा*, मुंबई, १९६०, पृ. ७४, ७५.
४. कृ. भि. कुलकर्णी, *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति*, मुंबई, १९५६, पृ. ११६.
५. तत्रैव, पृ. ११६–११७ वरून.
६. श्री. म. पिंगे, अनि. पृ. १४०–४५ वरून.
७. श्री. म. पिंगे, उनि, पृ. १५३.
८. कोशरचनाशास्त्र व कोशवाङ्मय, *मराठी शब्दकोश*, खंड १, सं. दाते-कर्वे, पुणे, १९३३, पृ. ५२.
९. गं. बा. सरदार, *अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका*, पुणे, १९३७, पृ. २४४.
१०. *ज्ञानोदय*, १ ऑक्टोबर १८७६, पृ. २९६.
११. दाते-कर्वे, उनि. पृ. ५९.
१२. *ज्ञानोदय*, १ सप्टेंबर १८५७, पृ. २६३.
१३. तत्रैव.
१४. दाते-कर्वे, उनि., पृ. ६०.
१५. *ज्ञानोदय* १५ फेब्रुवारी १८५९, पृ. ५८.
१६. 'Introduction', *A Comprehensive Dictionary English–Marathi*, Bombay, 1800, p. 10.
१७. *ज्ञानोदय* पृ. १९ अंक १४ (१५ ज्यु. १८६०) पृ. २२४ पाहा.
ता. क. क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप ह्या पुस्तकाच्या प्रति अजून मिळतात. किंमत रु. ४ शिवाय टपाल खर्च.
१८. *ज्ञानोदय* १५ फेब्रुवारी १८६५, पृ. ६४.
१९. *ज्ञानोदय* १५ नोव्हेंबर १८६९, पृ. ३५२.
२०. *ज्ञानोदय* १ एप्रिल १८७०, पृ. १०४.
२१. 'प्रस्तावना', *आदर्श मराठी कोश* पुणे, १९७१, पृ. १९.
२२. *ज्ञानोदय*, २८ मार्च १८६९, पृ. ९९–१००.
२३. *ज्ञानोदय*, २८ मार्च १८८९ पृ. ९९–१००.
२४. *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार*, पुणे, १९२२, पृ. ९५.
२५. 'प्रस्तावना', *शब्दरत्नावली*, मुंबई, १८६०, पृ. ३, ४.
२६. *The New American College The Saurus*, Ed. Albert H., 52nd

Printing, 1956-62, New York and Toronto Last page-Advertisement (स्वैर भाषांतर).

२७. 'प्रस्तावना', *शब्दरत्नावली*, मुंबई, १८६०, पृ. ४, ५.

२८. *ज्ञानोदय*, १ ऑगस्ट १८६०, पृ. ३०२.

२९. 'प्रस्तावना', उनि. पृ. ५.

३०. 'Preface' *Compendium of Molesworth's Marathi and English Dictionary*, Bombay, 1863.

३१. *ज्ञानोदय*, १ जून १८६३, पृ. १७६.

३२. *सुबोध पत्रिका*, मुंबई, २ मे १८७५.

३३. *ज्ञानोदय*, १५ सप्टेंबर १८६३, पृ. २७८.

३४. *मोल्सवर्थकृत मराठी-इंग्रजी कोशाचा संक्षेप*, मुंबई, १८६३, प्रस्तावना, पृ. ११.

३५. *ज्ञानोदय*, १५ सप्टेंबर १८६३, पृ. २७८.

३६. *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति*, मुंबई, १९५६, पृ. १३२.

३७. *ज्ञानोदय*, २६ मार्च १८९१, पृ. ९८.

३८. *संस्कृत-मराठी कोश*, मुंबई, १८९१, पृ. ८.

३९. *ज्ञानोदय*, २९ ऑक्टोबर १८९१, पृ. ३४८.

४०. *सुबोध पत्रिका*, २ मे १८७५.

४१. *विविधज्ञानविस्तार*, पु. ५ अं. ४, १८७०.

४२. गं. बा. सरदार यांचे 'बाबा पदमनजी' हे *आकाशवाणीवरील भाषण*, १९५५ (१२ जानेवारी), पृ. ५.

* * *

७

## आधुनिक मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचे जनक : १ – नव्या करारावर टीका

रे. ना. वा. टिळक बाबा पदमनजींना 'ख्रिस्ती मराठी वाङ्मयाचे जनक' असे संबोधतात.[1] त्याचप्रमाणे श्री. भास्करराव उजगरे त्यांना 'ख्रिस्ती वाङ्मयाचे भीष्माचार्य' म्हणतात.[2] या दोघांच्या म्हणण्यात बरेचसे तथ्य आहे. कारण की बाबा पदमनजींच्या सर्व लेखनापाठीमागची प्रमुख प्रेरणा ख्रिस्ती धर्म हीच आहे. कोशासारख्या ग्रंथामध्ये धर्मप्रसार किंवा धर्मप्रचार असणे फारसे शक्य नसते तेथेही बाबा पदमनजी लिहितात.

> ज्यांत अक्षय जीवनाचे शब्द आहेत असे जें पवित्रशास्त्र त्याचा ह्या देशात प्रसार होण्यास हा लहानसा ग्रंथ कांहीं अंशी कारणीभूत होवो.[3]

बाबा पदमनजींच्या प्रत्येक पुस्तकात पाहाणारास ख्रिस्तप्रेम आढळल्याशिवाय राहणार नाही. तथापि केवळ ख्रिस्ती धर्माचाच विचार ज्या पुस्तकात प्रामुख्याने केलेला आहे अशा त्यांच्या पुस्तकांचा येथे विचार अभिप्रेत आहे. त्यांची अगदी प्रारंभीची *स्त्रीविद्याभ्यास निबंधादी* पाच पुस्तके अप्रत्यक्षपणे ख्रिस्ती धर्माकडे कल असलेली दिसतात. *व्यभिचारनिषेधक बोध* या पुस्तकात तर काही ठिकाणी बायबलमधील वाक्ये उद्धृत केलेली आढळतात.[4] बाबांच्या पूर्वी बायबलमधील काही भागांची रूपांतरे परकीय मिशनऱ्यांनी केली आहेत. परंतु भाषेच्या दृष्टीने ती अगदीच वेगळी आहेत. उत्तम मराठीतून साक्षेपाने व उत्कटतेने लिहिणारे बाबा हे महाराष्ट्रातील पहिले ख्रिस्तसेवक होत. गुणवत्ता व विपुलता या दोन्ही बाबतींत बाबांना अद्यापपर्यंत कोणीच मागे टाकू शकले नाही.

लंडनमधील ट्रॅक्ट सोसायटीने प्रसिद्ध केलेल्या करारांचा परिचय मराठीत करून देण्याच्या निमित्ताने बाबांनी *नव्या करारावर टीका* या नावाच्या ग्रंथलेखनाला सुरुवात केली. तो लिहिताना साहजिकच त्यांच्या ख्रिस्ती धर्मविषयक सूक्ष्म अभ्यासाचा परिपाक त्यांच्या लेखनात उतरत गेला व दोन भाग मिळून सुमारे १४०० पृष्ठांचा हा ग्रंथराज मराठीत साकारला. याचा

पहिला भाग इ. स. १८७४ मध्ये आणि दुसरा भाग इ. स. १८७७ मध्ये प्रसिद्ध झाला. बाबांच्या ख्रिस्ती धर्माविषयक सर्व ग्रंथात हा ग्रंथ अनन्यसाधारण आहे म्हणूनच त्याचा परिचय काहीशा विस्ताराने या प्रकरणात करून देण्यात येत आहे.

**बायबल व नव्या कराराचे स्वरूप**

पवित्र शास्त्र अर्थात *बायबल* हा ग्रंथ म्हणजे अनेक पुस्तकांचा एक संग्रहच होय. सामान्यतः बायबलचे दोन महत्त्वाचे भाग पाडण्यात आले आहेत. त्यास अनुक्रमे जुना करार व नवा करार असे म्हणतात. जुन्या करारात ३९ तर नव्या करारात २७ पुस्तके आढळतात. सर्वसामान्य इब्रींचे (हिब्रूंचे) धार्मिक जीवन व त्यांचे अनुभव जुन्या करारात अंतर्भूत आहेत, तर नव्या करारात ख्रिस्तपूर्व लोकांच्या हालचाली, मनुष्य व परमेश्वर यांच्यातील दुवा येशूख्रिस्त व त्याचे जीवन याबाबतची माहिती आहे. जुन्या कराराच्या ३९ पुस्तकांची चतुर्विध विभागणी पुढीलप्रमाणे केलेली दिसते : (१) कायदा, (२) इतिहास, (३) काव्य, (४) भविष्य. त्याचप्रमाणे नव्या करारांतील २७ पुस्तकांची पुढीलप्रमाणे त्रिविध विभागणी केलेली दिसते : (१) ऐतिहासिक किंवा चार शुभवर्तमाने, (२) पत्रे, (३) प्रगटविणे. अशा प्रकारे *बायबल* या ग्रंथाचे स्वरूप दिसून येते. *बायबल* हा ख्रिस्तीधर्मामध्ये अत्यंत पवित्र ग्रंथ मानण्यात येतो. त्यात लोक-इतिहास व लोक-वाङमय यांचा समावेश आहे. त्या त्या काळाचा इतिहास, धर्म हा *बायबला*तील विविध पुस्तकात आढळतो. प्रत्येक पुस्तकाला तत्कालीन संदर्भाचे महत्त्व आहे. *बायबल*मध्ये एक सार्वकालिक सत्य असते अशी ख्रिस्तीधर्मियांची श्रद्धा आहे. पूर्वी परमेश्वराने जे माणसासाठी केले ते तो आजही करील ही भावना आहे. 'पवित्र शास्त्र' म्हणून बायबलचे महत्व अनन्यसाधारण असून प्राचीन भाषा व ऐतिहासिक संदर्भ यासाठी या ग्रंथावर अनेक टीकाग्रंथ झाले आहेत. त्यापैकी मराठीतील एक महत्त्वाचा टीकाग्रंथ म्हणजे बाबा पदमनजींची *नव्या करारावरील टीका* हा होय. या ग्रंथात बाबांनी नव्या करारांचे संपूर्ण स्वरूप उलगडून दाखविले आहे. ते उलगडून दाखविताना जुन्या कराराची पार्श्वभूमि सुरुवातीस नेमकी विशद केली आहे. ख्रिस्ताचा प्रत्यक्ष जन्म होण्यापूर्वी ईश्वराचा संदेश प्रेषितांच्या संदेष्टयांच्या उक्तीकृतीतून मनुष्यजातिपर्यंत कसा पोचला, याबद्दलचे जुन्या करारातील भाव साधार विवेचिल्यानंतर बाबा नव्या करारांचे अनेक ग्रंथाधारे विस्तृत प्रमाणात विवेचन करतात. *बायबल*चे विवेचन करावयाचे तर त्यांच्यासमोर असलेल्या बायबलच्या भाषांतराचाच त्यांना उपयोग करावा लागतो. साहजिकच या सर्व विवेचनावर भाषेच्या दृष्टीने अनेक बंधने पडतात. ती सर्व स्वीकारून बाबा आपल्या साऱ्या अभ्यासाचा जणू परिपाकच या ग्रंथात सादर करतात. बाबांच्या ख्रिस्ती धर्मविषयक लेखनात हा प्रयत्न सर्वात मोठा आणि बाबांच्या ग्रंथलेखन कर्तृत्वाला एकदम उठाव देणारा असा आहे.

पवित्र शास्त्राचा हा भाग (नवा करार) विशेष करून येशू ख्रिस्ताचेच प्रगटविणे आहे. पवित्र आत्म्याने प्रकाशित झालेल्या जुन्या कराराच्या वाचकास कोणी एक महापुरुष

इस्त्राएलांचा राजा व जगाचा तारणारा होऊन येणार आहे असें जागोजाग दृष्टीस पडत असे खरे, परंतु त्याचे दर्शन केवळ अंतःपटातून झाल्यासारखे होते. आता नव्या करारात तोच दिव्य पुरुष पूर्ण तेजाने प्रगट झाला आहे. इथे तो पतित झालेल्या मानवजातीला जसा तारणारा पाहिजे व ज्याच्या येण्याची सिद्धता ईश्वरप्रीतीने व ज्ञानाने इतका दीर्घकाळ करीत होता तसाच प्रगट होतो. त्याने जगात येऊन मानव राजनीति, मानवधर्मशास्त्र, ज्ञान व कलाकौशल्य यांच्याने व ईश्वरदत्त नेमशास्त्र याच्याने देखील जे करवले नाही ते सिद्धीस नेले. जे पापात मेले आहेत ते त्यांचे तो जीवन झाला आहे. जे अपराधी आहेत त्यांस पुनः तो ईश्वरकृपेचा सुखानुभव घ्यावयास पात्र करतो. प्रत्येक मनुष्याचे आत्म्यास द्विजत्व देऊन पावन करितो, आणि लोकांच्या मंडळीला शुद्ध करून सुदृढ करतो. तोच सत्य आहे. मनुष्याच्या मनात ज्या पारमार्थिक वस्तूसंबंधी पृच्छा उत्पन्न होतात त्यांचे समाधान तो करतो व आणखी पृच्छा करावयास उत्तेजनही देतो. अशा पृच्छकास तो ईश्वराचा व आपला स्वभाव प्रगट करितो, ईश्वराने मनुष्याच्या पापाची क्षमा करितांना आपला न्याय व दया उभय गुणांचा कसा मिलाफ केला हे दाखविली. सांप्रतकाळच्या जगाच्या कामांत ज्या गोष्टी आम्हास गूढ अशा वाटतात त्यांचे तो स्पष्टीकरण करतो व पुढील काळाविषयी जीवन, अमरत्व ही प्रकाशित करतो.

या नितांत श्रद्धेने बाबांनी हा 'करार' उभा केला आहे. याला 'करार' म्हणण्यातले औचित्य कोणते? आणि 'नवा करार' असे का म्हणावयाचे? तर,

जी नवीन ईश्वरी धर्मव्यवस्था प्रभु प्रवृत्त करावयास आला होता तिला त्यानेच स्वतः 'करार' असे नाव दिले आहे. (मात्थी २६, २८ व टी. पा.) आणि जसे शुभवर्तमान हे नाव त्याच्या पुस्तकास पडले, तसे ज्या पुस्तकात ईश्वरी प्रेरणेने ह्या व्यवस्थेचे निरूपण केले आहे. त्याला करार हे नाव पडले. देवाने पूर्वी दिलेल्या शास्त्रांत पुढे होणारी गोष्ट प्रतिबिंबानी व भविष्यांनी दर्शविल्या होत्या व म्हणून ते अपूर्ण होते, ते ह्या नव्या शास्त्राकडून अंशतः परिपूर्ण झाले, हे मात्थीचे शुभवर्तमान व इब्रि यांस पत्र यांत फार स्पष्ट रीतीने दर्शविले आहे. तसेच त्या प्राचीन शास्त्रांत ईश्वरी ज्ञान व मनुष्यांची कर्तव्ये व परमार्थ या विषयींच्या सर्व गोष्टी प्रगट केल्या नव्हत्या. त्या ह्या नवीन शास्त्रांत पूर्ण केल्या आहेत. हे मोशेचे धर्मशास्त्र व प्रभु येशूने त्याच्या प्रेषितांना लावून दिलेल्या आज्ञा व विधि यांची तुलना करून पाहिली असतां स्पष्ट ध्यानांत येईल. आणि जुन्या करारांत पुढे ईश्वर आणखी विशेष ज्ञान मनुष्यास शिकवील अशी अपेक्षा बाळगण्यास जशी जागा ठेवली होती तशी नव्या करारात अगदी नाही. . .संपूर्ण नवा करार मुळी ग्रीक भाषेत लिहिला गेला, व तो सर्व गद्यात्मक आहे. कोठे कोठे मात्र ईब्री कवितेप्रमाणे काही स्थळे आहेत. त्यांत जी पुस्तके आहेत ती सर्व ख्रिस्ती शतकाच्या पहिल्या शतकाच्या आंत लिहिली गेली व त्यांचे लेखन मार्क व लुक खेरीज करून येशूचे प्रेषित होते. या पुस्तकाचे दोन मुख्य भाग आहेत. (१) ऐतिहासिक, यात चार शुभवर्तमाने, व २ प्रेषितांची कृत्येही आहेत. (२) उपदेशपर, यात १) पौलांची पत्रे २) याकोब, पेत्रस, यहुदा व योहान्न यांची

पत्रे आणि (३) योहान्नाचे प्रगटविणे नामक जो नव्या करारातील मोठा भविष्य ग्रंथ तो आहे.

अशा प्रकारे बाबांनी नव्या कराराचे स्वरूप थोडक्यात विशद करून (पृ. ७–१०) पवित्र ग्रंथ, ऐतिहासिक ग्रंथ, परमेश्वर व त्यावरील विश्वास, तसेच असा परमेश्वर की जो प्रत्यक्षात इतिहासात होऊन गेला, त्यावरील विश्वास व तत्कालीन धार्मिक चळवळ यांचे प्रतिबिंब नव्या करारात कसे पाहावयास सापडते याची मीमांसा केली आहे.

**शुभवर्तमान**

नव्या कराराचे स्पष्टीकरण केल्यानंतर ते शुभवर्तमानाकडे वळतात. ते म्हणतात,

शुभवर्तमान याचा मूळ अर्थ व्यक्तच आहे. दुसरा अर्थ असा कीं पापी मनुष्यावर देवाने ख्रीस्ताच्या द्वारे जी दया केली, त्या दयेचा जो निरोप त्याला ख्रिस्ती शास्त्रांत 'शुभवर्तमान' म्हटले आहे. (मार्क १.१५ रो. १.१) ह्या शब्दाचा प्रयोग काळे करून ज्या ईश्वर प्रेरित पुस्तकात हा दयेचा निरोप लिहून ठेविला त्यांत व विशेष करून ज्यात ख्रीस्तांचे सर्व जन्मदारभ्य चरित्र, त्याचे मरण व पुन्हा उठणे ह्या गोष्टी लिहिल्या आहेत त्याच्या नावाकडे होऊ लागला. म्हणजे मात्थी, मार्क इ.कांनी लिहिलेल्या पुस्तकांस शुभवर्तमान म्हणू लागले. शुभवर्तमानाची चार पुस्तके आहेत. तथापि त्या प्रत्येकांत किंवा सर्वात येशू ख्रिस्ताचे सर्व चरित्र, व त्याचें सर्व चमत्कार आहेत असे नाहीं. येशू ख्रिस्ताचे संवाद, अनेक कामें, त्यांनी कथन केली नाहीत. शुभवर्तमानाचे लेख प्रामाणिक व खरे आहेत व ईश्वरी प्रेरणेनें लिखित आहेत. शुभवर्तमानाच्या चारही लेखकांनी जर ग्रंथ स्वेच्छेनें लिहिले असते तर ग्रंथ लोकप्रिय व्हावे व कीर्तिप्रद व्हावे म्हणून व लोकांस चमत्कारिक कथा सांगून त्यांचे रंजन करावे म्हणून कितीएक खऱ्या व खोट्या गोष्टी त्यांनी अवश्य लिहिल्या असत्या. तसें त्यांनीं केलें नाहीं. ख्रिस्ताविषयी आवश्यक तो सर्व भाग त्यांनी कथन केला आहे. तो कोण व कोठून आला, त्याचे गुण व कर्मे काय होती, त्याच्या उपदेशाचे बीज काय होतें, त्याने मनुष्याकरिता काय केले ह्या सर्व गोष्टींचा त्यांनी आपल्या ग्रंथी सप्रमाण संग्रह केला आहे. बाकी ईश्वरी सूत्रानें लुप्त होऊ दिल्या. याशिवाय आपले ग्रंथ वाचून पुण्य प्राप्त होईल असे ते म्हणत नाहींत. कथा माहात्म्य व स्वमाहात्म्य ते सांगत नाहींत. केवळ प्रभू येशूचा महिमा वाढावा म्हणून स्वतः पडद्यांत राहून येशूला मात्र ते सर्वांच्या पुढे ठेवतात. (पृ. ११)

मूळ ग्रंथाचे विवेचन करताना बाबा अधूनमधून हिंदू धर्मकथांकडे वळतात. ते म्हणतात,

हिंदू लोकांच्या ईश्वरप्रणीत ग्रंथांत म्हणजे पुराणात देवकथा आढळतात (वि. पु. स्कं. ६ ४.८) त्यांचे कर्ते कोणाचा तरी पक्ष धरितात. विरोधकांची निंदा, पुण्याचें आमिष दाखवितात, तसें शुभवर्तमानाच्या बाबतीत म्हणता येत नाहीं. ख्रिस्ताचें चरित्र चौघा-जणांनी चार निरनिराळ्या ग्रंथात लिहिले आहे. ह्यापैकी मात्थी व योहान्न हे दोघेजण आपण पाहिलेल्या गोष्टी लिहितात आणि जे ख्रिस्ताचे संवादन त्यांनीं ऐकले तेच

सांगतात. बाकीचे दोघे लेखक म्हणजे मार्क व लुक ह्यांनी जे शिष्य ख्रीस्ताच्या संगतीं होते व ज्यांनीं त्याची कामे स्वत: डोळयांनी पाहिलीं होतीं व लिहून ठेविलीं होतीं, त्यांच्या तोंडच्या गोष्टी किंवा त्यांचे ग्रंथ अवलोकन करुन आपले ग्रंथ रचिले आहेत. पहिलीं तीन शुभवर्तमानें चौथ्या शुभवर्तमानापेक्षां बऱ्याच गोष्टींनी निराळी आहेत. चौथ्याचे विषय व लेखनशैली निराळी वाटते. पहिलीं तीन मात्र बऱ्याच अंशीं परस्परांशीं मिळती जुळती आहेत. कित्येक ठिकाणीं तर वाक्य, शब्दरचना जुळतात. यावरून तर्क करतां येतो कीं ह्या लिहिणारांनीं प्रथम प्रेषितांच्या तोंडच्या ज्या गोष्टी ऐकल्या त्याच त्यांनी विश्वासूपणे लिहिल्या. त्यांत जो भेद आहे त्यावरून असे म्हणता येईल कीं त्यांनी परस्परांच्या ग्रंथावरून उतारे घेतले. नाहींत. त्या सर्वांचा शिक्षक व प्रेरक पवित्र आत्मा होता. त्या ग्रंथाच्या लेखांत जो ताळा दिसतो त्यावरून असे दिसते कीं या तीन ग्रंथकारांचा प्रेषितांशी संबंध होता आणि त्यांनीं दंतकथांवर आधारित लेखन केलें नाहीं. तात्पर्य या चार ग्रंथांत सुमेळ आहे तसा भेदही आहे.

या ग्रंथांतील विपर्यासांचा आपण केवळ मेळ घातला आहे असे बाबा म्हणतात. जेथे मेळ नाही तेथे ग्रंथकारांनी मुळातच ती गोष्ट थोडक्यात कथन केली असे समजावे किंवा व्यक्ती तितक्या प्रकृती या न्यायाने या चार जणांच्या ग्रंथात फरक असणारच हे लक्षात घ्यावे, असे प्रतिपादिले आहे. (पृ. १३)

**मात्थीचे शुभवर्तमान**

मात्थीच्या शुभवर्तमानासंबंधी बाबा लिहितात,

पहिल्या शुभवर्तमानाचा लिहिणारा मात्थी होता असें पूर्वीपासून यावत् ख्रिस्ती मंडळी मानीत आली आहे. ही गोष्ट आम्ही खात्रीनें सांगत नाही. म्हणून कोणास आश्चर्य वाटू नये. सर्व प्राचीन ग्रंथाच्या विषयीं परंपरागत चालत आलेल्या लोकाभिप्रयावरच विश्वास ठेविला पाहिजे. रामायण वाल्मिकीने लिहिलें किंवा भारत व्यासानें कथिलें ह्याला दंतकथे शिवाय दुसरें काय प्रमाण आहे?

मात्थीची थोडक्यात माहिती प्रस्तुत *नव्या कराराच्या टीके*त बाबांनी दिली आहे. त्याचे सार असे की, मात्थी हा जकातदार होता. स्वभावाने नम्र, येशूने माझ्यामागे ये असे म्हणताच जाणारा, सर्वत्याग करणारा, ख्रिस्ताकरिता त्याने मेजवानी केली. साधारणत: यरुशालेमचा नाश होण्ययापूर्वी सन ३७ मध्ये हे शुभवर्तमान लिहिलेले असावे. मात्थीचे शुभवर्तमाचा लेखक ख्रिस्ती झालेला यहुदी होता. त्याला शास्त्राची माहिती होती व त्याचा अर्थ ज्ञात होता. नाजरेथ येथील अवमानित उपदेशक हाच खरोखर इस्त्राएलचा वचनदत्त व दीर्घकालापेक्षित राजा आहे हे स्थापित करण्याच्या मुख्य हेतूने त्याने येशूचे चरित्र लिहिले आहे. दाविदाच्या गादीचा खरा वारिस गालीलातील एका खेडयांतील गरीब सुतार शाळेत त्याला सापडतो, आणि योसेफच्या मानलेल्या मुलांमध्ये इशायाने भविष्यरूपाने कथलेल्या इमानुवेलाची मूर्ति त्याच्या दृष्टीस पडती. येशूच्या चरित्रात त्याने ज्या कित्येक गोष्टी सांगितल्या आहेत त्या

इतर सुवार्तिकांच्या लेखात सापडत नाहीत. येशूला बालपणात जे मोठे संकट प्राप्त झाले व त्याचे बाल्यापासून कसे रक्षण झाले ह्या गोष्टीत मत्थीला भविष्यवाद्यांनी जे सांगितले होते त्याची प्रचिती दिसून आली. येशूच्या उपदेशात त्याने इस्त्राएलाच्या राजाच्या प्राचीन व्यवस्थेची परिपूर्ति पाहिली, आणि त्याचे उद्योग व चमत्कार, आणि त्याचे दुःख भोगणे, व मरण ह्या संबंधी सर्व गोष्टी यांकडून दाविदाच्या पुत्राविषयीच्या भविष्यांची परिपूर्णता होती. असे तो स्थापितो. ख्रिस्ताने जी भविष्ये सांगितली आहेत त्यापैकी यहुदी लोकांकडून त्याच्या शिष्यांची जी छळणूक व यरुशालेमचा नाश ह्या संबंधाने जी होती ती मात्र त्याने आपल्या ग्रंथात रक्षण करून ठेविली आहेत, कारण इस्त्राएलच्या आत्मिकराज्याच्या स्थापनेशी या गोष्टीचा संबंध प्राचीन भविष्यवाद्यांनी जोडलेला आहे. (अ २४ व यशा अ ६६ ता. पा.) यास्तव ह्या शुभवर्तमानास (जे बहुधा पहिल्यानेच लिहिले असावे) नव्या करारात जे आद्य स्थान दिले आहे ते योग्यच आहे, कारण ते जुना व नवा करार यांचा संबंध अगदी पूर्णतेने प्रगट करते. ह्याशिवाय ते इब्री लोकांच्या उपयोगी पडावे असे होते, व त्यांच्याच करिता ते प्रथम लिहिले असावे. (पृ. ३८–४०).

**मार्कसचे शुभवर्तमान**

मार्कसच्या शुभवर्तमानाचा परिचय अगदी थोडक्यात आहे. उदा. :

प्रे. १२.१२, २५ यांत सांगितलेला योहान्न हा दुसऱ्या शुभवर्तमानाचा लेखक हा बार्णबा होता. त्याचें उपनाम मार्कस होते असे पूर्वीपासून ख्रिस्ती मंडळाचे मत आहे. याच्या धार्मिक नातलगाचा पुत्र. तो प्रेत्रसाच्या उपदेशकाकडून ख्रिस्ती झाला असावा. कारण पेत्रसाचा त्याच्या आईच्या घरी वारंवार जाण्याचा परिपाठ असे (प्रे. १२.१२) असे दिसते. तो पौल व बार्णबा यांच्या संगतीने यरूशालेमाहून अंत्योखास जाऊन (प्रे. १२.२५) तेथून त्याच्या-बरोबर गावोगांव शुभवर्तमानाचा उपदेश करीत फिरावयास निघाला, परंतु मध्येच त्याने त्यास सोडले. (प्रे. १३.५, १३) यामुळे पुढे सहा वर्षांनी पौलसानें त्याला पुनः आपल्या-बरोबर फेरीत येण्यास नाकबूल केले. मग तो बार्णबाबरोबर कुप्रसास गेला. (प्रे. १५.३८ ३९) परंतु पुनः तो पौल रोमांत बंदिवान असतां त्याचा सोबती झाला आणि त्याविषयी पौलाने जे लिहिले आहे त्यावरून त्याची प्रीतिही त्याजवर बसली असे दिसते. (कल ४. १०–२) तो एकदा पेत्रसाबरोबर होता असा लेख आढळतो. (१ पेत्र ५.१३) प्राचीन काळचे ख्रीस्ती ग्रंथकार असे म्हणतात की, तो प्रेषिताबरोबर त्याच्या लौकिक कामांत बराच काळ होता, व त्या उभयतांचे फार सख्य जमले होते, आणि तो त्याच्या दुभाष्याचे किंवा चिटणिसाचे काम करीत असे व शेवटी तो स्वतः मिसर देशांत काम करीत असतां सत्याच्या साक्षीकरिता मरण पावला. (पृ. २२३)

परिचय थोडक्यात असला तरी या शुभवर्तमानावरची टीका महत्त्वाची आहे.

'मार्कसने आपला ग्रंथ रचते वेळी मात्थीच्या ग्रंथाचे अवलोकन केले असावे काय?' (असा प्रश्न उपस्थित करून बाबा म्हणतात,) त्याने त्याचे उतारे घेतले किंवा ग्रंथाचा सारांश

काढला असे म्हणता येत नाही. तो यरूशालेमातील पहिल्या ख्रिस्ती लोकांमध्ये राहत होता म्हणून त्याला प्रेषितांकडून पुष्कळ माहिती झाली असेल, व कदाचित मात्थीचे शुभ-वर्तमानही त्याच्या पाहण्यांत आले असेल. त्याची व पेत्रसाची मोठी मैत्री असल्याने त्यानेही त्याला प्रभु येशूच्या पुष्कळ गोष्टी विस्ताराने सांगितल्या असतील आणि त्या सांगताना आपल्या महत्त्वाच्या सर्व गोष्टी त्याने गाळल्या आहेत. एवढाच काय तो पेत्रसाचा व ह्या ग्रंथाचा संबंध दिसतो. बाकी तो कोणी सर्व स्वतंत्र कर्त्याच्या हातचा आहे यात संशय नाही. कित्येकांच्या मताप्रमाणे जर तो पेत्रसाच्या सांगण्यावरून अथवा त्याच्या देखरेखीखाली लिहिला असता तर मात्थीच्या ग्रंथाप्रमाणे त्याची रचना झाली नसती, पण योहान्नाच्या शुभवर्तमानांत जशा नव्या गोष्टी सापडतात तशा पेत्रसाच्या माहितीतील पुष्कळ नव्या गोष्टी त्यांत आढळल्या असत्या.

हा ग्रंथ केव्हा व कोठे लिहिला याचा निश्चय होत नाही. परंतु त्याचा काळ सन इ. ४८ पासून ६५ ह्या वर्षांच्या मध्ये असावा व त्याचे स्थळ रोम, कायसरिया, अंत्योख किंवा आलेक्झांद्रिया यांतून कोणते तरी एखादे असावे. . . . ह्यात प्रभू येशूच्या उपदेशापैकी फार थोडाभाग सांगितला आहे आणि जे काही लिहिले आहे ते फार संक्षिप्त आहे असे दिसते. परंतु ज्या चमत्कारिक कृत्यांवरून नाझरेथ येथील येशू हा देवाचा पुत्र होता असे सिद्ध होते त्याचे विस्ताराने कथन केले आहे. ह्यांतील जन्मवृत्तांत जरी संक्षिप्त आहे तरी ज्याचा तो आहे तो कोणी अपार सामर्थ्याचा, अश्रांत उद्योगाचा व अनंत दयेचा पुरुष होता असे दिसून येते.

## लूकाचे शुभवर्तमान

लुक नामक ग्रंथकाराची साद्यंत माहिती बाबा देतात :

ह्या शुभवर्तमानाचा व प्रेषितांची कृत्यें नामक ग्रंथाचा लूक हा पौल प्रेषिताचा काही काळ पर्यंत सोबतीचा कामकरी व प्रवासी होता. प्रेषितांच्या इतिहासामध्ये त्याचे नाव त्रौवास येथल्या कथेत आढळते. तेथून तो पौलासंगती फिलिपै येथे जाऊन (प्रे. १६.१०,१७) तेथे नवे झालेल्या ख्रिस्ती लोकांस उपदेश करावयास राहिला असे दिसते. नंतर सात वर्षांनी पुनः तो तेथेच येतो, आणि तेथून पौलाबरोबर आशिया व पालस्टीन ह्या प्रांतांत जातो व शेवटी रोम शहरास जातो. (२०.५–२८.१६) तेथे तो पौलाच्या मरणाअगोदर थोडे दिवस होता. (२ ति. ४,११) कल ४.१४ यांत सांगितलेला प्रिय वैद्य तो हाच होता असे सर्वसाधारण मत आहे. ह्याचे आईबाप विदेशी होते असे दिसते, कारण कल ४.११,१४ यांत तो 'जे सुंतेचे' त्यांहून वेगळा दर्शविला आहे. कित्येकांचे असे मत आहे की तो मिरिया प्रांतातील अंत्योख गांवी राहत होता, आणि ह्या मताला त्याच्या ग्रंथातील कित्येक लेखांवरून बळकटी येते. त्याच्या नांवावरून व त्याच्या वैद्यकीच्या धंद्यावरून असा तर्क निघतो की, तो कोणी धनवान रोमी गृहस्थाच्या मुक्त झालेल्या दासांपैकी असावा. परंतु त्याला यहुदी धर्माची इतकी बारिक सारिक माहिती असल्यावरून तो ख्रिस्ती होण्यापूर्वी त्या मतानुसारी

असावा असेही अनुमान निघते. त्याचे वैद्यकीचे ज्ञान त्याने जे आपल्या ग्रंथात रोगांचे वर्णन वगैरे केले आहे त्यावरून व ख्रिस्ताने व त्याच्या शिष्यांनी रोग बरे केल्याचे जे वृत्त लिहिले आहे त्यावरून दिसून येते. इतर शुभवर्तमानांमध्ये ह्याच गोष्टी साधारण रीतीने वर्णिल्या आहेत, परंतु लूका शिकलेल्या वैद्याप्रमाणे त्याविषयी लिहितो, आणि त्याच्या भाषेच्या शैलीवरूनही तो सुशिक्षित होता असे दिसते. (पृ. २९०) लूका त्याच्या ग्रंथां-तरीच्या गोष्टीचा स्वतः साक्षी नव्हता तर त्याने येशूला पाहिले होते. जे त्याला ओळखत होते त्यांच्या साक्षीवरून त्याने शोध करून प्रस्तुत ग्रंथलेखन केले ही गोष्ट त्याच्या प्रस्तावनेवरून समजते.

(अ. १.१–४) बाबांनी लूकाचा परिचय तर्कशास्त्रास धरून चांगल्या प्रकारे करून दिला आहे. आपल्या सिद्धान्तास प्रमाणे देऊन ग्रंथलेखकाचा परिचय करून देण्याचा हा गुण बाबांच्या या नव्या करारावरील टीकेत सर्वत्र आढळून येतो. आपल्या म्हणण्यास आधार काय, दंतकथा कोणत्या, अनुमाने कोणती इ. सर्व काही त्यांनी स्पष्टपणे लिहिले आहे. भाष्यकाराला आवश्यक असा तुलनात्मक दृष्टिकोण बाबांच्या ठिकाणी कसा होता याचा प्रत्यय आपणास प्रस्तुत टीकेत जागोजागी येतो. लूकाच्या शुभवर्तमानात आहेत पण अन्य शुभवर्तमानात नाहीत अशा काही गोष्टी बाबांनी निर्दिष्ट केल्या आहेत. त्यापैकी मुख्य येणेप्रमाणे असे म्हणून बाबा लिहितात,

(१) येशूच्या जन्मकालापूर्वी व जन्मकाळी घडलेल्या गोष्टी ह्याचा वृत्तांत लिहितांना लुकाला एका दस्तऐवजाचे सहाय्य मिळाले असावे असे दिसते, व हा दस्तऐवज कदाचित् येशूची आई मारया हिजपासून मिळाला असेल, कारण तीच मात्र ह्या गोष्टी तपशीलवार सांगण्यास लायक होती. (२) प्रभू येशूचे संवाद व वचने ही अ. ९.५१–१८.१५ यांत आहेत व ती त्याने गलील सोडल्या वेळेपासून त्याचा यरूशालेमास शेवटला वल्हांडण येईपर्यंतच्या मधल्या काळांतील असावीत असे दिसते, आणि (३) प्रभु मरून उठल्या-वरच्या कित्येक सविस्तर गोष्टी व त्याच्या स्वर्गारोहणाचा वृत्तांत. (पृ. २९०)

अशा प्रकारे तौलनिक अभ्यास करून प्रस्तुताचा वेगळेपणा बाबा त्यांच्या या टीकेत जागजागी सिद्ध करतात.

लुकाच्या शुभवर्तमानाचा इतिहास देताना बाबांनी प्रत्येक ठिकाणी आपले म्हणणे स्पष्टपणे साधार नोंदविले आहे. उदा. :

हे शुभवर्तमान प्रेषितांच्या कृत्याच्या पूर्वी लिहिले आहे यांत शंका नाही. (प्रे. १.१ पहा.) ह्याची मिती सन इ. ५०–५८ सालाच्या मध्ये आहे. लुकानें प्रथमतः आपला ग्रंथ थूयापिलस नामक आपल्या एका मित्राकरितां लिहिला. (अ १.३ पाहा.) तरी पुढे त्याचा सदोदित व सर्वत्र उपयोग व्हावा असाही त्याचा हेतू दिसून येतो. त्याने प्रभू येशूची वंशावळी मनुष्य जातीचा मूळ पुरुष जो आदाम त्यापर्यंत नेऊन पोचविली आहे, आणि त्यावरून यहुदी व विदेशी यांचा भेद न करिता ख्रीस्त हा जगाचा तारणारा आहे असे दर्शविले आहे. देवाच्या पुत्राचा आमच्या मनुष्य स्वभावाशी ज्या गोष्टीकडून निकट संबंध येतो त्या गोष्टी त्याने

फार पूर्णतेने वर्णिल्या आहेत. याकरिता त्याने देवाच्या पुत्राचे ईश्वरी तेज व महत्त्व यांस मलीनता न येऊ देतां त्याने प्रभूचा जन्म, त्याची बालपणीची वाढ, त्याची मानवी वंशावळी, त्याचा नित्य प्रार्थना करण्याचा परिपाठ, त्याला दूतांकडून प्रसंगोपात मिळालेले सहाय्य, आणि त्याच्या मनात मनुष्याचे सुखदुःख जाणून उत्पन्न होणारा कळवळा, इ. विषयाचे कथन केले आहे. ह्या विषयाचे व येशूच्या दृष्टान्तांचे कथन करतांना त्यांत असा रस भरला आहे की वाचणाराचे चित्त मोहून जाते. (अ. २.४०–५२, ४.१६–२२, ७.११–१७, १०.३०–३७ इ. इ. पाहा.)

ह्या साधारण विवेचनामुळे दुहेरी कार्य साधते. पहिले म्हणजे, 'नवा करार' मूळ स्वरूपात वाचकांना उपलब्ध होतो, बाबांसारख्या खंद्या मराठी लेखकाने तो लिहिल्यामुळे भाषेच्या दृष्टीने तो नमुनेदार ठरतो व दुसरे म्हणजे 'नवा करार' टीकेच्या स्वरूपात अधिकाधिक स्पष्ट होत जातो.

लुकाच्या शुभवर्तमानाचे आणखी वैशिष्टच सांगताना बाबा आपल्या टीकेत म्हणतात,

लुकाच्या शुभवर्तमानांत ऐतिहासिक गोष्टींची पूर्णता इतर शुभवार्तिकांच्या लेखाहून विशेष दिसून येती. त्याने आपल्या लेखास योहान्न बाप्तिस्मा करणाराच्या जन्माच्या गोष्टीपासून जो आरंभ केला आहे तो ख्रीस्ताच्या स्वर्गारोहणाची कथा सांगून त्याची समाप्ती केली आहे. त्याने ज्या मुख्य गोष्टी सांगितल्या आहेत त्यांचा त्याने परस्परांशी संबंध दाखविला आहे आणि त्यांत त्याच्या काळच्या बाहेरील बहुत ऐतिहासिक गोष्टींचे अंग दर्शविले आहे. ह्याशिवाय आणखीही कित्येक अगत्याच्या गोष्टी त्याने सांगितल्या आहेत. ह्यामुळे त्याचा ग्रंथ विशेष मोलवान झाला आहे. तो प्रभू येशूने कारणपरत्वे केलेली चर्चा व त्याच्या मुखांतून प्रसंगोपात निघालेलीं वाक्ये फार स्पष्ट रीतीने सांगतो, ज्या प्रसंगी ती उत्पन्न झाली ते प्रसंग व तेथे विद्यमान असणाऱ्या लोकांची उत्तरे ह्यांचेही तो वर्णन लिहितो. परंतु त्याचे कथानिरूपण सर्व ठिकाणी सारखे विस्तृत नाही, कोठे कोठे तो फार संक्षेपाने एखादी गोष्ट सांगतो व कोठे कोठे फार तपसिलवार लिहितो, आणि मार्का-प्रमाणे स्वरूपबोधक वर्णन करितो. (पृ. २९१)

याप्रमाणे विश्लेषक वृत्तीने बाबांनी या शुभवर्तमानावर लिहिले आहे. विषयाचा नीट अभ्यास करून त्याचा उलगडा करण्याची बाबांची दृष्टी या ठिकाणी दिसते.

### योहान्नाचे शुभवर्तमान

योहान्ना हा याकोबाचा भाऊ प्रेषिताच्या कामातील सोबती. त्याच्या आईचे नाव सालोमी. तो वडिलांबरोबर गालिलात बेयसायदा गावी गेन्नसेरेथ सरोवरात मासेमारी करी. कुटुंब सुखी कारण घरी मोलकरी होते. त्याची आई येशूची द्रव्याने सेवा करी. योहान्नांची व मुख्य याचकाची ओळख पण होती. येशूच्या आंद्रयस या प्रारंभीच्या शिष्याबरोबरचा एक योहान प्रथम बाप्तिस्मा करणारा योहान्न याचा शिष्य होता. त्यानेच त्याला येशूची ओळख करून दिली. तेव्हापासून तो त्याचा एकनिष्ठ शिष्य झाला. योहान्न, याकोब व पेत्रस यांना येशूने

फार जवळचे केले. सर्व गंभीर कामांचा साक्षीदार म्हणून निवडले. येशूला शिपायांनी धरले तेव्हा हा पळाला खरा, पण त्याने धैर्य सावरले. तो येशूच्या मरणसमयी त्याच्या जवळ होता. येशूने, स्वमातेची जबाबदारी पण याच्यावरच सोपविली. शुभवर्तमानाच्या इतिहासात योहानाचे नाव येते. पुढे नाही. पेत्रसाच्या समागमे ते असते. पौल ख्रिस्ती झाल्यावर जेव्हा यरूशालेमास आला तेव्हा योहान्न तेथे नव्हता. पुढे भेटला. तो मारयेच्या मरणापर्यंत यरूशालेमास राहिला. पौलानंतर आशिया मैनर येथे योहान प्रभूचे काम करावयास गेला. त्याचे राहण्याचे मुख्य स्थान एकस होते. त्या देशात त्याने अनेक मंडळया स्थापिल्या. रोमन बादशहाच्या काळी ख्रिस्ती लोकांच्या छळवणूकीत योहान्नला पारमसबरोबर पाठवले गेले. तेथे त्याला दृष्टान्त झाले. ते त्याने आपल्या प्रगटविणे नामक पुस्तकात लिहिले आहेत. नंतर तो सुटल्यावर एकदम येथे आला. तेथेच मरणापर्यंत त्याने आपले काम चालविले. इ. स. च्या ३०० व्या वर्षी तो मरण पावला. त्याचे वय तेवढेच होते. स्वभाव प्रथम तलाख होता. प्रभूच्या शिक्षणाची गरज त्यास वारंवार पडे. शिष्यात फळी करावी, एक फळी चालवावी असा त्याचा कल होता. सुशिक्षा मिळून तो प्रीतीपात्र व ममताळू झाला. पापनिषेधार्थ आग्रहाने तो क्षीण झाला नाही. प्रभूचे त्यावर विशेष प्रेम होते. तो स्वतः तसे म्हणतो. त्याचे मन विचारशील, ध्यानस्थ होते. येशूचे संवाद व कृत्ये तल्लीनतेने लिहिली आहेत. एकस येथे यरूशालेमचा नाश झाल्यावर बहुत काळाने सन ९७ सालच्या सुमारास योहान्नने आपले शुभवर्तमान लिहिले असे प्राचीन ख्रिस्ती साक्षीने दिसते. याच्या ग्रंथात येशूने सांगितलेले येरूशालेमाविषयीचे भविष्य व यहुद्यांच्या याजकाविषयीचे भविष्य मिळत नाही. कारण योहान्नच्या ग्रंथलेखनसमयी या गोष्टी घडलेल्या होत्या.

त्याने आपला ग्रंथ पालस्तैन देशाच्या बाहेर लिहिला. तेव्हा यहुदी राज्य व व्यवस्था नष्ट झाली होती. ख्रिस्ती धर्मात विदेशी आले होते. म्हणून यहुदी भाषेतील शब्द, रीतभात व स्थळ यांचा प्रसंगानुरूप तो अर्थ सांगतो. यहुद्यांच्या सणांचा उल्लेख करितो. (पृ. ४१८–१९) योहान्नाच्या शुभवर्तमानाचे आगळेपण दाखवताना बाबा लिहितात,

> योहान्नाला दुसऱ्या शुभवर्तमानांची माहिती होती यात संशय नाही. आपल्या ग्रंथाची वाचकांस प्रभु येशूच्या चरित्रातील मुख्य गोष्टींची पूर्वीच माहिती आहे असे कल्पून तो लिहितो असे त्याच्या लेखावरून दिसते. मात्थी वगैरे सुवार्तिकांनी लिहिलेलेल्या गोष्टींची तो जागोजाग सूचना मात्र करितो, परंतु त्याच गोष्टी पुनः क्वचित सांगतो, व जेव्हा त्या सांगतो, तेव्हा आपल्या ग्रंथाच्या मुख्य उद्देशाच्या संबंधाने मात्रस ांगतो. तो येशूने केलेल्याचमत्कारांपैकी साहा चमत्कार सांगतो, त्यातून पाच तर केवळ त्याच्याच ग्रंथात मिळतात. येशूने सांगितलेले सर्व दाखले व डोंगरावरील उपदेश व भविष्यात्मक संवाद ते सर्व त्याने सोडले आहेत. याप्रमाणे त्याच्या ग्रंथाचे दोन तृतियांश अगदी नवे आहेत आणि दुसऱ्या शुभवर्तमानांत मिळतात अशा ज्या कित्येक गोष्टी मिळतात त्या त्याने लिहिल्या आहेत. (पृ. ४१९)

नव्या कराराच्या पहिल्या भागात अशा रीतीने *बायबल*मधील चारी शुभवर्तमानांचा अल्प व साधार परिचय, शुभवर्तमानकारांचा स्थलकाल वगैरे उल्लेख, शुभवर्तमानाचे स्वरूप,

त्याचे इतरांपेक्षा निराळेपण, त्याचा इतिहास व त्या शुभवर्तमानाचे वैशिष्ट्य काय आहे इत्यादिचा बारिक सारिक तपशील बाबा पदमनजी देतात. सूक्ष्म अभ्यास, इतर ग्रंथांची मदत, संदर्भांचा उल्लेख, थोडक्यात पण महत्त्वाची माहिती देणे, स्पष्टीकरणाला टिपणे देणे इ. गोष्टी बाबांच्या खास होत्या. त्या सर्वांचे एक मनोहारी दर्शन येथे स्पष्टपणे दिसून येते. हे श्रमाचे, कष्टाचे व अभ्यासाचे काम होते आणि बाबांच्या प्रचंड उद्योगाची फलश्रुती या ग्रंथात दिसते.

*नव्या करारावर टीका भा. १* हे पुस्तक १८७४ साली प्रसिद्ध झाले. *ज्ञानोदयाने* त्याचे महत्त्व स्पष्ट करणारे परीक्षण तात्काळ प्रसिद्ध केले. तो म्हणतो,

> *नव्या करारावर टीका* हे पुस्तक लंडन येथील त्राक्ट सौसैयटीने छापून प्रसिद्ध केलेल्या एका इंग्लिश ग्रंथावरून रे. मि. बाबा पदमनजींनी केले आहे, तरी हे त्या ग्रंथाचे अक्षरशः भाषांतर आहे, असे नाही, तर स्वतःचे विचार व दुसऱ्या नामांकित टीकाकारांचे विचार घालून मुळापेक्षां कमी जास्त केले आहेत. जेथे मूळ टीका फारच संक्षिप्त होती, तेथे विस्तार केला. ज्या गोष्टी इकडील वाचकांस विशेष लाभदायक होण्यासारख्या नाहीत त्या सोडून दिल्या. जेथे शास्त्रांत वर्णिलेल्या लोकांच्या रीतिभाती व संप्रदाय, हिंदू लोकांच्या रीति व संप्रदाय यांसी मिळतात तेथे उदाहरणांनी स्पष्ट दाखविले आहे, ख्रिस्तीशास्त्र व हिंदुशास्त्रे यांच्या सिध्दान्तांचा कितपत मेळ व अंतर हे दाखविले आहे, ख्रिस्ती शास्त्रांतील बोध व निषेध ही स्पष्ट करण्याकरितां हिंदु कवींच्या ग्रंथांतून वेचे घेतले आहेत, आणि योग्य दिसले तेथे उपयक्त सूचना केल्या आहेत. या ग्रंथाची भाषा सुलभ आहे. कित्येक लोकांस ऊंच व कठीण भाषा लिहिण्यांत भूषण वाटते, तसी नाही, तशा भाषेने ही टीका लिहिली असती तर विद्वान पंडितांस मात्र तिचा उपयोग करिता आला असतां, साधारण लोकांस काही समजली नसती. त्यांस समजण्याकरिता यां टीकेवर एक उपटीका लिहावी लागली असती.[५] . . . हा ग्रंथ फार उत्कृष्ट आहे. याचे आणखी असे दोन भाग व्हायचे आहेत, तेही लौकर होतील असी आम्ही आशा करितो. हा ग्रंथ कित्येक ख्रिस्ती मनुष्यांपासी व विशेष करून प्रत्येक ख्रिस्ती उपदेशक, पंतोजी व विद्यार्थी यांपासी असला पाहिजे. म्हणजे त्यांस पवित्र-शास्त्राचा अभ्यास करावयास मोठे सहाय्य होईल. त्याचप्रमाणे ज्यांस ख्रिस्ती धर्माचे ज्ञान नाही, त्यांनी व विशेष करून ज्यांस सत्याचा शोध करण्याची आवड आहे, त्यांनी हे पुस्तक अवश्य घेऊन पठण करावे. म्हणजे त्यांसही मोठे सहाय्य होईल. त्याचप्रमाणे जे ख्रिस्ती धर्माच्या विरूद्ध लिहित व बोलत असतात, त्यांनींही ही टीका किंवा इंग्लिश भाषेत ज्या टीका आहेत त्यांतून एखादी घेऊन वाचावी आणि ख्रिस्ती शास्त्रांतील ज्या गोष्टी विरूद्ध किंवा सिद्धांताविरूद्ध आपण लिहिणार त्याचा वास्तविक अर्थ काय आहे हे पाहून मग लेखणीस हात घालीत जावा म्हणजे माजी विचार लिहिणारांप्रमाणे *दंभहारक* व *सुबोधपत्रिका* आदिकरून पत्रांतील लिहिणारांचे ख्रिस्ती धर्मविषयी जसे अज्ञान दिसून येते तसे त्यांचे दिसून येणार नाही.[६]

इ. स. १८९४ साली या नव्या करारावरील टीकेच्या पुस्तकाची दुसरी आवृत्ती अद्याप निघाली नाही म्हणून *ज्ञानोदयाने* दुःख व्यक्त केले आहे. एका पाळकास या टीकेचा कसा

उपयोग झाला व त्याने टीका दुप्पट किंमत देऊन कशी विकत घेतली होती याचा पण खुलासा याच लेखात आहे. ज्यांस इंग्रजी येत नाही त्यांना नव्या कराराचा अभ्यास करण्यास फार उपयोगी अशी ही बाबांची नव्या करारावरील टीका आहे या *ज्ञानोदया*च्या अभिप्रायाने तिची उपयुक्तता लक्षात येते.

**भाग दुसरा**

*नव्या करारावर टीका भा. २* मध्ये प्रेषितांची कृत्ये प्रगटविणे हा विषय आहे. प्रस्तुत ग्रंथात पहिल्या भागापेक्षा जास्त ग्रंथांचे सहाय्य घेतले व सूचिपत्र विशेष विस्तीर्ण व विषयप्रचुर आहे असे ग्रंथकार प्रस्तावनेत म्हणतात. ग्रंथातील विवेचनार्थ *बायबल*च्या १८५७, १८७२ व १८७३ साली झालेल्या मराठी भाषांतरांचा उपयोग करण्यात आला आहे.

प्रेषितांची कृत्ये या पुस्तकाचा कर्ता लूक. अंतर्गत पुराव्याची छाननी करून ते सन ६३ मध्ये लिहिले असावे हे बाबांचे अनुमान आहे. यात प्रेषितांची सर्व कृत्ये नाहीत. खूप गोष्टी गाळल्या आहेत. उदाहरणार्थ पेत्रस कैदेतून सुटल्यावर यरूशालेमाच्या मंडळीचा काहीच इतिहास यात नाही. तसेच रोम शहरात ख्रिस्ती धर्माचा प्रवेश प्रथम कोणाकडून झाला या विषयी व पौलाच्या बहुतेक कामांविषयी दुःख भोगण्याविषयी काही लेख आढळत नाही. त्यावरून बाबांना ग्रंथकर्त्याचा उद्देश असा दिसतो की, 'ख्रिस्ती मंडळीची प्रथम स्थापना तिचे आदिपीठ जे यरूशालेम व अंत्योखी येथे व यहुदी व विदेशी लोकांमध्ये कशी झाली व पुढे तेथून तो धर्म सर्वत्र कसा पसरला गेला हे संक्षेपाने सांगावे.' ह्या बेतावरून सर्व ग्रंथाचे स्वभावतः दोन मुख्य भाग होतात. पहिल्या भागात यहुदी लोकात पेत्रसाच्या श्रमाने मंडळीची स्थापना व वृद्धी कशी झाली (अ १–१२) आणि दुसऱ्यात विदेशी लोकांमध्ये पौलाच्या श्रमाने स्थापना कशी झाली (ब १३–२८) हे विषय आहेत. दोन्ही भागातील प्रेषितांच्या कृत्याचा संक्षिप्त परिचय करून दिल्यावर बाबा आपल्या प्रस्तुत ग्रंथात यरूशालेमाचा नाश होईपर्यंत घडलेल्या गोष्टींचा थोडक्यात वृत्तांत देतात. त्यानंतर 'प्रेषितांच्या पत्रावर साधारण विचार' या सदरात नव्या करारातील एकवीस पत्रांचा थोडक्यात परिचय करून देतात. ते लिहितात,

> प्रेषितांनी ख्रिस्ती मंडळ्यांस ईश्वरी प्रेरणेने जो उपदेश केला व जे ज्ञान कथिले ते त्यांच्या दंतकथेत मिसळून भ्रष्ट न व्हावे अथवा काळाच्या ओघांत वाहून जाऊन लयाप्रत न पोहोचावे म्हणन त्याच प्रेरणेने त्यांतून कित्येकांनी ते पत्ररूपाने लिहून ठेविले. ही पत्रे तीन प्रकारची आहेत, म्हणजे ख्रिस्ती मनुष्यांस पाठविलेली, अमुक एका मंडळास लिहिलेली, सर्वसाधारण ख्रिस्ती लोकांस लिहिलेली आहेत व काही यहुदी लोकांस आहेत. त्या पवित्र पत्रांत तारणोपाय संबंधी ईश्वरी संकल्पाचा शेवटला स्पष्ट बोध आहे. त्यांत पूर्वी ज्या गोष्टी गूढ होत्या त्याचे स्पष्टीकरण केले आहे व ज्या अपूर्व रीतीने समजत होत्या त्या पुरतेपणी शिकविल्या आहेत. त्यापैकी (१) प्रभु येशच्या राज्याचे रक्षण, ही एक गोष्ट आहे. हे राज्य ऐहिक वैभवाने व डामडौलाने स्थापित होईल असे प्रेषित व त्यांचे देशबांधव समजत होते, परंतू या पत्रांत ते केवळ पारमार्थिक व आकाशीय आहे, असे दर्शविलेले आहे.

(२) दुसरी गोष्ट ख्रिस्ताचे दुःख भोगणे, मरण व पुनरुत्थान याचा अर्थ प्रेषितांस समजण्यास फार कठीण पडत असे. त्याविषयी इथे असा उलगडा केला आहे की, मनुष्य जातीच्या तारणाची आशा केवळ यावरच अवलंबून आहे. ह्या पत्रात या गोष्टींच्या संबंधाने असे सांगितले आहे की, ख्रीस्त आमच्या अपराधांकरिता मरण पावला आणि आम्हाला न्यायी ठरविण्याकरिता पुनः उठला, आणि यामुळे मनुष्यास आपल्या विषयवासना जिंकून सर्व कर्मांत ख्रिस्ती सदाचाराने वागण्यास परम उत्कृष्ट हेतू उत्पन्न होतात, असे सिद्ध केले आहे. (उदाहरणार्थ कल ३.१–५ पाहा.) (३) तिसरी गोष्ट, विदेशी लोकांस ख्रिस्ताच्या मंडळींत बोलवणे ही पत्रे प्रेषितांच्या कृत्यांचे पुस्तकाचा संबंध धरून वाचून पाहिली असतां विदेशी लोक ख्रिस्तामध्ये सुवार्तेच्या योगे यहुद्यांच्या संगतीने वारिस व एका शरिराचे सहभागी व्हावे म्हणून बोलाविले आहेत असे स्पष्ट समजते. ह्या गोष्टीविषयी पौल प्रेषित असे म्हणतो कीं, (एफ् ३.३–६) प्राचीन भविष्यवाद्यांच्या ग्रंथांत व प्रभूच्या संवादांत जरी हिची सूचना होती तरी ती पवित्र आत्म्याकडून नवीन प्रगट झाली आहे. (४) या पत्रांत प्रभूच्या दुसऱ्या येण्याविषयी अनेक भविष्ये आहेत आणि जशी त्याचे पहिले येण्यावर त्याच्या लोकांची आशा होती तसी या येण्याची त्यांच्या सांप्रत काळच्या लोकांस अपेक्षा आहे, असे सांगितले आहे. (५) आणि शेवटी या पत्रांत नीतिसंबंधी कर्तव्यें आचरण्याविषयी जागोजाग महादरमाच्या उपयुक्त आज्ञा व बोध आहेत, ही कर्तव्यें मनुष्याच्या स्वकीय आचरणसंबंधी व इतरांस अनुलक्षून आहेत याचे विवेचन इतके स्पष्ट व परिपूर्ण आहे कीं पूर्वीच्या शास्त्रभागांत तसे सांपडत नाही. आणि तेणेकरून संपूर्ण ख्रिस्ती नीतिशास्त्राचा संग्रह त्यांत झाला आहे. (पृ.१५९)

बाबांच्या मते ही पत्रे संक्षिप्त आहेत म्हणूनच चटकन लक्षात राहतात. ती ख्रिस्तीशकाच्या पहिल्याच शतकात सर्वमान्य होती. नव्या करारात एकूण एकवीस पत्रे, आहेत, पैकी तेरा पौलाची, कारण त्यावर त्याचे नाव आहे. उर्वरित सातांपैकी दोन पेत्रसाची, एक यरूशालेमाच्या मंडळीच्या पालकाचे, तीन योहान्नाची व एक यहुद्याचे. या प्रत्येक पत्रकर्त्याची माहिती, त्याचा स्वभाव, गुण, चरित्र व पत्रविषय, पत्राविषयीचे प्रास्ताविक इ. बाबांनी आपल्या टीकेत दिले आहे.

शेवटी बाबांनी 'प्रगटविणे' या विषयासंबंधी भाष्य केले आहे. ते लिहितात,

'प्रगटविणे' म्हणजे गुप्त किंवा झांकलेल्या गोष्टी उघड्या करणे. (रो. १६. २५,२६) ह्या पुस्तकांत प्रभू येशू ख्रीस्ताने योहान्न प्रेषितास प्रगट केलेल्या गोष्टी आहेत. म्हणन ह्याला 'प्रगटविणे' असे नांव दिले आहे. हे प्रगटविणे योहान्न ईज्यन समुद्रांतील पातमस नामक बेटांमध्ये असतांना झाले. तेथे त्याला दोमिश्यन बादशहाने देशबहिष्काराची (निकालाची) शिक्षा भोगण्याकरिता पाठविले होते. इ. स. ९४ किंवा ९५. (पृ.७४२)

संकटकाळात व दुःखात व छळ होत असताना ख्रिस्ती लोकांचे धैर्य टिकविण्यासाठी या पुस्तकाचा उपयोग फार होतो, असे बाबा टीकेत सांगतात. ते लिहितात, 'ह्या भविष्यग्रंथात काळाच्या समाप्तीपर्यंत होणाऱ्या गोष्टी प्रगट केल्या आहेत.' त्यामुळे नवीन 'प्रगटविणे'

ची आशा नाही व देवाचा मनुष्याला हा शेवटचा निरोप आहे. प्रगटविण्याच्या पुस्तकातील दृष्टांत, त्यांचे स्थळ, काळ, गोष्टी व माणसे याबाबत टीकाकारांत कसे भेद आहेत हे स्पष्ट केल्यानंतर लेखक म्हणतो, 'प्रगटविणे ह्या ग्रंथाचे स्वरूप, हेतू व त्यापासूनचे शिक्षण याबाबत मात्र अनेक टीकाकारांत एकमत आहे.' ह्या पुस्तकात ईश्वरी तारणारा प्रभू येशू ख्रीस्त याचे तारणसंबंधी कार्य व त्याचे स्वकीय गुण, यांचे विशेषकरून प्रदर्शन केले आहे. तो सनातन, स्वयंभू परमेश्वर असून मर्त्य मानव झाला, आणि अल्पकाल मरणाधीन होऊन मरणावर जय मि वता झाला, आणि आपल्या महिमा पावलेल्या दिव्य मानवी स्वभावे करून मंडळीच्या स्वामित्वाच्या श्रेष्ठ अधिकाराची चिन्हे धारण करीत आहे, व आपले सनातनत्व, सर्वसमर्थता व सार्वभौमत्व हा स्थापन व प्रगट करीत आहे. व सर्व सुबुद्ध प्राणी त्याचे भजन करीत आहेत, असा वर्णिलेला आहे. (पृ. ७४४) नवा करार पद्यात्मक नसल्यामुळे जुन्या करारातील भविष्य-ग्रंथाप्रमाणेच तो कसा काव्यात्म आहे, यात आरंभापासून अंतापर्यंत यथाक्रम अनुसंधान असून विषयांचे संविधान उत्तरोत्तर कसे विकसित पावते हे सांगण्यात आले आहे.

नव्या कराराचेही मुख्य दोन भाग आहेत. त्यातील (१) प्रथम खंडात (अ १–३) आरंभक किंवा प्रस्तावनारूप दृष्टान्त आहेत. यात मंडळीच्या पतीचे दैवी गुण व त्याचा मनुष्याविषयीचा कळवळा यांचे प्रदर्शन केल्यावर त्या काळातील मंडळ्यांपैकी सात मंडळ्यांस पत्रे आहेत. (२) द्वितीय खंडात भविष्यविषयक दृष्टान्तमाला आहेत. त्यांत मुख्य तीन श्रेणी आहेत. त्यांतील विषय देवाच्या व त्याच्या शत्रूवरील गजब आहेत. ते सात शिक्के उघडणे, सात करणे, वाजणे, व सात प्याले ओतणे यांच्याशी जोडले आहेत. यांतून प्रत्येक सर-णीच्या पूर्वी किंवा नंतर दुसरे दृष्टान्त आहेत. त्यात देवाच्या राज्याची व मंडळीच्या सांप्रतच्या दास्यावस्थेची व दुःखावस्थेची किंवा तिच्या भावी (पुढच्या) नयावस्थेची व महिने चिन्हे दर्शविली आहेत. (अ ४–२०) आणि ग्रंथसमाप्तीस जो विषय आहे त्यात ख्रिस्ती मंडळीच्या शेवटच्या व परिपूर्ण अवस्थेचे लाक्षणिक वर्णन आहे. (अ २१–२२) नव्या कराराच्या टीकेच्या या दुसऱ्या भागात हे दृष्टांत, पत्रे, व्यंजनात्मकता, रूपकात्मकता सगळी उलगडली आहे व अशा रीतीने नवा करार सामान्य वाचकांस या ग्रंथात उत्तम रीतीने समजावून सांगितला आहे.

नव्या कराराच्या पहिल्या भागात चार शुभवर्तमाने आहेत. दुसऱ्यात प्रेषितांच्या कृत्या-पासून प्रगटविण्यापर्यंत पुस्तके आहेत. रचना एका विशिष्ट पद्धतीची असून प्रथम प्रस्तावना, नंतर नव्या करारासंबंधी प्रस्तावनारूप निवेदन, म्हणजे उपोद्घात आहे. त्यानंतर दोन उपयुक्त कोष्टके आहेत. त्यापैकी एकात इतिहासातील गोष्टींचा कालानुक्रम आणि रोमन राज्यात घडलेल्या समकालीन गोष्टी दिल्या आहेत. दुसऱ्या कोष्टकात शुभवर्तमानांच्या इतिहासाचा कालानुक्रम व चारी शुभवर्तमानांचा सुमेळ दर्शविला आहे. त्यानंतर टीका आहे. टीकेतही प्रत्येक पुस्तकाच्या आरंभी त्या त्या पुस्तकाची प्रस्तावना दिली आहे. पुढे प्रत्येक पृष्ठावर मूळशास्त्र, त्याच्या खाली तुल्यार्थदर्शक शास्त्रवचनांची ठिकाणे व त्यांच्या खाली टीका, आणि प्रत्येक अध्यायाच्या आरंभी त्या अध्यायातील विषयांचे टिपण व शेवटी त्यावरून उपयुक्त सूचना दिल्या आहेत. उदाहरणार्थ :

मात्थीने केलेले शुभर्तमान

(१) अध्याय–अब्राहमचा पुत्र दाविद, याचा पुत्र येशू ख्रीस्त,* याची वंशावळी . . . व १२.३ व २२.१८ गाल ३:१६ मात २२.४२–४५ गीत ९.३ येशूची राजकीय वंशावळी ओ. १–१७ व येशू ख्रीस्त याची वंशावळी. यहुदी लोकांचा मूळ पुरुष अब्राहम याच्या कुळात ख्रीस्ताचा जन्म होईल असे फार प्राचीन काळी देवाने वचन दिले होते. (अल्प १२ १–३, २१,१२ इब्रि ११.१८ गाल ३.१६ 'दाविद' हा अब्राहमाच्या वंशातला होता. आणि त्याच्या कुळात मशीहा ख्रीस्त येईल असेही वचन होते. (इर्म २३.५ गी १३२–१० ११) अब्राहम हा ख्रीस्ताच्या पूर्वी १९०० वर्षे होता व दाविद सुमारे १००० वर्षे होता, आणि यहुदी लोक ह्या भविष्य-वाक्याची परिपूर्ती होण्याची वाट पाहत होते. ह्या कारणामुळे मात्थीने ख्रीस्त ह्या दोघांच्याही कुळात जन्मला असे प्रमाण दाखविले आहे.

'पुत्र', वंशज–वंशातला जसे राम हा दशरथाचा पुत्र असतां त्याला रघुनंदन (रघूचा पुत्र) म्हटले आहे, तसेच येथे समाजाने–'येशू' ग्री. श., इब्रि भाषेत 'यहोशवा', व. अ. 'यहोवा तारितो', म्ह. तारणारा विशेषनामांची असीं रूपांतरे अन्य भाषेतही होतात. यशोदा, यमुना, अयोध्या यांचे ब्रिज भाषेत जशुदा, जमुना, अजुध्या असे रूप आहे. मुसलमान लोक येशूला 'ईसा' त्यांत देवाचा आत्मा होता म्हणून 'रूह अल्ला' असे म्हणतात. कु. २.८१ – ख्रीस्त हाही ग्रीक श. आहे. इ.ब्रि. भा. त मशीहा, म्ह. अभिषिक्त. आमच्या प्रभूला अधिकार परत्वे किंवा हुद्यावरून नाव मिळाले आहे. (योहा. १, २०, ४१ पाहा.) ओ. १७ बाबेलाचा प्रवास, बाबेलचा राजा नेबुखदनेज्जार याने यरुशालेम घेऊन (ख्रि. पू. ५८८) यहुदी लोकांस पाडाव करून आपल्या देशी नेले त्या वेळी त्यांस घडलेला प्रवास. (२ का ३६) (पृ. ४१) अशा प्रकारे मूळ शास्त्राचा अर्थ अनेक उदाहरणांनी विशद करण्याचा उत्तम प्रयत्न नव्या करारात केलेला आहे असे दिसून येते.

नव्या कराराचा मूळ आधार 'लंदन येथील त्राक्ट सोसायटी'ने प्रसिद्ध केलेली नव्या कराराची इंग्लिश टीका. बाबांच्या मते ती सर्वोत्कृष्ट आहे, कारण 'तिच्या रचणाराने अनेक महान व नामांकित ख्रिस्ती ग्रंथकारांचे सहाय्य घेतले आहे. इतकेच नाही तर तिच्या रचण्यांत स्वतःचे ज्ञान, विचार व विद्या यांचा सद्व्यय केला केला आहे. ही टीका जरी संक्षिप्त आहे तरी बहुसंग्रही असून शास्त्राभ्यासी मनास बहुसूचक आहे.' महाराष्ट्र देशाच्या लोकांस तिचा विशेष उपयोग व्हावा म्हणन भाषांतरकर्त्याने त्यात जो फेरफार केला आहे तो अथवा ज्या गोष्टीकडे विशेष लक्ष दिले आहे त्या गोष्टी पुढीलप्रमाणे :

'मुळातील अतिसंक्षिप्त टीकेचा इतर ग्रंथाधारे विस्तार, महाराष्ट्रीयांस अनुपयुक्त वाद व गुणावगुण दर्शन यांचा समाहार केलेला आहे. त्याचप्रमाणे शास्त्रात वर्णिलेल्या लोकांच्या रीतिभाती, धर्मसंप्रदाय जेथे हिंदू लोकांच्या रीतिभातींशी व धर्मसंप्रदायाशी मिळतात तेथे उदाहरणांनी प्रकाशित केले आहेत.'

ख्रिस्तीशास्त्र व हिंदुशास्त्र यांच्या सिद्धांतामधील साम्य व वैषम्य वर्णन केले आहे. ख्रिस्ती-

* बाबा 'ख्रिस्त' हा शब्द 'ख्रीस्त' असा (बहुतेक ठिकाणी) लिहितात.

शास्त्रातील बोध किंवा निषेध यांच्या प्रकाशनार्थ हिंदू कवींच्या ग्रंथातून कित्येक ठिकाणी उतारे घेतले आहेत, अशी आपल्या टीकेची वैशिष्ट्ये त्यांनी कथन केली आहेत. टीपात कित्येक ठिकाणी *वेदोपनिषदे, गीता, महाभारत, पुराणे, स्मृती, ज्ञानेश्वरी, तुकारामांचे अभंग, दासबोध* यातील समानार्थक वा विरोधी उतारेही दिले आहेत. उदाहरणार्थ, 'मीजे तुम्हास अंधारांत म्हणतो ते उजेडात आणा आणि जे मी तुमच्या कानांत सांगितले ते धाब्यावरून गाजवा.' या वचनाशी विरोधी म्हणून त्यांनी गीतेतील, 'इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन' हे वचन उद्धृत केले आहे. 'सर्वंच कडूपण व आवेश व राग बडबडणे व निंदा ही अवघ्या दुष्टपणा सुद्धां तुम्हांपासून दूर होवोत' या वचनाखाली, 'निंदा हे भोजन जेवण जयासी । जोड घरी राशी पातकाच्या' या तुकारामाच्या पंक्ति उद्धृत करून, 'तथापि अमंगल भाषणाच्या मळापासून तुकारामही सुटला नव्हता' असा खोचक शेरा मारला आहे.

'जो माझ्यापेक्षा बापावर किंवा आईवर प्रीति करतो तो मला योग्य नाही. आणि जो माझ्यापेक्षा पुत्रावर किंवा कन्येवर प्रीति करतो तो मला योग्य नाही.' या शास्त्रवचनाचा अर्थ बाबांच्या टीकेत पुढीलप्रमाणे दिला आहे.:

काही तरी हानी सोसल्यावाचून कोणीही ख्रीस्ताचा शिष्य होत नाही. ख्रीस्त हाच सद्गुरू आहे, व पुढील ओव्या त्यालाच मात्र अर्पण करणे योग्य आहे. (पृ. ९६–९७)

आपुलीया गुणांची लेणी । करीन गुरुसेवे स्वामिणी ॥
हे असो होईन गवसणी । गुरु भक्तिसी ॥
गुरु स्नेहा चित्रे वृष्टि । मी पृथ्वी होईन तळवटी ॥
ऐशिया मनोरथांची सृष्टि । अनंतरिची ॥
ताट मी काढीन । शेज मी झाडीन ॥
चरण संवाहन । मीच करीन ॥
सिंहासन होईन आपण ।
वरी गुरु करी आरोहण । ओईन पुरेपण । वेगळेचे ॥
गुरु क्षेत्र । गुरु देवता । गुरु माता । गुरु पिता ॥

*ज्ञानेश्वरी* अ. १३.४, १३–१५, २४–२५

जगका अजब तडाखाबे – तूं क्या जाने लडकाबे – बडे मिजाजी कठडे बैठे. तक्या बिछायत साजा – मार झपेटकर जम लेजावे जैसा खबुतर बूझा . . . १ नववी मरगय दसवी मरगय– मरगय सहस्त्र अठ्याशी – तेहतीस कोटी देवता मरगय – पडे कालकी फाशी . . . २ पीर मर गय, पैगंबर मरगय – मरगय जींदा जोगी – जपीतपी संन्याशी मरगय – मरगय हकीम रोगी . . . ३ *कबीर*

अशा प्रकारे नव्या करारात 'मृत्यू'चे स्पष्टीकरण केलेले आढळते.

### इतर ग्रंथाच्या आधारे स्पष्टीकरण

'मी आपली मंडळी रचीन व तिजवर नरकाच्या दरवाज्याचे बळ चालणार नाही' या

वचनावरची टीका पुढीलप्रमाणे आहे : 'अधोलोकीचे दरवाजे, हे दीस म्ह. मृतलोक याला इथें नरक म्हटले आहे. ह्या जगात जे कांही पराक्रमी व वैभवयुक्त आहे ते सर्व मृत्यूच्या दाढेत पडते. (इशा. १४.३–२०) 'दरवाजे' म्हणजे वेस.

मृत्यू कोण कोणास नेतो त्याविषयी रामदासाने व कबीराने चांगले वर्णन केले आहे. त्यांतून ख्रिस्ती उपदेशकाच्या उपयोगासाठी काही ओव्या इथे उतरून घेतल्या आहेत.

मृत्यू काळ काठी निकी । बैसे बळियाचे मस्तकी
महाराज बकिये लोकी । राहो न शकती ॥
मृत्यु न म्हणे विख्यात । मृत्यु न म्हणे हा श्रीमंत ।
मृत्यु न म्हणे हा अद्‌भुत । पराक्रमी ॥
मृत्यु न म्हणे हा भूपि । मृत्यु न म्हणे हा चक्रवर्ती ।
मृत्यु न म्हणे करामती । कैवाड जाणे ॥
मृत्यु न म्हणे ब्रह्मचारी । मृत्यु न म्हणे जटाधारी ॥
मृत्यु न म्हणे निराहारी । योगेश्वर ॥
मृत्यु न म्हणे हा पुण्य पुरुष । मृत्यु न म्हणे हरिदास ।
मृत्यु न म्हणे विशेष । सुंकृति नर ॥
गेले बहुत वैभवाचे । गेले बहुत आयुष्याचे ।
गेले अगाध महिमेचे । मृत्युपंथे ॥ *दासबोध* द. ३ समा. ९.

'जे पाहात नाहीत त्यांनी पाहावे व जे पाहातात त्यांनी आंधळे व्हावे' याचे स्पष्टीकरण टीकेत असे, आहे 'माझ्या येण्याने जे आत्म्याने आंधळे आहेत, त्यास दृष्टी प्राप्त झाली व जे आपणांस ज्ञानचक्षू आहेत असा अभिमान धरत होते त्यांस अंधत्व प्राप्त झाले.' (पृ ४६६-६७)

याकोबाचे पत्रात असे म्हटले आहे. ५ तुम्ही पृथ्वीवर चैनबाजी केली. आणि विषयभोग केला आहे, तुम्ही जसे बधण्याच्या दिवसात तशी आपली अंतःकरणे पुष्ट केली आहेत. न्यायी याला तुम्ही अन्यायी ठरवून घात केला. तो तुम्हास आठवीत नाही. याचा टीकेत अर्थ व स्पष्टीकरण (भाष्य) पुढीलप्रमाणे केले आहे ५ *पृथ्वीवर चैनबाजी* : ही चैनबाजी जुलमाने मिळविलेल्या धनावर होती.

**अंतःकरणे पुष्ट केली आहेत :** तुम्ही आपल्या देहवासना तृप्त केल्या आहेत. लू. २१.३४ प्रे. १४.१७ तुम्ही, जी जनावरे कापायाच्या दिवशी देखील अधाशासारखी खूप खाऊन आपल्या कुशी भरतात, त्याप्रमाणे आहात.

विषयलुब्ध धनवान लोक विषयाचा कसा उपभोग घेतात व खाण्याणिण्याच्या घमंडीत कसे राहातात आणि आपली अंतःकरणे पुष्ट कशी करतात ह्याचे नुकतेच एक उदाहरण बाहेर पडले आहे. तुर्कस्थानच्या सुलतानाच्या नित्याच्या भोजनात ९४ प्रकारचे पदार्थ करून पुढे ठेवावे लागतात. त्याच्या जनानखान्यात ७०० स्त्रिया आहेत, त्यावर पहारा करणारे ३५० खवास आहेत. त्यांच्या खुराकासाठी ४०,००० बैल सालिना मारतात. शिवाय बकरी, बदके, कोंबडी यांची तर संख्याच नाही. इतका खर्च चालविण्यास तो रयतेला

गांजून द्रव्य उत्पन्न करतो. (हे लिहून गल्यावर ह्या विषय लंपट राजाला त्याच्या प्रजेने पदच्युत केले व तो आत्महत्या करून मरण पावला.)

(पृ. ६५२) या प्रकारे बाबांनी आपल्या भाष्यत विषयाची फोड सोदाहरण केलेली असल्याने ह्यात सोपेपणा झाला, रंजकता आली आणि अवघड किंवा कठीण गोष्टीचे स्पष्टीकरण झाले.

मार्क १२ – ओ. ३८ 'आणि तो उपदेश करितांना त्यास म्हणाला, शास्त्र्यांविषयी जपा कारण की झगे घालून फिरणे आणि चवाट्यात मुजरे घेणे, ३९ आणि सभा स्थानांत मुख्य आसने जेवणामध्ये मुख्य बैठकी त्यास आवडतात. ४० ते विधवांची घरे खाऊन टाकतात व ढोंगाने लांब लांब प्रार्थना करतात. ते अधिक दंड पावतील. . .' या मूळ नव्या करारातील वचनांवर बाबांनी आपल्या टीकेत पुढील भाष्य केले आहे :

येशू शास्त्र्यांविषयी जपायास सांगतो, आणि विधवेच्या अर्पणाची प्रशंसा करितो. ओ. ३८–४४.

ओ. ३८. ३९ मात्थी अ २३ मधील या विषयाचा ह्या ओव्यांत केवळ अतिसंक्षिप्त रीतीने उल्लेख केला आहे.

४० विधवांची घरे इ. ते मानकवी भक्तीचे पोम दाखवन निराश्रित व भोळे लोकांचा विश्वास आपणावर बसवून घेत आणि आपला लोभी व परद्रव्याभिलाषी संकल्प सिद्धीस नेत. ह्या देशात अशा प्रतीचे गुरू बहुत आहेत :

गुरु म्यां केला घरवासी । माझ्या चुकल्या दोन म्हैशी ॥१॥
आपली बुट बुट घ्यावी । माझी परता परत द्यावी ॥२॥
तुझा मंत्र घेता कानी । माझ्या पेवात शिरले पाणी ॥३॥
गुरु म्या भाग्यासाठी केला। कांही फळाशी नाही आला ॥४॥
तुझा मंत्र नव्हे बरा । माझा बैल चुकला मोरा ॥५॥

*तुकाराम*

त्या ठिकाणी तुकारामाचा अभंग देऊन भारतातील ढोंगीगुरुंचे तुकारामाने केलेले वर्णन स्पष्टीकरणार्थ घेतले आहे. (पृ. २७३) नव्या करारावरची टीका एतद्देशियांना उपयुक्त आहे ती अशी.

'३ तेव्हा तो दाखले देऊन त्यास गोष्टी सांगू' लागला. की पाहा, कोणी पेरणारा पेरावयास गेला. . .परंतु माणसे झोपेत असतांना त्याचा वैरी आला, आणि निंदण पेरून गेला.' याचे स्पष्टीकरण बाबांनी आपल्या टीकेत केले आहे, की,

दाखले दाखला म्हणजे नीतिसंबंधी किंवा धर्मसंबंधी उपदेशाचे एकाद्या प्रापंचिक गोष्टीवरून प्रकाशन ही कथा बहुतेक कल्पित असती. परंतु कित्येक प्रसंगी खरोखर घडलेली गोष्ट ही असती,. आणि जेव्हा तिचा असा उपयोग करितात तेव्हा तिला उपमा किंवा रूपक म्हणतात. झोपेत असतांना म्हणजे रात्री – निंदण ह्याचे मोड गव्हासारखे दिसतात. कोणाच्या शेताचा नाश करायाचा असला तर त्यात निंदण

पेरण्याची चाल पालस्तैन वगैरे देशात अद्यापही आहे.

ख्रिस्ती गोधूमरूपी सद्‌भक्तांच्या मंडळीतील निंदणरूपी अभक्तांस पुढील वर्णन (पृ. ११३, १५) शब्दश: लागू आहे :

मिळाला राजहंसाचा मेळा ।
तेथ आला डोंब कावळा
लक्षोनियां बिष्ठेचा गोळा। हंस म्हणवी ।।
तैसे सज्जनाचे संगती ।
विषयी सज्जन म्हणविती ।।
विषय आशा चित्ती । गेलीच नाही ।। *दासबोध* दश. ५

शास्त्राचे स्पष्टीकरण करताना विविध ग्रंथातील उतारे घेणे हा बाबांचा विशेष आहे. त्याचमुळे त्यांनी काही ठिकाणी भगवद्‌गीतेतील संस्कृत श्लोकांचाही उपयोग केला आहे. उदाहरणार्थ,

'येशू ख्रिस्ताचे रूप त्यांच्या देखता पालटले आणि त्याचे तोंड सूर्यासारखे तेजस्वी झाले. आणि त्याची वस्त्रे उजेडासारखी पांढरी झाली.' (पृ. १३८) या वचनाचे स्पष्टीकरणार्थ कृष्णाच्या विश्वरूप दर्शनाचे स्पष्टीकरण या संस्कृत श्लोकाने केले. 'दंष्ट्राकारालानि च ते मुखानि द्रष्ट्वै कालानलसंनिभानि । दिशो न जाने न. लभेच शर्म प्रसीद प्रसीद देवेश जगन्निवास ।।' *गीता* अ. ११. २५

नव्या करारावरील टीकेच्या संदर्भात आपणास असे निश्चितपणे म्हणता येईल की प्रस्तुत टीकेत शास्त्राचे केवळ भाषांतर नसून स्वत:चे विचार, दुसऱ्या नामांकित टीकाकाराचे विचार यांचा मेळ करून प्रस्तुत टीकाग्रंथ तयार केला आहे. लेखकाचे श्रम या पुस्तकाच्या पाना-पानावर दिसून येतात. मुळात अत्यंत संक्षिप्त विचार होते. त्यांचे स्पष्टीकरण विस्ताराने केलेले आहे. हिंदु शास्त्र व ख्रिस्ती शास्त्र यांच्यातील साम्यभेद सोदाहरण स्पष्ट करून ख्रिस्ती शास्त्रातील बोध व निवेध विस्तारपूर्वक कथन केली आहेत. क्वचित हिंदू कवींच्या ग्रंथातून उतारे घेवून यावर भाष्य केले आहे. ग्रंथाची भाषा सुलभ आहे. या ग्रंथात ख्रिस्ती शास्त्रा-विषयी थोडक्यात चांगली माहिती दिली आहे. प्रथम सर्व नव्या कराराविषयी प्रस्तावनारूप विवेचन आहे, पुढे चारही शुभवर्तमानांविषयी साधारण सूचना आहेत. पुढे नव्या करारातील इतिहासाच्या गोष्टींचा 'कालानुक्रम' आणि रोमराज्यात घडलेल्या समकालीन गोष्टी यांचे कोष्टक, त्यानंतर चाऱ्ही शुभवर्तमानांचा सुमेळ याचे तपशीलवार कोष्टक आणि प्रत्येक शुभ-वर्तमानाची ओळख, पत्रांचा परिचय आणि प्रगटविण्याविषयी माहिती इत्यादी गोष्टी आहेत. टीकेत शास्त्राचे अर्थ थोडक्यात पण चांगल्या रीतीने स्पष्ट केले आहेत. ग्रंथांच्या शेवटी मुख्य विषयांची वर्णानुक्रमणिका देऊन अभ्यासकांची उत्तम सोय केली आहे. विविध प्रस्तावनात व टीकेत जागजागी असणाऱ्या टीपा अधिक माहिती देणाऱ्या, योग्य प्रत्यंतरे देणाऱ्या आहेत. बायबलच्या अभ्यासकास एक उत्तम मार्गदर्शक म्हणून हा ग्रंथ मूल्यवान खराच.

* * *

## टीपा

१. *अरुणोदय*, २ री आवृत्ती, मुंबई, १९०८, पृ. २४८.

२. *मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास*, सासवड, १९३१, पृ. २३.

3. Baba Padmanji, *Compendium of Molesworth's Marathi English Dictionary*, Bombay, 1863, Preface, P. XI.

४. पण द. शि. कुलकर्णी यांनी मात्र 'व्यभिचारनिषेधक बोध यात ख्रिस्ती धर्माचा प्रत्यक्ष प्रचार कोठेही नाही' असा शेरा मारला आहे. *मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ४*, पुणे, १९६५, पृ. ४३९.

५. *ज्ञानोदय*, ९ जुलै १८७४, पृ. ३३५.

६. *ज्ञानोदय*, ९ जुलै १८७४, पृ. ३३५, ३३६.

८

# आधुनिक मराठी खिस्ती वाङ्मयाचे जनक : २—चरित्रे व मृत्युलेख

नव्या करारावरच्या बाबांच्या टीकेखेरीज त्यांची ख्रिस्ती धर्मविषयक अनेक छोटीमोठी पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांमध्ये अर्थातच त्यांनी लिहिलेल्या ख्रिस्तचरित्रास आद्यस्थान द्यावे लागेल. या प्रकरणात या ख्रिस्तचरित्राचा व त्यांच्या इतर चरित्रग्रंथाचा व चरित्रात्मक मृत्युलेखाचा थोडक्यात परिचय करून देण्यात येत आहे.

### येशू ख्रिस्ताचे चरित्र*

हे चरित्र इ. स. १८८३ साली बाबांनी एकूण सात खंडात लिहिले आहे. येशू ख्रिस्ताबद्दल बाबांच्या मनात नितांत श्रद्धा असली तरी हयातभर ख्रिस्ताचे चिंतन, मनन व निदिध्यासन केल्यानंतर मनाच्या परिपक्व अवस्थेत शोधक बुद्धिने त्यांनी हे चरित्र लिहिले आहे. ते लिहिताना आपल्या मर्यादा, सामर्थ्य, तत्कालीन वाचकांच्या गरजा यांची त्यांना चांगली जाणीव होती. ते म्हणतात,

> प्रभू येशू ख्रिस्ताचे चरित्राचा कोणताही केवळ मनुष्यलिखित ग्रंथ पूर्ण किंवा निर्दोष आहे असे नाही. अशा प्रकारचे कितीही ग्रंथ लिहिले तरी नव्या ग्रंथास जागा राहणार नाही असे कधीही होणार नाही. त्याचे कारण उघडच आहे. देवाच्या पुत्राच्या अवताराचे यथार्थ वर्णन करावयास श्रेष्ठ बुद्धीचे जे दूत ते देखील असमर्थ आहेत. तेव्हा त्यांच्यापुढे अल्प बुद्धीच्या मानवांचा काय पाड? मनुष्याच्या तारणाचा जो अनादिकालिक ईश्वरीसंकल्प त्याचे पूर्ण रहस्य ईश्वरावाचून कोणाला समजणार आहे? आणि जेव्हा हा परमपवित्र ईश्वरी तारणारा जगात आला तेव्हा त्याची गुणकर्मे, त्याचे हेतू व त्याचे संकल्प हे पापी

* बाबा 'ख्रिस्त' शब्द बहुतेक सगळीकडे 'ख्रीस्त' असा लिहितात. ह्याचा उल्लेख मागच्या प्रकरणात करण्यात आला आहेच.

मनुष्यांस समजले नाहीत. जे त्याचे निवडक शिष्य होते व ज्यांस त्याने आपल्या जवळ सुमारे तीन वर्षे ठेवून धर्म शिक्षण दिले व आपली गुणकर्मे राखवून आपला अवतार घेण्याचा उद्देश्य कळविला त्यांस देखील त्याच्या सर्व गोष्टी एकाच काळी समजल्या नाहीत. इतर धर्मात जे अवतारी पुरुष नांदले आहेत त्यांचे चरित्र लिहिणे फार सोपे होते. कारण ते केवळ मनुष्य असून त्यांची गुणकर्मे पापी मनुष्यांस आवडतील अशी होती. तशात त्यांच्या चरित्रलेखकांनी वाचकांच्या मनरंजनार्थ व यजमानांच्या खुशामतीसाठी आपले ग्रंथ रचले. ख्रिस्त चरित्रलेखकांनी असे काही केले नाही. त्यांनी ज्या गोष्टी डोळयांनी स्वतः पाहिल्या किंवा ज्या प्रत्यक्ष पाहाणाऱ्यांच्या मुखाने ऐकल्या त्याच लिहिल्या व त्यांच्या लिहिण्यात चूक होऊ नये व येशूची प्रतिमा त्यांच्या लेखावर यथामोल उठावी म्हणून त्यास ईश्वराच्या आत्म्याचे साह्य होते. या साह्याशिवाय त्यास आपल्या ईश्वरी गुरुचे जीवनचरित्र कधीच लिहिता आले नसते.[१]

असे चरित्र म्हणजे शुभवर्तमानातील चरित्र होय. बाबांनी यापूर्वीच *नव्या करारा*च्या निमित्ताने शुभवर्तमानातील येशू ख्रिस्ताचे चरित्र स्पष्ट केले होते. 'शुभवर्तमानांत प्रभूचा जो वृत्तांत आहे तो जरी सर्व तथ्य आहे तरी त्यांच्या लेखकांनी आपापल्या धोरणाप्रमाणे तो लिहिला असल्यामुळे त्यात कित्येक गोष्टींचा अन्वय सुटून त्या परस्परांशी विरुद्ध दिसतात व कित्येक गोष्टी कालानुक्रमाच्या संबंधाने मागेपुढे झाल्या आहेत. हा विपर्यास दूर करून आरंभापासून अंतापर्यंत एक संबंध व संकलित इतिहास वाचनात येण्याकरिता अशा प्रकारच्या ग्रंथाची गरज आहे' असे बाबांना वाटले. तसेच 'ख्रिस्ताच्या चरित्रातील गोष्टी म्हणजे त्याची करणी, त्याचा उपदेश, दृष्टांत इ. स्पष्ट रीतीने समजण्यासाठी ज्या देशात व ज्या काळात त्या घडल्या त्यातील स्थळे, राज्यधर्म, लोकाचार, इत्यादिकांचे ज्ञान झाले पाहिजे. ही कारणे लक्षात ठेवून इंग्लिश, फ्रेंच, जर्मनी इ. भाषांत ख्रिस्तचरित्रांचे अनेक ग्रंथ मोठमोठ्या विद्वानांनी रचले आहेत. त्यांत कित्येक तर फार उत्तम आहेत. त्यांत ग्रंथकर्त्यांचे अध्ययन, शोधकबुद्धी, बहुतश्रुतपणा, तर्कशक्ति यांची पराकाष्ठा दिसून येते. अशांपैकी चार प्रसिद्ध ग्रंथांचे व चार शुभवर्तमानांचे साहाय्य घेऊन हे ख्रिस्तचरित्र लिहिण्याचा उद्योग' बाबांनी केला आहे.[२] त्यामुळे कालविपर्यास, स्थलविपर्यास, व्यक्तिविपर्यास इ. टाळण्याचा त्यांचा प्रामाणिक प्रयत्न या चरित्रात दिसून येईल. शोधक बुद्धी, बहुश्रुतपणा व तर्कशक्ति हा तर या चरित्राचा आधारच आहे आणि चरित्रमंथनात दंतकथा वेगळया करून चरित्र जसे घडले तसे देण्याची त्यांची खटपट आपणास आढळून येते. चरित्र लिहिताना येशूच्या जीवनातील काही महत्त्वाच्या घटनांची, प्रसंगाची व व्यक्तींची चित्रे देऊन वाचकांना कंटाळा येणार नाही असे त्यांनी पाहिले. विषय आकलन व्हावे व रुची निर्माण व्हावी हा बाबा पदमनजींचा प्रयत्न वाखाणण्यासारखा आहे. संपूर्ण चरित्र विविध खंडात विभागलेले असून प्रत्येक पानावर शीर्षक देऊन वाचकांची सोय पण त्यांनी पाहिलेली आहेच. शीर्षके क्वचित दीर्घ पण आकर्षक व यथार्थ आहेत. स्पष्टीकरणात्मक टीपा देणे, दंतकथा व अविश्वसनीय माहिती निराळी काढणे इत्यादी निवडानिवडी करण्याचे काम त्यांनी या ग्रंथात केलेले दिसते. उदा. याच चरित्रातील एक उतारा त्या

दृष्टीने पाहाण्यासारखा आहे. ते लिहितात,

यरुशलेमातील मंदिराच्या पूर्वोत्तर कोनास बेथेसदा नावाचे तळे होते. त्याच्या पाण्यात काही रोग बरे करण्याचा गुण होता, म्हणून तेथे पुष्कळ रोगी येत असत. तळयाच्या काठी लोकांस राहाण्याचे सोयीकरिता मेहराबीच्या आकाराचे मंडप बांधले होते.' हे पाणी दूत हलवीत असे' अशा अर्थानी जी ओवी योहान्नच्या शुभवर्तमानात आहे ती *नव्या कराराच्या* फार प्राचीन हस्तलिखित प्रतींत मिळत नाही, यावरून ती कोणी आत घुसडली असावी असा पुष्कळ विद्वानांचा अभिप्राय आहे. तर अशी कित्येक उन्हाळी किंवा गंधकाच्या पाण्याची कुंडे असतात तशा प्रकारचे ते होते, व त्यात एकाच वेळी स्नान केल्याने सर्व रोग बरे होत असतील असे वाटत नाही, तर वारंवार अंग धुण्याने गुण येत असेल. आणखी जो त्या पाण्यात गुणकारी ग्यास किंवा वायू होता तो कमीजास्त होत असेल असेही अनुमान होते, जेव्हा तो जास्त होई तेव्हा पाणी हलवून त्याला ऊत येत असेल, व त्याचा बरे करण्याचा गुण अधिक व त्वरीत होई. अशा कारणाने जे पाणी हले ते दूत हलवीत असे व त्याच वेळेस स्नान केले असता रोग बरा होतो अशी लोकांची समजूत होती. (पृ. १००)

याप्रकारे चिकित्सक बुद्धीने प्रक्षिप्त भाग कोणता, अद्‌भुतता कोणती, दंतकथा कोणत्या व प्रत्यक्ष सत्य काय इ. गोष्टी येशूच्या चरित्रात त्यांनी स्पष्टपणे, प्रामाणिकपणे मांडलेल्या आहेत. निसर्गाचे वर्णन क्वचित सौंदर्यदृष्टी आणि रसाळ वर्णन याचा प्रत्यय आणून देणारे आहे. त्यांच्या या ग्रंथातील पुढील वर्णन पहा,

सिरीया देशातील तो सायंकाळ फार सुंदर होता. वसंतऋतूंत हरित पीतवर्ण कोमल तृण पुष्पादिकांची शोभा आसपास मारत होती. त्याच्या भोवती जवळच्या खोऱ्यांचे काळ्या रंगाची झाक छान उठली होती व दूरचे डोंगर अस्तास जाणाऱ्या सूर्याच्या प्रकाशात स्नान करीत होते. तेथे मंद, शीतळ व सुवासिक वायू झुळझुळा वाहत होता. ह्या सर्व सृष्टि-सौंदर्यात ज्याला सृष्टि ही एक उघडलेल्या पुस्तकाप्रमाणे होती, त्याला त्याच्या प्रत्येक पृष्ठावर आपल्या पित्याचे नाम दृष्टीस पडते. (पृ. ३४९–५०)

दृष्टान्त किंवा दाखले देऊन बाबा मुख्य विषय सुलभ करतात. परमेश्वर भावाचा भुकेलेला असतो हे सांगण्यासाठी विधवेच्या दमडीची कथा दृष्टांतवजा ते देतात.

भांडारात विधवेच्या दमडीचे मोल जास्त कारण तिने होते ते सर्व दिले होते. बाकीचे श्रीमंत होते व त्यांपैकी काही ते देत होते. अशाच प्रकारे धनवानाच्या विपुल दानांनी ख्रिस्ती परोपकाराची धर्मप्रसाराची व धर्मशिक्षणाची कामे चालतात असे नाही. तर विधवेच्या दोन दोन दमडयांनी ख्रिस्ती भांडारे भरत ती शेवटपर्यंत तशीच भरतील. यरुशलेमास जाण्यापूर्वी प्रभूने यहुद्यांच्या अधिकाऱ्यांस व यहुदी लोकांस मेंढपाळाचा दाखला दिला आहे. एका भिकाऱ्याने न्यायाधिशाला केलेल्या उपदेशाला उद्देशून शंकराचार्याला जर एखाद्या अंत्यजाने उपदेश केला तर जसा त्याला क्रोध येईल तसा या उपदेशाचा परिणाम झाला.

अशा प्रकारचे उदाहरण दिले आहे. (पृ. २४४) या पुस्तकाबाबत *ज्ञानोदयात* पुढील मजकूर लिहून आला तो स्वतःच बोलका असल्याने जशाच्या तसा वाचकांसाठी देत आहे.

या ग्रंथाची भाषा फार साधी, सरळ, सुलभ, तरी प्रतिष्ठित व रसिक आहे. सर्व चरित्रांमध्ये जे हे उत्तम चरित्र त्यातील निरनिराळया कथाभागांचे विवरण फार संक्षिप्त नाही, फार सविस्तर नाही, अशा नेमस्त रीतीने केले आहे. तरी त्याची ३८३ अष्टपत्री पृष्ठे झाली आहेत. जर ते विस्तारपूर्वक लिहिले असते तर सहज ५०० किंवा ६०० पृष्ठे भरली असती. अशा व यापेक्षाही फार विस्ताराने लिहिलेले ख्रीस्तचरित्र ग्रंथ इंग्रजीत व जर्मन भाषेत बहुत आहेत. येशू ख्रिस्ताच्या चरित्राचे एक पुस्तक मागे बालबोध व मोडी लीपीमध्ये झाले होते. तेही आमच्या ट्रॅक्ट सोसायटीनेच प्रसिद्ध केले होते, असे आम्हास वाटते. परंतु ते एवढे मोठे व इतके चांगले होते असे वाटत नाही. या देशातील फार मोठया लोकांस जगद्‌गुरू प्रभु येशु ख्रिस्त यांच्या चरित्राची माहिती आहे. बाकी बहुतेक लोकांस त्याचे काहीच ज्ञान नाही. म्हणूनच ते त्याच्या नावाचा कंटाळा करितात. ते नाव कानी पडताच त्यांचे मस्तक ठणकते. दुसरे जे संभावित व सौम्य वृत्तीचे लोक आहेत ते या मंगल नामाचा तिरस्कार करीत नाहीत, तरी असे म्हणतात की, जसे आम्हामध्ये राम, कृष्ण, ज्ञानोबा, नामदेव, तुकाराम, एकनाथ, चैतन्य, नानक, कबीर, जरतुस्त, महंमद वगैरे अवतारी पुरुष व साधू संत व पैगंबर होऊन गेले असाच हा येशू ख्रिस्त तुम्हा ख्रिस्ती लोकांमध्ये होऊन गेला, त्याचा तिरस्कार किंवा निंदा करणार नाही, कारण जसे आमच्या लोकांत होऊन गेलेले महापुरुष आम्हांस पूज्य आहेत तसाच हा तुम्हांस पूज्य आहे. आणि कोणी कोणी तर म्हणतात की येशू ख्रिस्त फार चांगला व सदाचारी होता. त्याने आमच्या अवतारी व साधू पुरुषांपेक्षा उत्तम आचरण केले व उत्तम मार्ग दाखविला. परंतु तो ईश्वराचा अवतार होता व तो ईश्वरापाशी आम्हांसाठी मध्यस्थि करतो व तो त्यावर विश्वास ठेविल्याशिवाय कोणाचे तारण व्हावयाचे नाही असे बोलणे मात्र आम्हांस बरे वाटत नाही. या सर्वांची ही मते गैर माहितीची फळे होत. जर हे लोक हे चरित्र घेऊन लक्षपूर्वक वाचून पाहतील आणि तशाच गोष्टी शुभवर्तमानात म्हणजे ख्रिस्ती शास्त्रात लिहिल्याप्रमाणे आहेत किंवा नाहीत हे पाहून त्यांच्या खरेपणाविषयी शोध करतील व प्रत्येक गोष्टीवरून येशू ख्रिस्ताचे ज्ञान, सामर्थ्य, पवित्रता, प्रीति इ. गुण कसे दिसून येतात हे पाहतील, तर त्यांच्या विषयी ख्रिस्ती लोकांचे जे मत आहे तेच खरे व यथार्थ आहे अशी त्यांच्या मताची खात्री होईल. यास्तव त्यांनी या अलौकिक व अद्वितीय सद्‌गुरुंची माहिती करून घेण्याची ही उत्कृष्ट संधि दवडू नये, अशी त्यांस आमची विनयपूर्वक सूचना आहे. त्याचप्रमाणे ख्रिस्ती लोकांनाही हा प्रभु येशूच्या चरित्राचा ग्रंथ घेऊन मनःपूर्वक साद्यंत वाचावा, आणि त्यात जे उत्तम प्रकारचे शोध व सूचना केल्या आहेत त्या स्मरणरूप वहीवर छापून टाकाव्यात. जर आम्ही ख्रिस्ताच्या चरित्राविषयीच्या सर्व गोष्टींविषयी व त्यावरून येणाऱ्या अनुग्रहाविषयी निपुण होऊ तर आम्ही एकमेकांस व आपल्या निधर्मी मित्रास उद्धारप्राप्तीविषयी व सत्याचा शोध करण्याविषयी संबोध्य व सहाय्य करण्यास अधिक योग्य होऊ. कोणास काही बक्षिस देणे वा नजर करणे झाल्यास आम्ही हे स्वस्त किंमतीचे मौल्यवान पुस्तक देत जाऊ तर फार बरे होईल. हे मुलां लेकरांस ख्रिस्ती भावा बहिणीस, वृद्ध भक्तांस विधर्मी मित्रांस

व विरोध्यांस देखील फार हितकारक होईल.[३]

### व्हैट साहेब चरित्र

*पुरंधर तालुक्यांतील समस्त लोकांस उद्देशून एक पत्र* या नावाचे एक पत्र स्वरूपाचे हे छोटेखानी चरित्र आहे. पुरंधर तालुक्यातील मिशनरी मि. व्हैटसाहेब याने पटकीच्या व वाख्याच्या साथीच्या दिवसात तेथील लोकांची सेवा शुश्रूषा केली. हा मिशनरी शुभवर्तमानाचा प्रसार करण्यासाठी आपला देश स्कॉटलंड सोडून आला होता. हवा, पाणी, देश, परिस्थिती, इ. सर्व भिन्न असताना व्हैट साहेबाने आपला देश सोडून गोरगरिबांची सेवा केली, कष्ट केले, हाल सोसले व आपल्या ख्रिस्ती धर्माचे पालन करून त्याचा प्रचार केला. पुरंधर–सासवडच्या लोकांमध्ये त्याने कार्य केले. स्वतःचा जीव धोक्यात घालून साथीच्या रोगात पुरंधर तालक्यातील लोकात काम केले, औषधपाणी केले व स्वतः मरण पत्करले. कारण याच वेळी १० जुलै १८६४ रोजी तो पटकीच्या व व्याख्याच्या रोगाने मरण पावला. आणि म्हणून येथील समस्त लोकांनी मि. व्हैट साहेबांच्या धर्माकडे म्हणजेच ख्रिश्चन धर्माकडे मनःपूर्वक लक्ष द्यावे असे जाहीर आव्हान बाबांनी या पुस्तिकेत केले आहे. हे पुस्तक पत्ररूपाने अगोदर *ज्ञानोदयात* छापले गेले होते.[४]

### नीसिमा ऊर्फ जपानी देशभक्त

बाबा पदमनजींनी इ. स. १८९३ मध्ये *खरा जपानी देशभक्त नीसिमा याचे चरित्र* हे पुस्तक लिहिले. हिंदुस्थानातील शिक्षितजनांस अनुकरणीय असे त्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावरच लिहिलेले आहे. प्रस्तुत चरित्रात नीसिमाचा जन्म आणि बाळपण, नीसिमा अमेरिकेस पळून जातो, नीसिमाचा अमेरिकेतील रहिवास, नीसिमा युरोपास जातो, नीसिमा जपानास जातो, नीसिमाचा जपानातील कामास आरंभ, ख्रिस्ती युनिव्हर्सिटी स्थापण्याविषयी कर्तव्य सूचना, नीसिमाची शेवटची वर्षे आणि मृत्यू व शेवटी हिंदुस्थाना तील लोकांनी नीसिमाचा कित्ता का वळवावा याविषयीचे स्वल्प दिग्दर्शन इत्यादी भाग या पुस्तकात आलेला आहे. या पुस्तकातील प्रकरणात आकर्षक शीर्षके असून त्यात थोडक्यात नीसिमाचे चरित्र कथन केले आहे. शेवटच्या प्रकरणात या पुस्तकाचा उद्देश्य स्पष्टपणे व्यक्त केला आहे. भाषांतरकार बाबा पदमनजींनी 'नीसिमा' याचे विशेष पुढील सांगितले : (१) त्याचा खोट्या स्वदेशाभिमानापासून खऱ्या स्वदेशाभिमानाकडे पालट स्वदेशाभिमानाबरोबर स्वदेशप्रीतिही योग्य प्रकारची असल्यास फार स्तुत्य आहे. स्वदेशाभिमानी लोक परदेशाचे फार द्वेष्टे असतात. प्राचीन रोमन भाषेत हॉस्टिसचा अर्थ परदेशी असा होता. परंतु पुढे त्याचा अर्थ शत्रू असा झाला व प्रत्येक परक्यास ते शत्रू मानू लागले. (२) जपानच्या बादशहाचे चाकर होण्यापेक्षा त्याने ख्रिस्ताचे चाकर होणे पसंत केले. (३) तारुण्यात त्याने देशाची संपत्ती वाढविण्याचा विचार केला. कारखाने, काच कारखाने, गोद्या वगैरे पाहिल्या. पण प्रामुख्याने नीती जी जपान्यास आवश्यक होती ती पाहिली. व्यावहारिक शिक्षण, ज्ञान यांचे परिणाम आश्वासनदायक नव्हते

असे त्याचे मत होते. त्याचप्रमाणे शिक्षण बुद्धी व अंतःकरण या दोहोंचे असावे, ख्रिस्ती युनिव्हर्सिटीची स्थापना शुभवर्तमानाचा उपदेश करणारे निर्माण होण्यासाठी, देशबांधवांचे कल्याण, इत्यादी नीसिमावरून शिकता येते. प्रबळ महत्त्वाकांक्षेमुळे अशक्त नीसिमा स्वदेश-कल्याण करू शकला. ही शक्ती निसिमाला येशू ख्रिस्ताच्या द्वारे जे तारण फुकट मिळते ते ग्रहण केल्याने मिळाली. त्याने आपल्या स्वर्गस्थ पित्याचा मान राखला, त्याच्या नजरेखाली तो चालला आणि त्याजपासून त्याला आपले कर्तव्य करावयास शक्ती मिळाली. (पृ. ८१)
अशा प्रकारे 'नीसिमा' याचे चरित्र देऊन तो कसा एकनिष्ठ व प्रयत्नशील ख्रिस्ती होता हे लेखकाने दाखविले आहे. एके ठिकाणी लेखक लिहितो,

नीसिमा तरुण स्वदेशाभिमानी होता. स्वदेशातील सर्व गोष्टी त्यास निर्दोष वाटत. परदेशीय रानटी लोकांचा तो धिःकार करी. पण त्याने पश्चिमेकडील लढाऊ जहाज जपानी जहाजापेक्षा श्रेष्ठ हे प्रथम पाहिले. नंतर युनैटेड स्टेट्समधील कायद्याचे जपानी कायद्यापेक्षा श्रेष्ठत्व त्याच्या लक्षात आले. स्वदेशकीयांनी परदेशीय उत्तमाचा स्वीकार करावा हे त्याने उत्कंठेने जाणले. (पृ. ७७)

या चरित्राने नीसिमा हा कोण होता व त्याने काय केले याचे स्पष्ट चित्र आपल्यासमोर उभे राहते.

## सदारोगी सदाउद्योगी

इ. स. १८९० मध्ये बाबा पदमनजी यांनी *सदारोगी व सदा उद्योगी किंवा रिचर्ड ब्यॉक्स्टर याचा काळ व चरित्र* या नावाचे पुस्तक लिहिले. त्या आधी काही दिवसांपूर्वी अमेरिकन मिशन मंडळीच्या वार्षिक सभेत रे. बाबा पदमनजी यांनी 'रिचर्ड बॅक्स्टर यांचा काळ व जीवनचरित्र' यावर एक व्याख्यान दिले. रिचर्ड बॅक्स्टर याला काही प्रकारचा विकार होता. त्याच्या शरिराची साहजिक वाढ खुंटली न खुंटली इतक्यात त्याला रोगाने पछाडले. तो क्षयरोगाने मरेल असे दोन वर्षेपर्यंत त्याच्या मित्रास भय पडले होते. आणि जरी त्याप्रमाणे तो मरण पावला नाही तरी रोगाने त्याला कधी सोडले असे नाही. तो शेवटपर्यंत हात धुवून त्याच्या पाठीमागेस लागला. त्याला आरोग्याचा म्हणून एक दिवसही भोगावयास मिळाला नाही. तो सदा रुग्णावस्थेत असे. त्याचे नेहमीचे दुखणे अशा प्रकारचे होते की, तेणेकरून त्याचे शरीर वाळून कष्टवत झाले होते. परंतु हा सदारोगी पुरुष सदा उद्योगी असे. ग्रंथकारांमध्ये त्याची मोठी प्रसिद्धी होती. ईश्वरीविद्येसंबंधीचे आजपर्यंत जे महाग्रंथकार झाले त्यांत त्याचा हात धरील असा कोणी नाही. त्याने लहान मोठी १६० पुस्तके लिहिली. जगप्रसिद्ध ज्ञानोपकारी, सुज्ञ व थोर असे जे 'उइलबर फोर्स ते ह्याविषयी असे म्हणतात की त्याचे धर्मसंबंधी ग्रंथ म्हणजे ख्रिस्ती ज्ञानाचे भांडारच आहे'

असा सदारोगी पुरुष सदाउद्योगी कसा झाला असा प्रश्न उत्पन्न होतो. तर या प्रश्नाचे उत्तर असे की त्याच्या 'उद्योगीपणाची किल्ली प्रभुजवळ' आहे, या तीन शब्दांच्या लहान पण महावाक्यात होते असे समजून येते. या किल्लीच्या योगे त्यांनी आपले उद्योगरूप यंत्र

फिरते ठेविले होते.

वैशाखमासी (मे महिन्यात) उन्हाच्या प्रखर तापाने व्याकुळ झालेल्या पांथस्थाचा जसा एखाद्या छायावृक्षाखाली बसल्याने श्रमपरिहार होऊन त्याला सुखानुभव प्राप्त होतो त्याप्रमाणे धन, सुत, दारा, लौकिक, कीर्ती, मान इत्यादिकांत निमग्न झालेल्या किंवा पाखंड मते किंवा पोकळ व्याख्याने व भाकडकथा यांनी पाशबद्ध व क्लेशित झालेल्या ज्या कोणास या इहलोकाच्या दृश्य व अनित्य वस्तूंच्या क्लेशापासून व तापापासून किंचित विश्रांती व समाधान पाहिजे आहे त्याने बॅक्स्टर साहेबांचे असे चरित्र व त्यांनी लिहिलेली कित्येक पुस्तके वाचली पाहिजेत, असे लेखकाला वाटते. एके वेळी कोणी एक उमरावाने बॅक्स्टर साहेबाला अदृश्य वस्तूचे विश्वासाच्या योगे ज्ञान झाल्यामुळे आनंद वाटतो काय असे विचारल्यावरून तो म्हणाला, 'तर मग ख्रिस्त धर्म कशाकरिता आहे म्हणून तुम्हास वाटते? ईश्वराविषयीचा विचार, त्याच्या तेजाचा व मोठेपणाचा विचार आमच्या कल्पनेबाहेर आहे. परंतु त्याचा जो पुत्र आमचा धारण करून आला त्याचे चिंतन केल्याने व ज्या ईश्वरभक्तास आपण येथे ओळखत होतो त्यांचे स्मरण केल्याने स्वर्गसुख किती गोड व आपल्या परिचयातले आहे हे समजते.' *ज्ञानोदयाने* वाचकांसाठी बाबांच्या या पुस्तकातील रिचर्ड बॅक्स्टरच्या गुणस्वभावाचा परिचय करून देणारा खालील उतारा दिला आहे:

बिशप रॉयल असे म्हणतात की ब्यॅक्स्टर हा अतिशय पवित्र पुरुष होता. जगामध्ये पन्नास साठ वर्षे वागून त्याच्यासारखी निष्कलंक कीर्ती ज्यांनी मागे ठेविली अशी थोडीच मनुष्ये सापडतील. जरी लोक त्याचा द्वेष व छळ करीत तरी धर्माच्या बाबतीखेरीज करून त्याच्या वर्तनात त्यांस काही दोष ठेवावयास जागा मिळाली नाही. संसाराच्या सर्व संबंधात तो पवित्र होता, म्हणजे तो पवित्र पुत्र, पवित्र पति, पवित्र पिता, पवित्र मित्र असा होता. आणि धर्माच्या प्रकरणात पवित्र उपदेशक होता. सुखात व दुःखात, रोगात व आरोग्यात, तारुण्यात व वृद्धापकाळात तो पवित्र होता. दुसरा एक ग्रंथकार त्याविषयी असे लिहितो की, तो अमानुष मनुष्य होता. तो देवाच्या व ख्रिस्ताच्या समागमात राहत असे. स्वर्ग, मृत्यू व अनंत काळ ही निरंतर त्याच्या दृष्टीससमोर असत. जगातील बहुमानाच्या पदव्या व मिळकतीच्या जागा याची त्याने कधीच पर्वा केली नाही. तो जगाचे वैर व मनुष्याचा राग यांस जुमानीत नसे. आपल्यावर लोकांची गैरमर्जी होईल ह्या भीतीने अथवा मर्जी व्हावी या इच्छेने त्याने आपल्या कर्तव्यात तसूभरही अंतर पडू दिले नाही. क्रामवेल अथवा चार्लस राजा व त्याचे बिशप यांच्यासमोर तो सिंहासारखा धैर्याने उभा राही. तरी गरीब लोकांस तारणाचा मार्ग दाखविताना तो मेंढरासारिखा सौम्य असे. सर्व पंथाच्या ख्रिस्ती लोकांशी तो प्रीतीने वागे व जो ख्रिस्तावर निष्कपट भावाने प्रीती करील त्यावर त्याची प्रीती असे. तो खरोखर नम्र मनुष्य होता. एकदा कोणी एकाने त्याच्या गुणांची वाखाणणूक करून त्याला एक पत्र लिहिले. त्यास त्याने असे उत्तर दिले की, ज्याला तुम्ही ओळखत नाही त्याची तुम्ही स्तुति करता, ओळख झाल्यावर भ्रम जाईल. तो ख्रिस्ताचे स्वच्छ लिहिलेले पत्र होता. हा त्याचा पवित्रपणाचा गुण आम्हा सर्वांस घेता येण्याजोगा आहे. कारण तो

आमच्या सारिखाच सुखदुःख भोगणारा प्राणी होता. त्याचे उदाहरण आम्हांस प्रोत्साहन-दायक असावे. ब्यॅक्स्टरचा देव बदलत नाही.[५]

त्याच्या उपदेश करण्याच्या सामर्थ्याविषयी दुसरा एक ग्रंथकार असे म्हणतो की,

जशा मधमाशा मधाच्या पोळयास चिकटून राहतात त्याप्रमाणे लोक त्याचा उपदेश ऐकावयास देवळात चिकटून बसत. किडरमिनस्टर येथील देवळाच्या इमारतीत लोकांस बसण्याकरिता पाच गॅलऱ्या (सज्जे) बांधाव्या लागल्या. लंडनात त्याच्या उपदेशाच्या वेळी इतकी गर्दी होत असे की तेथे जाणे मोठे जोखमीचे होते.

एकदा असे झाले की तो उपदेश करीत असता देवळाच्या शिखराची एक वीट आत पडली. तेवढयावरून सगळे देऊळ कोसळून पडत आहे अशी लोकांनी हूल उठविली. तेव्हा एकच धांदल होऊन पुष्कळ माणसे दाराशी जमली व जे जागा धरून बसले होते ते फारच घाबरे झाले. अशा प्रसंगी ब्यॅक्स्टर शांत व स्थिर राहिला, त्याने आपली जागा सोडली नाही, आणि जेव्हा शांतता होऊन लोक आपापल्या जागी येऊन बसले तेव्हा तो आसना-वरून उठून असे म्हणाला की, जेव्हा पृथ्वी विरघळून जाईल तेव्हा आपण निर्भय असावे म्हणून तयारी करिता आपण येथे देवाची सेवा करावयास आलो आहोत.[६]

### लूथरचा इतिहास

या नावाचे पुस्तक कोणा परदेशी गृहस्थाकडून लिहून घेऊन ट्रॅक्ट सोसायटीने १८५० साली प्रसिद्ध केले होते. १८९१ साली हेच चरित्र बाबांनी आकर्षक रीतीने पुन्हा लिहून ट्रॅक्ट सोसायटीतर्फे प्रसिद्ध केले. धर्मसुधारक म्हणून लूथरने केलेल्या कार्याचा परिचय या पुस्तकात आहेच, परंतु भर आहे तो लूथरच्या धर्मनिष्ठेवर, त्याच्या सुधारणेच्या खऱ्या तत्त्वावर आणि सुधारणेच्या त्याने वापरलेल्या खऱ्या साधनांवर. मार्टिन लूथरने सुधारणा केली खरी पण तत्पूर्वीच्या अनेकांच्या मनात ही कल्पना होतीच. पाल्हो, योहान्न, विक्लिफ, हस इत्यादींनी ख्रिस्ती मंडळीच्या शुद्धीसाठी वर्तनशुद्धी इ. प्रयत्न केलेच. दान-धर्म, स्नेहवर्तन, शास्त्रातील न्यूनाधिक काढणे, इ. प्रकारची कामे व ही शुद्धता होती. लूथरने सुधारणेच्या कामास प्रारंभ केला तेव्हा पूर्वीच बरेच अनुकूल वातावरण यूरोपात होते. अनुकूल मदतनीस होते. बरकड ख्रिस्ती लोक सुधारणेस प्रतिकूल होते. त्यावरून अनुमान निघते की लूथरकडून सुधारणेचे काम देवानेच करवून घेतले. अज्ञानांधकार परमेश्वर दूर करीतच असतो. लूथरप्रमाणेच देवाचे काम आपण करावे, ख्रिस्ती शास्त्राप्रमाणे वर्तन करावे, देवावर भरवसा ठेवावा इत्यादी बोध लूथरच्या इतिहासावरून केला आहे.

### स्वपत्नीचे अत्यल्प चरित्र

रे. बाबा पदमनजींनी इ. स. १८९० मध्ये आपल्या 'पत्नीच्या शेवटल्या तीन दिवसांचे वृत्त' फुकट वाटण्यासाठी छापून प्रसिद्ध केले. त्या संदर्भात *ज्ञानोदय*कार लिहितात,

त्यावरून मिसिस बाबांच्या अंतःकाळचा अनुभव स्पष्ट रीतीने कळून येतो. *बायबलात*

परलोकाविषयी जे सांगितले आहे त्यावर आम्हा ख्रिस्ती लोकांचा विश्वास तर आहेच, तरी ख्रिस्ती भक्तांच्या अंत:काळचा अनुभव जाणण्याची आमची फार इच्छा असते. त्यावरून नवीन बोध व अनुभव प्राप्त होतो. जे लोक *बायबल*वर विश्वास ठेवीत नाहीत व असे म्हणतात की, परलोकच्या गोष्टी कोण पाहून आला आहे, मेले म्हणजे झाले, पुढे काय होणार कोणास ठाऊक? किंवा जे लोक म्हणतात, परलोक आहे, आत्मिक सृष्टी आहे, तिज-विषयीचे ज्ञान होणे इष्ट आहे. अशा लोकांस अंत:काळचे वृत्त फार अगत्याचे आहे.[७]

बाबांच्या पत्नीस मृत्युच्छायेच्या खोऱ्यातून कसे जावे लागले, त्यांस बेउल देशाचे कसे दर्शन झाले व शेवटी आपल्या प्रिय प्रभूचा हात धरून त्या यार्देन नदी उतरून वरील खनानात कशा सुखरूप गेल्या याचे आध्यात्मिक स्वरूपाचे वर्णन या लहानशा पुस्तकात केले आहे. बाबांच्या मनाला लागलेला पवित्र शास्त्राचा ध्यास यातून लक्षात येतो. उदा. या पुस्तकात शेवटी असे म्हटले आहे की,

माझ्या प्रिय पत्नीचा अमर व ख्रिस्त रक्ताने न्यायी ठरविलेला व पवित्र आत्म्याच्या धुण्याने (पवि) पवित्र केलेला आत्मा आपले सर्व शरीर पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत मृत्यूशिपायाच्या व शवनर्तेच्या ताब्यात देऊन यर्दिनच्या महापूरातून कोरड्या पायी पैलतिरी जाता झाला. तेथे त्याला दिव्यदूत भेटले. त्यांनी त्याला महाद्वारातून मोठ्या उत्साहाने दिव्य नगरात नेऊन आपल्या राजाच्या आसनासमोर उभे केले. (लू. १६:२२ प्रग ७.१५) ते समयी त्यांच्या मागून मी आत पाहू लागलो तो ते नगर सूर्यासारखे प्रकाशमय आहे. तेथील मार्ग सुवर्णरचित आहे, व त्यांनी मुगुट मस्तकी धारण केले आहेत व हाती विजयध्वज व प्रभूची स्तुती करण्याकरिता सुवर्णमय सारंग्या घेतल्या आहेत. नंतर पाहतो तो दरवाजा बंद झाला. ते समयी त्याच्या बरोबर असावे असे मला वाटू लागले.

(यात्रि क्र.) एक आध्यात्मिक अनुभव व अद्‌भुत असे पत्नीच्या शेवटच्या तीन दिवसांचे वृत्त बाबांनी दिले आहे. हा प्रकार नवा आहे यात शंका नाही.

पत्नीच्या अंतकाळचे त्यांनी केलेले वर्णनही असेच धर्मनिष्ठ आहे.

बुधवारी (ता. २० ऑगस्ट १८९०) सर्व काही बदलले. प्रात:काळीच तिची मुखचर्या पालटली. तिचे झापड आलेले डोळे जे निस्तेज होते ते टवटवीत होऊन त्यावर तेज चमकू लागले. मुखावर आरोग्याची तुकतुकी आली. शरिराच्या सर्व व्यथा एकदम थांबल्या. जुलाबही बंद झाले. सकाळी थोडासा चहा वगैरे उपहार घेतल्यावर तिने इंग्रजी शास्त्राच्या मोठ्या अक्षराचे पुस्तक मागवून योहान्नाच्या शुभवर्तमानाचा १४ वा अध्याय वाचला. नंतर आमचा मुलगा यास दाविदाचे २३ वे गीत वाचावयास सांगितले. मग मुखावाटे शास्त्रवचने व आनंदाचे उद्‌गार व अनुभवाच्या गोष्टी एकसारख्या निघू लागल्या. पहिले वाक्य जे मी ऐकले ते 'किती निराळे, किती निराळे' असे होते. दुसरे वाक्य असे ऐकले की 'देवाने जगावर एवढी प्रीती केली की त्याने आपला एकुलता एक पुत्र दिला, अशासाठी की जो कोणी त्याजवर विश्वास ठेवतो त्याचा नाश होऊ नये.' ख्रिस्ती धर्माचे हे महावाक्य त्या दिवशी ख्रिस्ताच्या कन्येच्या मुखातून किती वेळा निघाले असेल हे सांगवत नाही.

शास्त्रवचनाच्या खालोखाल आनंदप्रदर्शक उद्‌गार पुष्कळदा निघाले, 'किती आनंद किती हर्ष मला. केवढा आनंद झाला आहे हे तुम्हांस सांगवत नाही. . .हे या लोकांस समजत नाही ह्या महानंदात तिची भूक तहान निवारली. पेज पाणी घेण्यास सांगितले असता तिने म्हणावे, 'आता मी स्वर्गात आहे. मला हे कशास पाहिजे? हे तारणाऱ्या मजबरोबर राहा. होय तो माझ्या संगती आहे. माझ्या बहुत पापांची क्षमा झाली आहे. म्हणून हर्ष वाटतो. . . तिने माझे नाव जे आवडीने नित्य घ्यायचे (डियर प्रिया) ते न घेता 'बाबा पदमनजी' असे घेतले यावरुन जणु काय तिच्या त्या दिव्य आत्मिक स्थितीत पतिपत्नी संबंध सुटला असे दर्शविते.

पतिपत्नीमधले उत्कट प्रेम व तितकीच उत्कट धार्मिक श्रद्धा यातून प्रतीत होतात. बाबांनी पत्निनिधनाच्या निमित्ताने लिहिलेल्या या पुस्तकाचे स्वरूप मूलतः मृत्युलेखाचे आहे. त्यांचे आणखी काही मृत्युलेख उपलब्ध आहेत. त्यांची माहिती खाली दिली आहे.

**विष्णुशास्त्री पंडित**

जून १८७६ च्या *सत्यदीपिके*च्या अंकात बाबा पदमनजींनी एका छोटया लेखात *इंदुप्रकाश* पत्राचे व छापखान्याचे मालक विष्णुशास्त्री पंडित यांच्या निधनानंतर मृत्युलेख लिहिला आहे. त्यांनी एकूण त्यांचे चित्र उभे केले आहे ते असे.

'गेल्या महिन्यात महाराष्ट्र देशात एक फार मोठी दुःखाची गोष्ट घडली. वे. शा. सं. रा. रा. विष्णुशास्त्री पंडित हे मरण पावले.' या लेखात धर्मसुधारक म्हणून पंडितांच्या कार्याचा यथार्थ गौरव बाबांनी केला आहे. 'पंडिताच्या मरणाने देशसुधारकांच्या इमारतीचा एक खांब पडला.' असे बाबांनी म्हटले आहे. पंडितांच्या कार्यातील वेदानुवादाचे काम बाबांना महत्त्वाचे वाटले. ते म्हणतात,

धर्माच्या संबंधाने परमपवित्र, परमपूज्य मानलेले, व परमगुप्त ठेवलेले जे वेद, त्यांचे मंत्र प्रथम यांच्याच पत्रात प्रथमतः लोकांच्या दृष्टीस पडू लागले. हे सामान्य धैर्याचे काम नव्हते. शिखानष्टांच्या कानी वेदवाणी पडू नये इतकेच नाही तर सांप्रतच्या काळात ब्राह्मणांव्यतिरिक्त अन्य जातीस वेदपठन करण्याचा अधिकार नाही, असा जुन्या समजूतीच्या लोकांचा शास्त्रसुधारयुक्त मोठा दुराग्रह असता, म्लेंच्छ, यवन, महार, चांभार यांच्या हाती जाणारे जे प्राकृत वर्तमानपत्र, त्यात वेदमंत्र छापणे व त्यावर टीका चर्चा करणे हे हलके काम नव्हते, तथापि विष्णुशास्त्री पंडित यांनी ते चालू केले व शेवटी वेदार्थप्रयत्नाच्या प्रसिद्धीत त्याचा कळस केला. (पृ. ५२)

सुधारक पंडितांचे मोठेपण बाबांनी खालीलप्रमाणे फार चांगल्या रीतीने सांगितले आहे :

ह्या गृहस्थाच्या मरणाने विधवाविवाहाच्या कामाला सध्या मोठा धक्का बसला आहे. पुर्नविवाहोत्तेजक मंडळीचे हे पुरुष आरंभापासून खरे मित्र व पुरस्कर्ते होते. ते तिचा जिव्हाळाच होते असे म्हटले असता चालेल. विधवाविवाह करणे हे देशकल्याणास आवश्यक आहे इतके चौघात म्हणण्यापुरते यांजपाशी धैर्य होते असे नाही, तर तो सशास्त्र आहे असे

विद्वज्जनांच्या सभेत प्रतिपादन करण्यापुरती यांजपाशी विद्या व हिंमत होती. मागल्या एका वेदशास्त्र अर्थशून्य शंकराचार्याने पुण्यात जी विद्वान शास्त्र्यांची सभा केली होती तीत ह्या शास्त्रीबावांनी वाद करून यश मिळविले आणि पुढे त्याजवर प्रसंग गुदरला तेव्हा त्यांनी स्वत: एका विधवा बाईशी लग्न लावून आपल्या पक्षाला कोटिशास्त्रार्थाकडून जी बळकटी मिळाली नसती ती आणिली. ह्या पुनर्विवाहाच्या युद्धात बहुतेक शूरांनी शत्रूस पाठ दाखविली, कित्येकांनी आपला झेंडा सोडून शत्रूच्या गोटात आश्रय धरिला, कित्येकांनी विश्वासघात केला, फितूर केला. पण शास्त्रीबावांचे धैर्य खचले नाही, ते आपल्या थोडक्या विश्वासू सेने सहवर्तमान शत्रूशी टक्कर देत राहिले व त्याची कित्येक ठाणीही त्यांनी हस्तगत केली. (पृ. ५३)

पंडितांच्या सरकारविरोधी टीकेने बाबा अस्वस्थ होत, त्याचे प्रतिबिंब या लेखातही पडले आहे. उदा. :

देशकल्याणाचा इतर कार्याकडेही त्या गृहस्थाचे बरेच लक्ष्य असे. यांची व्यापार संबंधाने कीर्तने बहुतांनी ऐकली आहेत. त्यांत इंग्लिश राज्यावर यांचा बहुत कटाक्ष होता, म्हणजे इंग्लिश राज्य जावे किंवा वाईट आहे असे त्यांचे मत नव्हते, तरी त्या राज्यापासून देश अतिशय दैन्यावस्थेत पावला आहे. असे ते आपल्या श्रोत्यांस भासवीत असत व देशस्थितीच्या वर्णनात अतिशयोक्ती करीत ही त्यांची मोठी चूक होती. तथापि एकंदरीत यांचे सर्व लोककल्याणाचे उद्योग, यांची निस्पृहता, यांचे धैर्य व धारिष्ट, यांनी विरूद्ध पक्षाकडून जो छळ व निंदा सोसली व बोलण्याप्रमाणे चालण्याचा जो कित्ता घालून दिला तो महत्त्वाचा होय. (पृ. ५३)

### पदमनजी माणिकजी

बाबांनी आपल्या वडिलांच्या मृत्यूनंतर *ज्ञानोदयात* त्यांचा अल्प परिचय करून दिला आहे. धर्मांतरानंतर बाबांना त्यांच्या वडिलांकडून जी सहानुभूति प्राप्त झाली तिचा विशेषत्वाने त्यांनी उल्लेख केला आहे. पाल्हाळ न लावता थोडक्यात त्यांनी वडिलांचे चित्र आपणांसमोर उभे केले आहे. वडिलांचे शिक्षण, नोकरी, त्यांचे कलाकौशल्य, प्रेमळ वर्तणूक, त्यांची वागण्याची पद्धत वगैरे गोष्टींचा मुद्दाम उल्लेख बाबांनी केला आहे. वडिलांच्या स्वभावावर प्रकाश टाकणारी बाबांनी दिलेली खालील हकीकत उद्बोधक आहे.

एखादा विद्वान ब्राह्मण त्यांच्याकडे आला तर मुद्दाम त्याजपाशी आपल्या ख्रिस्ती मुलाची गोष्ट न लाजता काढावी, व प्रसंग असला तर त्याची त्यास भेट करून द्यावी, व उभयतांस धर्मसंबंधी भाषण करावयास सांगावे. त्यांचा मुलगा ख्रिस्ती झाल्यावरून त्यांच्या स्नेहात व ममतेत त्यांनी किंचित अंतर पडू दिले नाही. उलटी त्या उभयतांच्या प्रीतीची वृद्धीच झाली, त्यांनी त्याच्या अनुमतीवाचून कोणतेही महत्त्वाचे व आगत्याचे काम केले नाही, व संसाराच्या गोष्टीत त्यांनी सर्वदा त्याच्या मसलतीने वागावे, त्याच्या सर्व कुटुंबावर त्यांचे अतिशय प्रेम असे आणि त्यांच्या योगाने त्यांस जितक्या ख्रिस्ती लोकांची ओळख पडली

होती त्याच्यांशी त्यांनी मोठ्या स्नेहभावाने वागावे. यांच्या शेवटच्या दुखण्यात त्यांचा ख्रिस्ती मुलगा त्यांच्याजवळ होता. त्याच्या मरणाच्या पूर्व दिवशी त्याने त्यांस ख्रिस्ती धर्माची मूळतत्वे म्हणजे मनुष्य पापी आहे व ख्रिस्तीकडूनच मात्र तारण होते, असे सांगितले व त्यांच्याकरिता प्रार्थना केली. तेव्हा त्यांस फार आनंद झाला. प्रार्थनेच्या पूर्वी ते म्हणाले की, माझ्याने उभे राहवत नाही, परंतु उठून बसेन, आणि हात जोडून नमस्कार केला व आपल्या जवळच्या धाकट्या मुलास तसे करावयास सांगितले. मरणाच्या रात्री त्यांनी होऊन आपल्या ख्रिस्ती प्रार्थना करावयास सांगितली, आणि माझ्या अंत:करणात फार शांती आहे असे म्हटले. त्याने त्यांस आकाश लोकविषयी व तेथे जाण्यास ज्या तारका चे पुण्य पाहिजे त्याविषयी सांगितले.[८]

बाबांनी संपादन केलेल्या *सत्यदीपिका* मासिकावरून *ज्ञानोदयाने* मोल्सवर्थ व काशिनाथ विश्वनाथ यांची अल्पचरित्रे पुन्हा छापली आहेत. त्यांपैकी काशिनाथ बिश्वनाथ यांची माहिती अगदी नवीन असल्याने मुद्दाम उतरून घेतली आहे.

### काशिनाथ विश्वनाथ यांचा मृत्यू अथवा देहावर जय

*सत्यदीपिके*चे मुंबईतील बहुतेक ख्रिस्ती व हिंदु वाचणारे पुण्यातील कित्येक मित्र यांस मि. काशिनाथ विश्वनाथ हे नावाने ठाऊक असतील इतकेच नाही, पण त्यांस त्यांची चांगली ओळखही असेल. त्यांच्या मरणाचे दु:खकारक वर्तमानहि त्यांस समजले असेल व त्यावरून जसे आम्हांस दु:ख झाले आहे तसे बहुतांस वाटले असेल यात संशय नाही.

हा आमचा तरुण मित्र पूर्वी हिंदू होता तेव्हापासून त्याची आमची ओळख होती. तो बारा तेरा वर्षांचा मुलगा असता मुंबईतील फ्री चर्च इंग्लिश विद्यालयात शिकायास येऊ लागला. तेव्हा त्याचे सुंदर रूप, गौरवर्ण, हास्यमुख, भिडस्त स्वभाव व मधूर भाषण पाहून त्याची आमची प्रीती लवकरच जमली व त्याच्या वर्गातली मुलेही त्याच्या स्नेहाची आवड धरू लागली...सन १८५५ त काशिनाथचा बाप्तिस्मा रेव. नारायण शेषाद्री यांच्या हातून झाला. काशिनाथने प्रभू येशूकरिता आपली म्हातारी बिधवा आई व दोघे भाऊ यांस सोडिले. त्यांवर त्याची प्रीती फार होती. पण त्यांहून विशेष प्रीति त्याने आपल्या तारणावर केली आणि त्याच्या आईलाहि पुढे समजले की माझा मुलगा सुपुत्र आहे. तो यथाशक्ति तिचे सहाय्य करीत असे. तो सोनार जातीचा होता म्हणून मुंबईच्या कित्येक सोनार लोकांनी त्याचा बाप्तिस्मा होण्यापूर्वी रेव. निसबीट साहेबांच्या बंगल्याभोवती गर्दी केली व रे. नारायण शेषाद्री यांच्या घरून तो शाळेत जात असता एके दिवशी त्याला जबरीने धरून नेऊन मारहाण केली, व कोंडून ठेविले. पण सोनार जातीचे मुख्य मयत आनरेबल जगन्नाथ शंकरशेट यांच्या सांगण्यावरून त्यांनी त्याला सोडून दिले.

काशिनाथने ख्रिस्ती झाल्यावर फ्री चर्च मिशनाच्या इंग्लिश विद्यालयात उत्तम प्रकारे विद्याभ्यास केला व शिक्षकाचे कामही केले. पुढे काही दिवस त्याने त्याच मिशनाच्या बोर्डिंग शाळेत शिक्षकाचे काम चालविले.

काशिनाथास रक्तपितीचा दुष्ट रोग लागला होता. तो ख्रिस्ती होण्यापूर्वीच त्याच्या रमणीय व कोमल मुखावर लाल चट्टे दिसू लागले होते. पुढे काही वर्षांनी तो रोग बळावला. त्याने त्यासाठी पुष्कळ औषधउपाय केले व नाना देव पाहिले. शेवटी त्याला समजले की ह्या रोगाकडूनच आपण तारणाराची सेवा व गौरव करावे अशी ईश्वरेच्छा आहे. मग त्याने सर्व उपाय करणे सोडले. त्याचा एक हिंदू भाऊ याच रोगाने मेला. आणि याला जेव्हा वाटले की, आपणांसही असेच मरण येईल तेव्हा त्याला अतिशय आनंद व्हावा. त्याने म्हणावे की आता मी हे नासके शरीर टाकून दिव्य लोकात जाईन, व तेथे प्रभू संगती सर्व काळच्या सुखात राहीन. त्याचे दुखणे फार कठीण होते. कधी कधी त्याला बिछान्यावरून उठण्याची शक्ती राहत नसे.

आमच्या प्रिय बंधूचे शरीर आता मातीत पुरले आहे, पण ते शेवटच्या दिवशी दूताच्या नाही, येशूच्या शरीराप्रमाणे गौरवयुक्त होऊन उठेल आणि त्याचा आत्मा तर आताच आकाशात अनिर्वाच्य सुख भोगीत आहे. त्या सुखाचे वर्णन कोणाच्याने करवेल?

ह्या वृत्तांत वाचून आमच्या वाचणारांतून जे आपल्या आत्म्याविषयी निष्काळजीने वागत असतील त्यांतून कोणी जागृत होतील काय? आणि जगाचे भय व जगाची भूक सोडून प्रभू येशूला शरण जाऊन स्वर्गसुखाचे वारिस होतील काय? सर्वांच्या आत्म्यास पापरूप रक्तपितीचा रोग लागला आहे, आणि तो जाण्याचा केवळ एकच उपाय आहे. प्रभू येशूचे रक्त आम्हांस सर्व पापांपासून शुद्ध करिते."

बाबांनी आपल्या *सत्यदीपिका* मासिकाच्या वाचकांसाठी प्रसिद्ध कोशकार मोल्सवर्थ साहेबाचा त्याच्या निधनोत्तर एक अल्पपरिचय प्रसिद्ध केला. *ज्ञानोदया* ने तो *सत्यदीपिके*तील परिचय उदधृत केला आहे. बाबा पदमनजींचे लेखन हे असे उपयुक्त होते. मोल्सवर्थचे स्मरण मराठी भाषिकास सदैव राहिल. मराठी इंग्रजी कोश ही त्याची देणगी अमोल आहे. त्याच्या मरणोत्तर त्याचा अल्पपरिचय देणे औचित्यपूर्ण होते. बाबांनी ते काम चोख बजावले.

### सिद्दापा याचे मरण

एक विष्णुशास्त्री पंडितांसंबंधीचा मृत्युलेख सोडला तर बाकीचे सारे मृत्युलेख ख्रिस्ती धर्मियांचे व बाबांच्या नातेवाईकांचेच आहेत. पत्ररूपाने बाबांनी लिहिलेला आणखी एक मृत्युलेख उपलब्ध आहे तो असा :

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस,

विनंती विशेष —बेळगांवजवळ शाहापूर नावाचा सांगलिकरांचा एक गाव आहे. तेथे तीन महिन्यामागे एक लिंगाईत जातीचा तरुण मनुष्य मरण पावला. त्याची हकीकत आपणाकडे लिहून पाठविली आहे. ती कृपा करून आपल्या सुंदर पत्री प्रसिद्ध करावी.

सिद्दापा किंवा सिद्दराय हा तरुण लिंगाईत सुमारे दाहा वर्षापासून ख्रिस्ती धर्माचा शोध करीत होता व एक वेळ त्याचे मन त्याकडे इतके वळले होते की, तो आपल्या एका मित्रासह वर्तमान बेळगांव येथील मिशनेरी साहेबापाशी बाप्तिस्मा मागावयास आला होता. परंतु

जेव्हा त्याच्या नातलगांनी व जातीच्या लोकांनी या कारणास्तव त्याचा छळ आरंभिला तेव्हा ते उभयतांही परत गेले. नंतर सिद्दापास परत नेण्यास त्याचा मित्रच कारण झाला. पुढे ते दोघेजण काही वर्षेपर्यंत देवाचे शास्त्र एका ठिकाणी वाचीत व प्रार्थना करीत असत. ख्रिस्ती भजनालयात उपदेश ऐकायास जाणे, व ख्रिस्ती लोकांची संगतही सिद्दापाने तर शेवटपर्यंत सोडिली नाही. परंतु त्याचा मित्र एक दोन वर्षामागे एकाएकी मरण पावला. तेव्हापासून तर त्याच्या मनात धर्माविषयी आणखी विशेष विचार उत्पन्न होऊ लागले. तरी उघडपणी ख्रिस्ती होण्याचा त्याचा निश्चय होईना. तो आपल्या मित्राविषयी म्हणत असे की, तो ख्रिस्तीवर विश्वास ठेवून मरण पावला.

नंतर सिद्दपा मरण पावला. त्याच्या प्रेतयात्रेच्या बरोबर सुमारे दोनशे लोक गेले होते. कारण तो आपल्या जातीत पाटील होता. त्यासंगती कित्येक ख्रिस्ती उपदेशकही गेले होते, त्यांनी वाटेत त्याच्या मरणावरुन लोकांस बहुत उपदेश केला, आणि बहुत लोकांनी कबूल केले की सिद्दापास ख्रिस्ती धर्माकडूनच मरण कामी शांती मिळाली.

सिद्दपाच्या रोगाविषयी व त्याच्या लोकांच्या अति अज्ञानाविषयी थोडेसे सांगितले पाहिजे. त्याला प्रारंभी मलावरोध झाला. तो त्याने रेचक घेऊन दूर करावा तसे न करिता त्याची उपेक्षा केली. हेच प्रथम कारण झाले. नंतर त्याच्या शरिरास इतकी व्यथा होऊ लागली की, चार दिवसात बिछान्यावरुन उठण्यास त्यास शक्ती राहिली नाही. त्यास डाकतराचे औषध देण्यास त्याच्या ख्रिस्ती मित्रांनी पराकाष्ठा केली, पण त्याच्या लोकांनी ते घेऊ दिल्हे नाही. त्यांनी त्यास भलभलती गावठी औषधे चारिली व पाजिली व त्याचे मरण जवळ आणिले. पण आम्ही सांगितलेले उपाय त्यांनी अगदी केले नाहीत. आमच्या तोंडावर त्यांनी होय होय म्हणावे, पण मागून भलतीच औषधे त्यास द्यावी. याप्रमाणे बेळगावकडील लिंगाईत अडाणी व अज्ञानी आहेत. त्यास पुष्कळप्रकारे समजावून त्या रोग्याला पाहाण्याकरिता एक इंग्लिश डाकतर त्याच्या घरी त्याच्या ख्रिस्ती मित्रांनी नेला. पण तेव्हा तो मृत्युपंथास लागला होता. म्हणून त्याच्याने काही करविले नाही. गरीब बिचारा सिद्दापा म्हणे की, मला ख्रिस्ती लोकांचे औषध घेऊ द्या, पण त्यांनी त्याचे ऐकिले नाही. असे ते कठोर मनाचे लोक होते. जर तो इंग्लिश सरकारच्या अंमलात असता तर म्या त्या लोकांस शिक्षा लावविली असती, पण काय करावे, तो परराज्यात पडला म्हणून आमचा उपाय चालला नाही. या गोष्टीवरुन दिसून येते की जेथे सत्याने मूळ धरिले आहे तेथे ते शेवटी जय पावेलच. आता शेवटी आमच्या पत्र वाचणाऱ्यांस एवढेच सांगणे आहे की, तुम्ही आपल्या शरिराच्या रोगाची उपेक्षा करु नका. रोग आरंभी लहान दिसतो. पण तो उपेक्षित असता प्राणघातक होतो. आणि दुसरा रोग तुम्हा सर्वांस आहे त्याची जर उपेक्षा कराल तर सर्व कालिक मरण म्हणजे नरकवास हाच त्याचा परिणाम आहे. तर तो लहान म्हणून त्याची अगदी उपेक्षा करु नका. कोणतेहि पाप लहान नाही. त्याच्यात मरणाचे बीज आहे. तर ते उपटून टाकण्याकरिता आताच, या क्षणीच प्रभु येशूला शरण गेले पाहिजे. सिद्दापा सारिखी कोणी मरणकाळीच्या पश्चातापाची वाट पाहू नये, त्याला देवाने जळत्या घरातून ओढून काढिले,

परंतु त्याप्रमाणे हजारांतून एक निघतो. साधारण नियम असा आहे की, जे बहुत दिवस सत्य जाणत असता त्याप्रमाणे चालत नाहीत त्यांचे मन कठिण होत जाते. व शेवटी ते क्षमा पावल्यावाचून आपल्या पापात मरतात. आणखी असा विचार करा की, आपल्या उत्पन्न कर्त्याची व तारणकर्त्याची आपण जन्मभर सेवा करून मरावे हे बरे किंवा बुद्धि व शरीर ही निर्बल झाल्यावर मग त्याचे नाव घेऊन मरावे हे बरे?

असा बिनतोड प्रश्न उत्पन्न करून बाबांनी हे चरित्र संपविले आहे.

रोगाची उपेक्षा करू नये, जुन्या रूढी व अपसमज सोडून द्यावेत व वेळीच परमेश्वराची भक्ति करावी – येशूचा स्वीकार करावा असा बोध सिद्दप्पाच्या मरणकथेच्या द्वारे बाबांनी केला आहे. सिद्दप्पाचे संपूर्ण चरित्र न देताही त्यातील महत्त्वाचा व मुद्याचा भाग बाबांनी दिला आहे.

अशा प्रकारे रे. नारायण शेषाद्रि, मिसेस नारायण शेषाद्रि, महात्मा जोतीबा फुले इत्यादिकांच्याबद्दलचे मृत्युलेख बाबांनी लिहिले आहेत. ख्रिस्ती धर्मावर श्रद्धा असणारे वा ख्रिस्ती धर्माबद्दल आस्था असणारे यांचीच चरित्रे बाबा लिहितात हे लक्षात घेण्यासारखे आहे.

* * *

## टीपा

१. 'प्रस्तावना', *येशू ख्रीस्ताचे चरित्र*, मुंबई, १८८३, पृ. १.

२. चार ग्रंथांची नावे संक्षेपाने येणेप्रमाणे आहेत :
Farrar's *Life of Christ;* Geikie's *Life and Words of Christ*, Pressenese's *Jesus Christ; His Times & Works;* Andrew's *Bible Students' Life of Our Lord*. याशिवाय Robinson's *Harmony of the Gospel* आणि Andrew's *Life of Christ* या पुस्तकांचे लेखकाने अवलोकन केले होते.

३. ज्ञानोदय, ३१ मे १८८३, पृ. २५७.

४. ज्ञानोदय, १५ जुलै १८६४, पृ. १०–१३.

५. ज्ञानोदय, १० एप्रिल १८९०, पृ. ११७.

६. तत्रैव, पृ. १११–११३.

७. ज्ञानोदय, ९ ऑक्टोबर १८९०, पृ. ३२४.

८. ज्ञानोदय, १० डिसेंबर १८६४, पृ. ६१६, ६१७.

९. ज्ञानोदय, ५ जून १८६६, पृ. १८४–१८६.

१०. तत्रैव, १ ऑक्टोबर १८७२, पृ. २८५–२९६.

९

# आधुनिक मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचे जनक : ३–स्फुट ग्रंथरचना

बाबांनी ख्रिस्ती धर्मविषयक बरीच स्फुट ग्रंथरचना केलेली आढळते. त्यापैकी उपलब्ध ग्रंथाचा परिचय यापुढे करून देण्यात आला आहे. बाबांच्या नावावर असलेली सर्वच स्फुट ग्रंथरचना उपलब्ध होत नाही.

### आत्मारामपंत व मृत्यूशिपाई यांचा संवाद

बाबांनी धर्मांतरानंतर लिहिलेले इ. स. १८५५ मधील त्यांचे *आत्मारामपंत व मृत्यूशिपाई यांचा संवाद* हे पुस्तक मनोरंजक व संवादात्मक आहे. ते एकनाथांच्या *हिंदू-तुर्क संवादाच्या* धाटणीवर असून तसेच रूपकात्मक आहे. त्यात ख्रिस्ती धर्मातील खरेपणा स्वीकारण्याचे तत्त्व गोवलेले आहे. एक धनवान मनुष्य मरणाला भीत असे. पण खरेपणा स्वीकारल्यावर त्याच्या मनोभावनेचा कसा पालट झाला हे या पुस्तकात सांगितले आहे.

### निःशास्त्रवाद परीक्षा (१८५८)

ईश्वराने शास्त्र दिले नाही व देण्याची गरजही नाही, अशा मताचे लोक आजकाल फार झाले आहेत. आणि या मताच्यामुळे आपल्या येथल्या तरुणांची स्थिती फार वाईट होत चालली आहे. त्यांच्या मताचा खोटेपणा दाखवून त्यास त्यातून बाहेर काढले नाही तर त्यांचा व इतरांचा नाश होईल हे स्पष्ट करण्यासाठी या पुस्तकाचा प्रपंच आहे. *Examinations of the Claims of Deism* या इंग्रजी पुस्तकाचा आधार येथे घेण्यात आला आहे. सृष्टिजन्य ज्ञानापरते दुसरे शास्त्र नाही व नको, मनुष्याला ईश्वराविषयी, आपणाविषयी आणि आपल्या संपूर्ण कर्माकर्माविषयी जे काही समजणे आवश्यक आहे ते सर्व या ज्ञानावरून समजते असे मानणाऱ्या बुद्धिवाद्यांच्या विचाराचे यात सावेश खंडन करण्यात आले आहे.

सृष्टीवरून आमचे सर्व कांही होईल असे आम्ही म्हणतो पण वास्तविक तसे नाही. कारण तिजवरून ईश्वराच्या अस्तित्वाचा प्रकार, त्याचे गुण व इच्छा याजविषयी संशय धरण्यास जागा राहाणार नाही, इतक्या निश्चितपणाने कांही समजत नाही. जगाच्या इतिहासावरून पाहावे तर ईश्वराने मनुष्यास शास्त्र दिल्हे असे मानावे नाही तर सर्व इतिहास केवळ भाकड कथा आहे असे म्हणावे, अशी पंचाईत पडली. मनुष्याच्या बुद्धिवरून सर्व कर्तव्ये समजतील म्हणावे, तर आजवर प्राचीन आणि अर्वाचीन ज्ञात्यांनी आपल्या बुद्धिवरून विचार करून हजारो प्रकारची मते काढून इतकी घाण केली आहे की, त्यातून कोणाचे मत खरे म्हणावे हे कळत नाही. इतकेच नाही तर ज्या वास्तविक ज्ञानाची गरज आहे ते सर्व बुद्धि आणि सृष्टि यांवरून प्राप्त होणे मुळीं संभाव्य आहे किंवा नाही, हेच समजत नाही, या आमच्या मताची फळे आजपावेतो फार दुःखकारक झाली. ते ज्यांनी मानिले त्यांची वर्तणुक वाईट होती व तेणेकरून हजारो मनुष्यांचा घातही झाला. आमचे आचरण तरी कोणते चांगले आहे? आणि येणे करून आमच्या देशाचे काय कल्याण होणार आहे? असे निःशास्त्रवाद्यांस वाटावे.[१]

अशा शब्दांत *ज्ञानोदय*कार प्रस्तुत ग्रंथाच्या विषयासंबंधी लिहितात. प्रस्तुत ग्रंथ पत्रात्मक आहे. पहिले एका ख्रिस्ती मनुष्याचे त्याच्या निःशास्त्रवादी मित्रास पत्र (त्याने धर्मासंबंधी विषयावर पत्रद्वारे व्यवहार ठेवण्यास वचन दिले होते) देण्यात आले आहे. दुसऱ्या पत्रात निःशास्त्रवादी याच्या मताची परीक्षा केली आहे. ही परीक्षा दोन ते चार या तीन पत्रात केली आहे. पाचव्या ते आठव्या पत्रात इतिहाससंबंधी गोष्टींवरून निःशास्त्रवादाची परीक्षा आणि ईश्वररोक्त शास्त्रास प्रमाणे दिली आहेत. नवव्या पत्रात प्राचीन कालचे ज्ञानी लोकांची ईश्वरविषयक व नीतिविषयक मतांवरून प्रमाणे दिली असून दहाव्या पत्रात अर्वाचीन सूज्ञांची मते दिली आहेत. अकरावे पत्र निःशास्त्रवादाची फळे दर्शविते तर बाराव्या पत्रात जागृत झालेल्या अंतःकरणाचे समाधान बुद्धीशास्त्राकडून होत नाही हे दाखविले आहे. तेराव्या पत्राचा विषय आहे. निःशास्त्रवादाच्या योगाने देव पापाची क्षमा करील अशी खातरी होत नाही, तर, नि : शास्त्रवाद ईश्वरापासून नाही हे त्याच्या गुणकर्मावरून दिसते, हा चवदाव्या पत्राचा विषय आहे. बाबांचा हा दहावा ग्रंथ असल्याचे *ज्ञानोदयाने* म्हटले आहे.[२]

### शंकानिवृत्ति

हे पुस्तक ट्रॅक्ट स्वरूपाचे आहे. त्यात हिंदूंच्या ख्रिस्ती धर्माबाबत अठरा शंका दिल्या असून त्यांची उत्तरे पण दिली आहेत. फुकट वाटण्याकरिता धर्मप्रचार पुस्तिका असे त्याचे स्वरूप आहे. पहिली शंका अशी : हिंदु लोक असे म्हणतात की वडिलांची चाल सोडू नये, वडील जसे चालत आले तसे आपण चालावे, आमच्या धर्मात बहुत गुरु आहेत मग पुन्हा आम्हास येशू ख्रिस्त कशास पाहिजे? उत्तर म्हणून तुमचे गुरू लोभी आहेत. दक्षिणा घेतात, उपदेश देत नाहीत, तारणाशिवाय निष्काळजी आहेत. त्यांच्या मंत्रात दम नाही. गुरु केल्यावरही कर्म

सुटत नाही. तृप्ती नाही. पण येशू शिष्याच्या सर्व गरजा पुरवितो म्हणून तो सद्गुरू करावा असे सांगितले आहे. सर्व पुस्तिका याच स्वरूपाची आहे. या पुस्तिकेची सहावी आवृत्ती १८५९ साली निघाली होती. पहिली आवृत्ती केव्हा निघाली होती ते कळत नाही.

**ख्रिस्ती लोकांचे कर्तव्यसार (१८५९)**

ख्रिस्ती लोकांनी कसे वागावे हे यात सांगितले आहे. ख्रिस्ती लोकांनी आईबापांशी कसे वागावे हे प्रथम कथन केले आहे. त्यानंतर ख्रिस्ती माणसाने कुटुंबांशी कसे वागावे याचा विचार आहे. संसार, द्रव्य, खर्च, मुलांचे शिक्षण, धर्म याबाबत ख्रिस्ती व्यक्तीच्या कर्तव्यावर येथे प्रकाश टाकला आहे. नातलग, दुःखे, दुःखप्रसंगी कसे वागावे, रोग, मरण, दुःख, सांत्वन इत्यादी प्रसंगी ख्रिस्ती कसा वागतो याचे दिग्दर्शन नंतर केले आहे. ईश्वरभजन, त्याचे लाभ, परमेश्वराचे स्मरण, त्याची भक्ती, चालणे, वागणे, बोलणे इ. लोकरीतीत ख्रिस्ती आपल्या कर्तव्याने कसा वेगळा याचे निवेदन लेखक या पुस्तकात करतो. नंतर जातिभेदाचा विचार करून त्याच्या निर्मूलनाचा विषय मांडला आहे. एतद्देशीय व परदेशी ख्रिस्ती यांचे प्रेम, धर्म भाषा याबाबत वर्तन कसे हवे, धर्मांतर करणाराने स्वदेशप्रीती सोडणे इष्ट कसे नाही, स्वदेश-प्रीती व स्वदेशसुधारणा कशी करता येईल, आत्मोद्धार व ख्रिस्तप्रेम, पापमुक्ती, देवाची संगती इ. विविध ख्रिस्तीजीवनावर विचार करून ख्रिस्ती माणसाने कसे वागावे हे साररूपाने कथन केले आहे. प्रस्तुत पुस्तक वाचताना हिंदू लोकांना व ख्रिस्ती लोकांना भिन्न भिन्न सूचना लेखक देतो. ख्रिस्ती वाचकांस सूचना आहे की,

> ह्या पुस्तकात ख्रिस्ती लोकांची सर्व कर्तव्यकर्मे सांगितली आहेत असे नाही, आणि जी लिहिली आहेत ती संक्षिप्त असून सांप्रतकालास अनुसरून व ज्यांचा बाहेरील वर्तणुकीशी विशेष संबंध आहे अशी आहेत. यावरून असे समजले पाहिजे की ख्रिस्ती लोकांच्या कर्तव्यकर्माचे दोन प्रकार आहेत. म्हणून जो विशेष प्रकार आत्मसंबंधी वर्तणुकीकडे लागू आहे तो या पुस्तकांत नाही.

बहिर्वर्तन आत्मसंबंधी वागणुकीच्या पायावर आधारित असते त्यामुळे आत्मवर्तनार्थ दुसरे पुस्तकच लिहिण्याचा संकल्प बाबांनी या ठिकाणी सोडला आहे. हिंदू वाचकांना सुचवितांना लेखक लिहितो,

> जर तुम्ही निष्पक्षपाताने पाहाल तर मला ह्या पुस्तकाविषयी जे वाटते तेच तुम्हास वाटेल. (मी इथे बढाई मारीत नाही) प्रारंभापासून शेवटापर्यंत या पुस्तकाचा पाया ख्रिस्ती शास्त्रांवर रचला आहे. याच्या इमारतीचे दगड ख्रिस्ती शास्त्रांतील वाक्यरूप मसालेदार चुन्याचे गच्च बसविले आहेत. ह्याच्या खिडक्या व दारे ह्यासह ईश्वरी शास्त्रांतील मताचे अडसर व कडी कोयंडे लाविले आहेत. आणि ह्या अशा सुदृढ व सुखदायक घरात सर्वांनी येऊन रहावे, म्हणजे त्यांतील कर्तव्यकर्मे सर्वांनी आपल्या मनापासून करावी अशी माझी इच्छा आहे.

याप्रकारे सूचना करून शेवटी ईश्वरी ज्ञान सर्वश्रेष्ठ असून प्रत्येकाने ते प्राप्त करून धन्य

व्हावे असे त्यांनी प्रस्तावात म्हटले आहे. परमेश्वरास प्राप्त करण्याचे मार्ग कठीण आहेत. क्लिष्ट आहेत. परमेश्वर प्रेमस्वरूप आहे म्हणूनच तो माणसावर क्वचित कोपतो पण त्या कोपात मानवप्रेम आहे. माणसावरील प्रेमापोटी त्याच्या तारणासाठी परमेश्वराने आपला पुत्र दिला, शुद्ध व कल्याणकारक धर्म दिला. हिंदूंच्या वडिलोपार्जित धर्माने त्यांच्या कुटुंबात आत्मिक सुख व आनंद नाही. देहास कष्ट व मनास काळजी त्यामुळेच वाटते. अतः सुखप्राप्ती साठी तारणावर विश्वास ठेवा, अशा प्रकारचा ख्रिस्ती धर्मोपदेशकार उपयुक्त असा विचार या पुस्तकात दिला आहे.

**आमची भक्तीसंबंधी पापे वाहणारा उपाध्या (१८६२)**

हे बाबांचे एक रूपांतरीत पुस्तक आहे. *ज्ञानोदया*च्या भाषेत सांगावयाचे म्हणजे,

> हे पुस्तक एतद्देशीय ख्रिस्ती लोकांस फार उपयुक्त आहे. यांत आमच्या भक्तीसंबंधी कर्मा-विषयी फार बारीक विचार केला आहे. यावरून असे दिसते की, ज्या कर्मास आम्ही पवित्र मानतो त्यात देखील बहुत दोष होतात, त्याची आम्हास क्षमा झाली पाहिजे. आणि हे आमचे भक्तिसंबंधी दोष किंवा पापे येशू ख्रिस्त कसा वाहतो व त्यांची आम्हास कसी क्षमा होईल, हे दाखविले आहे. ख्रिस्त आमचा भविष्यवादी, उपाध्या व राजा आहे. त्यांतून दुसरा जो अधिकार म्हणजे उपाध्यापण त्याच्यासंबंधाने देवापुढे तो आम्हांकरिता जे एक विशेष काम करतो त्याचा परिस्फोट यांत केला आहे.[३]

यावरून या पुस्तकात ख्रिस्ती धर्मातील एका महत्त्वाच्या गोष्टीचे स्पष्टीकरण असल्याचे दिसून येते. अंतःकरणाची शुद्धता हिंदू धर्मात नसून ती ख्रिस्ती धर्मात आहे. हे या पुस्तकाचे प्रतिपाद्य. हिंदुधर्मातील कर्मकांड व मूर्तिपूजा यावर या पुस्तकात कटाक्ष दिसतो. देव तसा भक्त, देवच जर अपवित्र तर भक्त पवित्र कोठून होईल? असा प्रश्न उपस्थित करून घेऊन ख्रिस्त हा पवित्र देव म्हणून त्याचे भक्तही पवित्र हा या पुस्तकाचा पवित्रा आहे.

**पंढरीचा वारकरी (१८६३)**

या पुस्तकात बाबांनी एक ख्रिस्ती गृहस्थ व पंढरीचा यात्रेकरू यांचा संवाद लिहिलेला असून त्यात पंढरीच्या यात्रेचे व विठोबाचे दर्शनाचे माहात्म्य व त्यापासून होणारे लाभ याविषयी वारकरी वगैरे विठ्ठलभक्तांच्या ज्या समजुती आहेत त्यांचे खंडन केले आहे.

**नासिक क्षेत्राची यात्रा (१८६३)**

हे पुस्तक म्हणजे एक निबंध होय. यात संवाद असून पवित्र मानलेल्या तीर्थांच्या ठिकाणी यात्रा करण्यास जाण्याविषयी जुने भाविक हिंदु लोक ज्याप्रमाणे सांगतात ती घेऊन त्याचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. पवित्र मानल्या गेलेंल्या नद्यात स्नान केल्याने पातक दूर होत नाही तर देवाने नेमलेला खरा जगद्गुरु येशू ख्रिस्त यावर अनन्यभावे विश्वास ठेवल्याने सर्व पापांची क्षमा होते, हा या पुस्तकाचा आशय आहे.

### सुप्रभात (१८६४)

इ. स. १८६४ मध्ये बाबांनी *सुप्रभात* किंवा *ब्रिटनदेशी ख्रिस्ती धर्माचा उदय* या नावाच्या एका इंग्रजी ग्रंथावरून मराठीत भाषांतर केले. हिंदुस्थान देशाप्रमाणे ब्रिटन देशही मूर्तिपूजक होता. तेथे ख्रिस्ती धर्माचा प्रवेश कसा झाला व मनुष्याच्या मनात ख्रिस्ती धर्माची किरणे कशी प्रवेश करतात य हे या पुस्तकात सांगितले आहे. *ज्ञानोदयकारांच्या* मते हा ग्रंथ 'ख्रिस्ती व अख्रिस्ती मनुष्यास सारखाच उपयुक्त आहे.'[४]

### पहारेकऱ्याची वाणी (१८६५)

हे पुस्तक *The Watchmans Voice* या इंग्रजी पुस्तकावरून रचण्यात आले आहे. यहुदी लोकांचा अज्ञानांधःकार व त्यांच्या जुन्या धर्मातील मिथ्या गोष्टी समाजास कळून त्यांनी नीतीच्या मार्गावर यावे म्हणून प्रस्तुत रचना बाबांनी केली आहे. अब्राहम, इझाक, याकोब व त्याचे वंशजाचे तारण करण्यासाठी प्रार्थना करणाराचे भाषण, मशीहाचे जगात येणे, त्याचे दुःख सोसणे, मरणे, मशीहाचे देवपण, ख्रिस्ती धर्माची सत्यता, अर्वाचीन यहुदी लोकांकडून जुन्या करारात झालेली भेळमिसळ इत्यादी विषय या पुस्तकात आहेत. ख्रिस्ती धर्माचा प्रचार एतद्देशीय हिंदूत जसा ते हिरीरीने करतात तसाच मुसलमानात पण करण्याचा हा लेखकाचा प्रयत्न येथे स्पष्ट दिसतो.

### उत्पत्ति ह्यावर टीका (१८६६)

पवित्र शास्त्रातील पहिले पुस्तक म्हणजे उत्पत्ति ह्यावर टीका हे होय. हे पुस्तक डॉ. आर. जेमसन, यांच्या उत्पत्तिवरील टीकेचे भाषांतर होय. बाबांनी त्याचे मराठीत भाषांतर करून फक्त मराठी जाणणाऱ्या ख्रिस्ती माणसाची मोठी सोय केली. पवित्र शास्त्रावर मात्थीच्या शुभवर्तनाखेरीज अन्य टीका उपलब्ध जेव्हा नव्हती त्यावेळी बाबांनी हा यत्न केला. पवित्र शास्त्र समजण्यास टीकेची अत्यंत आवश्यकता असते. टीकेशिवाय शास्त्रार्थ विपरीत लावला जातो. सनातनी विचार, मते, शिक्षण यामुळे पवित्र शास्त्राचा अर्थ क्वचित उलट लावला जातो. शास्त्रातील स्थल, काल उल्लेख व व्यक्ती इत्यादींचे उल्लेख यांची माहिती टीकेतून देता येते. या माहितीने शास्त्र वाचणारास आवड निर्माण होते. या पुस्तकाचे भाषांतर करताना बाबांनी धर्मशास्त्र, पुराणे यातून दाखले घेऊन मूळच्या रीतीभाती कायदेकानू व मूळ विषय स्पष्ट केला आहे.

### सिद्धांतरत्नमाला (१८६६)

या पुस्तकात थोडक्यात पवित्र शास्त्रातील निवडक सिद्धांताची ओळख करून दिलेली आहे. पवित्र शास्त्र हीच सर्व ईश्वरी ज्ञानाची एक खाण आहे. '*सिद्धांतरत्नमालेतील* सिध्दांत शास्त्रात शोधून पडताळून पाहा' ही पुस्तकाच्या मुखपृष्ठावरची सूचना महत्त्वाची आहे. हे सिद्धांत लोकास समजावेत म्हणून प्रस्तुत *सिद्धान्तरत्नमाला* बाबा पदमनजींनी गुंफलेली आहे.

ते प्रस्तावनेत म्हणतात,

ज्यास शास्त्रावाचूनही शिकविणाराची गरज भासते अशा ख्रिस्ती लोकांसाठी व शिकविणारांसाठी प्रस्तुत पुस्तक रचले आहे. ह्या देशात ज्या ख्रिस्ती मंडळ्या जमतात व जे लोक ख्रिस्ती होतात त्यांच्या धर्माचे सिद्धांत शुद्ध सशास्त्र व निर्मळ असण्याचे फार अगत्य आहे. कारण इतर देशातल्याप्रमाणे इथेही पाखंडे व अशुद्ध उपदेश व असत् मते उत्पन्न होण्याचे भय आहे. यास्तव सांप्रतकाळच्या एतद्देशीय ख्रिस्ती लोकांनी व ख्रिस्ती होणाऱ्यांनी आपल्या मंडळीचा पाया शास्त्रातील शुद्ध सिद्धांतावर रचावा व आपल्या पुढे होणाऱ्या संततीस साक्ष देण्याकरिता ते सिद्धांत पुस्तकात संग्रह करून ठेवावे, हा हेतू मनात धरून हे लहानसे पुस्तक रचले आहे.

पश्चात्ताप, प्रार्थना, पवित्र शास्त्र, तारण, येशूख्रिस्त, सैतान, पवित्र आत्मा, प्रभु भोजन, शाब्बाथ, विश्वास, आकाशाविषयी, नरक, पुन: उठणे व न्याय आणि आत्म निवेदन इत्यादी प्रकरण–शीर्षकावरूनच *सिद्धान्तरत्नमाले*च्या अंतरंगाविषयी स्पष्ट कल्पना येते. ख्रिस्ती धर्मात वरील विषयांचे महत्त्व फार आहे आणि प्रत्येक ख्रिस्ती माणसास त्याविषयी माहिती असणे अत्यंत आवश्यक आहे.

## आदामा तू कोठे आहेस? (१८७६)

बाबा पदमनजींनी इ. स. १८७६ मध्ये *आदामा तू कोठे आहेस!* या नावाचे उपदेशात्मक भाषण अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्ये केले होते.[५] त्यातील कल्पना अशी की आदामाप्रमाणे प्रभू प्रत्येक माणसास तू कोठे आहेस असा प्रश्न विचारणार. त्याला योग्य उत्तर आपणापाशी हवे. प्रस्तुत निबंध *सत्यदीपिके*त प्रसिद्ध झाला होता. याचेच पुढे पुस्तक झाले.

## उद्धारमार्गविज्ञान (१८७८)

हे आणखी एक रूपांतरीत पुस्तक. या मूळ ग्रंथाचा कर्ता नास्तिक होता. त्याचा परमेश्वरावर विश्वास नव्हता. मित्राच्या सूचनेवरून तो ख्रिस्ती धर्माचा अभ्यास करू लागला. आणि त्यानंतर ख्रिस्ती शास्त्राभ्यासाने त्याची पक्की खात्री झाली की ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे. नंतर त्याने आपल्या मित्रास यासंबंधी पत्रे लिहिली. त्या पत्रांचा संग्रह म्हणजेच प्रस्तुत पुस्तक होय. ह्या मराठी भाषांतरात मूळ ग्रंथातील कित्येक गोष्टी गाळल्या आहेत व कित्येक ठिकाणी त्याचा संक्षेप केला आहे. तथापि विषयाचे अनुसंधान व वादकोटीची श्रेणी यांचा भंग न होण्याचा भाषांतरकर्त्याने यत्न केला आहे.

## जगतशेटाचा पुत्र नरनायक याचे चरित्र (१८७९)

बायबलमधील प्रख्यात प्रॉडिगल सनची कथा बाबांनी या पुस्तकात खुलवून व रूपांतरित स्वरूपात सांगितली आहे. रूपांतर पाहण्यासारखे आहे.

**श्री येशूख्रिस्तकृत शांतिकल्याणदायक सुखसंवाद (१८७९)**

*Beatitudes of the Kingdm* या इंग्रजी पुस्तकाचे हे मराठी भाषांतर आहे. आत्म्याचे दैन्य, शोक, नम्रता, न्यायीपणाची भूक, दया, शुद्धता, समेट व पाठलाग या अष्ट विषयांची आशीर्वचने या पुस्तकात आहेत. त्यांचे विवेचन सामान्यांना समजेल अशा छोटया वाक्यातून सुबोध रीतीने करण्यात आले आहे.

**उपदेशरत्नमाला (१८८०)**

हा ग्रंथ बाबांनी भाषांतरित केलेला आहे. पुस्तकात एकूण बारा उपदेश आहेत. त्यात पहिला उपदेश 'समेट कर' या शीर्षकाचा आहे. त्यानंतर ख्रिस्ताचे पुनरुत्थान, स्वर्गारोहण, यावर उपदेश आहे. प्रपंचाची निवड व तिचा परिणाम, ईश्वर आमचा वाटा, ख्रिस्ताची आपल्या शिष्याकरता प्रार्थना, सोयीची वेळ व पदरी न घेतलेल्या पापाचे भय, असे आठ उपदेश सर्वांकरिता आहेत. त्यानंतर चार उपदेश अगत्याचा प्रश्न, आज्ञाधारक मनुष्य, आज्ञाभंजक स्त्री, आमचा बाप, हे मुलांकरिता आहेत. प्रस्तुत उपदेश म्हणजे मात्थी, लूक, गीत, योहान्न प्रेषित वगैरे धर्मविषयक शास्त्राच्या पुस्तकातील वाक्यांवरून केलेले विवेचन आहे. वाक्याचा अर्थ, स्पष्टीकरण, उदाहरणे, वगैरेंच्या साह्याने विवेचन केले आहे.

**सत्यवेदांत काय आहे ? (१८८०)**

या पुस्तकाचे दोन भाग असून त्यात सत्यवेद म्हणजे ईश्वरी शास्त्र म्हणजे ख्रिस्ती शास्त्र असे प्रतिपादिले आहे. ख्रिस्ती शास्त्र किंवा सत्यवेद, ईश्वर व त्याचे गुणस्वभाव, सृष्टीची उत्पत्ती, मनुष्याची उत्पत्ती, पाप, मनुष्याची पतितावस्था, पापाचा परिणाम या प्रत्येका-विषयी प्रथम ख्रिस्ती शास्त्रातून कित्येक वचने उतरून घेऊन मग त्यावर व्याख्या केली आहे. *ज्ञानोदय*कार म्हणतात की,

> काही दिवसामागे *वेदांत काय आहे* या नावाचे पुस्तक प्रसिद्ध झाले हे आमच्या वाचकास स्मरत असेलच. ते हिंदू लोकांच्या वेदांविषयी होते. हिंदूच्या वेदांतील बहुतेक गोष्टी खऱ्या व ईश्वरप्रणीत नाहीत असे त्यांत सिद्ध केले आहे. त्यावरून वाचकांच्या मनात सहज अशी पृच्छा उत्पन्न होती की, 'तर खरा वेद कोणता व त्यात काय सांगितले आहे?' या प्रश्नाचे उत्तर या पुस्तकांत दिलें आहे.[६]

ख्रिस्ती शास्त्राला 'सत्यवेद' म्हणावयाचे कारण ग्रंथकर्त्याने असे दिले आहे की, त्यात ईश्वर व मनुष्य या विषयी सत्यज्ञान आहे. त्यात कल्पित ज्ञान किंवा कल्पित गोष्टी व भाकड कथा नाहीत. ह्याला पवित्र शास्त्र म्हटले आहे कारण ह्यात ईश्वराविषयी जे काही सांगितले आहे ते सर्व शुद्ध आहे, आणि याच्या अभ्यासाने व आचरणाने मनुष्य पवित्र होतो. याचे सर्व धोरण मनुष्याला पवित्र करून पवित्र देवाच्या समागमात राहण्यास योग्य करावे असे आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लेखक म्हणतो, 'हिंदू लोकांत जो कोणी ख्रिस्ती शास्त्र न वाचता त्याचा धि:कार करतात त्यांनी हे लहानसे पुस्तक तरी अवश्य वाचून पहावे. म्हणजे त्या शास्त्रात काय

आहे त्याविषयी त्यांची योग्य समजूत होईल.' यात मनुष्याची मूळ स्थिती, पतन वगैरे अतिप्राचीन ऐतिहासिक गोष्टी, यहुदी लोकांचा वृत्तांत, भविष्यवादी व भविष्यवाद, चमत्कार, शुभवर्तमान; किंवा तारण, तारणारा, मनुष्याच्या तारणोपायात आत्म्याचे काम, ख्रिस्ती जिणे, स्वर्ग, नरक, मेलेल्यांचे पुनरुत्पादन व सार्वजनिक न्याय या महत्त्वाच्या विषयांचे विवरण १३–१४ प्रकरणात केले आहे. *ज्ञानोदय*कार या पुस्तकाच्या संदर्भात लिहितात, 'खरा वेद म्हणजे खरे ईश्वरदत्त शास्त्र कोणते या प्रश्नाचे उत्तर ह्या दोन भागांत दिले आहे, ते असे की ख्रिस्ती शास्त्र हे ईश्वरप्रणीत शास्त्र आहे, म्हणून जरी त्याला वेद अशी संज्ञा दिलेली नाही तरी त्यास 'सत्यवेद' म्हणणे योग्य आहे.'[७] या पुस्तकातून ख्रिस्ती शास्त्रातील मुख्य मुख्य विषयांचे शास्त्राधारे वर्णन केले आहे. प्रथम प्रत्येक विषयाच्या प्रतिपादनार्थ शास्त्रवचने दिली आहेत, नंतर त्या विषयाची व्याख्या या सदराखाली फोड केली आहे. तीतही शास्त्राधार दाखविला आहे. उदा. 'ख्रिस्ती शास्त्र हाच सत्यवेद आहे. यापुढे जे हे शास्त्र मी आज तुम्हांपुढे ठेवितो त्या सर्वांसारिखे यथार्थ नेम व नीति ज्याला आहेत असे कोणते मोठे राष्ट्र आहे.' (अन. ४.८) 'तुझ्या सर्व आज्ञा सत्यताच आहेत. तुझे वचन अत्यंत स्वच्छ आहे. तुझे शास्त्र सत्यच आहे. तुझे सर्व सत्य न्याय सनातन आहे.' (गीत ११९, ८६, १४०, १५१, १६०) हे आधार नमूद केले आहेत.

### ख्रिस्तवर्तन (१८८३)

या पुस्तकाविषयीचा *ज्ञानोदयात* आलेला अभिप्राय बोलका असून पुस्तकाचे स्वरूप प्रकट करणारा आहे. *ज्ञानोदय*कार लिहितात,

> बुशनेल साहेब म्हणून अमेरिकेत एक मोठा विद्वान उपदेशक होता. त्याने 'नेचर व सुपरनॅचरल' म्हणजे 'सृष्टिक्रम व अद्‌भुत गोष्टी' या विषयावर एक उत्कृष्ट तत्त्वज्ञानीय ग्रंथ केला आहे. त्याच्या एका भागात येशू ख्रिस्ताची गुणलक्षणे व वर्तन यांविषयी जे लिहिलेले आहे त्याचे हे संक्षिप्त भाषांतर आहे. हे रे. मि. बाबा पदमनजी यांनी केले आहे. याची भाषा चांगली प्रौढ असून विषयाचे प्रतिपादन उत्कृष्ट रीतीने केले आहे. विषय कोणता म्हणाल तर प्रभु येशू ख्रिस्ताची गुणलक्षणे, स्वभाव, बाल्यावस्था, तारुण्य, बोल, आचरण, कामे, योग्यता ही सर्व अलौकिक आहेत.[८]

ख्रिस्त मानव नव्हता. आकाशातून उतरला हे सिद्ध करण्यास त्याचा स्वभाव व वर्तन पुरेशी आहेत. ज्याप्रमाणे सूर्य प्रकाशणारा आहे हे त्याच्या प्रकाशाने सिद्ध होते तसेच ख्रिस्त मानव नव्हे हे त्याच्या वर्तनाने, स्वभावाने व चमत्कारानी सिद्ध होते, असा या पुस्तकाचा थोडक्यात आशय सांगता येईल.

### वाचन पाठावली (१८८४)

हा वेच्यांचा एक संग्रह आहे. या संग्रहात *ज्ञानोदया*च्या कित्येक जुन्या पुस्तकातून काढलेले ५० वेचे आहेत. असे पुस्तक काढण्याविषयी प्रथमतः डॉ. मर्जक यानी येथील ट्रॅक्ट

सोसायटीस सुचविले. नंतर ट्रॅक्ट सोसायटीच्या विनंतीवरून अहमदनगर येथील रे. डॉ. बिसल साहेब व रे. रामकृष्ण विनायक मोडक यांनी बहुतेक वेच्यांची निवड केली, आणि बाकीचे विषय सदरील मंडळीचे एडिटर बाबा पदमनजी यांनी निवडून घेतले.[९] त्यांनी कित्येक विषयास नवीन सदरे घातली, कित्येकात वर्तमानपत्रातील निबंधाचे स्वरूप बदलून पुस्तकातील लेखाचे स्वरूप दिले. कित्येक विषयांची भाषा सुधारावी लागली, परंतु बहुतेकांची भाषा-सरणी जुन्या चालीचा नमुना दाखविण्याकरिता तशीच ठेविली आहे व कित्येक विषयांचा काल निर्देशिला आहे व कित्येकांचे विशेष स्पष्टीकरण करण्याकरिता अथवा प्रस्तुत काली त्यांच्या संबंधाने लोकस्थिती कशी आहे हे दाखविण्याकरिता कुंडलीत (म्हणजे कंसात) अल्प टीपा दिल्या. ह्या वेच्यांचा विषयानुसार क्रम लाविला नाही तथापि वाचणाऱ्याच्या ध्यानात तो सहज येईल अशी त्याची मांडणी आहे एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्रातील धर्म, नीती, रीतीभाती, लोकसुधारणा इत्यादी गोष्टीत कसकसा फेरफार व वृद्धी होत चालली आहे, त्याकाळचे ख्रिस्ती मिशनरी व इतर की व सुधारलेले लोक यांचे विचार कसे होते हे यावरून समजते. ह्या वेचात कित्येक विद्वान व सुधारलेले हिंदू व एतद्देशीय ख्रिस्ती ह्यांचा संक्षिप्त वृत्तांत आहे. कुटुंबात व शाळात उपयोगी पडण्यासाठी या वेच्यांची मांडणी आहे.

**पहिल्या तीन शतकातील ख्रिस्ती मंडळींच्या अंतर्गत इतिहासाची कित्येक अंगे (१८९२)**

हे पुस्तक म्हणजे बाबांचे एक भाषण आहे. यात ख्रिस्ती मंडळीचा इतिहास दिला आहे. त्यात कित्येक चमत्कारिक, मनोरंजक व बोधक भाग आला आहे. बाबा लिहितात,

> ख्रीस्ती मंडळींचा स्थापक प्रभू येशू ख्रीस्त होता, हे ख्रिस्ती सभेस सांगावयास नको. प्रथमारंभी तिच्यामध्ये प्रेषित म्हटले की बारा मनुष्ये होती. ही मंडळी ख्रीस्ताच्या स्वर्गारोहणानंतर मोठी वाढल्यावर काही काळ यरुशालेमात होती म्हणून पहिली ख्रीस्ती मंडळी यरुशालेमाचीच होय.

असा प्रारंभ या इतिहासाचा केला आहे. पुढे त्यांची धर्ममते व धर्मशिक्षण, गृहस्थिती, ख्रिस्ती कुटुंब व गरीब लोक किंवा ख्रिस्ती दानधर्म, कुटुंबातील ईश्वर भक्ती, मंडळीतील प्रार्थना, भजनालये, इत्यादी, नाटके व सर्कस व शेवटी सारांश या अंगांची इत्थंभूत माहिती बाबांनी या ग्रंथात ग्रथित केली आहे. बाबा लिहितात, 'प्रिय मित्र हो याप्रमाणे ख्रीस्ती मंडळीच्या अत्यंत प्राचीन स्थितीचे संक्षिप्त निरुपण तुम्हास केले आहे. ख्रीस्ती धर्माची स्थापना जागतिक घडामोडीत एक आश्चर्यकारक घटना आहे.' ख्रिस्ती धर्माचा प्रसार ज्या ज्या मार्गाने करता येईल त्या त्या मार्गाने बाबा करीत असताना दिसतात. कधी भाषण, तर कधी उपदेश, कधी लेख, कधी पुस्तक रचना, प्रस्तुत भाषण त्यांनीपुढे पुस्तक म्हणून प्रसिद्ध केले. स्वतःस जो धर्म पटला, तो इतरांना पटावा व इतरांचे उद्धरण–तारण व्हावे, यासाठी बाबांची खटपट आहे.

**लाभालाभ** (१८९४) बाबा पदमनजींचे इ. स. १८९४ तील एक पुस्तक लाभालाभ या नावाने आहे. *लाभालाभ म्हणजे ब्राह्मण धर्माने हिंदुस्थानकरिता काय केले आणि ख्रिस्ती धर्म त्याकरिता काय करील* असे भले मोठे शीर्षक या पुस्तकाचे आहे. याचे दोन भाग असून पहिल्या भागात हिंदुधर्मातील दोष कथन केले आहेत. हिंदुस्थानातील लोकांनी ख्रिस्ती धर्माचा खऱ्या मनाने स्वीकार केल्यास त्यास कोणकोणती सुखे प्राप्त होतील हे थोडक्यात या पुस्तकात कथन केले आहे. आरोग्य आणि दीर्घायुष्य ही वाढतील, सुज्ञानाचा प्रसार होईल, हिंदुस्थान जगातील राष्ट्रामध्ये ऊंचपद पावेल, लोकास सामाजिक व धर्मासंबंधी स्वतंत्रतेचा उपभोग घेण्यास मिळेल. मनुष्य जातीचे बंधुत्व कबूल केले जाईल. मनुष्यांमध्ये न्यायाची वृद्धी होईल, सामाजिक सुधारणेसाठी होणारे अडथळे बंद होतील, मनुष्य जातीचे दुःख कमी होऊन सुख वाढेल, स्त्रियास त्याचे योग्य पद प्राप्त होईल. मूर्तिपूजा व भक्तीचे दुसरे नीचत्व आणणारे सर्व प्रकार लयास जातील, परमपूज्य असा जो एकच देव त्याचीच मात्र भक्ती चालू होईल. पापाची खरी क्षमा प्राप्त होईल, पवित्र आचरणाची वृद्धी होईल, जन्मभर जी मिथ्या भये बाळगावी लागतात त्यापासून सुटका होऊन अंतःकाळची गौरव आशा प्राप्त होईल. खरे ख्रिस्ती सकल जगताच्या प्रभूचे दत्तक पुत्र व कन्या होऊन उत्तरोत्तर त्यासारिखे होत जाऊन त्याच्या चिरकालीन सुखाचे विभागी होतील. थोडक्यात ख्रिस्ती धर्माकडून हिंदू लोकांचे इहलोकी व परलोकी कल्याण होईल. परंतु त्यांच्या स्वधर्माचे फळ ह्या सर्व गोष्टीच्या विरुद्ध आहे असे मत प्रतिपादन या ग्रंथात आहे. हिंदूधर्मात रोग, दारिद्रय, राष्ट्रीय अज्ञान, बुद्धिचे दारिद्रय, जात, स्त्रीअसहिष्णुता, पशुभक्ती, मूर्तिपूजा, अद्वैतमत, लूट, खून, नरयज्ञ इत्यादीविषयी धर्माची मंजूरी, नीति अनीति, पापपुण्य. धर्माधर्म यांच्यातील अनादी सिद्ध भेदाचा इन्कार, पापक्षमेचे निरर्थक उपाय, धर्माचरण नाही, पापांचे वृथा भय व व्याकुळता, मरणसमयाची खोटी आशा, दुर्बळ देव, वगैरे तोटे असणाऱ्या गोष्टींनी ब्राह्मणधर्म म्हणजे हिंदूधर्म भरलेला आहे म्हणून त्यापासून लाभ काही नाही, अशी विचारसरणी लेखकाने प्रस्तुत '*लाभालाभात*' मांडलेली आहे. या पुस्तकाच्या शेवटी ग्रंथकर्त्याने जी प्रार्थना केली आहे ती पुढीलप्रमाणे—

"हे परमेश्वरा ज्या त्वा पृथ्वीवर राहण्याकरिता सर्व मनुष्ये एका रक्ताची उत्पत्ती केलीस आणि जे जवळचे व दूरचे त्यास शांतीचा उपदेश करण्यास आपला पुत्र तू पाठविलास, तो तू असे कर की, ह्या देशातील सर्व लोकांनी तुला शोधावे व तुला पावावे आणि हे स्वर्गीय पित्या तुझे वचन पूर्ण करण्याविषयी त्वरा कर, म्हणजे सर्व मनुष्यजातीवर तुझा आत्मा ओत, आमचा तारणारा प्रभु येशू ख्रीस्त त्याच्या नावाने हे मागतो. आमेन."

**ज्ञाननीति बोध संग्रह** (१८९९)

पवित्र शास्त्रात जे नीतीचे पुस्तक आहे त्यातील निवडक विषयांवर उपदेशपर टीकेचा इंग्रजी ग्रंथाधारे ज्या पुस्तकात संग्रह केला आहे असे हे पुस्तक. यात ईश्वरभक्ती, ईश्वरी सूत्रे, मनुष्याची कर्तव्ये, सदाचाराचा सुपरिणाम, दुराचाराचा दुष्परिणाम, धार्मिक व अधार्मिक

यांची गुणलक्षणे व वर्तने, सद्‌गुण प्रशंसा, दुर्गुणांचा निषेध इत्यादी १२३ विषय आहेत. *ज्ञानोदयकार* या पुस्तकाविषयी लिहिताना म्हणतात,

> ग्रंथकर्ते रे. बाबा पदमनजी यांनी आपल्या वृद्धापकाळी व प्लेग व दुष्काळ यांच्या काळजीत असता हे लिहिले आहे. तशात वयपरत्वे त्यांच्या एका नेत्रास अंधत्व व दुसऱ्यास दृष्टि-मंदत्व आल्यामुळे त्यांच्याच्यानी स्वत: हा ग्रंथ लिहविला नाही. तर त्यांची कन्या एस्तेर-बाई हिच्या सहाय्याने हे ग्रंथरूपी जहाज मोठ्या कष्टाने सुरक्षित बंदरी पोहोचवले.[१०]

## स्ट्रे नोट्स् वा अिडरलघूड बायबलची टिपणे (१९००)

बाबांचे एक *स्ट्रे नोट्स्* या नावाचे इंग्रजी पुस्तक उपलब्ध आहे. मूळ व निवडलेल्या टीपा असे त्यांचे स्वरूप असून ओल्ड टेस्टामेंट म्हणजेच जुन्या करारावरच्या ह्या टीपा आहेत. ज्या बायबलच्या प्रस्तुत टीपा आहेत ते बायबलचे पुस्तक बाबांना प्रसिद्ध मिशनरी रे. मि. व्हाईट यांनी दिले होते. त्यांनी बायबल शिकविण्याचा एक वर्गही चालविला होता. त्या वर्गास बाबा स्वत: विद्यार्थी म्हणून जात असत. त्या वर्गातच बाबांना उपरोक्त बायबल व्हाईट साहेबांनी दिले होते. त्या बायबलमध्ये कोरी पाने होती. 'जणू ती पाने आपणास टिपणे करावयास आमंत्रणच देत होती' असे बाबा म्हणतात. ते लिहितात,

> त्या बायबलमधील कोऱ्या पानांवरचा मजकूर माझ्या वैयक्तिक खाजगी बाबींचा होता. माझे धर्मशिक्षण, सुधारणा व शिक्षण याबाबत तो मजकूर मी वयोमानाने अंध होईपर्यंतचा आहे. बरीच वर्षे ही टिपणे मी तयार करीत होतो. हे कार्य इ. स. १८५७ ते इ. सन १८८७ पर्यंतचे आहे असे का म्हणाना. परंतु कालांतराने मला असे दिसले की अगोदर लिहिलेल्या मजकुराची शाई फिकी होत आहे व कागद पण जीर्ण-शीर्ण होऊ लागला आहे. त्याची स्वतंत्र नक्कल करावी अशी कल्पना मला सुचली पण ते कार्य किती कठीण आहे याची पण कल्पना आली. १० वर्षांचा काळ यात गेला. मरणसमय नजीक वाटू लागला आणि आपल्या मृत्युनंतर या टिपणांचे काय होणार ही क्षिती वाटू लागली. त्यातच हे काम पवित्र आत्म्याचे आहे असा त्रास होऊ लागला. अन्यांच्या उपयोगी आपले अनुभव पडावेत या जाणीवेने ती टिपणे प्रसिद्ध करण्याचे ठरविले.

पुढे ते लिहितात,

> I shall not weary the reader with the details of the editing for the press. I shall content myself by mentioning but one important. Short headings have been placed to the most important subjects, these will be found in the form of the initial words of the verse, or the name of the subject treated under the Note, every possible care has been bestowed to render the whole matter accurate and acceptable.

आपण खाजगी बाबी, प्रार्थना, अनुभव, पापांचा पाढा (कबूली), ध्यान वगैरे मजकूर वगळून हे टिपण पुस्तक तयार केले आहे असे बाबा म्हणतात. ही टिपणे संपूर्ण व सलग नाहीत. नावाप्रमाणेच विखुरलेली (स्ट्रे नोट्स्) अशी ही टिपणे आहेत. दुर्मिळ व कष्टसाध्य असे

त्यांचे स्वरूप आहे. ती तुलनात्मक, विश्लेषणात्मक व माहितीपूर्ण, अचूक व सुबक व्हावीत अशी त्यांनी काळजी घेतली. शेवटी बाबांनी त्यांच्या श्रद्धा, विश्वास, अनुभव इत्यादींनी या टिपणांच्या प्रसिद्धीच्या कार्याच्या वेळी ख्रिस्तकृपेची कशी सांगड मिळाली हा इतिहास कथन केला आहे. पवित्र शास्त्र, अर्थात जुना करार, या विषयावरच्या इतस्ततः टीपा तयार करून त्या प्रसिद्ध केल्या आणि बाबांनी स्वानुभवाची ही शिदोरी पुढीलांच्या हाती दिली. ख्रिस्ती लोकांना प्रस्तुत टिपणे अधिक मोलाची वाटल्याशिवाय राहणार नाहीत. पुस्तकांच्या अंती बाबांनी संदर्भसूची व स्वग्रंथसूची तयार करून दिली आहे. थोडक्यात हे पुस्तक इंग्रजीत असून मराठी ग्रंथकाराने केलेले आहे हे लक्षात घ्यावयास हवे. या पुस्तकाच्या रचनेने बाबांच्या इंग्रजी लेखनकौशल्याचे दर्शन घडते असे म्हणावेसे वाटते.

### पित्याकडे जाणे (१९०४)

'प्रोफेसर हेन्री ड्रमंड या प्रसिद्ध गृहस्थाचे नाव इंग्रजी जाणणाऱ्या सर्व लोकांस ठाऊक आहे. त्याचे लेख मार्मिक व आत्म्याला फायदा करून देणारे आहेत. *आयडियल लाइफ* या नावाचा त्यानी एक मोठा ग्रंथ केला. त्याआधारे *पित्याकडे जाणे* हे पुस्तक मि. बाबा यांनी करून प्रसिद्ध केले आहे. या लहान पुस्तकाचा ख्रिस्ती समाजाने उपयोग केला तर ड्रमंड साहेबांचे आणखीही काही लेखांचे भाषांतर करून प्रसिद्ध करण्याचा मि. बाबांचा इरादा आहे.'[११] प्रस्तुत माहिती *ज्ञानोदया*त प्रसिद्ध झाली होती. त्यावरूनच या पुस्तकाविषयी माहिती कळते.

### ख्रिस्त आमचा त्राता, कित्ता (१९०४)

हे पुस्तक पहावयास मिळाले नाही, परंतु त्याबद्दल बाबांचे खालील पत्र पाहावयास मिळाले.

> *ख्रिस्त आमचा त्राता व कित्ता* ह्या पुस्तकाच्या बऱ्याच प्रती खपल्या, तरी अद्याप बऱ्याच शिल्लक आहेत, त्या विषयी कित्येकांची अनास्था पाहून दुःख वाटते. पाळक व मिशनेरी यानी व इतरांनी त्याचा प्रसार करण्यासाठी जसा आवेश दाखवावा व उद्योग करावा तसा केल्याचे माझ्या अनुभवास विशेष आले नाही. एक मिशनेरी साहेबाने नुकत्याच त्याच्या तीन डझन प्रती नेल्या हे सांगण्यास आनंद वाटतो. मंडळीची शुद्धता राखण्याकरिता स्वतः काही करणार नाहीत व दुसऱ्याने केले असता त्यात सहाय्य होणार नाही असेही ख्रिस्ती लोक आहेत हे पाहून मात्र खेद होतो. — बी.पी.[१२]

प्रस्तुत पुस्तकाची आणखी माहिती उपलब्ध होऊ शकली नाही.

बाबांची बहुतेक स्फुट ग्रंथरचना वाङमयीन दृष्टीने महत्त्वाची नसल्यामुळे त्याचा फक्त ओझरता परिचय या प्रकरणात करून देण्यात आला आहे. या प्रकारची त्यांची पुस्तके संख्येने बरीच असून ती सर्वच्या सर्व उपलब्ध होऊ शकली नाहीत. यातील बहुतेक पुस्तके धर्म-प्रचाराच्या दृष्टीने लिहिलेली असून काही पुस्तकांच्या अनेक आवृत्या निघालेल्या दिसतात. भाषेच्या दृष्टीने ही पुस्तके चांगली आहेत. कारण ती बाबांनी लिहिलेली आहेत. त्याचप्रमाणे

या ग्रंथांपैकी बरीचशी पुस्तके भाषांतरीत किंवा रूपांतरीत असल्याचेही प्रत्ययास येते. ख्रिस्ती व ख्रिस्ती धर्माच्या अभ्यासकांना बाबांच्या या पुस्तकाचा उपयोग चांगला होण्यासारखा आहे. मराठी ख्रिस्ती धर्म वाङमयात या स्फुट ग्रंथांनी चांगलीच भर टाकलेली आहे हे उघड आहे.

* * *

## टीपा

१. ज्ञानोदय, १ सप्टेंबर १८५७, पृ. २५०.
२. ज्ञानोदय, ऊनि., पृ. २५०.
३. ज्ञानोदय, २ मार्च १८६३, पृ. ६८–६९.
४. ज्ञानोदय, ५ ऑक्टोबर, १८९३, पृ. ३१७.
५. सत्यदीपिका, पु. ३ अं. १२, २ फेब्रु. १८७६, पृ. १७९ ते १८८.
६. ज्ञानोदय, २० मे १८८०, पृ. २४३.
७. ज्ञानोदय, २६ ऑगस्ट १८८०, पृ. ४१६.
८. ज्ञानोदय, २५ ऑक्टोबर १८८३, पृ. ५१५.
९. ज्ञानोदय, ५ जून १८८४, पृ. २६१.
१०. ज्ञानोदय, ९ नोव्हेंबर १८९९, पृ. ३५५.
११. ज्ञानोदय, १० मार्च १९०४, पृ. ७५.
१२. ज्ञानोदय, ३ सप्टेंबर १९०३, पृ. २८५.

१०

# ख्रिस्ती धर्म व हिंदु धर्म यांचा आपपरभावाने केलेला तौलनिक विचार

धर्मांतरानंतर तत्कालीन मिशनऱ्यांच्या धर्मप्रचार व प्रसार यांच्या लाटेत बाबा पदमनजी-सारखा खंदा लेखक न सापडला तरच नवल! एकोणिसाव्या शतकाचे अर्धशतक ओलांडल्यानंतर महाराष्ट्र ख्रिस्ती धर्मप्रचारक व हिंदूधर्माभिमानी यांच्यामध्ये जो एक वैचारिक संघर्ष झाला त्याचे संपूर्ण व स्पष्ट चित्र उभे करण्यात साधनांच्या दुर्मिळतेमुळे बऱ्याच अडचणी असल्या तरी बाबा पदमनजींची हिंदू व ख्रिस्ती या धर्माबद्दलची जी तुलनात्मक ग्रंथ-रचना उपलब्ध आहे तिच्यावरून या संघर्षाचे वैचारिक स्वरूप लक्षात येते. या दोन्ही धर्मांतील दोन्ही आखाड्यात जे एक वाग्युद्ध काही काळापुरते अटीतटीने रंगविले त्यातील ख्रिस्ती धर्माची एक सबळ बाजू बाबांच्या या पुस्तकातून आपल्या निदर्शनास येते. 'अशिक्षितांना सेवा-वृत्तीने जिंकावे व सुशिक्षितांना युक्तिवादाने कुंठित करावे'[१] असा जो ख्रिस्ती धर्मोपदेशकांचा दुहेरी डाव होता तो डाव बॉम्बे ट्रॅक्ट सोसायटीच्या इच्छेनुसार बाबांना खेळावा लागला आणि हा खेळ त्यांनी मोठ्या उत्कटतेने व तल्लीनतेने खेळले आहेत. पाश्चात्य मिशनऱ्यांच्या पावला-वर पाऊल ठेवून बाबांनी दोन्ही धर्मांच्या तुलनात्मक अभ्यासासाठी उपलब्ध साधनांचा बारका-ईने अभ्यास करून आपल्या मल्लिनाथीसह अनेक पुस्तके ट्रॅक्ट सोसायटीतर्फे प्रसिद्ध केली आहेत. या ग्रंथलेखनात बाबांच्या दांडग्या अभ्यासाची वृत्ती जरी दिसून आली तरी त्यामध्ये बाबांचा आपपरभाव अगदी स्पष्ट दिसून येतो. आपभाव ख्रिस्ती धर्माच्या वाट्याला व परभाव हिंदूधर्माच्या वाट्याला ही उघड उघड विभागणी असल्यामुळे किंवा तत्कालीन ख्रिस्ती मिशनऱ्यांप्रमाणे हा त्यांचा अभ्यास त्यांनी 'छिद्रान्वेषक बुद्धीने' केला असल्यामुळे[२] त्यातला तारतम्यभाव स्पष्ट दिसतो. 'ख्रिस्ती धर्मोपदेशक फक्त येशू ख्रिस्ताची महति गाऊनच थांबत नसत. हिंदुधर्म व समाजरचना ह्यावरही ते आक्षेप घेत. भारतीय तत्त्वज्ञानातील विसंगती व तर्कदुष्टता, आणि हिंदु समाजरचनेतील अन्याय व विषमता दाखवून देऊन

ख्रिस्ती धर्म हाच खरा बुद्धीवादावर अधिष्ठित असा धर्म आहे असे सिद्ध करण्याचा ते प्रयत्न करीत हे प्रा. सरदारांचे विवेचन[3] बाबांच्या या प्रकारच्या ग्रंथलेखनासही जसेच्या तसे लागू होण्यासारखे आहे. विष्णुबुवा ब्रह्मचारी, मोरभट दांडेकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी विरुद्ध बाजू सिद्ध करून तोफा डागल्यानंतर अशा प्रकारच्या तुलनात्मक विचारातील असहिष्णुता व उथळपणा लक्षात आल्याखेरीज राहिला नाही. बाबांनी कृष्णशास्त्री चिपळूणकरांवर जी आग पाखडली आहे ती त्यांच्या आत्मचरित्रात सूचक रीतीने व्यक्त झाली आहे.[4] विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यांच्या विरुद्ध 'बावांचा कावा' या नावाने पाश्चात्य मिशनऱ्यांच्या विवेचनाचे मराठीत रूपांतर करून ते बाबांनी *ज्ञानोदयात* प्रसिद्ध केले होते.[5] कालांतराने या वादविवादातील तीव्रता कमी होऊन ख्रिस्ती मिशनऱ्यांचा या बाबतीत प्रभाव पडेनासा झाल्यानंतर ही बाबांनी या विषयावर सातत्याने ग्रंथरचना केलीच आहे.

आज खंडनमंडनात्मक अशा पद्धतीचा तुलनात्मक धर्मविचार केवळ 'ऐतिहासिक' वाटावा इतका अनावश्यक व आपल्या समजुतीच्या आणि बुद्धिवादाच्या पलीकडचा आहे. आज तर या विषयात कोणासही रस वाटणे शक्य नाही. तरीदेखील बाबांच्या ग्रंथांच्या अवलोकनाच्या रूपाने एकोणिसाव्या शतकातील या ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या दृष्टिकोनाचे स्वरूप कळावे यासाठी त्यांच्या या ग्रंथाचा व त्यातील विचारांचा थोडक्यात परिचय करून देण्याचे योजिले आहे. बाबांच्या या सर्व पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत आणि प्रत्येक आवृत्तीत काही ना काही परिष्करण करण्याची बाबांची उद्योगप्रियता तर मोठीच आहे. या त्यांच्या सर्व आवृत्त्या आज उपलब्ध नसल्यामुळे आणि परिष्करणातील वाढीव मजकुरही मोठ्या प्रमाणात असल्यामुळे या प्रकरणात कोणत्याही विशिष्ट आवृत्तीचे संदर्भ क्रमांक न देता स्थूलमानाने हे विवेचन करण्याचे धोरण ठेवले आहे.

### ख्रिस्ती धर्म व हिंदू धर्म यांची तुलना

धर्मांतरानंतर लगेच हे पुस्तक बाबांनी लिहिले व ते १८५५ साली प्रसिद्ध केले. पुत्र आणि बाप यांच्या संवादरूपाने हे पुस्तक लिहिण्यात आले आहे. यात पुत्र ख्रिस्ती धर्माचे विवेचन करतो तर बाप हिंदुधर्मविषयक मताने बोलत आहे. कदाचित बाबांचे वडील व बाबा स्वतः यांच्यात दोन्ही धर्मासंबंधी झालेली चर्चा या पुस्तकात ओघाने आली असण्याची शक्यता आहे. तारण हे केवळ ख्रिस्ती धर्मातच शक्य आहे. हिंदुधर्मात राहून माणसाला पापमुक्ती अशक्य कशी आहे, हे पटवून देणे हा या पुस्तकाचा हेतू आहे. गंमत अशी की, असे करीत असताना हिंदु तत्त्वज्ञानातील मोक्षविचाराकडे बाबांनी संपूर्ण दुर्लक्ष केले आहे; अधूनमधून मोक्षाचा उल्लेख असला तरी तो केवळ शाब्दिक आहे, तात्त्विक नव्हे.

> हिंदुशास्त्रात तारण होण्याचा खरा उपाय सापडत नाहीं. आपण देवाचे अपराधी आहोत, पापामुळे त्याचा आपणावर राग आहे. आपलें अंतःकरण मलीन असते. वासना, इच्छा, हेतु, कल्पना या पापिष्ट अंतःकरणापासून निघतात, देवाच्या दृष्टीने त्या अगदी मलीन. या अवस्थेत त्याची सेवा आमच्याच्याने करवत नाही व मरणानंतर देवापाशी सुख भोगावयास

जाववत नाही. अशा संकटांत हिंदुधर्मात कोणाचाच आश्रय नाही. वेदांत पापपुण्याचा फारसा विचार नाही. यज्ञयागांत इहलौकिक धनधान्य संपत्ति, गाई गुरे इ. प्राप्त होते; पुराणांत मूर्तिपूजा, व्रतवैकल्ये, उपासतापास व कर्मकांड आहे; अवतार तारावयास आले नाहीत. वेदांतात सर्व माया, आभास; यामुळे पापपीडितास कोणापासून शांति न मिळता हिंदुधर्माकडून त्याची हेळणा होऊन तो निराश कर्दमांत बुडतो. याप्रमाणे मुलाने बापासमोर प्रस्ताव करून बापाला सुरुवातीलाच कुंठित केले आहे, व ख्रिस्ती तारणासंबंधी त्याच्या मनात कुतुहल निर्माण केले आहे. (त्यातील महत्त्वाचे मुद्दे असे : )

**मतामतांचा गलबला :** 'हिंदुधर्माचे पाये पुराणे, शास्त्रे, वेद हे होत. त्यांत लिहिले ते सर्व लोक खरे मानतात. ब्राह्मणावर विश्वसून लोक राहतात. शास्त्रपरीक्षा करीत नाहींत. शिवाय सर्व शास्त्रे संस्कृतात आहेत. ऊंटाच्या ओझ्याची पुस्तके. सगळ्यांचा अर्थ केव्हा लावणार?' 'हिंदूधर्म देवापासून नाही. देवांचे वर्णन त्याच्या गुणास नीचत्व आणणारे. काल्पनिक विज्ञान, भाकडकथा, सदोष मते इ. त्यात आहेत. मनुष्यास थोरपण, मनुष्याची तारणव्यवस्था त्यात नाही. सांख्य म्हणजे कपीलमताने ईश्वर नाही. सृष्टि अनादि आहे. ईश्वर म्हणजे ब्रह्मनिर्गुण, निराकार. त्यामुळे त्यास इच्छा, ज्ञान, शक्ति, न्याय, पवित्रपण, क्षमा, शांति ही कोठून असतील? आपण त्याची भक्ती कशी करावी? ब्रह्मोपासना करता येत नाही. ब्रह्म या विषयावर त्या धर्मात बराच गोंधळ, मतामतांचा गलबला आहे. ब्रह्मा-विष्णु-महेश यांच्या उत्पत्तीच्या कथा विलक्षण, विपरीत, न पटणाऱ्या आहेत. त्यांच्या राहण्याच्या जागा भिन्न-भिन्न, देवांचे परस्परांत वैर, ते स्वैराचारी, व्यभिचारी दिसतात.' त्यांच्या अवताराविषयी बोलावयाचे तर 'देवाला मनुष्यअवतार घेण्याचे कारण हेच असले पाहिजे की त्याने आपल्या पवित्र वर्तुणुकीने व उपदेशाने पापी मनुष्यास शुद्ध मार्गास वळवावे आणि मनुष्याचा मूळ स्वभाव, जो प्रारंभापासून पापी नव्हता तो, त्यास पुन: प्राप्त करून द्यावा आणि पापाचे प्रायश्चित करून पाप्यासाठी स्वर्गाचे दार उघडावे पण असे न करता जर देवच पाप्यासारखे वागू लागले तर मनुष्ये पूर्वस्थितीवर कशी येतील? ती म्हणतील की, देवही आमच्यासारखा पापी आहे. मग आम्हांस सदाचरणाने वागण्याची काय जरूर? जसा देव तसा भक्त. जसा गुरू तसा चेला. आणखी परमेश्वर सोंग घेतो इ. भाषणांनी त्याचा अपमान होतो. मनुष्याचा उद्धार करण्यासाठीच मात्र परमेश्वराने एक वेळ अवतार घेतला होता आणि हे काम फार मोठ्या मेहनतीचे व अगत्याचे व गंभीरपणाचे होते. तर तशाला सोंगाडी जो घटकाभर गमतीसाठी खेळ करतो त्याची उपमा देणे हे परमेश्वराच्या व दयासंपन्न गुणांची थट्टा केल्यासारखे आहे.'

**अनेक देव :** हिंदुशास्त्रात अनेक देव आहेत. पुत्राच्या मताने हे पाप होय. सूर्य, चंद्र, अग्नि, इंद्र, गणपती, काली, मारुति, विठोबा, खंडोबा असे अनेक देव व देवालये जागोजागी दृष्टीस पडतात. देवांच्या अनेक पुराणकथांवरून त्यांची भांडणे होती, त्यांची युद्धे होत. देव परस्परांस कैद करीत. स्वैराचार, पापे यांच्या कथांतून आहेत. हिंदुधर्मात ब्राह्मणांचे वर्चस्व आहे. ब्राह्मण द्रव्यलोभी, आळशी, भोजनप्रिय आहे. त्याने मनुष्याचे तारण स्वत:च्या हाती ठेविले. देव त्याच्या आधीन, धर्मशास्ता, धर्मप्रवर्तक, मनुष्याचे तारण करणारा, वगैरे अनेक गोष्टी

ब्राह्मणाने स्वतःच्या हाती ठेवल्या. शास्त्र संस्कृतात रचले. विधि-निषेधांनी धर्म जखडून ठेवला. ब्राह्मण साक्षात् भूदेव इतकी मजल गेली. मनुष्याचा मूर्खपणा व ब्राह्मणाची धिटाई यावरून उघड होते. कारण ब्राह्मण मनुष्य असता त्याने देवत्वाचा कबजा घेतला. देवावर खरे प्रेम करणारे व देवाचे भक्त यांना उपरोक्त विवेचन ऐकून दुःख होते. असा प्रकार ख्रिस्ती धर्मात नाही. हे हिंदुधर्मातील ब्राह्मणश्रेष्ठत्व आहे. ब्राह्मणांविषयी बाबा लिहितात,

तर वास्तविक गोष्ट हीच आहे की ब्राह्मण इतर लोकांप्रमाणेच अशक्त, पापी, दुःखी, रोगी, शोकपात्र, मरणपात्र असे आहेत. बहुतकाळापासून त्यांनी हिंदुधर्माचे भांडवल आपणापाशीच ठेवले म्हणून त्यांस लोकांस अज्ञानांत ठेवण्यास व आपले महत्त्व वाढविण्यास सवड सापडली. पण आता उत्तरोत्तर त्यांचें वास्तविक रूप लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येत चालले आहे व जर ते अजून अभिमान न सोडतील व आपण इतरांसमान असें न मानतील तर महारमांगांची मुलें त्यांच्यापेक्षा विद्वान, सुशील होतील. आणि ईश्वरकृपेनें तसा प्रकार दृष्टीस पडत चालला आहे. यास्तव ब्राह्मणांनीं सावध होऊन आपले हित पहावें हें बरे. वेदशास्त्रें ही त्यांच्या इच्छेविरुद्ध हळूंहळूं उघडकीस येत चालली आहेत. तीं आतां लपवून ठेवून कांही हंणील नाहीं असें त्यांनीं खचित समजावें.

**ग्रंथांतरींचें मत (हिंदुशास्त्र)** : पापी मनुष्याचा स्वभाव बदलण्याची शक्ती हिंदुधर्मात नाही असा पुत्रमुखाने बाबांचा युक्तिवाद आहे. हिंदू शास्त्रकारांनी बहुत शोध व विचार केला आणि शेवटी त्यांस हाच निर्णय करावा लागला असे त्यांस वाटते. शिव, ब्रह्मा इ. देवांकडे पाप घालविण्यास जावे तर **ते स्वतः पापी असे त्यांच्या वर्णनावरून समजते.** कर्म नियम पाळून करावे तर शास्त्र म्हणते की, जो नित्यपवित्र, नम्र, इंद्रियदमन करणारा आणि जो उत्तम स्मरणयुक्त, वेदशास्त्रामध्ये विचक्षण, सुशील इ. गुणसंपन्न आणि ज्याची बुद्धि चांगली असा जो आहे, त्यानेच नियम करावे. दुसरे कोणीही करू नये. या अर्थाचे वचन आहे. यावरून जे लोक जी व्रते, उपवास, नेम इ. करतात ती सर्व व्यर्थ होतात. जर गंगास्नानादि कर्मांनी पाप जाते म्हणावे तर त्याला बाधक अशीही मते हिंदू शास्त्रात आहेत. शेवटी बिचाऱ्या पाप्यास हे हिंदुशास्त्र त्यांच्या पापसमुद्रात बुडवत ठेवते. हिंदुशास्त्र म्हणते की लंगड्या मनुष्याने मजकडे चालून यावे, मग मी त्याचा पाय बरा करीन. मुक्या मनुष्याने प्रथम स्वतः बोलावे मग मी त्यास वाचा देईन. हिंदुशास्त्राप्रमाणे प्रथम अंतःकरण शुद्ध करावे लागते. हिंदुशास्त्र पाप्यास एकही खरा मार्ग दाखवित नाही. त्यास हजारो वाटांनी जाण्यास सांगून शेवटी अरण्यात नेऊन सोडते. हिंदू लोक एक स्वर्ग मानीत नाहीत. एकेका देवाचा स्वर्ग एकेक आहे. शिव कैलासात राहातो. विष्णु वैकुंठात, ब्रह्मदेव ब्रह्मलोकी. तथापि इंद्राची रहाण्याची जागा तिला स्वर्ग असे म्हणतात. तेथे बहुधा सर्व पुण्यप्राणी जातात असे सर्वसाधारण मत आहे. हा स्वर्ग पुण्यसाठा असेपर्यंतच. पुण्यसमाप्तीनंतर त्यास पृथ्वीवर वा नरकात जावे लागते. तसेच स्वर्ग हे पवित्र स्थान नाही. तेथे सुखोपभोग आहेत. वेश्या आहेत. नाच, तमाशे वगैरे इंद्रियभोगांचे मलिन विषय या ठिकाणी आहेत. तर अशा स्वर्गाची प्राप्ती काय कामाची? या टीकेच्या नशेत पुत्र पित्यास *धूमकेतू*चा हवालाही देतो. तो म्हणतो, *धूमकेतू*चे संपादक

भाऊ महाजन यानी षड्दर्शनांविषयी लिहिले होते की, 'वेदांत, व्याकरण, मीमांसा इत्यादी निरुपयोगी शुष्क पांडित्यांची मते आहेत, कारण सर्व शास्त्रे परस्परविरुद्ध दिसतात, कांही नास्तिक आहेत. पूर्वमीमांसेत केवळ वेदप्रामाण्य एवढाच आस्तिक्याचा भाग आहे, अन्यथा ते शास्त्र नास्तिकांचे होय. मंत्र म्हणजे देवता. देवाशिवाय ब्रह्मांडांत अन्य कांही नाही. न्यायशास्त्रात जीवात्मा, परमात्मा यांचा भेद कल्पिला आहे.' कापिल मतांत ईश्वर अजागलस्तनवत् मानला आहे. सर्व गोष्टी स्वभावे घडतात. ईश्वराकडे त्याचे कर्तृत्व नाही. देवाशिवाय सृष्टीक्रम चालण्यास त्यात कांही अडचण दिसत नाही. *धूमकेतू*कर्त्यांच्या या मताचा हवाला देऊन या संवादातील पुत्राने हिंदुधर्माचे यथेच्छ दोषदिग्दर्शन केले आहे. तो म्हणतो,

> हिंदूधर्मात एक शास्त्राभावी हीं मतमतांतरे झाली व ब्रह्मघोटाळा झाला. अज्ञानी प्रजेची दिशाभूल झाली. हिंदूधर्माचे तत्त्व म्हणून जे कांही आहे ते ईश्वराविषयी निंद्य गोष्टींनीं भरले आहे. (१) परमेश्वर आहे आणि तो नाही असे ते सांगते (२) (सदसच्चाहम्) सत् आणि असत् मी आहे. (*भगवद्गीता* अ. ९ श्लो. १९) त्याचे गुण पाहिले तर तो केवळ 'सच्चिदानंद' म्हणजे अस्तित्व, ज्ञान आणि आनंद आहे. यावरून त्याचे दुसरे गुण पवित्रपण, न्यायीपण, प्रीति हे नाहिसे होतात, आणि तो पुरुष नाही. पण पदार्थ मात्र आहे असे होते व तो सर्व पदार्थमात्र आहे असे मानल्याने त्याचे स्वतंत्र अस्तित्व नष्ट होऊन तो नसल्यासारखाच होतो. (२) वेदांतमत सर्व मनुष्यांच्या बुद्धीस ग्रहण करता येत नाही. (३) वेदांतमताप्रमाणे मनुष्याला चालणे अशक्य आहे. वेदांतमतावर दाक्तर बालंटैन नामक एका विद्वान साहेबाने एक ग्रंथ केला आहे. त्यांत तो लिहितो की, खरा वेदांती ह्या पृथ्वीत मिळणें कठीण, जर मिळाला तर तो वेडा असावा. (४) वेदांतमत मानिल्याने नीति–अनीति, बरे–वाईट, पाप–पुण्य यांचा भेद सोडून दिला पाहिजे. (५) त्यावरून ईश्वर आणि मनुष्य या उभयतांचा जो अनेकविध संबंध आहे तो राहात नाही. मनुष्ये परमेश्वरांची जी कर्तव्यकर्मे लागतात त्यांचा नाश होतो. म्हणजे परमेश्वरावर प्रीति करणे, त्याचा मान राखणे, त्याचे भय धरणे, व त्याच्या सर्व आज्ञा पाळण्याची व धर्म आचरण्याची बुद्धी नाहीशी होती. आणि मनुष्य आपल्याविषयी व दुसऱ्या विषयी जी कर्तव्ये करू लागतो त्यांचा नाश होतो. (६) सारांश, वेदांतात तारणोपाय नाही. पापाची क्षमा कशी होती, अंतकरणाची शुद्धी कशी होती, व ईश्वराकरवी कृपा मनुष्यावर कशी होती, तो मनुष्य ईश्वरापाशी जाण्यास कसा योग्य होतो, याविषयी त्यांत वास्तविक फलदायक उपाय नाही.

वेदांताबद्दलचा मिशनऱ्यांचा दृष्टीकोनच याप्रकारे बाबांनी पुत्राच्या मुखाने व्यक्तविला आहे. बाबांचे खंडनमंडन हे सर्वत्र याच प्रकारचे आहे. खंडन हिंदुधर्माच्या वाट्याला व मंडन ख्रिस्ती धर्मासाठी; यापेक्षा वेगळा प्रकार कुठे आढळत नाही.

### कृष्ण व ख्रिस्त यांची तुलना

येशू ख्रिस्त व श्रीकृष्ण यांची तुलना अशीच विस्ताराने केलेली आहे. येशू ख्रिस्ताने अवतार

का घेतला हे सांगताना बाबा लिहितात की येशूचा जन्म माणसाचे वरदान आहे. आज्ञाभंग, पापक्षमा व तारणाचे वचन यातून ख्रिस्ताने देवाचा पुत्र म्हणून, देवाचे गौरवार्थ, मनुष्याच विश्वासाचा नाश होऊ नये म्हणून, ज्ञानभक्तिरक्षणार्थ, पवित्रमंडळीस्थापनार्थ, येशूने अवतार घेतला. तात्पर्य मनुष्याच्या हातून जे होण्यासारखे नव्हते त्यासाठी ख्रिस्त अवतरल्याचे त्यांनी शास्त्रद्वारे सिद्ध केले. याच संदर्भात कृष्णावतार मात्र भृगूच्या, राधेच्या शापापासून झाल्याचे पुराणकथांवरून कसे दिसते याचे निंदाव्यंजक चित्र बाबा रेखाटतात. येशू ख्रिस्त श्रेष्ठ व कृष्ण कनिष्ठ दाखविण्याच्या हेतूने बाबांनी आपल्या लेखनाची सिद्धता केली आहे. पुराणे, शास्त्र-ग्रंथ, दंतकथा इत्यादीकांच्या आधाराने त्यांनी हा तुलनापाक तयार केला आहे. 'ख्रिस्ताच्या अवताराची सर्व कारणे संलग्न असून त्यांत ईश्वराची मनुष्यावरची प्रीति व दया ही दिसून येतात.कृष्णावतारात असे कांही आहे काय?' असा प्रश्न त्यांनी निष्पन्न केला आहे.

अशा प्रकारे बाबा पदमनजींनी हिंदुधर्मातील ईश्वरी अवतार कृष्ण व ख्रिस्ती धर्मातील देवाचा पुत्र येशू ख्रिस्त यांची तुलना करून दोन्ही धर्माविरील आपले भाष्य प्रकट केले आहे. अर्थात ख्रिस्ताचे श्रेष्ठत्व व ख्रिस्ती धर्मप्रचार हा अंतस्थ हेतू असल्याने कृष्णाचा अभ्यास सखोल किंवा संशोधन पद्धतीवर आधारित असा असण्याची अपेक्षा येथे बाळगणे चूक ठरेल. कृष्णाच्या अवतारातील उदात्तता, त्याचे राजकारण कौशल्य, मित्रत्व, त्याचे शौर्य, त्याचा निष्काम कर्मयोग, त्याचे भगिनीप्रेम, त्याचे अपौरुषत्व, त्याची अनासक्ती, त्याचे योगसामर्थ्य इ. अनन्यसाधारण अशा श्रीकृष्णाच्या गुणांकडे बाबांनी सोयीस्कर कानाडोळा केला आहे.

### ख्रिस्ती जिणे व हिंदू जिणे यांची तुलना

हिंदू माणसाचे जीवन व ख्रिस्ती माणसाचे जीवन ते जगण्याची पद्धति यामध्ये असणारी भिन्नता बाबांनी आपल्या उपरोक्त पुस्तकात मांडली आहे. दोन्ही माणसांच्या धार्मिक जीवन-क्रमातील फरक येथे दर्शविला आहे. 'हिंदुस्थानात इंग्रजी राज्यामुळे धार्मिक बाबतीत बऱ्याच सुधारणा झाल्या, ख्रिस्ती मंडळीत जग शिरल्याने (जगभर प्रसार झाल्याने) त्यांच्या जिण्यास बहुत कलंक लागले, शक्यतोवर निरपेक्ष दृष्टीने दोन्ही धर्मातील जिणे प्रस्तुत पुस्तकात वर्णन केले आहे' असे बाबांना वाटते. धर्म, ईश्वर, परलोक इ. विचाराने ख्रिस्ती जिणे सफल आहे असे त्यांचे म्हणणे आहे. इतर सर्व जिणे त्यांच्या दृष्टीने निष्फल आहे. श्रीगुरुवाचूनी सारे जिणे विफल होते. ख्रिस्तासारखा श्रीगुरु नाही व म्हणून त्याच्याशिवाय असणारे, ख्रिस्ती जिण्याशिवाय असणारे इतर सर्व जीवन विफल आहे, निष्फळ कसे आहे, हे बाबांना मुख्यत्वे-करून सांगावयाचे आहे.

### हिंदूधर्माचे स्वरूप

बाबा पदमनजींची प्रबंधात्मक विस्तृत रचना म्हणजे *हिंदुधर्माचे स्वरूप* हा ग्रंथ होय. हा ग्रंथ दोन भागात रचण्यात आला आहे. विद्यार्थीदशेपासूनच बाबांना हिंदुधर्मविषयक ग्रंथ गोळा करण्याचा नाद होता. *अरुणोदयात* यासंबंधी त्यांनी लिहिले आहे की,

मुंबईत हिंदुधर्मसंबंधी प्राकृत पुस्तकांची मला बरीच माहिती होत चालली. कोणतेही नवीन पुस्तक निघाले की, ते बहुधा मी घेत असे. ही पुस्तके विकणारे ब्राह्मण त्या दिवसात भुलेश्वराच्या देवळाच्या आवारांत दुकाने मांडून बसत असत. त्यापैकी एक वृद्ध ब्राह्मण (ब्रह्मपंथानुयायी रा. रा. आबाजी नवरंगे यांचे तीर्थरूप) माझ्या घरी भले मोठे गाठोडे घेऊन येत असत. बेळगावात जी पुस्तके माझ्या दृष्टीस पडली नाहीत ती तेथे मिळू लागल्यावरून मला फार आनंद होई. *तुकारामाचे अभंग*, *रामदासी श्लोक*, *मोरोपंती आर्या*, *भक्तलीलामृत*, *भक्तिविजय*, *गुरुचरित्र* इ. अनेक ग्रंथांचा मी संग्रह केला.[६]

विद्यार्थीदशेपासून हा जो ग्रंथसंग्रहाचा नाद होता तो त्यांना हिंदुधर्माचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी उपयोगी पडला. हे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी बाबांनी सर्वतऱ्हेच्या मूळ ग्रंथांचा व संदर्भ-ग्रंथांचा आधार घेतलेला आहे. वेदोपनिषदे, ब्राह्मणे, आरण्यके, दर्शनग्रंथ सूत्रग्रंथ व स्मृतिग्रंथ व इतिहास-पुराणे यातील विपुल संदर्भ बाबांनी हिंदुधर्मस्पष्टीकरणार्थ दिले आहेत. तसेच युरोपियन विद्वानांनी यासंबंधी केलेल्या ग्रंथरचनेचा भरपूर उपयोग करून घेतला आहे. आणि मराठीतून जे काही धर्मग्रंथांचे अनुवाद उपलब्ध होऊ शकले होते त्यांच्याही अवलोकनाची जोड देण्यात आली आहे. एवढ्या व्यापक रीतीने संदर्भ साहाय्य घेऊनही बाबांची भूमिका हिंदु-धर्मसंबंधांच्या मुरलेल्या अभ्यासकाची नव्हती हे लक्षात येते. कारण हे सर्व विवेचन यासंबंधी इतरांनी केलेल्या ग्रंथाच्या आधाराने बाबांना करावे लागते. एखाद्या शास्त्रीपंडिताला मूळ संस्कृत ग्रंथात जी गती असू शकते ती बाबांना नव्हती हे स्पष्टच आहे. म्हणूनच अशासारखे ग्रंथ काशीचे पंडित रे. नेहमया नीलकंठशास्त्री गोरे यांच्यासारख्या विद्वानांनी लिहिले असते तर त्यांची रचना उत्कृष्ट होऊन, उपयुक्तताही विशेष झाली असती याची जाणीव बाबांनाही आहे. दुसऱ्या भागाच्या प्रस्तावनेत ती त्यांनी स्पष्ट रीतीने नमूद केली आहे. केवळ ट्रॅक्ट सोसायटीने हे काम त्यांच्याकडे सोपविले म्हणून बाबा आपल्या सामर्थ्याप्रमाणे या ग्रंथाची जुळणी करतात व ख्रिस्ती धर्मप्रचारकाच्या भूमिकेवरून या ग्रंथाची मांडणी करतात. अर्थातच एकंदर ग्रंथाची मांडणी त्यांनी इतक्या विविधांगांनी सजविली आहे की, हिंदुधर्माचे स्वरूप स्पष्ट करणारा मराठीतील हा पहिलाच ग्रंथ आहे यात काही शंका राहात नाही. एतद्देशीय सुशिक्षितांना हिंदुधर्माचे स्वरूप ज्याप्रमाणे युरोपियनांच्या ग्रंथावरून समजावून घ्यावे लागले, त्याचप्रमाणे मराठी वाचकांना ते बाबांच्या ग्रंथावरून समजावून घेऊन त्यांच्याच पद्धतीने नंतरच्या काळात अनेक विद्वानांना जिद्दीने त्याचे स्वरूपाविष्करण मूलभूत स्वरूपात करण्याची प्रेरणा झाली हे ही तितकेच खरे. हिंदुधर्माची माहिती तटस्थ रूपाने व खऱ्या जिज्ञासेच्या पोटी यथातथ्य स्वरूपात द्यावी, हा बाबांचा उद्देश्य असणे शक्य नव्हते. बाबा कृष्ण, हिंदुधर्म, हिंदु जिणे, इत्यादी गोष्टींचा विचार ख्रिस्त, ख्रिस्ती धर्म, ख्रिस्ती जीणे यांच्या संदर्भात करतात ही गोष्ट लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. या पुस्तकाच्या प्रथम भागात हिंदुधर्म वेदशास्त्रे व पुराणे यात कसा दिसत आहे हे सांगितल्यावर ख्रिस्ती धर्म *बैबलात* कोणत्या प्रकारे दर्शविला आहे हे आपपरभावाने सांगितल्याखेरीज त्यांना राहावत नाही. ह्याच बेतास अनुसरून ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागात हिंदुधर्माचे आचार, कर्मे, भक्ती, इत्यादिकांमध्ये जे स्वरूप दिसते ते दाख-

विल्यानंतर ख्रिस्ती धर्माचे स्वरूप त्याच विषयाच्या संबंधाने कसे दिसते हे थोडक्यात ते सांगतात. पहिल्या भागाच्या उपसंहारामध्ये बाबा लिहितात,

आता कोणी म्हणतील की, जर आमच्या वाडवडिलांस वैदिक काळापासून सत्य सापडले नाही, तर यापुढे काय सापडणार? त्यापेक्षा जी वडिलांची रूढी चालत आलेली आहे तिजप्रमाणे चालावे म्हणजे झाले. हे म्हणणे निराधार व मनुष्यबुद्धिला लांछनादायक आहे. जगात सत्य नाही म्हणजे हे आकाशात सूर्य नाही म्हणण्यासारखे आहे. जसा मनुष्याच्या प्रपंचासाठी देवाने भौतिक सूर्य दिला आहे, तसा परमार्थासाठी त्याने दैविक सूर्यही दिला आहे. ज्याला ख्रिस्ती लोक *बैबल* किंवा पवित्र शास्त्र म्हणतात जे ते जो कोणी चित्त लावून व परमेश्वराचे सहाय्य मागून शोधून पाहिल त्याला खचित समजेल की तेंच केवळ खरे शास्त्र आहे. ह्या शास्त्राशिवयी ह्या पुस्तकात विस्ताराने सांगण्याचा आमचा उद्देश्य नाही. तर केवळ त्याच सत्यतेचा मुख्य प्रमाणांचे व सिद्धान्तांचे दिग्दर्शन मात्र करितो.

अशा प्रकारे बाबांनी हिंदुधर्मातील भक्ति व जिणे इत्यादी गोष्टींचा विचार ख्रिस्ती धर्मातील भक्ती व जिणे यांच्या तुलनेत केला आहे. ख्रिस्ती धर्ममाहात्म्य जनमनावर ठसविणे हे त्यांचे उद्दिष्ट त्यामुळे सफल होते.

हिंदूधर्माचे यथार्थ वर्णन करणे अशक्य आहे. इतकेच नव्हे तर ते करण्याचा प्रयत्न केला असता *महाभारता*एवढा ग्रंथ लिहावा लागेल या जाणिवेने बाबा संक्षेपाने वर्णन करतात व त्यामुळे फार मोठा विषय ते उडत्या मारीत लिहित असताना दिसतात. उदा. :

हिंदुधर्माचे मुख्य ग्रंथ वेद, दर्शने, धर्मशास्त्रे, इतिहास, पुराणे व तंत्रे हे आहेत. हे सर्व ग्रंथ मूळ संस्कृत भाषेत असून ते ईश्वरप्रणीत आहेत, असे हिंदुलोक समजतात. भागवतात असे सांगितले आहे की, व्यासाने वेद रचिले व त्याचे चार विभाग केले. नंतर त्यानेच इतिहास व पुराणे रचिली. त्यांस पाचवा वेद म्हणतात. त्याने वेद पैलास व इतरास दिले. इतिहास व पुराणे सूताचा पिता लोमहर्षण यास दिले, नंतर हे ग्रंथ स्त्रिया व शूद्र यास प्राप्त होणार नाहीत असा विचार करून त्याने भारत रचिले. नारदास भागवत रचावयाची मसलत दिली असा ग्रंथकारांचा उल्लेख करता येईल. वैदिक ग्रंथास श्रुती म्हणतात. ह्या पदांच्या पोटी मंत्र, ब्राह्मण, आरण्यके व उपनिषदे ह्या ग्रंथांचा समावेश होतो. वेदांचे (शिक्षा, व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्त व सूत्रे) व मन्वादी धर्मशास्त्रे यास स्मृती म्हणतात. *रामायण* व *महाभारत* यास इतिहास म्हणतात. त्यांच्या मागून पुराणे व तंत्रे झाली. ह्या सर्व ग्रंथात वेद फार प्राचीन आहेत. त्यांची रचना ख्रि. पू. १५००, १२०० ह्या काळात झाली असावी. पुराणाचा काळ ख्रि. स. १२००–१६०० पर्यंतचा आहे. प्राचीन हिंदु-मताप्रमाणे वेद अनादी आहेत. इ.

प्राचीन व अर्वाचीन हिंदुधर्माबाबत बाबा लिहितात,

प्राचीन काळी हिंदुलोकांचा वैदिक धर्म होता. म्हणजे वेदांत वर्णिलेले इंद्र, अग्नी, वरुण इ. देवतांची भक्ती ते यज्ञद्वारे करीत असत. अर्वाचीन काळच्या हिंदुधर्मात देव व देवी, अनेक

कर्मे, व्रते, उपवास व आचार वाढलेले आहेत. त्यात मूर्तिपूजा, ब्राह्मणांची व गाईची पूजा, जातिसंबंधी आचार, तीर्थयात्रा ही मुख्य आहेत.

ईश्वरप्राप्तीचे ज्ञान, योग, कर्म व भक्ती असे चार मार्ग हिंदुधर्मात मुख्य आहेत. त्यात श्रेष्ठ-कनिष्ठ असा भेद पण आहे. ईश्वरविषयक ज्ञानाला ब्रह्मज्ञान व ते शिकविण्यास ब्रह्मवाद म्हणतात. ज्ञानाचे बीज उपनिषदात तर विस्तार वेदान्तादि षड्दर्शनात आहे. विष्णूची उपासना करणारे वैष्णव, शिवाची उपासना करणारे शैवमत तर देवीची उपासना करणारे शाक्तमत आहे. हिंदुधर्मात अनेक सुधारणारे पंथ, तत्त्वविवेचक, धर्मोपदेशक झाले. पंथ, मठ, आश्रम, विविध आहेत. मूर्ति आहेत. मूर्तिपूजेतून पवित्र वस्तू, स्थळे, दिवस इ. ची निर्मिती झाली. पुण्यस्थाने, तीर्थक्षेत्रे, पर्वणी, सण, पुण्यतिथि इ. यातूनच निर्माण झाले. अनेक जन्म व पूर्वजन्मातले कर्मफळ माणसास भोगावे लागते. कर्मविषयक, मंत्रशास्त्र व त्यात जारण, मारण, उच्चाटन व भेदन असे प्रकार आहेत. याने शत्रुनाशन करता येते हा हिंदूचा समज आहे. तसेच पिशाच्चविद्या आहे. त्याद्वारे भूतप्रेत, पिशाच्च, ब्रह्मराक्षस इ. शी संबंध ठेवता येतो असे ते मानतात.

वेदांपासून इतिहासपुराणापर्यंतच्या वाटचालीचे वर्णन करताना बाबा जी मल्लीनाथी करतात, ती कशी एका विशिष्ट भूमिकेने सिद्ध झालेली असते हे पाहण्यासारखे आहे. वेदांचे ईश्वरप्रणीतत्व, अनादित्व प्रमाणाने सिद्ध करता येत नाही. वेदमंत्र प्राचीन आर्यऋषींनी रचलेल्या प्रार्थना होत. वेद त्यांनी जगाच्या कल्याणासाठी, दुसऱ्याच्या उपयोगासाठी रचलेले नाहीत. स्वतःच्या गरजा पूर्ण होण्यासाठी व क्षमायाचनार्थ केलेल्या त्या प्रार्थना व मंत्र आहेत. वेदांची अनेककाळी व अनेक प्रकारे उत्पत्ती झाली. एका असुराने ब्रह्मदेवाची चोरी करून वेद पळविले अशी कथा आहे. यज्ञाच्या उच्छिष्टापासून वेद झाले. *रामायण*, *भारत* व पुराणे यांनाही वेदाप्रमाणे ईश्वरप्रणीत असे म्हणतात. नंतर वेदमंत्रांनाच देवत्व दिले गेले. पुढे ब्राह्मणग्रंथांनी यज्ञादि क्रियांचा इतका पाल्हाळिक अर्थ केला की, त्याप्रमाणे प्रयोग चालविणे कठिण पडू लागले, म्हणून पुढे त्या ब्राह्मणाचा अर्थ समजण्याकरिता वेदांगे झाली. त्यात कल्पसूत्रे ही मोठ्या महत्त्वाची होऊन बसली. त्यांच्या अर्थाची पुढे भ्रांती पडू लागली. म्हणून त्यावर भाष्ये व टीका झाल्या. याप्रमाणे मूळच्या सुलभ, सरळ साध्या व घरगुती वेदमंत्रांवर काळाचे व अर्थवादाचे दाट धुके पडून त्याचे खरे स्वरूप झाकून गेले. वेदविक्रय करू नये व वेद लिहू देखील नयेत, म्हणजे त्याच्या प्रती करू नये याविषयी निषेध होऊ लागला. *भारतात* असे सांगितले आहे की जे वेदविक्रय करितात अथवा जे तो लिहितात ते नरकात जातात :

वेदविक्रयिणश्चैव वेदानां चैव लेखकाः ।
वेदानां दूषकाश्चैव ते वै निरयगामिनः ।।

याप्रमाणे वेदाच्या ठायी जी अंगभूत पूज्यता व योग्यता नव्हती ती ह्या ब्राह्मणग्रंथांनी व मन्वादि स्मृतींनी त्याला दिली. वेदांची निर्मिती आणि वेदांना आलेले अपौरुषत्व यांच्याबद्दलची बाबांची ही मांडणी खचितच शुद्ध व निर्मळ नाही, हे सांगावयास नकोच. सगळीकडे हाच प्रकार आहे.

वेदांतील देवताविचार, सृष्टयुत्पत्तिविचार यांच्याबद्दल लिहिताना साहजिकच बाबांना स्फुरण येते. त्यांना हा सगळा अडाण्याचा पोरकट कल्पनाविलास वाटतो. ते म्हणतात,

सृष्टीच्या उत्पत्तीविषयी हिंदूच्या शास्त्रकारांमध्ये जसे अज्ञान दिसून येते तसे दुसऱ्या कोणत्याच गोष्टीविषयी दिसत नाही. ईश्वराविषयीचे ज्ञान त्याच्या उत्पत्तीविषयक कृत्यावरून होते. अनाद्यनन्त शक्ती व देवत्व ही त्यात दिसून येतात. हिंदूधर्मशास्त्रकर्ते म्हणतात प्रजापतीला आपणच बहुत व्हावेसे वाटले. त्याने तप केले, त्याने कष्ट केले, तो आपणच जन्मला, तो द्विधा झाला, तो आपणच सृष्टी बनला, तो अंड्यात राहिला, तो स्वकीय सृष्टीला भ्याला, अशा प्रकारचे ब्राह्मणादि प्राचीन वैदिक ग्रंथातील वर्णन सर्वसमर्थ, सर्वज्ञ व सर्वज्ञानी सृष्टिकर्त्याला अगदी शोभत नाही. त्यापेक्षा ऋग्वेदात इंद्रादि देवांनी सृष्टी केली असे जे साधारण वर्णन आहे ते बरे म्हटले पाहिजे.

उपनिषदांची वेदविरुद्ध बंडाळी वर्णन करताना बाबा लिहितात,

ब्राह्मणग्रंथांनी जशी वेदमंत्रांच्या अर्थाची चिवडाचिवड केली तशी उपनिषदांनी वेद व ब्राह्मण यांची उघड निंदा केली. ज्या यज्ञाला भाविक आर्य ऋषींनी सत्यधर्माचा मार्ग, स्वर्गास जाण्याचा हेतू म्हणत व यज्ञशालेला ऋतसदन (सत्याचे घर) म्हणत त्या यज्ञापासून मोक्षप्राप्ती नाही असे ह्या उपनिषदांतील पंडितांनी ठरविले. विद्येचे परा व अपरा असे भेद केले. सच्छास्त्राची कित्येक लक्षणे वेदांत आढळत नाहीत. वेदांत सत्य व जिवंत परमेश्वराची भक्ती सांगितली नाही. अनेक देवांची भक्ती त्यांत आहे. सच्छास्त्राच्या द्वारे ईश्वर मनुष्याशी बोलतो. वेदात तसे काही दिसत नाही. ऋग्वेदात ऋषीच आपल्या उपास्य दैवतांची स्तुती करतात, प्रार्थना करतात, धावा करतात. गुणवर्णन निमंत्रण करतात. स्तोत्र, यज्ञप्रशंसा करतात. स्वकीय ज्ञान, बोध, सत्कर्मस्तुती, कुकर्म निषेध, अभिवचन, आशीर्वाद, स्वर्गाशा, नरकभय इ. वेदमंत्रद्वारे ईश्वराने काही प्रकट केले नाही. पाप्याचा मार्गदर्शक कोण, तारणारा कोण, जगाची दुरवस्था कशी जाईल इ. यांत नाहीत मग वेद ईश्वराचे प्रगटविणे कसे? वैदिक व पौराणिक परलोकाचे वर्णन, परंपरागत कथा व संप्रदाय भिन्न भिन्न आढळतात. वैदिक ग्रंथातील स्वर्ग, नरक, मनुष्याची मरणोत्तर स्थिती इ. पारलौकिक गोष्टींची माहिती पुराणातील माहितीपेक्षा निराळी आहे. वैदिकधर्माला आधार परंपरागत चालत आलेल्या दंतकथा व वडिलांचे सांप्रदाय हेच होत. दंतकथा व सांप्रदायात पराचा कावळा व रजाचा गज होतो. उदाहरणार्थ वैदिक त्रिविक्रमाच्या बीजरूप कथेपासून वामनावताररूप महावृक्ष झाला. 'दुर्गाणि' ह्या एका वैदिक शब्दापासून दुर्गादेवी उत्पन्न झाली. तात्पर्य वेदांतील सांप्रदाय ब्राह्मणात व ब्राह्मणांतील पुराणांत बदलले. सूत्र, शाखा, गोत्रे व जाती, कुलाचार व देशाचार व रूढी यांच्या संबंधाने हिंदुलोकांच्या धर्मकर्मामध्ये अनेक भेद पडून तेच शास्त्र होऊन बसले आहेत. ब्रह्म व ब्रह्मा (स्तोत्र व स्तोत्रकर्ता) ह्या शब्दांचे अर्थ बदलून ब्रह्मदेव हा एक नवाच देव त्यापासून तयार झाला. नंतर ब्रह्मपुराणपण रचले गेले. ब्रह्मदेवाची भक्ती फार काळ चालली नाही. ती जी एकदा बुडाली ती पुनः वर आलीच नाही. ख्रिस्ती शास्त्रात एक असे भविष्य आहे की,

ज्या देवांनी आकाशे व पृथ्वी केली नाहीत ते पृथ्वीवरून व या आकाशाखालून नष्ट होतील.
(ईर्मया १०.११) त्याप्रमाणे मिथ्या सृष्टिकर्ता नष्ट झाला. असेच दुसरेही होतील.
बाबांनी ब्रह्मदेवाची विल्हेवाट अशी लावली.

त्रिमूर्तीविषयी बाबा लिहितात,

त्रिमूर्तीच्या उत्पत्तीविषयी काहीच संगतवार वृत्तांत सापडत नाही. ब्रह्मा, विष्णु, शिव हे परब्रह्मापासून झाले असे सांगितले असून ते त्याचे तीन गुण आहेत असेही म्हटले आहे. आणखी शिवापासून विष्णु, विष्णूपासून शिव व ब्रह्मा झाला आणि ब्रह्मदेवापासून शिव झाला असेही सापडते. एका शैव पुराणात तर ब्रह्मा शिवविष्णूच्या संयोगापासून झाला असे सांगितले आहे, आणि उमेला विचारले असता ती म्हणते की, ब्रह्मा, विष्णु, शिव ही माझी बाळे आहेत व मीच सर्वांची आदिमाता.

ह्या देवांचे उपासक जेव्हा त्यांची स्तुती करतात तेव्हा ते त्यास त्यांच्या बरोबरीच्या देवांस अत्यंत नीच समजतात. म्हणजे शिवाचा उपासक विष्णूला कनिष्ठ समजतो तर विष्णूचा उपासक शिवाला कनिष्ट समजतो. वैदिक उपासक आपल्याला देवास श्रेष्ठ मानीत पण पुराणात दुसऱ्याच्या देवास नीचत्व देण्याचा खटाटोप आहे. त्रिमुर्तीतील प्रत्येक देव सृष्टि-उत्पादक होता पण प्रत्येकाचा सृष्टीयुत्पत्तीक्रम भिन्न भिन्न आहे. कोणी प्राणी कानातून निघे, तर कोणी केशातून निघे, कोणी अंगुष्ठातून. अशी त्यांची सृष्टयुत्पत्ति कार्ये. अशा सृष्टी-वरून सृष्टिकर्त्याचे स्वकीय गौरव तर प्रगट झाले नाही. उलट त्याचे दौर्बल्य दिसून आले. या देवांनी दिलेल्या वराच्या जोरावर याच दानवांनी बंडाळी माजविल्या. देवांना सतावले. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी अनेक अवतार देवांना धारण करावे लागले. अवतारामागून अवतार, युद्धावर युद्धे, केवळ पृथ्वीवरच नाही तर स्वर्ग व पाताळ यांतही ही युद्धे चालत. अनेक जन्म व देहांतर यासाठी देवास घ्यावयास लागत. इतकेच नाही तर युग, मन्वंतर, कल्प यांचे हे रहाटगाडगे निरंतर चालू आहे असे कथा रचणारांनी लिहून ठेवले मनुष्य तर लक्ष चौऱ्यांशी योनीतून फिरतो अशी धारणा आहे. वैदिक काळात तपोबल दीर्घ तपस्येतून प्राप्त नव्हते. हजारो वर्षे तप करणारांचे आयुष्य किती वर्षांचे असेल. तपाचरणाचा हेतू देखील विचारात घेताना देव दिसत नाही. तपाचरणानंतर वरदान हे अनिवार्य झाले. बाबा उप-रोधाने लिहितात,

ईश्वराने दिलेले हस्तपादादि अवयव व बुद्धि ही त्याच्या सेवेस व मनुष्याच्या कल्याणार्थ सत्कर्मी खर्चण्याबद्दल अजगर वृत्ती धारण करून हजारो वर्षे तो तपात आपले आयुष्य व्यर्थ घालवितो अथवा स्वार्थीबुद्धिने व नीच हेतूने व्रते आचरितो, त्याला ईश्वर प्रसन्न होईल काय?

'प्राचीन काळातील कांही तपस्वी असे खरखरमुंडे फकीराप्रमाणे आढळतात' असा शेरा जाता जाता बाबा मारतात.

हिंदुधर्मातील अवतारांच्या संदर्भात त्यांचे म्हणणे असे आहे की,

अवताराची कारणे पाहू गेले असता जगास पापापासून तारण्याकरिता म्हणून एकही

अवतार झाला नाही. विष्णूचे अवतार ब्रह्मशापामुळे झाले असे असता तो धर्मरक्षणार्थ आला होता असेही मानले आहे. वैदिक देव पृथ्वीवर येऊन मनुष्यरूपाने दीर्घकाळ रहात नसत. परंतु रामकृष्णादि अवतार बहुत वर्षे जगात राज्य व विलास करीत राहिले हे कसे? दहा अवतारांतून कोणता अवतार पाप्यास तारावयास आला होता?

हा अखेरचा सवाल त्यांनी केला. हा अखेरचा सवाल बाबांच्या मनाचे दर्शन घडविण्यास पुरेसा आहे. हिंदुधर्म, देव, ग्रंथ, अवतार, भक्ती यांकडे ख्रिस्त व ख्रिस्ती धर्म यांच्या तुलनेतूनच ते पाहू शकतात. त्रिमूर्तीच्या आचरणाविषयी लोकात असलेल्या समज-गैरसमजाचा जो उहापोह बाबा करितात तोही याच प्रकारचा आहे. ब्रह्मदेवाचे कन्यागमन, कृष्णाच्या व्यभिचाराच्या कथा, ब्रह्मदेवाने कपट करून कुंभकर्णास व विष्णूने बलीस व इतर असुरास फसविणे, शिवाला पार्वतीनेच वंचक म्हणणे, काशिखंडाच्या सातव्या अध्यायातील ऋषी व देव मदनपाशात कसकसे अडकले याचे साद्यंत वर्णन, कृष्णाची रासक्रीडा इत्यादिकांवर बाबा आवेशाने तुटून पडले आहेत.

देवादिकांची अवतारकृत्ये हा जसा बाबांच्या उपहासाचा विषय होतो, तसेच त्याहीपेक्षा मोठ्या प्रमाणात ते ब्राह्मण व त्यांची मंत्रतंत्रादि विद्या यांचा विलक्षण उपहास करतात. लोकहितवादींसारख्या सुधारकांनी चाळीस वर्षांपूर्वी या प्रथेला सुरुवात केली होती, ती ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या चांगलीच पथ्यावर पडते आणि तिचा ते उपयोग करून घेतात. हिंदुधर्मात ब्राह्मण व मंत्र यांनी युगानुयुगे मनुष्यावर सत्ता कशी गाजविली याचे बाबा विस्ताराने वर्णन करतात.

जसे सर्व ग्रह सूर्याच्या भोवती फिरतात व त्याकडून आकर्षित आहेत, त्याप्रमाणे सर्व काही देव, मनुष्य, स्वर्ग, नरक, कर्म, धर्म, शास्त्र, रूढी, पाप, पुण्य ही ब्राह्मणरूप सूर्याने आकर्षित आहेत, ती त्यास प्रदक्षिणा घालतात, व त्याच्याच तेजाने प्रकाशतात.

हे त्यांचे वाक्य त्यांच्या विवेचनाचे सार स्पष्ट करून जाते.

ब्राह्मणांप्रमाणेच मंत्रविधीबद्दल बाबा म्हणतात,

हिंदुधर्मात ब्राह्मणांसारखाच एक महापराक्रमी देव उत्पन्न झाला त्याचे नाव मंत्र होय. तत्वज्ञानी लोक प्रथम वेदांतील मंत्रासच देव मानीत असत. पण नंतर मंत्रावाचून कोणतेही धर्मकार्य चालेनासे झाले. जितकी कर्मे तितके मंत्र झाले. व्रते, उपवास, देव, देवपूजा, मूर्तितदेवत्व, पीडानाश इतकेच नव्हे तर रिद्धीसिद्धि मंत्राने प्राप्त होऊ लागल्या. लग्नात तर सर्व कर्मास मंत्र, पदोपदी मंत्र आले. जसा वायू सर्वत्र संचार करीत आहे तसा मंत्र हिंदूलोकांच्या सर्व संसारात व शरिरात व जीवात्म्यात संचरला इतकेच नाही तर मनुष्य मेल्यावर त्याची जी रक्षा होते तीत देखील तो शिरला. त्याच्या अस्थीही त्याने सोडल्या नाहीत.

जगाचा नाश करण्यासाठी शंकराने षड्दर्शनातील अंधकाराची मते स्वतः शिकविली असे पद्मपुराणाच्या एका उताऱ्यावरून स्पष्ट होत असल्याचे बाबा निदर्शनास आणतात. *भगवद्गीता* व *अनुगीता* यांचा तुलनात्मक विचार विस्तृत व भेदक आहे. *अनुगीते*चा कृष्ण हा लबाड

ब्राह्मणांचा कृष्ण आहे, हे बाबांनी दाखविले आहे. शाक्तपंथ, त्यातला वामाचार ही तर मिशनऱ्यांच्या हल्ल्याची मोक्याची ठिकाणे. बाबांनी या विषयावर तोफा डागल्या आहेत. हिंदुधर्माच्या स्वरूपाचे विवेचन करताना बाबा बौद्ध व जैन धर्मावर पण घसरले आहेत. ते लिहितात,

वास्तविक पाहता हे दोन्ही धर्म निव्वळ नास्तिक आहेत. त्यास धर्म ही संज्ञा शोभते तर व्यभिचारिणीस पतिव्रता का म्हणू नये? पण हा सर्व प्रताप ब्राह्मणधर्माचा होय. ब्राह्मण व क्षत्रिय ह्या वर्गातील कित्येक विचारी पुरुषांनी आपला धर्म निकृष्टावस्थेस पोचलेला पाहून त्याची सुधारणा करण्यासाठी म्हणून जे प्रयत्न स्वबुद्धिवर अवलंबून केले त्याचे हे फळ त्यांनी मानवी स्वभावाचे वाटोळे व मनुष्य जिण्याचे मातेरे करून सोडले. जर हे पुरुष नम्रतेने ईश्वराची प्रार्थना करून त्यापासून सुबुद्धी मागते तर हा दुष्परिणाम झाला नसता. परमेश्वर ज्ञान देतो, त्याच्या मुखातून विद्या व विवेक येतात. जर कोणी ज्ञानाविषयी उणा आहे, तर देव सर्वांस उदारपणे देतो व दोष लावीत नाही, त्यापाशी त्याने मागावे, म्हणजे त्याला मिळेल, तू आपल्या सर्व हृदयाने भाव ठेव, आपल्या विवेकाचा भरवसा धरू नको. ही ईश्वरी शास्त्रवचने सर्व धर्मसुधारकांनी मंत्रांत बाळगून त्याप्रमाणे वागावे.

ग्रंथाच्या पहिल्या भागाच्या शेवटी बाबा पुन्हा एकदा सारांशरूपाने लिहितात की,

वैदिक ऋषिींनी यज्ञ हाच सत्यधर्म आहे असे समजून तो चालविला, त्याच्या मागून ब्राह्मणग्रंथकारांनी यज्ञविधीची पद्धत लावण्याच्या व अर्थ करण्याच्या निमित्ताने कर्मकांड माजविले. उपनिषदकारांस कर्मकांड पसंत पडले नाही, म्हणून त्यांनी ब्रह्मविद्या काढली. ती षटदर्शनकारांनी ब्रह्म, जीव, माया व अज्ञान यांच्या अढीत घालून इतकी परिपक्व केली की तिचा रस होऊन ती गळू लागली, आणि जरी कित्येक पंडितांनी तो रस प्राशन केला व साधारण लोक त्याच्या वासाला मात्र भुलले, तरी पंडित व प्राकृत जन ह्या उभयतांची त्याकडून तृप्ती झाली नाही. पंडितजन त्याच्या गुंगीत तल्लीन झाले व प्राकृतजन कर्ममार्गाच्या खटपटीस लागले असता अनेक जन्मांच्या फेंऱ्यांत पडण्याचे भयाने व्याकुळ झाले आहेत. अशा प्रकारचा ब्रह्मघोटाळा कित्येक सुज्ञ व विचारी हिंदू साधुसंतांच्या ध्यानी येऊन चुकला होता. रामदासांनी आपल्या *दासबोध* नामक ग्रंथी त्याचे येणेप्रमाणे यथार्थ व खेदयुक्त वर्णन केले आहे :

देव झाले उदंड। देवांचे मांडिले बंड।
भूतां देवतांचे थोतांड। एकचि जाहले ॥
मुख्य देव तो कळेना। कशास काहीच मिळेना।
एकास एक वळेना। अनावर ॥
शास्त्रांचा भरला बाजार। देवांचा गलबला झाला।
लोक कामनेच्या व्रताला। झोंबोन पडती ॥
मतामतांचा गलबला। कोणी पुसेना कोणाला। जो जें मतीं सापडला।

तयासि तेचि थोर ॥
असत्याचा साभिमान । तेणें पाविजे पतन ।
म्हणोनिया ज्ञातेजन । सत्य शोधिती ॥

*दासबोध*–११.२ २०–२६

अशा प्रकारे बाबांनी हिंदूधर्माचे स्वरूप वर्णन करताना त्याचे ख्रिस्ती धर्मियांस कसे स्वरूप दिसेल हे कथन केले आहे. ख्रिस्ती धर्मियांना अनुकूल ठरणारी रामदासांची, तुकारामाची वचने ते सहसा टाळीत नाहीत. त्यांचा उपयोग करून घेतात. त्यानंतर बाबांनी त्याच पुस्तकात ख्रिस्ती धर्माचे स्वरूप, ख्रिस्ती शास्त्र, त्यातील सत्यतेची मुख्य प्रमाणे घेऊन स्पष्ट केले आहे. ख्रिस्ती शास्त्रातील भविष्ये खरी ठरली, त्यात सत्य आहे, देव एकच त्याचे ऐक्य-स्वरूप परमेश्वराने स्वेच्छेने शून्यातून सृष्ट्युत्पत्ती केली, मनुष्याच्या तारणासाठी प्रभूने आपला येकुलता एक पुत्र दिला, मनुष्य पापी आहे, येशू प्रभूचा मनुष्यवातार आहे, तो माणसासाठी मेला व पुन्हा आला, हा धर्म सर्व मनुष्यास सांगावा व विश्वासूस बाप्तिस्मा द्यावा असे पुनः पुनः बाबा लिहितात. याविषयीच्या पुनरुक्तीचा त्यांना कंटाळा नाही.

हिंदूधर्माचे स्वरूप वेदशास्त्रपुराणादी ग्रंथांवरून कसे दिसते ते बाबांनी 'हिंदूधर्माचे स्वरूपा'-च्या प्रथम भागात स्पष्ट केले. हिंदूधर्माचे स्वरूप लोकाचारात कसे दिसते याचा विचार त्यांनी दुसऱ्या भागात केला. या पुस्तकात एकूण आठ खंड आहेत. पहिल्या खंडात जातिभेदाचा सविस्तर विचार केला आहे. बाबा लिहितात,

> हिंदू लोकांस सांप्रत काळी ज्या जाती आहेत त्यांच्या उत्पत्तीविषयी प्राचीन वेदांत काही सापडत नाही, कारण वैदिक काळातील लोक जातिभेद मानीत नसत.

जात्युत्पत्तीसंबंधीच्या मतामताच्या गलबल्याचा बाबा उल्लेख करतात,

> वेदांत जातीची उत्पत्ती संगतवार नाही. ब्राह्मण देवांपासून तर शूद्र असूरांपासून झाले असे एका ब्राह्मणात म्हटले आहे. दुसऱ्यात म्हटले आहे की मनुष्य व पशू हे सर्व प्रजापती-पासून झाले. पुराणात जाती उत्पत्ती ब्रह्मदेवापासून झाल्याचे म्हटले आहे. ब्रह्मदेवा-पासून ज्या चार जाती झाल्या त्या आरंभी शुद्धांतःकरण असून त्यांच्या ठायी हरि वास करीत होता.

असे एका पुराणात आहे मग शूद्रास कर्मसंबंधी अनाधिकार मन्वादि शास्त्रात कसा सांगितला? ज्याच्या अंगी देवाचा अंश वास करितो तो नीच कसा? जेव्हा मनुष्य पापी झाला तेव्हा ब्राह्मणही पापी झाले. मग ब्राह्मणांस विशेषाधिकार का? असे प्रश्न निष्पन्न करून 'याचा दोष वर्णव्यवस्था करणाराकडे येतो' असा निष्कर्ष काढतात. रोटीबेटीबंदी, व्यवहारबंदी इत्यादी बंधनांमुळे संकर कसे झाले, त्यातूनच अनुलोम, प्रतिलोम संतती कशी आली, आणि तरीही जात्याभिमानामुळे त्यातून जातीजातीची पुराणे हवी तशी कशी झाली व सोवळे ओवळे, नाम टिळे, गोसावी, बैरागी यातून कसे निर्माण झाले, याचे एक अस्वस्थ करणारे चित्र बाबा उभे करतात.

जातिभेदाचा परिणाम काय तर जाती पाळावी ही ईश्वराज्ञा मानणे हा होय. त्यामुळे विषमतेचे बीज पेरले गेले. ब्राह्मण नीतिभ्रष्ट असूनही जातिभ्रष्ट होत नाही. तो जातिभ्रष्ट होताच त्यास देहांत प्रायश्चित्त आहे. नित्यकर्म हे त्याचे संतोषाचे कारण झाले. सूक्ष्मपणे पाहता ब्राह्मणाची नित्यकर्मे वेदविरूद्ध आहेत. क्षूद्र जीवजंतूच्या मरणपापक्षालनार्थ महायज्ञ हे कर्म आले. पण वेदोक्तयज्ञात तर मोठमोठे पशू मारीत असत. यज्ञ द्विजाशिवाय करू नये असे पण समजतात. शूद्राने पशुहत्या केल्यास हिंसेचे पाप नाही. ब्राह्मणास मात्र पशूहत्येचे पण पाप लागते हे कसे? असा प्रश्न साहजिकच निर्माण केला जातो. ह्या जातीच्या आचारांच्या योगाने अंतःकरणाच्या शुद्धतेच्या जागी देहाचे सोवळे येऊन बसले आहे. स्नान करून धूतवस्त्र किंवा रेशमी वस्त्र परिधान केले व शरीरास भस्म, गोपीचंदन इत्यादिकांचा लेप दिला की झाला मनुष्य देवपुजेस योग्य. मग त्याच्या मनांत कामक्रोधांचे उमाळे आले तरी त्याला विटाळ होत नाही. पण जर का मळीण चिंधीवर त्याचा पाय पडला अथवा ओवळ्या मनुष्याचा अथवा परजातीच्या पाण्याचा शितोडा त्याचवर उडाला तर मात्र ही योग्यता त्याच्यातून तत्क्षणीच बिजलीसारखी निघून जाते, अशी मल्लीनाथी केली जाते.

या जातींना कर्मवादाने कसे ग्रासले आहे हेही ओघाने सांगणे आलेच. वास्तविक कर्मे गणावरून वा आवडीवरून ठरवायाची. परंतु तसे न ठरविता ती जातीच्या उच्चनीचतेवरून ठरविली गेली असे बाबांना वाटते. कर्मविपाकाने लोकांच्या बुद्धी, आचार, विचार, मन व शरीर यास दुर्बलत्व आले. देशास दारिद्रय आले. उपाध्ये व भटभिक्षुक आळशी, अज्ञानी, वृथाभिमानी, दुर्गुणी व द्रव्यलोभी झाले. गोरगरीब नाडवले गेले. दया, करूणा, परहितेच्छा इ. सद्गुण मातीमोल झाले. कर्माचरणाने धनधान्य, पुत्रपौत्र, पशु, आरोग्यप्राप्ती व पुण्यलाभ होतो या भटाब्राह्मणांच्या सांगण्यावर बाबा उपरोधात्मक टीका लिहितात,

> ह्या कर्मापासून उत्पन्न होणारे पुण्य मेरूसारखे आहे असे ब्राह्मण सांगतात, पण हा मेरू गुडगुडीच्या मेरूप्रमाणे पोकळ आहे. त्यात जो धूर असतो तो उत्पन्न करण्यास चिलमीत वरचेवर तंबाखू व विस्तव घालावा लागतो, त्याचप्रमाणे हे पुण्य जोपर्यंत ब्राह्मणाच्या हातात दक्षिणा व पदरात दाने पडत राहतील तोपर्यंत मात्र उत्पन्न होत असते, आणि शेवटी ते धुराप्रमाणेच क्षय पावते.
>
> तसेच ह्या पुण्याची भट्टी उतरण्यास तिथी, वार, नक्षत्रे, घटका, पळे इ. चा योग साधला पाहिजे. सर्व कर्मे ब्राह्मणांनी बनविलेल्या संस्कृत भाषेच्या पूजापद्धतरूप मुसीत घातली पाहिजेत, आणि अगटीतील विस्तव ब्रह्ममुखातील मंत्ररूप फुंकराने पेटविली पाहिजेत. त्याला इतरांच्या मुखाचा अशुद्ध वायू लागता कामा नये. इतकी सिद्धता व साहित्य मिळाले की पुण्याची भट्टी उतरलीच. अग्नी चेतविण्यास जसा पारा पाहिजे तशी इंधनेही पाहिजेत. कर्मे, व्रते, अनुष्ठाने, पूजा, महापूजा, इ. चालविण्यास यजमानापाशी धान्य, वस्त्रे, पात्रे, इ. अनेक इंधने असली पाहिजेत. ती यथास्थित असली व त्या सर्वांवर दक्षिणारूप घृताची मोठी धार धरली म्हणजे ब्रह्ममुखातून मंत्र व आशीर्वादरूप वायू मोठ्या सुसाटचाने वाहू लागतो व पुण्याच्या भट्टीतील आग खूप भडकते. सर्व कर्मांत दक्षिणा मुख्य

आहे. 'तस्मात सर्वप्रयत्नेन प्रधाना दक्षिणा स्मृता . . .' (*मत्स्यपुराण* २३९.१४) याप्रकारे पुण्यसंचय सदाचरणाने होत नाही तर व्रतवैकल्य, विधिनिषेध, कर्मविपाक व कर्मकांड इ. नी होतो. त्यात दुर्वर्तनी असला व दक्षिणा दान दिले तर पुण्य मिळणारच. कर्मकर्दमात हिंदूसमाज पुरा अडकल्याचे ते स्पष्ट करतात. ईश्वरी कृपा, आचरण, अंत:करणशुद्धी व पापक्षमा व अपराधाबद्दल पश्चाताप यांचा काही विचार हिंदूधर्मात प्राधान्याने नाही असा बाबांचा सूर आहे. कर्मकांड हे ब्राह्मणाचे अक्षयवतन व अपारधन आहे, हा विचार ते मांडतात.

त्यानंतर हिंदूधर्मातील सोळा संस्कारांचा विचार बाबांनी मांडला आहे. सुज्ञ व विचारी पुरुष कर्ममार्गाचा कंटाळा करतात. पण अज्ञ माणसांना मात्र ह्या संस्कारांनी व कर्ममार्गाने ग्रासले आहे. पूर्वी व्यवहार व परमार्थ साधण्यासाठी सम्यक् आचार होते. वेदात विवाहादि १६ संस्कार आहेत. ह्या संस्कारांनी विद्या, कला, कौशल्य यात निपुण, निरोगी, सतेज व दीर्घायू असे आर्यांचे स्वरूप बनवले होते. पण हळूहळू संस्कारात लोकहितापेक्षा आत्महित आले, त्याचे स्वल्प व साधे रूप जाऊन त्यात विपुलता, काठिण्य आले व त्यामुळे अज्ञान, धर्म व कर्मभ्रष्टता आली. पुरोहित व यजमान या संज्ञा जाऊन भटकी आली, भिक्षुकी आली. धर्मसिंधू व निर्णयसिंधू आले. संस्कार उपजीविकेचे साधन झाले. यजमानाची श्रद्धा संपली.

श्राद्ध व तदनुषंगिक संस्कारांचे बाबांनी वाभाडे काढले आहेत. श्राद्धाचे दृश्यफल ब्राह्मणास मिळते. मृताला सद्‌गती मिळावी म्हणून त्याच्या गोत्रजांनी येथे कर्मे करावयाची तर मृत जिवंत असताना त्याने केलेले पुण्य, तीर्थयात्रा, ब्राह्मणभोजने, जप, अनुष्ठाने इत्यादींचे काय झाले? श्राद्ध व प्रेतकर्मे याचा मेळ प्राचीन वैदिक धर्मशास्त्रातही लागत नाही. तेव्हा कर्मे भटाब्राह्मणांनी स्वार्थासाठी निर्माण केली, हे निश्चित. हा बाबांचा ठाम निष्कर्ष.

भक्तिमार्ग व मूर्तिपूजा यांचा प्रपंच बाबांनी विस्तारपूर्वक मांडला आहे. मूर्तिपूजा ही हिंदुधर्माची त्वचा आहे. आणि जशी त्वचा काढली असता मनुष्याची तळमळ होईल तसे हिंदुधर्मातून मूर्तिपूजा काढली असता त्या धर्माचे होईल. निराकार परमेश्वराची मूर्ती होऊ शकत नाही. तसेच मूर्तीचे उपचार मूर्खपणाचे द्योतक आहे. मंत्राने मूर्तीत प्राण व देवत्व कसे येणार? मूर्ती स्वसंरक्षण करू शकत नाही तर भक्त रक्षण कसे करणार? आवाहन, प्रतिष्ठापन, पूजनअर्चन, नैवेद्यसमर्पण, धूप-दीप, आरती वगैरे उपचार व शेवटी मूर्तीचे विसर्जन चालीत खरोखर काही अर्थ आहे काय? कोणताही विचार, सुज्ञपणा मूर्तिपूजेत नाही. जशी मुले आपल्या बाहुल्यांशी खेळतात तशीच माणसे मूर्तीशी खेळतात. बाबा लिहितात,

> मूर्तिपूजक आपल्या देवांच्या मूर्तीशी पूजेच्या योगाने खेळतात. देवाला निजवणे, उठवणे, स्नान घालणे, त्याला भूकतहान लागते असे समजून नैवेद्य दाखविणे, त्याला खारीक-खोबरे, पानसुपारी वाहणे, त्याला गरमी होते म्हणून वारा घालणे, त्याला रोग होतो म्हणून औषध देणे, त्याचे लग्न लावणे, त्याची वरात काढणे, तो बाटला असे मानून त्याला प्रायश्चित देणे, फुटला म्हणून बाजारात नेऊन विकणे, त्याला गहाण ठेवणे, त्याच्यावर कर्ज काढणे, त्याला पाण्यात टाकणे, रानात लावून देणे, हे सर्व प्रकार बाहुलाबाहुलीच्या खेळाप्रमाणे नव्हेत तर कशाप्रमाणे आहेत? देवाला बदाम, खारीक, मनुका, खोबरे, गूळ ह्यापेक्षा दुसरे काही

उत्तम अर्पण मनुष्यापाशी नाही काय? परमेश्वर आम्हापाशी काय मागतो ते ऐका. 'हे मनुष्या, जे उत्तम ते त्याने कळवले आहे, न्यायाने वर्तणे, दया व प्रीती करणे, व आपल्या देवाशी नम्रतेने वर्तणे यावाचून परमेश्वर तुजपाशी काय मागतो?'

बाबांनी यापुढे गुरुभक्ती, तीर्थयात्रा आणि जत्रा यांचा विचार केला आहे. बाबा लिहतात, हिंदु समाजाचे हे जे अंग पाहावे ते इतके विशाल आहे की त्याच्या समोर उभे राहिल्याने त्याची इतर अंगे अगदी लोपून जातात. जप, तप, स्नान, दान, संध्या, होम, देवतार्चन, व्रते व उपवास ही जरी पापहारक व मोक्षदायक मानली आहेत तरी ती सर्व करूनही आणखी काही तरी पाहिजेच. ते काय तर गुरुभक्ती, ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व तर प्राचीन काळापासून आहेच. त्यात वेद जाणता ब्राह्मण श्रेष्ठ हेही मन्वादि शास्त्रांत आहे. परंतु त्याच्या तेवढ्या श्रेष्ठत्वाने लोकांची तृप्ती झाली नाही. तसेच गायत्री मंत्रही मोक्षदायक मानिला आहे. तरी त्याच्या जपापासून विशेष फायदा होत नाही म्हणून एखाद्या अवतारी देवाचे नाव जपण्याचा उपाय निघाला. नामाचे महात्म्य तर साधुसंतांनी वर्णिले आहे. परंतु ते नाम जपण्याच्या पूर्वी गुरुमुखाने शिष्याच्या कानात फुंकले पाहिजे. त्यावाचून ते फलदायी होत नाही असे मत निघाले. बरे गुरुने एकदा उपदेश दिल्यावर मग कार्यसिद्धी होते असे म्हणावे तर तसेही नाही. जसा सूर्याच्या मागे राहू लागला आहे तसा हा गुरु जन्मभर शिष्यांच्या मागे आहेच. नामापेक्षा गुरु श्रेष्ठ. त्याला आत्मसमर्पण केले पाहिजे.

यानंतर बाबांनी गुरुगीता, गुरुचरित्र इ. ग्रंथांचा उल्लेख केला आहे. हिंदुधर्मात गुरुभक्तीचे स्तोम फार. वेद पावित्र्य व प्रामाण्य त्याला आले. गुरु देवांचा देव, तो देवांपेक्षा श्रेष्ठ ठरला. गुरुसेवेची प्रतिपादक मते व विविध पंथ अस्तित्वात आले. गुरुदर्शन, त्याची गर्दी, चेंगराचेंगरी इत्यादीचे वर्णन बाबा पुढे करतात. वाणी ,लोहाणी, मुलतानी इत्यादी गरुभक्त दिसतात. अशी गुरुभक्ती व गुरुमाहात्म्य हिंदूंत सर्वत्र आहे.

त्यानंतर तीर्थयात्रा विचार करताना ते लिहितात, 'धावा घेऊन तीर्थाजाती प्राणी बापुडे कष्टी होती. देवासी नेणता . . .' असे असूनही भरतखंडात तीर्थे अगणित आहेत. तीर्थ-माहात्म्य वर्णन करणाऱ्या पोथ्या आहेत. लौकिक दृष्टचा पाहिले असता गुरुभक्तीपेक्षा तीर्थ-यात्रेपासून अनेक दुःखे, कष्ट, हाल, भोग, पटक्या, अनाचार, अनीती व दारिद्रय ही उत्पन्न होतात. ती तरी बंद करण्याची शक्ती या गुरूभक्ती स्थापकांच्या ठायी आहे काय? प्रतिवर्षी हजारो व लाखो लोक काशी, प्रयाग, नासिक, पंढरपूर इत्यादी ठिकाणी जाताच आहेत. तीर्थांचे माहात्म्य वाढविण्याकरिता ज्या माहात्म्ये नावाच्या चोपड्या लिहिल्या आहेत त्यात एका तीर्थापेक्षा दुसऱ्याचे श्रेष्ठत्व विशेष आहे असे दाखविण्याची पराकाष्टा केलेली असते. उदा. आयोध्या माहात्म्यात असे सांगितले आहे की आयोध्या तीर्थक्षेत्राचे श्रेष्ठत्व स्थापण्या-करिताच रामावतार झाला. गोकर्णात गोकर्णाविषयी असे म्हटले आहे की, 'गोकर्णंच महाकाशी विश्वनाथो महाबलः—कोटीतीर्थच गंगायः सामुद्रधिकं फलं,' अनेक गुरुभक्त तीर्थाटन न चुकता करतात. गुरु स्वतःही तीर्थयात्रा करतात. 'मनसंकल्पाची पापे न जाती तीर्थाचिया बापे' इ. तुकारामादिकांचे वचनापासूनही काही उपयोग झाला नाही. मोक्षप्राप्तीसाठी तीर्थयात्रा

बारंवार करतात. त्यातही बंधने आहेत. तेथे दान दक्षिणा करावी लागतात. काशी व रामेश्वर ही जोडयात्रा आहे. अशा प्रकारे तीर्थयात्रांचा विचार करून मग बाबांनी जत्रांचाही विचार केला आहे. बाबा लिहितात,

मतलबी उपाध्यायांनी लावून दिलेल्या तीर्थयात्रा करून देखील लोकांची तृप्ती होत नाही. यात्रेसंबंधी कर्मे फारच कोरडी व निःसार तीर्थी मुंडन केल्याने मुखास शोभा येत नाही व पंचगव्य घेतल्याने तोंडास चव येत नाही. अनेक स्नाने करून अंगात कुडकुडी मात्र भरते व दान दिल्याने थैली खोल जाते. उपोषणांनी डोळयावर झापड येते व पोटास खपाटया बसतात. तेव्हा यापेक्षा दुसरे काही गमतीचे व ख्यालखुशालीचे असावे म्हणून लोकांनी जत्रा उभारल्या. त्यात नाच तमाशा चालतात. इष्क तुणतुण्यावर लावण्यांचे गाणे ऐकावयास मिळते. कलगीतुऱ्याचे झगडयाची मौज वाटते. तेथे एडक्यांच्या टकरा व पैलवानांच्या कुस्त्या पाहावयास मिळतात. ब्राह्मणांच्या तूप पोळयांऐवजी सागुतीचे बरबट ओरपावयास व बाजरीच्या भाकरीवर ताव झोडावयास मिळतो. पळीभर तूप व द्रोणभर आमटी यांच्या जागी ताडी, माडी, बेवडा, राशी, फेणी यांच्या बाटल्या झोकावयास मिळतात. यात्रेकरूस भट, ब्राह्मण, गोसावी, बैरागी हे मुंडतात. जत्रेत भामटे, भटके, मुरळया, आराधिनी, वाघे, गोंधळी, पांगूळ, वासुदेव, भराडी, जोशी, हे आपापली तुमडी भरतात. याप्रमाणे जत्रेतील मौजा. वास्तविक पाहाता त्यात मोठी नागवणूक आहे, परंतु तिजपासून लोकांचे रक्षण करण्याचे हिंदुधर्मात सामर्थ्य नाही.

ज्योतिषाबद्दलचे बाबांचे विवेचन नमुनेदार आहे. ते म्हणतात,

कर्ममार्गात चालणारे आमचे देशबांधव जसे निराशेच्या कर्दमात गुंतले आहेत तसे ज्योतिषावर विश्वास ठेवणारे ज्योतिषचक्रात सापडून सूर्यादि जडांच्या तापात तळमळत आहेत. सर्व भाविक हिंदूस ग्रहदशेची चिंता लागलेली असते. ईष्टग्रहांपासून कल्याण होण्याच्या अपेक्षापेक्षा अनिष्ट ग्रहांपासून हानी होण्याचे विशेष भय असते. त्या भयासारखे प्रत्यक्ष परमेश्वराच्या यथार्थ क्रोधाचे व अक्षय नरक दंडाचे देखील भय त्यास वाटत नाही. शनीची साडेसाती, मंगळाची वक्रदृष्टी वगैरे प्रसिद्ध आहेत. *शनिमाहात्म्य*, *गुरुचरित्र*, वगैरे ग्रंथ आहेत. शनी तर देवांना ग्रासतो. राहू पीडा, केतू पीडा तर विख्यात आहेतच. पत्रिका, कुंडली, छत्तीस गुण, नाडी, गण इत्यादी विवाहात फार महत्त्वाचे. प्रत्येक भाविक हिंदू गर्भवासात राहिल्यापासून जो या ज्योतिषचक्रात सापडतो तो जन्मास येऊन मरण पावल्यावरही त्यातून मुक्त होत नाही. तिथी, वार, नक्षत्रे, करण, योग, ही पंचांगे त्याच्या पंचप्राणास पुरुषाप्रमाणे झोंबून राहातात. मूळ नक्षत्र फारच प्रभावी मानले आहे. ज्योतिषशास्त्रातील शेकडो मूर्ख समजुती भावी विचारातून निर्माण झाले आहे. भोळीभावडी भावना पाठीमागे आहे. सुमुहूर्तावरचे विवाह मोडतात. कावळे, घुबड, पाल इ. अशुभ मानले म्हणून त्यांचे दर्शन नको. त्याचप्रमाणे यज्ञयागाचा विचार मांडताना ते म्हणतात यज्ञ म्हणजे खरे पशू बळी देणे व याग म्हणजे पिष्ठमय पशूंचा वध करणे. आहुती देणे, प्रसाद वाटणे इत्यादी ते थाटात करतात. यज्ञयाग कर्मठपणातून निर्माण झाले आहेत.

यज्ञाचें स्वरूप प्राचीन काळापासून बदलत आहे. क्वचित स्त्रीसही यज्ञात भाग घेऊ देतात. तात्पर्य यज्ञ, याग या गोष्टी कर्मकांडातलाच प्रकार. हिंदुधर्मात क्षुद्र दैवतांची भक्ती केली जाते. ती तामसिक आहे. नीच व अज्ञानी लोकच भूतपिशाच्यांची भक्ती करतात असे नाही, ब्राह्मण देखिल ही भक्ती करतात. क्षुद्र दैवते परमेश्वराचा अंश म्हणून ही भक्ती केली जाते. कारण प्रसंगी म्हणजे श्राद्ध, लग्न, मुंजी इ. कार्य करताना भूत-पिशाच्च यांच्या नावांचा बली व नैवेद्य काढून ठेवतात. रस्त्यातून लग्नाची वरात चालली असता जागोजाग मुंजा, ब्रह्मराक्षस, खवीस वगैरे जे क्षेत्रपाळ असतील त्यांस नारळ देतात. मरीआईच्या यात्रेत १८ वर्णांचे गुरु व देवांचे देव जे ब्राह्मण ते मांगाच्या मागून चालतात. अशा प्रकारे क्षुद्र दैवतांच्या भक्तीचा निषेध हिंदुधर्मात केलेला नाही. कुलाचार व कुलधर्म करावे अशी त्यांची उलटी आज्ञा आहे. ईश्वरत्वाने सर्व जगत् पुजावे.

बाबांनी हे विवेचन साधार मांडतो आहोत हे पटण्यासाठी *पंचदशी चित्रदीप*, प्रकरण २०६, २०८ व *दासबोधा*तील उताऱ्यातील (*दासबोध* ४ स ५) संदर्भ दिले आहेत.

ज्योतिषाप्रमाणेच क्षुद्र दैवतांचे हिंदूधर्मातील प्रस्थ वर्णन करताना बाबा लिहितात,

क्षुद्रदैवतांची धर्मकर्मे चालविण्यासाठी पंचाक्षरी देवऋषी, भगत, भगतिणी, जोगतिणी, आराधिणी, गोंधळी व गावकर यांची गरज लागते. कित्येक स्त्रिया व कित्येक पुरुषही आपल्या अंगात देवी येत आहे असे ढोंग करून नाना तऱ्हेच्या चेष्टा करून अंगात देवीचा संचार झाला आहे असे सोंग बनवून लोकांस व घरचे माणसास भक्ती-पाशात घालतात आणि असे पाहिले की मोठमोठाले रोजगारी शहाणे लोक देखील असल्या ढोंगांत फसले जातात.

बाबा पुढे याच संदर्भात लिहितात,

शहाणे मनुष्यांनी विचार करून पाहावा की, सप्तशृंग, कोल्हापूर, मातापूर वगैरे ठिकाणी केश काळचांचे पांढरे होत तोपर्यंत उग्र तपश्चर्या करीत असतात. तथापि देवी रात्री स्वप्नात येऊन काही अनुभव दाखवीत नाही. आणि अमंगळ व व्यभिचारिणी व ज्यास देवीचे स्मरणही कधी नसेल अशा स्त्रियांचे अंगात देवी येणे हे घडेल कसे? देवीस काही अनुग्रह करणे तर ती अंगात आल्यावाचूनही करील. एका संस्थानात एका गवंड्याने असेच देवीचे ढोंग माजवून संस्थानी यास भजनी लावून दहा पाच वर्षांत ४० लक्ष पावेतो टोपी घातली. आणि याशिवाय त्या संस्थानवाल्याची चोहोकडे मूर्खता प्रसिद्ध झाली. ती निराळीच.

या प्रकारे द्रव्यलूट व स्त्रिया भ्रष्टविण्याचे कार्य या क्षुद्रदैवतांच्या भक्तीमधून सर्रास घडलेले दिसते. बाबांनी अनेक दाखले देऊन या विषयावर प्रकाश टाकला आहे.

त्यांना हिंदुधर्मात अनेक पंथ दिसतात. बाबा लिहितात,

पंथसंस्थापकांनी जुन्या मानलेल्या घोर दैवतांचा त्याग केला. पिपाजी नामक शाक्त-भक्ताने देवीभक्ती सोडून कृष्णभक्ती स्वीकारली. पंथस्थापक अंधश्रद्धेने वागत नाहीत. ते एका अर्थाने सत्यार्थी होते. बुद्धिबळावर त्यांना जे वेद, शास्त्र व पुराण यांत दिसले ते

त्यांनी मानले. अयोग्य टाकून नवीन मतांचा स्वीकार केला. त्यामुळे कित्येक पंथांत कर्ममार्ग सुटला. ब्राह्मणमाहात्म्य कमी झाले. जातिभद मोडले. मूर्तिपूजेचा ऱ्हास झाला. क्वचित नीतीचा विशेष प्रभाव पडला. पंथसंस्थापकास नेमका सत्यमार्ग गवसला असे नाही. त्यास शिष्यपरंपरेचा व्यर्थ अभिमान आला. परपंथद्वेष देखील आला.

पंथाप्रमाणेच हिंदुधर्मात संतभक्ती पण उदयास आली. संतांचे तर *भक्तिलीलामृत भक्तिविजय* इत्यादी ग्रंथ झाले. वेद, वेदान्त, शास्त्रे, पुराणे, जातीचे आचार कर्म हटकून भक्तीची स्थापना त्यांनी केली. कबीर संत होता पण त्याचा देव पंढरीचा विठोबा नव्हता. रामदासास पण विठोबा मान्य नाही. राम हेच त्यांचे दैवत. तुकाराम, ज्ञानेश्वर, नामदेव, पंढरीचे भक्त संत होत, असे बाबांनी कथन केले आहे. त्यांच्या मते संतभक्त मंडळीचे देव-विषयक ज्ञान हीनत्व पावलेले होते. संतवर्तनही दोषपूर्ण होते. तरी देखील संतांनी काही गोष्टी चांगल्या केल्या. त्या सांगताना बाबा लिहितात,

तुकारामादि साधुसंतांनी जे ग्रंथ लिहिले ते पाहाता त्यांनी अनेक दैवतांची विशेषत: क्षुद्र दैवतांची भक्ती सोडली होती असे दिसते. कर्मठपणावर त्यांचा मोठा कटाक्ष होता. तसेच ब्राह्मणाचे महत्त्व त्यांच्या उपदेशाने व आचरणाने बरेच कमी झाले. साधारण लोकांस श्रेष्ठ वर्णाच्या लोकांप्रमाणे ईश्वरभजन करण्याचा व उपदेश वगैरे देण्याचा समान हक्क आहे असे त्यांनी आपल्या आचरणाने व शिकविण्याने स्थापित केले. स्त्रियांतही धर्मसंबंधी बरीच मोकळीक दिली.

वरीलप्रमाणे हिंदुधर्मस्वरूप कथन करून झाल्यावर बाबा याच पुस्तकाचा अठरावा खंड ख्रिस्ती धर्मस्वरूप निवेदनासाठी लिहितात. ते म्हणतात,

ह्या पुस्तकाच्या प्रथमभागी हिंदुधर्म वेदशास्त्रे व पुराणे यात कसा दिसत आहे हे सांगितल्या-वर ख्रिस्ती धर्म बायबलात कोणत्या प्रकारे दर्शविला आहे हेही सांगितले. ह्याच्या बेतास अनुसरून ह्या दुसऱ्या भागात हिंदुधर्माचे आचार, कर्मे, भक्ती इत्यादीमध्ये जे स्वरूप दिसते ते पाहिल्यानंतर आता ख्रिस्ती धर्माचे स्वरूप याच विषयाच्या संबंधाने कसे दिसते हे आपण थोडक्यात पाहू.

असे म्हणून मनुष्याची जात एकच हे ख्रिस्ती धर्मात व शास्त्रात मानले आहे. सर्व मनुष्याचे जन्माधिकार एक आहेत. ईश्वरभक्ती प्रत्येकास करता येते. देव एकच. त्याचे स्वरूप ऐक्य आहे. रोटी-बेटी व्यवहारबंदी ख्रिस्ती धर्मात नाही असे बाबा सुचवितात पण त्यातील सत्य पडताळून पाहावे लागेल.

जाती जन्मावरून ठरण्यापेक्षा कर्मावरून ठरविल्या गेल्या. ख्रिस्ती धर्मात बाप्तिस्मा व प्रभुभोजन हे दोनच संस्कार आहेत. कर्ममार्ग किंवा कर्मकांड वा विधिनिषेध नाहीत. सर्व माणसे पापी. पापाची क्षमा होते. पश्चात्तापाने व प्रभूच्या स्वीकाराने तारण होते. मनुष्याचा आत्मा मरणोत्तर एकदम सुखाच्या व दु:खाच्या स्थानी जातो. प्रेतक्रियेच्या वेळी शास्त्रवचने वाचून प्रार्थना करतात. त्याचा संबंध जीवंतांशी असतो. श्राद्ध व प्रेतकर्मे नाहीत. ईश्वराची भक्ती हा परमधर्म असे ख्रिस्ती शास्त्र सांगते. 'तुझा देव प्रभू याचे

भजन कर व याचीच सेवा कर.' मूर्ती व मूर्तिपूजा ख्रिस्ती धर्मात नाही. स्नान, सोवळे, ओवळे, देहाचे उपचार त्यात नाहीत. कपडे स्वच्छ व चांगले असावे असे मात्र त्यांत आहे. 'शुद्ध भाव हेच भक्ताचे सोवळे आहे. विश्वासयुक्त अंतःकरण हेच देवाचे मंदिर आहे. तेथे तो वास करतो. (१ कर. ३.१६, ६.१९)' उपकारस्तुती करणे हाच त्यांचा मंत्र आहे. प्रार्थना करणे हेच त्याच्याशी समागम करण्याचे साधन आहे. त्याच्या सर्व आज्ञा प्रीतीने पाळणे हेच ईश्वरसमर्पण आहे.

असे ख्रिस्ती धर्मविवेचन बाबा *हिंदुधर्माचे स्वरूप* याच ग्रंथात करतात.

पुढे बाबांनी ख्रिस्ती धर्मातील सद्‌गुरुसंबंधी विचार मांडला आहे. ख्रिस्ती धर्मात सद्‌गुरु देवाचा अवतार होता. त्याला कोणी गुरु नव्हता. त्याच्या अंगी ईश्वरी गुण होते. मनुष्याचे गुण होते. मनुष्याचे मनातील गोष्टी तो जाणत असे. (मा. २.८, लू. ५.२२, यो. १.४८ वगैरे संदर्भ त्यासाठी बाबांनी दिले आहेत.) त्याचे महासामर्थ्य परम पराक्रम, अद्‌भुत चमत्कार, मात्थी ८.३, १६.१० यो. ५.२१ मध्ये आहेत. त्याने महारोग बरे केले. जन्मांधास दृष्टी दिली. भुते काढली, वादळे शांत केली, मृत उठविले. ही चमत्कारशक्ती त्याने आपल्या शिष्यांस दिली. तो पवित्र, पूर्ण नम्र व दीनदयाळू होता असे शास्त्राद्वारे मांडता येते. त्याची करूणा व प्रीती प्रसिद्ध आहे. त्याचे महाकार्य म्हणजे जगामध्ये येवून जगाच्या पापाकरिता त्याने प्राण दिला. मनुष्यास मंत्र शिकवले नाहीत तर देव कसा आहे व त्याने माणसावर कशी प्रीती केली एवढेच सांगितले. देवावरचा भरवसा, देवाचे भय, देवाची आज्ञा पाळणे, मनुष्य-कर्तव्य, शास्त्रार्थ स्पष्टीकरण इत्यादी गोष्टी त्याने केल्या. ख्रिस्ती गुरुने जगदुद्धार केला. ईश्वर व मनुष्य यांचे ज्ञान देऊन पाप्याचा उद्धार कसा करता येईल हे सदगुरुने शास्त्रात सांगितले आहे. बाबा लिहितात,

असा परमथोर, परम पराक्रमी, परम आश्चर्यकारक, परम पवित्र, दिव्य सदगुरु मनुष्याच्या पापाबद्दल प्रायश्चित केल्यावर म्हणजे मरण पावल्यावर पुनः उठला आणि आकाशात सदेह चढून गेला. तेथे तो त्यांच्यासाठी (आपल्या लोकांसाठी) विनंती करावयास सर्वदा जगतो. (ईब्री. ७.२५) ह्या सदगुरुचा शिष्य झाल्याने कोणीही पश्चात्ताप करतात, विश्वास धरतात, अक्षय जीवनास जातात. अशा प्रकारे हिंदुधर्मातील जाती, कर्म, अनेक देव, पंथ, भेद इत्यादी ख्रिस्ती धर्मात नाहीत. मनुष्याचे तारण करणारा एकमेव धर्म म्हणजे ख्रिस्ती धर्म.

हे बाबांनी हिंदुधर्माचे त्याच्या स्वरूपाचे विवेचन करताना शेवटी पटविले आहे. निदान त्यांच्याकडून तसा प्रयत्न प्रामाणिकपणे केलेला दिसतो. ख्रिस्ती धर्माचे प्रतिपादन करण्यासाठी म्हणून का होईना, हिंदुधर्माचा बराच अभ्यास त्यांनी केला. हिंदुधर्मदोष परखडपणाने एकत्रित मांडले. दोषैक दृष्टीनेच पाहावयाचे म्हटले तर ख्रिस्ती धर्म दोषदिग्दर्शन अशक्य नाही. परंतु बाबांनी मात्र हिंदुधर्माचे वेदशास्त्रपुराणांतरीचे, जाती, आश्रम, वर्ण, कर्म, आचार, मूर्ती, भक्ती, संस्कार, तीर्थयात्रा, सदगुरु, ज्योतिष व पंथ इत्यादींवर एका विशिष्ट दृष्टीकोणातून सविस्तर व साधार विचार मांडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्याइतकी तपशीलवार माहिती अन्य कोणा ग्रंथकाराने इतक्या मेहनतीची व एकत्रित अशी दिलेली नाही असे वाटते. विरोधी

भक्तीने का होईना बाबांनीही पुष्कळ माहिती आपणास एका ग्रंथात उपलब्ध करून दिली आहे. उपरोक्त ग्रंथामधून बाबांनी हिंदु धर्म व ख्रिस्ती धर्म यांच्यावर तौलनिक विचार मांडले होते असेही म्हणण्यास हरकत नाही.

बाबा पदमनजीप्रणीत हिंदुधर्माचे स्वरूप हे वेदांतप्रणीत हिंदुधर्मस्वरूप नसून त्यातील बराचसा भाग कर्मकांडाधिष्ठित पुराणोक्त श्रुती व स्मृती यावर आधारलेला आहे. हिंदुधर्माचे उत्क्रांत, उदार, सर्वधर्मसमावेशक स्वरूप लक्षात न घेता, त्यातील वर्तनाचा तपशील व्यक्तीवर सोडण्याचा उदारपणा लक्षात न घेता बाबांनी नेमकी व्यक्तीच्या वर्तनातील विसंगती उचलली आहे. व्यक्तीचा धर्म आणि त्यात व्यक्तीचे कर्तव्यकर्म व तेही समाजधारणा करण्यासाठी करावयाचे असा हिंदूधर्म वर्णन करण्याचे बाबांनी सोयिस्करपणे टाळलेले दिसते.

बाबांनी *हिंदुधर्माचे स्वरुप* या ग्रंथाच्या पहिल्या भागात वैदिक धर्माची मते, विधी, कर्मे सांप्रदाय कसे होते हे वेद व तत्संबंधी दुसरे ग्रंथ यावरून सांगितले आहे आणि त्या ग्रंथातून कित्येक निवडक उतारेही दिले आहेत. वेदानंतर षड्दर्शने व त्यातील तत्त्वज्ञानाचे विचार व मते कशी आहेत हेही दाखविले आहे. मग धर्मशास्त्रे म्हणून अनेक स्मृती आहेत, त्यामध्ये काय सांगितले आहे हे सादर केले आहे. पुढे ऐतिहासिक काव्ये म्हणजे *महाभारत* व *रामायण* याजविषयी सांगून त्यांतील वेचेही दिले आहेत. शेवटी तंत्रशास्त्राविषयी काही लिहिले आहे. दुसऱ्या भागात हिंदुधर्म, लोकांचे आचार, विचार, कर्मे, भक्ती यांच्या रूपाने कसा दिसतो हे दाखविले आहे. ते असे पहिल्याने वर्णभेद व जातिभद, जातींची कर्मे, अधिकार वगैरे, कर्ममार्ग, भक्तीमार्ग, मूर्तिपूजा ,ज्योतिष, पंथ किंवा संप्रदाय याविषयी सांगितले आहे. त्याचप्रमाणे सदरील ग्रंथावरून किंवा मतांवरून हिंदू लोकास परलोकाविषयी काय आशा आहेत व त्या आशांचे आधार काय आहेत हेही दाखविले आहे. हिंदुधर्माची माहिती करून घेण्यास हा ग्रंथ चांगले साधन आहे. तात्पर्य हिंदुधर्मात काय आहे व काय नाही हे या ग्रंथावरून चांगल्या प्रकारे ज्ञात होते. या ग्रंथाविषयी *ज्ञानोदयाने* स्फुट लिहिले ते असे :

> *हिंदूधर्माचे स्वरुप* या पुस्तकाचा लोकांत चांगला खप होत असून आमचे हिंदुमित्र ते आवडीने वाचीत आहेत म्हणून आम्हांस फार आनंद वाटतो. धुळे येथून एक गृहस्थ बाबा साहेबास लिहितात की, *हिंदूधर्माचे स्वरुप* या नावाचे पुस्तक मी समग्र दोन वेळा वाचले. त्यात हिंदुधर्माविषयी माहिती फार दिलेली असून ते चांगले आहे. हिंदुधर्माचे तत्त्वाविषयी घोटाळयात पडणारांनी हे पुस्तक समग्र वाचले असता त्यांच्या मनातील सर्व शंकांचे निरसन होईल करिता हे संग्रही असल्यास योग्य होईल.[७]

*हिंदूधर्माचे स्वरुप* या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. त्या त्या आवृत्त्यांच्या संदर्भात *ज्ञानोदयाने* वेळोवेळी विस्तृत अभिप्राय लिहिले आहेतच. हिंदुधर्माचे स्वरूप भाग १ चे तर गुजरातीत भाषांतर झाले होते व इंग्रजीत व्हावे अशी सूचना त्या काळात पुढे आली होती. त्या काळात विविध परीक्षेसही या ग्रंथांचा वापर केला जात असे.[८] *हिंदुधर्माचे स्वरूप* भाग १ आवृत्ती ३ री च्या संदर्भात *ज्ञानोदयकार* लिहितात,

आजपर्यंत ख्रिस्ती समाजाकडून जी मोलवान पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत त्यातच *हिंदु-*

*धर्माचे स्वरूप* या पुस्तकाच्या दोन भागांची प्रसिद्धी ग्रंथकार रे. बाबा पदमनजी यांनी केली आहे हे आमच्या वाचकांपैकी पुष्कळांस माहीत आहेच. यात जे विषय घतले आहेत ते ग्रंथाधाराशिवाय घेतले नाहीत, हे उघड आहे. तथापि कुलाचार व रूढी यांचे वर्णन लेखी आधाराने करता आले नाही म्हणून ग्रंथकारांनी ती माहिती बहुश्रमाने मिळविली आहे. या ग्रंथाचे सिद्धिसाठी अनेक ग्रंथ मिळवणे व जी जनरूढी या हिंदुलोकांस सर्वत्र सारखी नाही तिची माहिती मिळवणे या दोन्ही गोष्टी ग्रंथकारांनी प्रयत्नाने आपल्या वाचकांस प्राप्त करून दिल्या आहेत.[९] (त्यानंतर *ज्ञानोदय*कार लिहितात . . .)

*हिंदुधर्माचे स्वरूप* या पुस्तकाची तिसरी आवृत्ती नुकतीच आमच्या हाती आली आहे. त्याबद्दल आम्ही ट्रॅक्ट सोसायटीचे आभारी आहोत. इच्यात जे फेरफार आहेत त्यांचा उलगडा ग्रंथकारांनी प्रस्तावनेत केला आहे. तो येणे प्रमाणे (१) पहिल्या भागात दुसऱ्या खंडात 'अनुगीता' हे एक नवीन प्रकरण, (२) *भगवद्गीते*च्या प्रकरणात काही भर, (३) तिसऱ्या खंडात *मनुस्मृती*तील कांही जास्त उतारे, (४) पाचव्या खंडात बौद्ध व जैन धर्माविषयी विशेष माहिती, (५) उपसंहारात काही फेरफार, (६) ख्रिस्ती धर्माविषयीच्या प्रकरणाचे नाव बदलून त्यास दुसऱ्या भागातील त्याच विषयाचे नाव प्रकरणाचे नाव दिले आहे, (७) सूचीपत्रातील विषयांची संख्या वाढविली आहे. या ग्रंथाबाबत एका सभेत एक गृहस्थ म्हणाले, सांप्रतकाळी आमच्या तरुण (हिंदू) मंडळीत हिंदुधर्माचे ज्ञान उत्तरोत्तर कमी होत चालले आहे व शेवटी ते आम्हाला प्राप्त करून घेण्याकरिता *हिंदुधर्माचे स्वरूप* या ग्रंथाकडे जावे लागेल.[१०]

*हिंदूधर्माचे स्वरूप भाग २* याच्या तिसऱ्या आवृत्तीविषयी *ज्ञानोदय*कार लिहितात,

आता या दुसऱ्या भागाची तिसरी आवृत्ती नुकतीच बाहेर पडली आहे. या ग्रंथाची दुसरी आवृत्ती ४३१ पानांची होती पण आता ही तिसरी आवृत्ती ५२४ पृष्ठांची असून शिवाय सूचिपत्र निराळे आहे. यावरून उघड दिसत आहे की, पुस्तकात पुष्कळच भर पडली आहे. ह्या पुस्तकाला नाव जरी *हिंदुधर्माचे स्वरूप* हे दिले असले तरी ह्याच्या दोन्ही भागात ख्रिस्ती धर्माचे स्वरुप दिले आहे. किंमत प्रत्येक भागाची केवळ आठ आणे असून पुस्तकाच्या मानाने ती काहीच नाही. दुसऱ्या भागात जे नवीन विषय घातले आहेत ते येणेप्रमाणे : (१) गायत्रीमंत्राचे अर्थ, (२) 'संध्या व वैश्वदेव' यातील कित्येक मंत्रांचे भाषांतर, (३) अधिक मास, (४) 'श्राध्द' प्रकरणात काही भर, (५) पंथांच्या प्रकरणात वल्लभाचारी पंथाचे गुरू व रामानुजांविषयी विशेष माहिती, (६) नानक पंथांविषयी नवीन प्रकरण, (७) संत भक्ती प्रकरणात काही भर, (८) पुरवणीत खंडोबाच्या लवाजम्याची हकीगत, (९) उपसंहारात कांही भर, (१०) ख्रिस्ती धर्माचे स्वरूपात काही भर. याशिवाय आणखी काही विषय दाखल करण्यात आले आहेत. ते पुरवणीत अंक ३–९ त सापडतील. याखेरीज आणखी काही फेरफार पुस्तकाचे मुख्य भागात सापडतील. त्यांपैकी शिवलोकाचे वर्णन (पृ. ३८४–३८८) हा एक विषय आहे. सूचिपत्रातही पुष्कळ भर घातली आहे.[११]

त्यानंतर *ज्ञानोदय*कार पुढे लिहितात,

या ग्रंथात जातिभेद म्हणजे चार जातींची उत्पत्ती, त्यापासून झालेल्या मिश्र किंवा संकर जाती, या मिश्र जातींचे सामान्य आधार, त्यांची कर्मे, संस्कार व आश्रम हिंदुधर्मग्रंथाच्या आधारे दिले आहेत. त्याप्रमाणे त्यांचे कर्ममार्ग व भक्तिमार्ग यांचाही चांगला खुलासा केला आहे. ज्योतिष व त्याची फळे यांचा निर्णय यात दिला आहे. निरनिराळे पंथ कसे उत्पन्न झाले, संप्रदाय किंवा रुढीला जागा कशी मिळाली याविषयीची माहिती यात मिळेल. ग्रंथकारांनी अनेक ग्रंथांचे सहाय्य घेतले आहे. त्यांची याद या पुस्तकाच्या शेवटी जोडली आहे. म्हणून हे पुस्तक किती मेहनतीचे व श्रमाचे फळ आहे हे वाचकांच्या लक्षात आल्याशिवाय राहणार नाही. एवढा श्रम करून थोडक्यात ही माहिती प्रमाणसहित ग्रंथकारांनी लोकांपुढे मांडली याबद्दल त्यांचे उपकार मानावे तितके थोडेच आहेत.[१२]

या *ज्ञानोदय*कारांच्या गौरवपूर्ण उद्गारात या ग्रंथांचे मोठेपण सहज लक्षात येते.

. . . बाबानी लिहिलेली हिंदुधर्माविषयक पुस्तके ख्रिस्ती मिशनरी संस्थांनी प्रकाशित केली. यावरूनच ती ख्रिस्ती धर्मप्रसारास उपयोगी पडावी म्हणून तयार झाली असावीत, याविषयी शंका राहात नाही. त्यामुळे याप्रकारच्या ग्रंथास आवश्यक असणारी अलिप्त वृत्ती त्यात आढळून येत नाही. परंतु बाबांनी जाणून बुजून त्यात असत्य माहिती दिली नाही. या प्रकारच्या ग्रंथातील *हिंदूधर्माचे स्वरूप भाग १ व २* हा ८३८ पृष्ठांचा ग्रंथ बाबांच्या व्यासंगाची साक्ष पटवितो. यात वेद, दर्शने, धर्मशास्त्रे, इतिहास, पुराणे, जातकर्मे, संस्कार आश्रम, नित्य नैमित्तिक कर्मे, देव, दैवते, तीर्थे, यात्रा, भूतपिशाचे, देवऋषी, जादूटोणे, शकुन मुहूर्त इत्यादी बहुविध माहिती दिलेली आहे, एका ख्रिस्ती माणसाचा हिंदुधर्माचा अभ्यास पाहून मन थक्क होते. . . .

हे प्रा. म. वा. धोंडांचे म्हणणे देखील लक्षणीय आहे.[१३]

### वैदिक हिंदूधर्म

*हिंदूधर्माचे स्वरूप* या पुस्तकात हिंदुधर्माबाबत आपले सविस्तर मतप्रदर्शन करूनही बाबांचे समाधान झालेले दिसत नाही. कारण इ. स. १८९२ साली पुनश्च त्यानी मोनिअर विल्यम्स यांच्या *Vedic Hinduism* या ग्रंथाचे भाषांतर *वैदिक हिंदुधर्म* या नावाने प्रसिद्ध केले आहे. वैदिक हिंदुधर्मातील प्रार्थना, यज्ञ इ. काही गोष्टी ख्रिस्ती धर्मात आजही कशा सापडतात, परंतु त्यांचे स्वरूप कसे भिन्न आहे, ख्रिस्ती धर्माच्या तुलनेने वैदिक हिंदुधर्म आजच्या जगात व्यवहार्य नाही म्हणून 'वैदिक धर्माकडे परत जाणे अशक्य आहे' असे ठामपणाने या पुस्तकात सांगण्यात आले आहे. सर्वसामान्यपणे वैदिक धर्माच्या गुणदोषांची चर्चा या पुस्तकात आढळून येते. वेदांचे नाव व विभाग, त्यांच्या उत्पत्तीविषयी हिंदुधर्मग्रंथांतील मते, वेदरचनेचा काळ तत्कालीन समाजस्थिती, वेदातील देव, त्या देवांचे उपासक, त्यांचा व देवांचा संबंध, वेदातील यज्ञ व आहुती, वेदातील प्रार्थना व स्तोत्रे, ब्राह्मणग्रंथ इत्यादींबाबतचा विचार या पुस्तकात प्रामुख्याने दिसून येतो. ग्रंथ भाषांतरीत असल्याने त्याची थोडक्यात ओळख करून दिली आहे. तरीदेखील हे भाषांतर चांगले आहे, कारण मूळ ग्रंथातील विचारधन स्पष्ट करण्यासाठी

भाषांतरकर्त्याने कित्येक ठिकाणी नवीन मजकूर घातला आहे. ग्रंथात तो चौकोनी कंसाने दिलेला सापडतो. मूळातील वैदिक सूक्तांचे भाषांतर *वेदार्थ यज्ञ* व *मॅक्समुल्लरच्या धर्मविषयक व्याख्यानांचे मराठी भाषांतर* या ग्रंथांवरून घेतलेले दिसते. आपल्या इतर ग्रंथांच्याप्रमाणे बाबांनी याही पुस्तकाच्या शेवटी 'ख्रिस्ताचा स्वीकार केल्याने तुम्हास त्याजमध्ये बल व समाधान — जी तुमचे प्राचीन ऋषींनी ह्या काळात ते जिवंत असते तर महानिधी मानून ग्रहण केली असती — ती तुम्हास प्राप्त होतील', असे प्रलोभन दाखवून वैदिक हिंदु धर्माची निरुपयोगिता व ख्रिस्ती धर्माची उपयोगिता दर्शविली आहे. शेवटच्या भागावर स्वामी दयानंदांच्या आर्यधर्माचा लेखकाने समाचार घेतला आहे.

हिंदु धर्म व ख्रिस्ती धर्म यांच्या तुलनात्मक विचारांचे बाबांचे शेवटचे पुस्तक म्हणजे, *हिंदू वाचकांकरिता ख्रिस्ती धर्माचे तुलनारुप स्पष्टीकरण (१८९१)* हे होय. प्रस्तुत ग्रंथात हिंदु धर्मातील व ख्रिस्ती धर्मातील साम्य व विरोध स्पष्ट केला आहे. मनुष्याला ईश्वरोक्त शास्त्र पाहिजे, मनुष्य पापी आहे इ. बाबत या दोन्ही धर्मांत एकमत दिसते त्यानंतर दोन्ही धर्मांमध्ये भिन्नता कोठे आहे याचा विचार केलेला आहे. हिंदु धर्माचे मुख्य मत वेदात आहे. ईश्वरावाचून काही नाही असा त्याचा इत्यर्थ. 'एकमेवाद्वितीय' वा 'सर्वम खल्विदं ब्रह्म' असे थोडक्यात त्याच्या धोरणाविषयी म्हणता येईल, तर ख्रिस्तीमताप्रमाणे ईश्वर हा त्याने निर्माण केलेल्या वस्तूंपासून भिन्न आहे.

हिंदू लोक विश्वदेवमत व अनेक देवमत मानतात. हिंदुधर्मात ३३ कोटी देव आहेत. ख्रिस्ती धर्मात मात्र एकच एक देव मानला आहे. येशू ख्रिस्त देवाचा पुत्र आहे. हिंदू धर्मामध्ये ब्रह्म निर्गुण व सुषुप्तावस्थेत आहे तर ख्रिस्ती धर्माप्रमाणे ईश्वर कधी अचेतन होत नाही असे सांगितले आहे.

**त्रिमूर्ति व त्र्यैकस्वरूप :** हिंदूशास्त्राप्रमाणे सचेतन ब्रह्माच्या ठायी त्रिगुणात्मक गुणधर्म (सत्व, रज, तम) असतो. *बायबल*प्रमाणे देव प्रकाशमय, निष्कलंक आहे. पवित्र आहे. (सत्वरजतमात्मक त्याचे स्वरूप नाही) हिंदूधर्मात ब्रह्माविष्णुमहेश त्रिमूर्ती आहे तर ख्रिस्ती धर्मात त्र्यैकत्व आहे. ब्रह्माविष्णुमहेश व कृष्ण यांच्या वर्तनाचा कित्ता मनुष्यास घेणे इष्ट आहे काय? असा प्रश्न विचारून, ख्रिस्ती शास्त्राप्रमाणे देव प्रीती आहे. देव प्रकाश आहे. त्याजमध्ये काही अंधार नाही. तो निष्कलंक, पवित्र आहे. असे हे त्र्यैकत्व त्यात आहे असे ते सांगतात. ख्रिस्ती धर्माप्रमाणे देवाने आपल्या शब्दाच्या सामर्थ्याने सर्व पदार्थ शून्यापासून निर्माण केले, तर हिंदूधर्ममताप्रमाणे देवाने काही उत्पन्न केले नाही. प्रकृती वा माया या अनादी, त्यांना देवाने निर्मिले. हाच विधाता. वेदान्तमताने सर्व काही माया, अविधा, तर ख्रिस्तीमताने सर्व वस्तू सत्य आहेत. आम्ही सत्य आहोत, सारे दृष्य जगतच सत्य आहे. ईश्वर सृष्टीचा मालक असला तरी दैव, कर्म, अदृष्ट, अनुशासन या गोष्टी तो चालवीत नाही. मनुष्याच्या संदर्भात ख्रिस्तीमत म्हणते की, मनुष्य देवाने उत्पन्न केला. देव हा स्वर्गीय पिता. हिंदूधर्मानुसार आत्मे अनेक आहेत. देव व मनुष्य यांचा पितापुत्राचा संबंध नाही. तर मनुष्य परमात्म्याचा अंश, म्हणून दोन्ही परस्पर स्वतंत्र आहेत. हिंदूंच्या मताप्रमाणे मनुष्य ८४ लक्ष

योनीत जन्म घेऊन मग मनुष्ययोनीत जन्मतो. मनुष्याच्या चार जाती. मनुष्यास मासा, झाड, पशू यांचा जन्म येऊ शकतो. ख्रिस्ती धर्माप्रमाणे मनुष्य फक्त एकदाच जन्म घेतो. तो इतर जीवापासून भिन्न आहे. सर्व माणसे भाऊभाऊ आहेत. त्यांच्यात जाती, उच्च वा नीच नाहीत. पापाबाबत हिंदुधर्म म्हणतो की, धर्म आणि अधर्म, न्याय व अन्याय व पाप आणि पुण्य यात अनादिकालाचा भेद नाही. हिंदूत देवाचे पाप ईश्वरी लीला मानतात. ब्रह्मदेवाने प्रत्येकाच्या नशिबाने लेख लिहिला. त्यात बदल होत नाही, वडिलोपार्जित चाल चालवावी असे त्यांना वाटते. जातीचे नियम मोडणे अक्षम्य पाप होय असे त्यांना वाटते. अशावर ते बहिष्कार टाकतात. पाप प्रायश्चित्ताने व दानधर्म, दक्षिणेने कमी होते. रोटी–बेटी व्यवहार बंदी व स्पर्शबंदी त्यात आहे. पापाबाबत ख्रिस्तीधर्मकल्पना निराळ्या आहेत. मनुष्याचे पाप मग तो समर्थ असला तरी आहेच, देवाचे पाप मनुष्यापेक्षा गर्हणीय, ईश्वराचे पाप द्वेष्य व ओंगळ मानतात,.मनुष्य आपल्या कर्माचा स्वतंत्र कर्ता, तो स्वकर्माविषयी जबाबदार आहेच. देवाच्या आज्ञा मोडणे हे पाप आहेच. मनुष्य पाणी पिण्याने भ्रष्ट होत नाही तर दुष्टकर्म, दुशब्द व दुष्कर्म यांनी तो भ्रष्ट होतो.

**मुक्तीचा विचार :** हिंदुमताने मुक्ती म्हणजे जन्मा-मरणाचे फेरे चुकणे, ब्रह्मात मिळून जाणे होय. नशिबाचे फेरे भोगावेच लागतात. तीर्थयात्रा, नामस्मरण वगैरेनीं पापमुक्तता होते. सर्वकर्मफलत्याग हाच परमार्थ, मनुष्य स्वतः तरून जातो. परमेश्वर पुनःपुन्हा अवतार घेतो. पुण्याने स्वर्ग, पापाने नरक प्राप्ती होते. ज्ञानाने, कर्माने, भक्तीने, योगाने अशा अनेक प्रकाराने मोक्ष मिळतो, असे सांगितले आहे. परमेश्वरप्राप्त्यर्थ मध्यस्थ नको, प्रायश्चित म्हणजे पंचगव्य प्राशन करणे, ब्राह्मणभोजन घालणे असे प्रकार आहेत. देव स्वतःच पवित्र नाही व म्हणून मनुष्यास शुद्ध करण्याच्या खटपटीत पडत नाही, या पद्धतीने बाबांनी सर्वत्र हिंदुधर्माचे विवेचन केले आहे. ख्रिस्ती धर्मात मुक्ती म्हणजे पापापासून सोडवणुक, स्वर्गात पूर्णानंदाचा अनंत काल उपभोग घेत राहाणे होय. मनुष्य पापी, देव पापक्षमा करण्याला समर्थ, मानवी साधने याबाबत व्यर्थ, मनुष्याने देवाचा गौरव करावा, जगाचे कल्याण करावा हाच परमार्थ होय. ख्रिस्ती धर्मातही अवतार आहे. परंतु येशूनंतर पुन्हा अवतार नाही. येशू प्रकाशमय होय. ईश्वर मनुष्यास तारण्यास समर्थ होय. मनुष्यास स्वपुण्याशिवाय ईश्वरकृपेने तारण प्राप्त होते. आपण ब्रह्म आहोत असे म्हणणे म्हणजे ईश्वराची निंदा असे ख्रिस्तीधर्म सांगतो. पापी मनुष्यास परमेश्वर प्राप्तीसाठी मध्यस्थ हवा. भाव तेथे देव असे नाही तर त्यासाठी योग्य विषय हवा असे ख्रिस्ती धर्मास वाटते. ख्रिस्ती धर्म मनुष्याला तो पश्चाताप करावयास सांगतो तो पापापासून वळणे व अंतःकरणापासून पापाविषयी दुःख करणे असा आहे. देवाचा पवित्र आत्मा मनुष्याचे अंतःकरण शुद्ध करतो. अशा प्रकारची मुक्ती ख्रिस्ती धर्म प्रणीत आहे. अशा प्रकारे ख्रिस्ती धर्मविवेचनातील बाबांचा पक्षपात उघडच आहे.

**शास्त्र व भक्ती :** शास्त्राचा विचार करता ख्रिस्तीशास्त्र *बायबल* हे सर्वांकरिता आहे. शास्त्राचा म्हणजेच *बायबल*चा अर्थ समजला पाहिजे. हिंदूधर्मात मात्र वेद केवळ ब्राह्मणांसाठी आहेत. वेद वाचण्यास इतरांना मज्जाव आहे. परंतु ब्राह्मण आज वेदांचा अर्थ सांग शकत

नाहीत. पाठांतर मात्र असते. *बायबल* मात्र सर्वांनाच मुक्त आहे.

त्यानंतर दोन्ही धर्मातील भक्तिविचार ते सांगतात. हिंदूधर्मात अनेक देव आहेत, त्यांची भक्ति करण्याची पद्धति भिन्न आहे. पृथ्वी व आकाश यातील अनेक वस्तूंची भक्ति करता येते. सर्प, जीव, वृक्ष, पाषाण, यांची पूजाअर्चा करता येते. बळी देण्याची पद्धत, सोवळे, ओवळे, नवससायास, मंत्रतंत्र, उपासतापास, नैवेद्य, यज्ञयाग, गंडेदोरे, कौल लावणे इ. अनंत प्रकारे भक्ती करतात. त्यात पंचमकार — मद्य, मिथुन, मांस इ. चालतात. विविध आकार, धातू यांच्या अनेक मूर्ति व त्यांची पूजाअर्चा मान्य, देवाचे नाव हीच प्रार्थना, देह ताडन मान्य, देवळात उपदेश करीत नाहीत. कलावंतीणीचा नाच चालतो. पूजा भ्रष्ट असते. अनुयायांचे मुद्रा, गंध, भस्म इ. खुणा, माळ धारण करणे, इ. प्रकार हिंदूधर्मात आढळतात. मरणोत्तर स्थितीची हिंदूधर्मियांस निश्चित कल्पना नाही. मात्र पूर्वजन्मीच्या पापाची त्यास विनाकारण धास्ती असते. त्यामुळे दारिद्रय, निरक्षरता, अज्ञान, मूर्खत्व, दैन्य, दुःख, जुलूम, विषमता, भेदभाव, इ. फळे त्यांस मिळतात. नीतिभ्रष्टता, उच्चनीचता, श्रेष्ठकनिष्ठता, विधिनिषेध इ. प्रकारांनी धर्म गांजला आहे. तात्पर्य हिंदू धर्म सुधारणेचा वैरी भासतो.

या उलट ख्रिस्ती धर्मात एकच देव मानतात. त्याचीच भक्ती करतात. इतरांची नाही, मूर्तिपूजा त्यांस अमान्य आहे. अंतःकरणातील सदिच्छेने ख्रिस्ती धर्मात प्रार्थना करावयाची असते. तपाचरण, देहदंडन ख्रिस्ती मानत नाहीत. तारणार्थ ते ईश्वरोपासना, पापाचा द्वेष, पवित्रतेची इच्छा आचरणात आणतात. ईश्वरभक्ती व पावित्र्यवृद्धीसाठी देवळातून आठवड्यातून एक दिवस वेगळा असतो. ख्रिस्ती धर्मातील बाप्तिस्मा पाप धुवून टाकण्याचे अगत्य दर्शविण्याची खूण आहे. इतर चिन्हे नाहीत. खरा ख्रिस्ती आहे त्यास मरणसमयी त्याच्या पापाच्या क्षमेची खात्री असते. आपण अक्षय सुख भोगण्यास जात आहोत असे त्यास वाटते. ख्रिस्ती धर्माच्या परिणामाने इंग्लंडमध्ये दरिद्रता नाही. धनाढ्यता आहे. लोक साक्षर आहेत. स्त्रियांना विद्या, धर्म, अर्थ इत्यादींबाबत हक्क आहेत. समानता आहे. उच्चनीच हा वर्णभेद नाही. कोणी एक भूदेव तेथे नाही. खऱ्या सुधारणेचा पुढारी तो देश आहे, कारण तेथे ख्रिस्ती धर्म आहे.

अशा प्रकारे हिंदूधर्मदोषदिग्दर्शन करून ख्रिस्ती धर्माचे गुणगान बाबांनी केले आहे. नंतर विचारशील मनुष्याने दोन धर्मांची तुलना करावी. कोणता धर्म योग्य व मानव जातीस कल्याणकारक हे पाहावे असे सांगीतले आहे. ते लिहितात, 'ह्या प्रश्नाचा निर्णय देशाभिमानाने करू नये. जर कोणी हिंदूलोकांस जुन्या पालख्यांतून व बैलगाड्यातून बसून प्रवास करण्याविषयी आग्रह करील व आगगाडी परक्या लोकाची कल्पना आहे म्हणून तीत बसू नये असा निषेध करील तर लोक त्याला वेडा म्हणतील.' म्हणजेच पर्यायाने ख्रिस्ती धर्म आगगाडीप्रमाणे आधुनिक सुखसोयीचा म्हणून स्वीकारावा ही बाबांची सूचना आहे. थोडक्यात उपरोक्त अनेक ग्रंथ लिहिण्याची बाबांची प्रेरणा ख्रिस्ती धर्मप्रचाराची आहे.

हिंदूधर्माचे कर्मकांडाधिष्ठित स्वरूप हे त्याचे बांडगूळ होते, हे बाबांनी जाणलेही असेल. पण तसे मांडले मात्र नाही. ख्रिस्ती धर्म व हिंदू धर्म यांची अनेक बाबतीत बाबांनी तुलना केली ती

ख्रिस्ती धर्माचे श्रेष्ठत्व हिंदूधर्मापेक्षा आहे हे मांडण्यासाठी. बाबांनी स्वत: ख्रिस्ती धर्म स्वीकारला त्याचे काटेकोरपणे आचरण केले व हिरीरीने प्रचारही केला. ख्रिस्ती धर्माची पताका खांद्यावर घेऊन त्यांनी आपला जीवनप्रवास अनुसरला. ख्रिस्तासाठी बाबांनी लेखणी उचलली आणि ख्रिस्तासाठीच त्यांनी ती चालविली. ख्रिस्तासाठी व ख्रिस्ती धर्मासाठी त्यांनी हिंदू धर्माचादेखील एका विवक्षित दृष्टीने का होईना पण बराच अभ्यास केला; आणि दोन्हीही धर्मांची अभ्यासपूर्ण, कष्टसाध्य व बहुत श्रमांची तुलना केली असे म्हणता येईल.

## टीपा

१. गं. बा. सरदार, *महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी*, पुणे, १९४१, पृ. ८०.
२. 'ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी हिंदूधर्म ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती मोठ्या प्रयासाने मिळविल्या. छिद्रान्वेषक बुद्धिने त्यांचा अभ्यास केला.' — गं. बा. सरदार, तत्रैव पृ. ९४.
३. तत्रैव, पृ. ९५.
४. *अरुणोदय*, पृ. १६३.
५. *अनुभवसंग्रह*, भाग १, मुंबई, १८९५, पृ. ६०.
या प्रबंधाच्या परिशिष्ट ६ मध्ये विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्यासंबंधी बाबांची चार पत्रे दिलेली आहेत. ती या संदर्भात उद्‌बोधक ठरतील.
६. *अरुणोदय*, पृ. ९९.
७. *ज्ञानोदय*, २४ एप्रिल १९०२, पृ. १३०.
८. *ज्ञानोदय*, २५ जुलै १९०१, पृ. २३५.
९. तत्रैव, २५ जुलै १९०१, पृ. ३३५.
१०. तत्रैव.
११. *ज्ञानोदय*, १३ फेब्रुवारी १९०२, पृ. ५२.
१२. तत्रैव.
१३. प्रा. म. वा. धोंड यांचे आकाशवाणीवरील भाषण, 'बाबा पदमनजी'.

११

## बाबांचा उपलब्ध पत्रव्यवहार

डॉ. विल्सन, रे मरे मिचेल, नेसबीट, कँडी इत्यादी पाश्चात्य मिशनऱ्यांच्या संपर्काने व सान्निध्याने बाबांच्या अंगी जो लेखनविषयक साक्षेप पुरेपूर बाणला होता त्याचे दर्शन त्यांच्या ग्रंथलेखन, वृत्तपत्रसंपादन व ख्रिस्तधर्मप्रसार या कार्यात उत्तम रीतीने घडते. विशेषत: या साक्षेपामुळेच त्यांना आपल्या आत्मचरित्राची फार चांगल्या रीतीने जी मांडणी करता आली. त्याचा काहीसा विचार पुढच्या प्रकरणातून करण्यात आला असला तरी, या प्रकरणात बाबांच्या पत्रव्यवहारासंबंधाने उपलब्ध माहितीचे चित्र उभे करावयाचे योजिले आहे. पत्रव्यवहाराची विलक्षण हौस, आपल्या धर्मबांधवांच्या आत्मीयतेने सातत्याने पत्रव्यवहार करण्याची व त्यामुळे माणसे जोडण्याची त्यांच्यामध्ये असलेली कला, त्यासाठी त्यांनी अंगी बाणलेली काटे-कोर शिस्त यांचा प्रत्यय यासंबंधीच्या त्यांच्या हकीकतीतून अनेक ठिकाणी येतो. ईश्वरभक्ती-विषयी आपला चाळीस वर्षांचा अनुभव व्यक्त करिताना बाबा एके ठिकाणी लिहितात,

> गेल्या चाळीस वर्षांत मी सरासरी बारा हजार पत्रे लिहिली असतील, त्यांत शेकडो पत्रे अशा प्रकारची होती व त्यांच्या प्रती जरी माझ्यापाशी नाहीत तरी त्यांस आलेली बहुतेक सारी उत्तरे माझ्या संग्रही आहेत व ती पुतळ्या व मोहरा यांजपेक्षा मला मोलवान वाटतात. त्यातून कित्येकात जो अनुभवरस भरला आहे तो अमृतापेक्षा गोड आहे.[1]

आपल्याकडून जाणाऱ्या पत्रांच्या नोंदी बाबा जशा साक्षेपाने ठेवतात तितक्याच साक्षेपाने बाबा येणाऱ्या पत्रांच्याही नोंदी ठेवतात. ७ मार्च १८९७ च्या दैनंदिनीमध्ये यासंबंधीची केलेली नोंद लक्षात राहाण्यासारखी आहे. ते लिहितात,

> ठाण्यास असताना बाहेरगावच्या कित्येक भावांस पारमार्थिक विषयावर पत्रे लिहिली *ज्ञानोदयास* दोन–तीन पत्रे पाठविली. या दोन महिन्यांत मला २१७ पत्रे व कार्डे आली.[2]

त्यांच्या बहुसंख्य पत्रांचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीने ३ जानेवारी १९०३ रोजी त्यांनी दैनंदिनीत

केलेली खालील नोंद महत्त्वाची आहे.

ख्रिस्ती इष्टमित्रांस व इतरांस पत्रे लिहिण्यास प्रसंग, बुद्धी व शक्ती, हे ईश्वरा, तूच दिलीस. गतवर्षी एकंदर पत्रे व कार्डे टपालमार्गे पाठविल्याची संख्या २९५ झाली. शिवाय गावातल्या गावात जी पाठविली त्यांची संख्या निराळीच होती. माझी प्रिय कन्या एस्तेर (राणी) हिला एकंदर २६० पत्रे व कार्डे आली; त्याशिवाय बंगी पोस्टाने ७७ लहान थोर पुस्तके व पत्रे व मासिके पुस्तके वगैरेंची पाकिटे पाठविण्यात आली. ही सर्व प्रभूच्या कार्यार्थ व परोपकारार्थ होती. त्यांत स्वार्थ नव्हता. ही पत्रे दुःखितांची समाधान करण्याची, कळवळयाची, बोधाची, प्रेमाची, क्षेमकुशलाची, अभिनंदनाची अशी होती, भांडणतंटा, वाद असे काही त्यात नव्हते. तसेच मित्रांकडून व ख्रिस्ती भावांकडून पुष्कळ पत्रे आली, त्यांत कित्येक तर फारच चांगली होती; ख्रिस्ती अनुभव, ख्रिस्तराज्याच्या प्रसाराची सुवार्ता, ख्रिस्ती धर्माचा शोध करणारांचे प्रश्न व शंका त्यांत होती; कित्येक पत्रे नवीन झालेले ख्रिस्ती व नूतन दीक्षा पावलेले पाळक वगैरे यांपासून होती. कित्येकांनी आपल्याकरिता व आपल्या कामाकरिता प्रार्थना कराव्या अशा विनंत्या केल्या होत्या. अशा अनेक उत्तम व लाभदायक विषयांनी भरलेली ती पत्रे होती. प्रभू हे सर्व तुझे उपकारच होत. ही पत्रे लिहिणारे अनेक मंडळयांतले व अनेक मिशनांचे, अनेक दर्जाचे व अनेक वर्गाचे होते. त्यांच्या प्रीतीच्या व ऐक्यांच्या अनुभवाने मला फार आनंद व लाभ झाले. ख्रिस्तामध्ये आम्ही सर्व एक आहो, तो आमचे मस्तक व आम्ही त्याचे अवयव आहो ह्या सत्यतेचा व संबंधाचा मला विशेष अनुभव आला. आम्हांस एकच आत्मा चालवितो, त्या आत्म्याची मी स्तुती करितो, आणि देवबापाचे व प्रभु ख्रिस्ताचे उपकार मानितो.[3]

इतक्या साक्षेपाने जपलेला व वाढविलेला पत्रव्यवहार बाबांच्या आत्मचरित्रलेखनाच्या कार्यात फारच थोडा उपयोगी पडला. १८८५ साली आपल्या ख्रिस्ती होण्याचे चित्र रेखाटण्यासाठी त्यांनी जे आत्मवृत्त लिहावयास घेतले त्या वेळी . . .

ह्यासंबंधी कागदे एकदा माझ्यापाशी पुष्क होती, पण त्यांतून बहुतेक काळाच्या प्रवाहात वाहून गेली, काही ग्रामांतरे व गृहांतरे करण्याच्या धांदलीत गहाळ झाली, काही कीटकांच्या भक्षी पडली, कित्येकांची पावसापाण्याने भिजून शाई उडाली, कित्येक अविचाराने व त्याचा पुढे उपयोग नाही अशा समजुतीने व ठेवण्यास जागा नाही अशा अडचणीने फाडून टाकली व कित्येक हयगयीमुळे हरवली! इतक्या क्रांतीतून निभावलेली जी अस्सल पत्रे राहीली ती सर्व वृत्तांताच्या संबंधाने यथाक्रम नाहीत. तसेच मी दुसऱ्यांस पाठविलेल्या पत्रांच्या ज्या प्रती राहिल्या त्यांपैकी काही वेळ नसल्यामुळे, आळसाने व दुसऱ्या कारणांनी अर्धवट राहिल्या आहेत. मी आपल्या वडिलांस पाठविलेली पत्रे घर सोडल्यावर दुसऱ्यांच्या हातात गेली, अथवा त्यांनीच ती फाडून टाकली असतील, ह्यामुळे त्याजवरुन जो मजकूर जुळता आला असता तो तसाच राहिला.

. . . अशी त्यांची कुचंबणा झाली. सुदैवाने सहजगत्या भेटावयास आलेल्या प्रिय बहिणीच्या संभाषणातून काकांच्या पेटीचा उल्लेख आला व त्याचा शोध घेता एका पेटीत फार

अगत्याची पत्रे सापडून तरूणपणाच्या कित्येक महत्त्वाच्या गोष्टींवर त्यांना प्रकाश टाकता आला.[४] १८९५ साली बाबांनी आपल्या ख्रिस्ती जिण्याचे चित्र रेखाटण्यासाठी *अनुभवसंग्रह* सिद्ध केला. त्या वेळीही त्यांना आपल्या पत्रव्यवहाराचा उपयोग करता आला नाही. त्यासंबंधाने त्यांनी म्हटले आहे,

ह्या पुस्तकास आणखी एक भाग जोडिता आला असता, परंतु सांप्रत तो एका खोल कूपात पडल्याप्रमाणे आहे. तो कूप माझा ४० वर्षांचा पत्रव्यवहार होय व त्याचा अर्धा भाग तर ज्या मित्रांस मी पत्रे लिहिली त्यांपाशी आहे; व तो मिळण्याची आशा करणे व्यर्थ आहे. कित्येक मित्र निवर्तले व कित्येकांपासून ती पत्रे गहाळ झाली असतील. एका मित्राने मात्र (दाक्तर मरे मिचलसाहेब) मला कळविले आहे की, मी त्यांस लिहिलेली सर्व पत्रे अद्याप त्यांच्या संग्रही आहेत. परंतु जो अर्धा भाग माझ्यापाशी आहे तो देखील सर्व वाचून पाहाणे व त्यांतून उपयोगी पडतील अशा अनुभवाच्या गोष्टी निवडून काढणे हे सध्याच्या माझ्या डोळ्यांच्या व डोक्याच्या स्थितीत दुःसाध्य आहे. आणि दुसऱ्याच्या सहायाने देखील कोणत्या काळी ते साध्य होईल हे सांगवत नाही.[५]

आज तर बाबांचा खाजगी स्वरूपाचा कोणताच पत्रव्यवहार उपलब्ध नाही. परंतु *ज्ञानोदया*दी तत्कालीन वृत्तपत्रांचे संशोधन करताना बाबांची सार्वजनिक स्वरूपाची काही व एखाददुसरे कौटुंबिक स्वरूपाचे पत्र हाती लागले. प्रख्यात ख्रिस्ती वाङमयाभ्यासक श्री. शामराव आढाव यांच्या संग्रही असलेली कांही दुर्मिळ पत्रे *विश्रब्ध शारदा* या प्रसिद्ध ग्रंथात प्रसिद्ध झालेली आहेत.* ही सारी पत्रे आज उद्बोधक वाटतील या कल्पनेने ती मुद्दाम उद्धृत करण्यात येत आहेत.

सार्वजनिक पत्रव्यवहाराच्या अनुरोधाने सामान्यतः बाबांच्या अंगी असणारे सद्गुण, त्यांच्या तत्कालीन अडीअडचणी, त्यांचे धर्मांतर, त्यानंतर त्यांच्याशी इतरांची झालेली वर्तणूक, त्यांचा ख्रिस्ती धर्मावरचा दुर्दम्य विश्वास, त्यांनी केलेला ख्रिस्ती-धर्म प्रचार इत्यादी गोष्टी त्यांच्या उपलब्ध पत्रांनी स्पष्ट होतात. बाबांच्या मनाचे प्रतिबिंब आपणास त्यांच्या पत्रातून स्पष्ट दिसून येते.

## बाबांचे पहिले जाहिर पत्र

बाबा १८४७ मध्ये (दुसऱ्यांदा) मुंबईस गेले. या वेळी त्यांचा प्रवास समुद्रमार्गाने झाला. मुंबईच्या बोरीबंदरात येऊन पोचल्यावर धक्यावर कस्टमच्या लोकांनी त्यांच्या सामानाचा झाडा घेतला. त्यात काही जुने दागिने व कपडे होते. ते नवे ठरवून त्यांची जकात घेतली. या अन्यायाविरुद्ध त्यांनी *प्रभाकर* नामक त्या वेळच्या प्रसिद्ध वर्तमानपत्रास पत्र पाठविले. ते त्याच्या कर्त्यांनी मेहेरबानी करून आपल्या ३ एप्रिल १८४७ च्या अंकात छापले. वर्तमानपत्रास लिहिण्याचा आपला हा पहिलाच प्रसंग होता असे ते याबाबत म्हणतात. बाबांचे पहिलेवहिले जाहीर पत्र पुढीलप्रमाणे आहे :

---

* ही पत्रे हस्तलिखित स्वरुपाची नसून वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेल्या पत्रांची अवतरणेच आहेत. बा. प. १५.

## इंग्रजांच्या राज्यात झोटिंगपाच्छाई

*प्रभाकर*चे कर्ते यांस,

विनंती विशेष. या इंग्रज सरकारात प्रजेवर जुलूम वगैरे इनसाफ चालु जाहला असें आजपर्यंत माझे ऐकण्यात आले नाही व या कारणास्तव पूर्वीचे मुसलमान इत्यादी राज्यांस जुलमी असे लोक म्हणतात. परंतु तोच प्रकार सांप्रतकाळी माझे अनुभवास आला आहे. व जर तसे चालू लागले तर काही (यथा) दिवसांनी या राज्यांत झोटिंगपाच्छायी होईल असें वाटते. तर तसे न व्हावे व सरकारचे डोळे उघडून गरीब बिचारी रयत बेहकनक (यथा) जुलमाने वगैरे इनसाफाने लुटली जाते ती न जावी या हेतूने हा पुढील मजकूर आपले सुंदर कागदात प्रगट करण्यास पाठवितो म्हणजे सरकारचे नजरेस येऊन रयतेचे हाल होणार नाहीत.

मी बेळगावाहून मुंबईस येताना बोरीबंदरांतील मांडवीवर उतरलो. येथे सरकार हुकूमाप्रमाणे शिपायांनी आमचा झाडा घेतला. परंतु आमचेजवळ कोरी कपडे कांही सांपडली नाहीत. नंतर सोन्यारुप्याचे दागिने पाहू लागले. त्यात त्यांनी दोन तीन जिनसा ठेवून घेतल्या. नंतर दुसरे दिवशी मला हपीसांत जावें लागले. तेथे गेल्यावर त्या जिनसाची चौकशी होऊन दुपट जकात ठरविली. त्याप्रमाणे मला २९ वे तारिखेस द्यावी लागली. आता हा कोणते प्रकारचा जुलूम वगैरे इनसाफ आहे तो पाहा. जकातीचे जिन्नस म्हणावे तर ते नवे नव्हते, सोन्याच्या जुन्या बांगड्या १०–१५ वर्षे वापरलेल्या व मोडक्या आहेत व मुलाचे हातातील जुनी बिंदली व एक नवा गोप. पहिल्या दोन जिनसा जुन्या आहेत व त्या हपिसांतील सरकारी कामदारांनी जुन्याच ठरविल्या व प्रत्यक्ष नजरेस जुन्याच दिसतात. दुसरा दागिना रुप्याचा गोप आहे. त्याविशी माझे म्हणणे असें आहे की दाहा पाच जुन्या दागिन्यात एक नवा दागिना सापडल्यास जकात घ्यावी की काय आणि आम्ही ते जिन्नस व्यापाराकरिता आणले नाहीत असे असून जुने दागीने नवे ठरून दुप्पट जकात घेणे ही फार जुलूमाची गोष्ट आहे. याप्रमाणे गैरइन्साफाची चाल मी तेथे पाहिली व तेणेकरून हजारो गरीब लोक बुडतात. हे पाहून मला फार दुःख वाटते. तर हे *प्रभाकर* महाराज आपण कृपा करून हे पत्र छापून प्रसिद्ध करावे म्हणजे सरकारांत अशी अंदाधुंदी चालणार नाही व रयतेचे हाल होणार नाहीत.

मुकाम मुंबई
तारीख ३ री एप्रिल सन १८४७

तुमचा मित्र,
बाबा पदमनजी

असे हे रयतेवरच्या अन्यायाला वाचा फोडणारे, गोरगरिबांच्या कळवळयाने दुःख व्यक्त करणारे, सरकारी शिपायांचा जुलूम चव्हाट्यावर मांडून सरकारवर वर्तमानपत्राचा दबाव आणणारे बाबांचे पहिलेच जाहिर पत्र सरकारी अंदाधुंदी प्रकाशात आणणारे आहे. मुंबईस शिकत असल्यामुळे वर्तमानपत्रांची शक्ती लक्षात घेऊन बाबांसारख्या तरुण विद्यार्थ्यामध्ये तिने केलेली जागृती या पत्रात स्पस्ट दिसते. भाषेची तत्कालीन रूपे अभ्यासनीय आहेत.

कलियुग की सत्ययुग?

बाबा पदमनजींचा बराच पत्रव्यवहार सार्वजनिक कल्याणाच्या प्रेरणेतून जन्माला आला आहे. इंग्रजी राज्य आले. त्याबरोबर इंग्रजी विद्या आणि कला यांचे आगमन भारतात झाले. दळणवळण, टपाल, शाळा, दवाखाने इ. सुधारणांमुळे बाबांच्या काळात लोकहितवादी, न्या. रानडे, डॉ. भांडारकर वगैरे मान्यवरांना इंग्रजी राज्य एक वरदान आहे असे वाटू लागले. बाबा पदमनजीही याच मताचे दिसतात. दि. १२–११–१८५१ रोजी बाबांनी मु. उडतरे, जि. सातारा येथून *ज्ञानप्रकाशास* एक पत्र पाठविले. त्या पत्रात तत्कालीन शिक्षित पिढीचे इंग्रजी राज्याविषयीचे मत स्वच्छपणे प्रकट झाले ते पत्र पुढीलप्रमाणे आहे :

*ज्ञानप्रकाश* महाराज व माझे पत्र वाचणारे मित्रहो,

या लोकांचे हे विचार कसे आहेत ते पाहावे. ते म्हणतात की आता कलियुग चालले आहे तर ह्या काळात कोणत्या गोष्टी चालत नाहीत, कोणत्या चालतात म्हणून कलियुग म्हणजे सर्वांपेक्षा पापी व दरिद्री म्हणावे? आता जुलमी राज्य नाही. कायद्याप्रमाणे न्याय होतो, गांवांत दरवडे पडत नाहीत. मार्गांत भिल्ल, रामोशी, फासेगार हे लोकांचे प्राण घेऊन लुटीत नाहीत, राज्यांत अंदाधूंदी नाही, रयतेच्या डोईवर धोंडे, कानास बंदुकीचे चाप, व मानेवर लाफडेही बसत नाहीत, म्हणून किंवा रस्ते चांगले झाले, घाट बांधले, पूल केले, डांका आल्या, आगबोटी येथे आल्या म्हणून या काळास कलियुग म्हणजे लोखंडी युग म्हणावे काय? आता सर्वांस विद्या शिकण्यास व ज्ञान मिळावयास सोपे साधन झाले आहे. पोथ्या पुस्तके मिळू लागली. गरीबही विद्वान होऊन ज्ञान व प्रतिष्ठा मिळवतात म्हणून हे युग वाईट झाले काय? आता कऱ्हाडे ब्राह्मण लोकांस विष घालून मारीत नाहीत, व बोडक्यास जिवंत कोणी जाळीत नाहीत, रजपुतांच्या घराण्यात कन्यांची हिंसा होत नाही, गंगेत कोणी प्राण देत नाहीत, कर्वतांवर शरीर कापीत नाहीत, नंगे परमहंस रस्त्यांत फिरत नाहीत, म्हणून कलियुग प्राप्त झाले म्हणावे काय? ...मला वाटते की आता कलियुग होऊन गेले— किंवा त्याचा अंतकाळ होत आला आहे व सत्ययुगाचा प्रथम दिवसाचा अरुणोदय झाला आहे. ईश्वरी कृपेने ज्ञानसूर्य लवकरच उदयाते पावो. . . चांगला वर्ण संकर झाला म्हणजे सर्वांस सुख प्राप्त होईल व अशा वर्ण संस्काराचीच सर्व सूज्ञ लोक मार्गप्रतीक्षा करीत आहेत.

एक प्रवासी

बाबा पदमनजी[६]

इंग्रजी विद्येने आपली समाजसुधारणा होत आहे, सतीबंदी झाली, पुनर्विवाहास मान्यता मिळाली, बालविवाहास बंदी, लुटालूट, जातिभेद, होळीचा सण बीभत्स प्रकारे पाळणे; लग्नकार्यातील उधळपट्टी इ. गोष्टी वाईट आहेत हे लोकांना पटू लागले. जपजाप्य, मंत्रतंत्र व पुस्तकी विद्या कमी झाली. अर्थहीन पाठांतर व यज्ञयाग बंद झाले, ज्ञान–विज्ञानाची कास लोक धरू लागले. लाचलुचपत, खोटचा साक्षी, आळशीपणा, ब्राह्मणभोजन व अविद्या यांना वाईट

दिवस आले. उद्योगप्रियता, प्रवासाच्या सोयी, दवाखाने, शाळा, मुद्रणविद्या वगैरेची प्राप्ती या काळात होते म्हणून हे कलियुग नसून हे सत्ययुग असे बाबांचे मत वरील पत्रात व्यक्त झाले आहे. हे विचार तत्कालीन समाजसुधारकांच्या विचारांशी मिळतेजुळते आहेत, यात शंका नाही.

### स्वधर्मांतराची कारणे

बाबा पदमनजींच्या आयुष्यातील अत्यंत क्रांतिकारी घटना म्हणजे त्यांनी केलेले धर्मांतर. दि. ३ सप्टेंबर १८५४ रोजी त्यांचा बाप्तिस्मा झाला. ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या भूलथापांना बळी पडून एखाद्या प्रवाहपतिताप्रमाणे त्यांनी धर्मांतर केले नाही. धर्मांतराचा निर्णय घेताना त्यांना दारुण व हृदयविदारक अशा अंतःकलहास तोंड द्यावे लागले. हिंदुधर्मावर व देवतांवर त्यांची दृढ श्रद्धा होती. आपल्या आईवडिलांवर त्यांचे निस्सीम प्रेम होते. परंतु याहीपेक्षा त्यांची धर्मजिज्ञासा जास्त प्रबळ होती. त्यांचे समवयस्क तरुण इंग्रजी चारपाच बुके शिकून सरकारी नोकरी मिळविण्याच्या खटपटीत दंग होते पण अशा लौकिक उत्कर्षाचा व प्रतिष्ठेचा विचारही त्यांच्या मनाला शिवला नाही. परमार्थ साधनेसाठी रात्रंदिवस झटणारे ते एक अंतर्मुख वृत्तीचे आर्तभक्त होते. म्हणून स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून त्यांनी आत्मशांतीसाठी ख्रिस्ती धर्म स्विकारला. दि. १७ ऑगस्ट १८५४ लाच त्यांनी धर्मांतर करण्याचे कारण मुंबईच्या *धूमकेतू* पत्रास लिहून पाठविले. त्या पत्रातील काही भाग असा :

*धूमकेतूचे* कर्ते यांस,

विनंती विशेष, जो कोणी एखादे काम करितो त्याने ते करण्याचे कारण सांगण्यास सर्वदा सिद्ध असले पाहिजे. आणि ज्यास आपल्या वर्तुणुकीचे कारण दाखविता येत नाही त्यास लोक वेडा किंवा मूर्ख मानितात. हा विचार जसा प्रापंचिक गोष्टीस लागू आहे. तसाच परमार्थासंबंधी गोष्टीसही लाविता येतो. स्थलांतर करणाऱ्या मनुष्यास जसे आपल्या क्रियेचे कारण दाखविले पाहिजे तसेच मतांतर करणारासही आपल्या कर्माचे कारण सांगितले पाहिजे. मग ते कारण खरे किंवा खोटे याचा लोकांनी सुविचारे करून निर्णय करावा, तोपर्यंत कोणत्याही कामावर दोष देणे अगर त्याची प्रशंसा करणे हे योग्य नव्हे. हा विचार मनात आणून मी आपल्या वडिलांचा धर्म का सोडला व ख्रिस्ती मताचा अंगिकार का केला याची काही कारणे आपल्या एतद्देशीय बांधवास कळवू इच्छितो. *धूमकेतूकर्ते* महाराज, धर्मसंबंधी विचाराची मनास स्वतंत्रता असण्याविषयीची जशी मोठमोठ्या विद्वान व उदार मनाचे पुरुषांची संमति आहे, तशीच आपलीही आहे हे जाणून आपणांकडे हे पत्र पाठविले आहे. इतर लोकांस जसे आपल्या मनातील विचार प्रकट करण्याचा हक्क आहे तसाच मलाही असावा. तशात मी हे पत्र कोणास दूषण देण्यास अथवा कोणाशी वाद वाढविण्यास लिहितो असे नाही, केवळ सांप्रतच्या माझ्या वर्तणुकीची कारणे मात्र लोकांस समजावी हा माझा मुख्य हेतु आहे.. (यापुढे धर्मांतराची कारणे सांगितली आहेत ती थोडक्यात अशी : )... (१) भारतात सुविद्या व सुज्ञान यांची वाढ व अज्ञान, अविद्या यांचा

ऱ्हास झाला. परकीय विद्येने स्वधर्म अंधश्रद्धा नष्ट झाली. (२) सत्यशोधक (३) भारतीय शिक्षणात धर्म शिकवित नाहीत. (४) विचाराप्रमाणे आचार नाहीत; असा धर्म सोडणे इष्ट. (५) मूर्तिपूजा, जातिभेद, सोवळे–ओवळे इत्यादी मला मान्य नाहीत. (६) त्यामुळेच हिंदूधर्मावरची श्रद्धा उडाली. (७) ख्रिस्तीधर्माची ओळख झाली व ख्रिस्ती शास्त्राचा अभ्यास करण्याचीं प्रेरणा झाली. (८) आत्मोद्धाराचा मार्ग सापडला तो ख्रिस्ती धर्मात. (९) ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्माचा अभ्यास प्रेरक ठरला नाही. (परमहंस मंडळीतही मला शांती मिळाली नाही, वगैरे कारणे पत्रात देऊन बाबा म्हणतात,) आता माझ्या स्वदेशी लोकांनी असे समजू नये की, मी आपला धर्म पालटला म्हणून त्याजवरील प्रीति पालटली; मी इंग्रज झालो नाही, किंवा माझ्या मनांतून स्वदेशाभिमान गेला असे नाही. माझ्या मनांत स्वदेशप्रीति वाढत जाईल. माझ्या हातून होईल तितके मी आपल्या लोकांचे कल्याण करण्यास झटेन, व जे स्वधर्मात राहूनहि स्वदेशीय लोकांचे कल्याणार्थ प्रयत्न करीत आहेत त्यांचा मी मित्र असा राहीन . . .

मुक्काम बेळगाव,
ता. १८ आ. १८५४. बाबा पदमनजी[७]

### एक नाजूक पण कठोर पत्र

बाबांचा बाप्तिस्मा झाल्यावर बाबांच्या बायकोने त्यांच्याकडे जावे म्हणून बाबांच्या वडिलांनी बरेच प्रयत्न केले. परंतु बाबांचे सासरे, बाबांचा साडू यांच्यामुळे ते सर्व प्रयत्न वाया गेले. त्या खटपटीत बाबांचा जो वडिलांशी पत्रव्यवहार झाला, त्यापैकी एक पत्र पुढीलप्रमाणे आहे :

आपण कृपा करून पत्र पाठविले ते पावले. आपण पूर्वीच मजकडे माझ्या बायकोस पाठवून दिले नाही म्हणून असे झाले इ. प्रकारचे विचार आपल्या मनात येऊ देऊ नये व मी आपणाविषयी तसा कांही विचार मनात आणिला नाही. पूर्वीपासून माझा जो निश्चय होता तोच मी धरिला आहे. ज्या ईश्वराकरिता मी आईबाप, बायको, भाऊ याजपासून वेगळा झालो आहे, त्यावरच मी आशा व भरवसा ठेविला आहे. माझ्या बायकोने मला सोडिले म्हणून मी स्वतःसाठी दुःखी होत नाही, तिजकरिता मात्र दुःख वाटते. तिने वैधव्यात व अज्ञानात राहावे हेच मला वाईट वाटते. पण ती मजपाशी न आली म्हणून माझे सुख कमी होईल असे नाही.[८]

पुढे येशू ख्रिस्तावरचा विश्वास प्रकट करून तोच वडिलांना शांतवन देईल इत्यादी मजकूर आहे. प्रस्तुत पत्र दि. २८ सप्टें. १८५४ रोजी बाबांनी आपल्या पिताजींना लिहून आपल्या मनातील पत्नीविषयी वाटणारी सहानुभूती व्यक्त करून पित्याला धीर देण्याचा प्रयत्न केला आहे. पत्नी माहेरी राहिली त्यात वडिलांची काही चूक नाही हेही त्यांनी स्पष्ट केले आहे. बाबा भावनाप्रधान होते पण धर्मकर्तव्य त्यांना सर्वापेक्षा प्रिय होते हे येथे उघड होते. ख्रिस्तीधर्मनिष्ठा हा बाबांचा विशेष खाजगी जीवनात देखील दिसून येतो, तो असा.

**एक शाब्दिक विडंबनपर पत्र**

२९ मार्च १८५४ रोजी हिंदूंचे नवे वर्ष निघाले त्याचे वर्षफळ बाबांनी *धूमकेतू* पत्रास लिहून कळविले—त्यात १० कलमे होती. त्यापैकी नववे असे होते :

> या वर्षी पृथ्वीवर बहुत ठिकाणी ख्रिस्ती धर्माची वृद्धी होईल. अन्य धर्माचा क्षय होत जाईल . . .या वर्षी राजा परमेश्वर आहे. तो कधीही बदलत नाही. त्यास मंत्री नको. कोशाधिपति नको. छत्राधिपती तोच. रसाधिपती तोच. अग्रधान्याधीश तोच. पश्चिम धान्याधिपती तोच. व्यवहारेश तोच, सर्वेश्वर आहे. बुध, भौम, शुक्र, चंद्र, रवि, गुरु हे सर्व त्याचे सेवक आहेत. त्यांच्या हाती काडीचीही सत्ता नाही. ते केवळ निर्जिव पदार्थ होत. त्यांजवर विश्वास ठेवून फळ नाही. त्या सर्वांचा व आपला उत्पन्न कर्ता जो परात्पर, सर्वशक्त, सर्वज्ञ, परम पवित्र, परमन्यायी, महादयाळू, सदावंदनीय, ईश्वर त्याचीच भक्ति करावी. या आनंदसंवत्सराच्या ठायी सर्वत्र आनंदच होईल.[९]

या प्रकारे *धूमकेतूस* पत्र पाठवून त्यात जाहीरपणे बाबांनी वर्षफलाच्या निमित्ताने स्वतःचा हिंदुधर्मावरून विश्वास कसा कमी होत चालला होता हे स्पष्ट केले आहे. पंचांगात ग्रहांच्या अनुषंगाने पाडव्याच्या दिवशी वर्षफल दिलेले असते. त्यातीलच शब्दांचा उपयोग करून बाबांनी आपल्या ख्रिस्ती धर्म प्रवेशाची नांदी केली आहे. वर्षफलातील रचना, वाक्ये, शब्द इत्यादी प्रभू (येशू) स्वामी कल्पून त्यांनी एक गद्य विडंबन तयार केले आहे. त्याचे दर्शन प्रस्तुत पत्रात होते. विविध प्रसंगी आपले विचार, अंतःकरण बाबांनी *धूमकेतू* पत्राच्या द्वारे जाहीरपणे उघड केले आहे*

**विद्याखात्याच्या डायरेक्टरास पत्र**

बाबांनी इ. स. १८५२ मध्येच *सर्वसंग्रही* या नावाचा एक विविध निबंधांचा संग्रह लिहिला होता. तो त्यांनी दक्षिणा प्राञिज कमिटीस नजर केला होता. त्याबद्दल त्यास त्या कमिटीकडून १२० रुपये इनाम मिळाले होते. पुढे ती कमिटी सदर ग्रंथ प्रसिद्ध करणार होती. परंतु पाच-सहा वर्षे झाली तरी तसे काही चिन्ह दिसेना. त्यामुळे इ. स. १८५७ मध्ये बाबांनी विद्या खात्याच्या डॅरेक्टरसाहेबांस सर्व हकीगत लिहून विनंतीपत्र पाठविले की,

> माझा ग्रंथ दक्षिणा प्रैंज कमिटीने छापावा अगर ते छापीत नसल्यास त्यांनी तो माझा मला परत द्यावा आणि आपले बक्षिस माघारी घ्यावे.[१०]

अशा प्रकारे त्या वेळच्या डायरेक्टरांना परखडपणे बाबांनी पत्र लिहिले. बक्षिसाचा मोह न न धरता स्पष्टपणे 'दक्षिणा प्रैंज कमिटी'चा निष्काळजीपणा जाहिर केला. शेवटी बाबांचे हे पुस्तक दक्षिणा प्रैंज कमिटीने *निबंधमाला* या नावाने कसे छापले, त्याचा उल्लेख 'निबंधकार बाबा पदमनजी' या प्रकरणात येऊन गेला आहे.

* गंमत अशी की, हा दहाकलमी पत्ररूप विडंबनपर लेख बाबांचा असून प्रख्यात संशोधक गं. दे. खानोलकर यांनी तो भाऊ महाजनांचा या समजुतीने त्यांच्या नावाने छापला आहे. पाहा : ***अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक***, पंचमखंड, पुणे, १९६२, पृ. ४२–४४.

**रोगाची उपेक्षा नको**

रे. अॅडम व्हाईट यांच्या मरणाच्या अनुषंगाने बाबांनी जसा आपल्या वाचणाऱ्यांना एक सुंदर उपदेश केला तसाच आणखी एक उपदेश त्यांच्या पुढील पत्रात सापडतो. प्रस्तुत पत्र बाबांनी इ. स. १८६४ मध्ये सिद्धापाच्या मरणोत्तर त्याच्या स्मृतीप्रित्यर्थ लिहिले आहे. बाबा लिहितात,

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस विनंती विशेष—बेळगावजवळ शहापूर नावाचा सांगलीकरांचा एक गांव आहे. तेथे तीन महिन्यामागे एक लिंगाईत जातीचा तरुण मनुष्य मरण पावला. त्याची हकीगत आपणाकडे लिहून पाठविली आहे. ती कृपा करून आपल्या सुन्दर पत्री प्रसिद्ध करावी. . .

सिद्धापास या वर्षाच्या आरंभी कांही रोग होऊन तो एका आठवड्यात (२८ आनुअेरी १८६४ रोजी) निवर्तला. . .आता शेवटी आमच्या वाचकास, पत्र वाचणारास एवढच सांगावयाचे आहे की, तुम्ही आपल्या शरीराच्या रोगाची उपेक्षा करू नका. रोग आरंभी लहान असतो पण तो उपेक्षिला असतां प्राणघातक होतो. आणि दुसरा एक रोग तुम्हा सर्वांस आहे त्याची जर उपेक्षा कराल तर सार्वकालिक मरण म्हणजे नरकवास हाच त्याचा परिणाम आहे. तर तो लहान म्हणून त्याची उपेक्षा करू नका. कोणतेही पाप लहान नाही. त्याच्यात मरणाचे बीज आहे. तर ते उपटून टाकण्याकरिता. . .आणखी असा विचार करा की आपल्या उत्पन्नकर्त्यांची व तारणकर्त्यांची आपण जन्मभर सेवा करावी. नंतर मरावे हे बरे किंवा बुद्धि व शरीर ही निर्बळ झाल्यावर मग त्याचे नांव घेऊन मरावे हे बरे. यास्तव जे कांही करणे ते आतांच केले पाहिजे. आज त्याची वाणी अगत्य ऐका, आपली अंतःकरणे कठीण करू नका. अि. ब्री. ४७. बाबा पदमनजी[११]

सिद्धापास मलावरोध झाला होता. त्याने त्याकडे दुर्लक्ष केले. नंतर त्याच्या नातलगांनी त्यास ख्रिस्ती वैद्याचे औषधोपचार होऊ दिले नाहीत. मग मरणसमयी त्याने आपल्या पापांची कबुली देऊन ख्रिस्ताचा स्वीकार केला. अशी वेळ सर्वांवर येऊ नये म्हणून उपदेशक बाबांनी प्रस्तुत पत्र जाहीरपणे प्रसिद्ध केले. ***यमुनापर्यटन*** या कादंबरीत बाबांनी विनायकरावांच्या अंतसमयीच्या बाप्तिस्म्याचे वर्णन केले होते. सिद्दापाच्या रूपाने त्यांची ही कल्पना प्रत्यक्षात अवतरली.

**संपादकीय जाण**

बाबा *सत्यदीपिका* मासिकाचे संपादक होते. *सत्यदीपिके*च्या कर्त्यास एका तत्कालीन वाचकाने मुंबईतील फ्री चर्च मुलींची बोर्डिंग शाळा व तिची सुपरिंटेंडेंट बाई याबाबत एक तक्रार पत्र लिहिले होते. *सत्यदीपिके*चा कर्ता या नात्याने बाबा पदमनजींनी आपल्या वाचकास जे उत्तर दिले ते पत्र म्हणजे बाबांच्या संयमी व विवेकी वृत्तीचा दाखला आहे. टीकाकाराची चिकित्सक वृत्ती व स्वमत सोदाहरणांनी पटविण्याची त्यांची कुशलता या पत्रात प्रकट झाली आहे. बाबा त्या पत्रात लिहितात,

सदरहू पत्रात शाळेच्या सुप. बाईवर व तिला पाठविणाऱ्या मडमांच्या कमिटीवर जो दोष ठेवला आहे तो बरोबर आहे. तथापि सर्व दोषाच्या अधिकारी त्या बाया होत नाहीत. ज्या मिशनच्या ताब्यांत ही शाळा आहे त्यास ह्या दोषाचा मोठा बोजा उचलला पाहिजे. शाळेतील सु. प. बाई दयाळू, विचारशील व भक्तिशील असणे आवश्यक आहे. परंतु शाळा चालविण्याचे जे नियम घालून दिले आहेत त्यांचा भंग तिच्याने फारसा करवत नाही. आणि वास्तविक पाहिले असता ह्या नियमांच्या पोटी क्षयरोगाचे मूळ आहे. . . जशी एखादी कोंडलेल्या पाण्याची विहीर, तीत उतरणाऱ्या पुष्कळ जीवांचा बळी घेते त्याप्रमाणे ह्या शाळेने आजपर्यंत बहुत मुलींची बळी घेतली. ह्या शाळेच्या सांप्रतच्या जागेविषयी दाक्तर भाऊ दाजी सारिख्या विद्वान व परोपकारी गृहस्थाचे असे मत होते कीं, ती फार वाईट हवेच्या ठिकाणी आहे. तर प्रथम तेथून हिचे स्थलांतर केले पाहिजे. दुसरी गोष्ट खाण्यापिण्याची व वस्त्रांची (मुलींच्या) नवीन व्यवस्था केली पाहिजे. तिसरी गोष्ट सन्मान्य पत्र लिहिणाऱ्याच्या सूचनेप्रमाणे मातृवासल्याने मुलींचा सांभाळ करणारी सुप. बाऊी आणिली पाहिजे . . . ह्या शाळेचे नाव उघडकीस आणण्याचा आमचा मानस नव्हता. पण ते ज्या सद्गृहस्थाने आम्हास पत्र पाठविले त्याच्या द्वारे बाहेर पडले तर त्याची जबाबदारी आमच्याकडे नाही. *सत्यदीपिका* कर्ते[१२]

**बाबा पदमनजी व विष्णुबुवा ब्रह्मचारी**

विष्णुबुवा ब्रह्मचारी (वि. भि. गोखले – इ. स. १८२५ ते इ. स. १८७१) व बाबा पदमनजी हे समकालीन. पण विष्णुबुवा कट्टर हिंदुधर्माभिमानी. विष्णुबुवांचे वडील वयाच्या पाचव्या वर्षी वारले. नवव्या वर्षी कस्टम खात्यात त्यांनी नोकरी धरली. अखंड वाचन. शिक्षण बेताचे. संस्कृतपठणही फार नाही. तरीही त्यांच्या प्रखर आध्यात्मिक साधनेमुळे त्यांची साक्षात्कारी पुरुषात गणना झाली. बुवा प्रखर बुद्धिमान होते. हजरजबाबीपणाने व ख्रिस्त-धर्मअभ्यासाने त्यांनी ख्रिस्ती धर्मवैगुण्ये शोधून काढून मिशनऱ्यांवर सडकून टीका केली. बुवांनी वेदांचा अभ्यास करून वेदोक्त धर्माचा पुरस्कार केला. पुराणोक्त कर्मकांडाच्या जंगला-तून सुटून परत वैदिक कल्पनांचा साक्षेपाने स्वीकार करावा असे त्यांनी प्रतिपादन केले. बुवांनी 'सुखदायक राज्यप्रकरणीनिबंधा'त ज्या अनेक कल्पना मांडल्या आहेत, त्या काळाच्या संदर्भात फार महत्त्वाच्या ठरल्या आहेत. विष्णुबुवांनी ख्रिस्ती धर्मप्रसारास ख्रिस्ती धर्मातील दोषदिग्दर्शन करून चांगलीच खीळ घातली. ख्रिस्ती मिशनऱ्यांशी वादविवाद केले. बाबा पदमनजी तर ख्रिस्ती धर्मप्रचारकच होते. ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करून त्यांनी हिंदूधर्मातील अनेक दोषस्थळे पुस्तकरूपाने चव्हाट्यावर मांडली होती. ख्रिस्ती धर्म, जीवन, भक्ती व येशू ख्रिस्त इत्यादींचा पुरस्कार हे बाबांचे ब्रीद होते. अर्थातच विष्णुबुवांचे व बाबा पदमनजींचे पटणे शक्य नव्हते. एका प्रकारे विष्णुबुवा व बाबांचा छत्तिसाचा आकडा असल्यासारखे, बाबांचा व विष्णुबुवांचा उभा दावा असल्याचे बाबांच्या *ज्ञानोदया*तील पत्रांवरुन वाटू लागते. विष्णुबुवा ब्रह्मचारी व ख्रिस्ती मिशनरी बोएन यांच्यामध्ये झालेल्या वादविवादाचे संकलन करून

*समुद्रकिनारीचा वादविवाद* नावाचे जे पुस्तक प्रसिद्ध झाले होते, त्याच परीक्षण करण्याच्या निमित्ताने *बाळबोध* मासिकाच्या मार्च १८८८ च्या अंकामध्ये एक लेख प्रसिद्ध झाला. या लेखामध्ये विष्णुबुवांनी ख्रिस्ती धर्मप्रचारकांची जी भंबेरी उडविली, त्यासंबंधाने विष्णु-बुवांच्या स्तुतिपर मजकुर प्रसिद्ध झालेला पाहून बाबांनी *ज्ञानोदयास* पत्र लिहून त्याचा समाचार घेतला. स्वर्ग-नरक काही नाही. मरणानंतर आत्म्याचा विलय होतो. वडिलोपार्जित धर्म आचरण्यास बुवा सांगतात तर जातिभेद, खान-पान निषेध ते मानीत नाहीत. तसेच धर्माचरण कशास? खावे, प्यावे, चैन करावी. पुढे मेलो म्हणजे आटोपले. कधी इंग्रज सुधारलेले, ख्रिस्त उत्तम पुरुष असे म्हणतात, तर कधी इंग्रज अक्षरशत्रू, रानटी इ. परस्पर विरुद्ध सांगतात. अशा प्रकारे विष्णुबुवा मूर्ख, विसंगत बोलणारे, ढोंगी बोलणारे व नास्तिक मताचा फैलाव करणारे असा आरोप बाबांनी आपल्या एका पत्रात जाहीर रीतीने मांडला.[13]

## बाबांचा विष्णुबुवांवर हल्ला

विष्णुबुवा ब्रह्मचारींनी *भावार्थसिंधू, वेदोक्तधर्म प्रकाश, सुखदायक राज्यप्रकरणी निबंध चतुःश्लोकीभागवत याचा अर्थ, सहज स्थितीचा निबंध, वेदोक्त धर्माचा ख्रिस्ती विचार व ख्रिस्ती धर्म मतखंडन, सेतूबंधनी टीका* इ. ग्रंथरचना केली. अंतःस्फूर्तीच्या बळावर त्यांनी ही ग्रथनिर्मिती केली. आपल्या परीने जीवनाचे एक सर्वांगीण आणि अनेक बाबतीत पुरोगामी असे तत्त्वज्ञान त्यांनी आपल्या गद्यपद्य ग्रंथातून मांडले. मात्र आपल्या या तत्त्वज्ञानाचे मूळ वेदात आहे असा त्यांचा आग्रह होता. विष्णुबुवांचा *वेदोक्तधर्मप्रकाश* सातशेहून अधिक पृष्ठांचा ग्रंथराज आहे. ग्रंथगत विषयाचे विस्तृत क्षेत्र व बुवांच्या विचारविश्वाची भवितव्यता इ. गोष्टींची कल्पना यामुळे येते. वेदोक्तधर्म, न्याय, आज्ञा, निराकार देव, पुराणोक्त नीतिकथा, वेदोक्त सृष्टिनियम व त्याची प्रमाणे, श्रीकृष्णावताराच्या कथा, वेदोक्तधर्माचा थोरपणा, ज्योतिषशास्त्रातील नावे व सिद्धांत, धर्मसंबंधी लोकांच्या प्रश्नांची उत्तरे, वेदोक्तधर्माची मार्मिक प्रश्नोत्तरे, आत्मज्ञानप्राप्तीविषयक कथा, हटयोग, राजयोग, राजनीती, अनेक मतांच्या लोकांस सुबोध, पितापुत्र संवाद, माताकन्या संवाद, विचारप्रदर्शन, म्लेंछमत, मंत्रशास्त्र, सत्याचा वाद, नास्तिकाना जिंकण्याचा वाद, प्रार्थना, सुभाषित, हकीगत, असे हे वैचारिक जडजवाहीर बुवांच्या ग्रंथखजिन्यात होते. 'सर्व प्रजा एक कुटूंब' ही मध्यवर्ती कल्पना बुवांच्या *सुखदायराज्यप्रकरणी निबंधात* होती. इतके असूनही बुवांच्या या साऱ्या कल्पना तत्कालीन समाजरचनेच्या संदर्भात केवळ स्वप्नरंजक ठरल्या. आधुनिक ज्ञान-विज्ञानाशी परिचय नसल्यामुळे विष्णुबुवांचे मूलगामी विचार विक्षिप्त ठरले. आपले विचार कृतीत उतरविण्यासाठी जी संस्थात्मक कार्य करण्याची आवश्यकता असते त्याची जाणीव त्यांना नसल्यामुळे त्यांचे विचार प्रभावी ठरू शकले नाहीत. ग्रंथरचना, वैदिक धर्मप्रसाराचा खटाटोप व संन्यासप्रणीत मुक्त वैयक्तिक आचारसंहितेचे पालन हे विष्णुबुवांचे विशेष होते. अशा माण-साला केवळ ख्रिस्तीधर्मविरोधी, ख्रिस्तीधर्मप्रचारास अडथळा म्हणून बाबांनी धारेवर धरले. संयम सोडून काही वेळा कमरेखाली वार केले, उपरोध व उपहासात्मक हल्ला केला. सदोष

तर्कपद्धती, राजनीती, सामाजिक जाणिवा व वादपटुत्व यांचा अभाव आणि विक्षिप्तपणा यांचा आरोप बाबा बुवांवर करतात. *बाळबोधा*तील परीक्षणाच्या निमित्ताने एकच पत्र लिहून बाबांचे समाधान झाले नाही. त्यांनी लगोलग दुसरे पत्र लिहिले व पुन्हा बुवांचा समाचार घेतला. ते पत्र असे :

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस,

वि. वि. विष्णुबुवा यांजविषयीचे आपण माझे पहिले पत्र छापिले म्हणून आपले उपकार मानितो. आता कृपा करून ह्या दुसऱ्या पत्रास जागा द्यावी.

*बाळबोधा*चे कर्ते म्हणतात की, 'वाद करण्याच्या कामात बाबा मोठे प्रवीण होते.' ज्याप्रमाणे मागच्या पत्रात 'बावांचा कावा' या नावाच्या एका हिंदूच्या पुस्तकाचे उतारे घेतले होते, त्याप्रमाणे यावरील लेखनाच्या संबंधाने एका हिंदूने १८५६ त मुंबईतील एका वर्तमानपत्रात जे लिहिले होते ते आपल्या वाचकास कळवितो.

'सभा पांडित्य अवलोकन करणारा हिंदू' असे लिहितो की, 'लोक हो, बावासारखी उत्तरे ओनामाव्युत्पन्न चिटलिंगही देऊ शकतील. मी प्रश्नोत्तररूप मासला दाखवितो त्यावरून बावांच्या विद्वत्तेची खातरी होईल :

प्रश्न : हिंदूशास्त्र ईश्वरदत्त आहे यास प्रमाण काय?
उत्तर : अनुभव घेऊन पहावे.
प्रश्न : मूर्तिपूजा करावी की नाही?
उत्तर : शास्त्र वाचून पहावे.
प्रश्न : तीर्थयात्रा कराव्या की नाही?
उत्तर : अनुभव घेऊन कळेल.
प्रश्न : देव किती आहेत?
उत्तर : शोधून पहावेत.
प्रश्न : पुनर्विवाह करावा की नाही?
उत्तर : अनुभव घेऊन पहावा.
प्रश्न : असे भगवे वस्त्र धारण करून काय होते?
उत्तर : अनुभव घेऊन पहावा.
प्रश्न : ब्रह्मा, विष्णू, शिव यांस देव मानावे की नाही?
उत्तर : शास्त्र वाचल्यावर समजेल.
प्रश्न : ब्रह्मचारीबाबा, खरा धर्म कोणता?
उत्तर : अनुभव घेऊन पहा म्हणजे कळेल.

अशा रीतीने प्रश्नोत्तरांचे भाकड पांडित्य या बाबांनी चालविले. ते बिचाऱ्या चिटलिंगास काय समजे? बाबांचे अस्खलित वदनोद्भव पांडित्याचा एकसारखा प्रवाह चालला म्हणजे मुलांस वाटावे की, त्रैलोक्य विजयी ज्ञाता आणि वक्ता दुसरा कोणी होणार नाही. याच्या पुढे साक्षात बृहस्पती आला तरी हे बाबा त्याची चवळी उडवतील. असो. हे असे महान

मुंबाभिमानी यांच्यापाशी हे बाबा त्रैलोक्यविजयी झाले म्हणून त्रैलोक्यविजयी झाले असे कोणी समजू नये. मला असे वाटते की एकाही प्रश्नाचे उत्तर बाबांच्याने समर्पक देववणार नाही.

आता बाबांच्या स्वकीय लेखावरून त्यांच्या विचारांची योग्यता काय होती हे पाहू. बाबांनी *वेदोक्तधर्मप्रकाश* नामक एक ग्रंथ प्रसिद्ध केला त्याला त्या काळात 'गोबाळ ग्रंथ' असे विचारी लोकांनी नाव दिले होते व तो त्या नावास योग्य होता. हे जे कोणी आपल्या मनाचे डोळे उघडून तो वाचतात त्यांस दिसते. ह्या ग्रंथाच्या प्रसिद्धीच्या समयी त्याजवर वर्तमानपत्रातून अनेक चर्चा झाल्या त्यापैकी काही अशा :

ठीक आहे. ही शिक्षा विष्णूस (विष्णुबाबास नव्हे तर विष्णुदेवास) प्रथम केली पाहिजे. कारण त्याने बौद्ध अवतार घेऊन लोकांस वेदधर्म सोडण्यास उपदेश केला व सोडविलेही खरे. (वि पु अंश ३ अ. १८).

बाबांनी 'सुखदायक राज्य प्रकरणी निबंध' या नावाचा एक निबंध लिहिला. तो खरोखरच अनुपमेय आहे. त्याविषयी ते स्वत: असे म्हणतात की, 'असा राज्यकारभार एका शतकापर्यंत चालेल तर दुसऱ्या शतकातील प्रजा हल्लीच्या राजांना व न्यायाधिशांना ते मनुष्य नव्हते, ते जनावर होते असे म्हणेल.'

ह्या 'वरदी' ग्रंथकाराच्या राज्यव्यवस्थेच्या नियमापैकी एक नियम येणेप्रमाणे आहे— 'राजाने असे समजावे की राज्य हेच एक घर व प्रजा हेच कुटुंब. राजाने प्रजेकडून सर्व जमिनीची लागवड करावी. गायी, म्हशी इ. साठी गवत व मनुष्यासाठी उत्पादन करून गावोगाव कोठारे भरून ठेवावीत व त्यातून सर्व गावकऱ्यांनी नेत जावे. सोन्यारुप्याचे अलंकार तयार करून गावोगाव ठेवावेत व ते सर्व स्त्री–पुरुषांनी वापरावेत व पुन्हा राजाच्या खजिन्यात ठेवावेत. सर्वांची लग्ने राजाने करावीत. ज्याला जी स्त्री नको त्याला दुसरी करून द्यावी व तिला दुसरा पति करून द्यावा. पाच वर्षांची पोरं झाली म्हणजे मुली व मुलगे राजाच्या ताब्यात द्यावीत.'

बाबा काही साधारण पुरुष नव्हते. त्यात *बालबोधा*च्या कर्त्यांच्या मताप्रमाणे केवळ एका दत्तात्रयाचा वर मिळाला असे नाही तर शंकर-पार्वती राम-सीता यांनी अनेक वेळ अरण्यात त्यांस दर्शन व वर दिला इतकेच नव्हे तर ज्या जगदंबेचा तुकाराम बाबांनी कायावाचामनें करून त्याग केला होता व जिचे नाव सुद्धा वेदांत आढळत नाही, तिने त्या विष्णुबुवास मांडीवर घेऊन कुरवाळून त्याचा मुका घेतला आणि ती त्यांस पृथ्वीचे राज्य देत असतांना ह्यांनी ते घेतले नाही. (*वेदोक्तधर्मप्रकाश* पृ. ५३८ ते ७४७).

अशा साक्षात्कारप्रचुर महापुरुषाचे ग्रंथ व मते साधारण बाबा वाक्यं प्रमाणं प्रमाणे म्हणायचे नाही तर ते श्रुतिवाक्य, आप्तवाक्य समजायचे. फ्रान्स, जर्मनी इ. देशांतील कम्युनिस्ट, सोशॅलिस्ट इ. कांस ही राजनीति पसंत होईल. कारण त्यांची मते कांही प्रकारे अशीच आहेत. असो ते तर दूर राहिले. परंतु आमच्या लोकांनी घरापुढे आलेल्या वाहत्या गंगेत हात धुवून स्वदेश कल्याण करून घ्यावे. *बालबोध* कर्त्यास आम्ही सूचवितो की, त्यांनी ह्या राज्य-

प्रकरणी निबंधाच्या प्रती आपल्या 'नॅशनल कॉंग्रेस व सोशियल कॉंग्रेस' या सभेत पाठवाव्यात. त्यांतील नियमांप्रमाणे राज्यव्यवस्था करण्याविषयी त्या सभांच्या द्वारे 'वायसराव' साहेबास अर्ज करावे. बाबासाहेब स्वत: या निबंधाच्या प्रस्तावनेत असे म्हणतात की, हल्ली या भूलोकावर अनेक राज्ये आहेत, परंतु ती चालविणाऱ्याची खरी राजनीती काय आहे हे माहीत नाही व प्रजा कोणत्या उपायाने गुन्हे करणार नाही, हे माहीत नाही. यामुळे सर्व राजे व सर्व प्रजा इ. मनुष्यास सर्वकाळ चिंताग्रस्त व हायहाय करीत फिरत आहे. यास्तव या लहानशा निबंधात लिहिलेली राज्य करण्याची रीत राजांनी पकडावी व प्रजेने त्या राजरीतिप्रमाणे वागण्याची रीति पकडावी.'[१४]

## समुद्रकिनारीचा वादविवाद

विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी वेदोक्तधर्माला विरोध करणारा धर्म म्हणून ख्रिस्ती धर्माला व त्याच्या प्रसाराला भाषणे, वादविवाद इ. च्या साह्याने विरोध केला. वाई, सातारा, सांगली, मिरज, पुणे, नगर या ठिकाणी बुवांनी प्रवचने दिली. मुंबईला तर सर्वधर्मियांना मुक्तद्वार असलेले वादविवाद त्यांनी घडवून आणले. हे वादसत्र मुंबईला इ. स. १८५७ पासून दर गुरुवारी समुद्रकिनारी होत असे. वाद अर्थात ख्रिस्ती मिशनरी विरुद्ध विष्णुबुवा ब्रह्मचारी असा असे. बाबांच्या या प्रयत्नामुळे ख्रिस्ती धर्मप्रचारकांची बरीच कुचंबणा झाली. विष्णुबुवांनी काही काळ या प्रचारकांना हतप्रभ व निष्प्रभ केले. *वेदोक्तधर्माचा विचार व ख्रिस्तीमत मंडन* (इ. १८७४) हे पुस्तक त्यांनी लिहिलेले आहे व *समुद्रकिनारीचा वादविवाद* (इ. १८७२) हा जी. बोएन यांनी संपादन केलेला ग्रंथही बाबांच्या (विष्णुबुवांच्या) नावावर समाविष्ट करता येईल. बाबा पदमनजींनी विष्णुबुवांवर जी उपरोध उपहासात्मक जहाल टीका केली ती ख्रिस्ती धर्म मंडनातूनच केली आहे. बाबांनी ख्रिस्ती धर्माच्या प्रचारासाठी हाती कंकण बांधले होते. कोणत्याही वाङ्मयप्रकाराचा बाबांनी आश्रय घेतला तरी त्यातून आपली लेखणी बाबा ख्रिस्ती धर्मासाठी झिजवतात. वेदोक्तधर्माभिमानी विष्णुबुवा व ख्रिस्ताभिमानी बाबा हे परस्परास प्रतिपक्षीय मानतात यात नवल नाही. बाबांनी विविध प्रकाराने विष्णुबुवांना नामोहरम करण्याचा प्रयत्न केला आहे. तो फारसा यशस्वी झाला आहे असे वाटत नाही.

बाबा पदमनजींच्या एका पत्राचा काही महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे असून त्यात बाबांची धर्मनिष्ठा प्रकट होते. या पत्रास बाबा पदमनजींनी हिंदू व ख्रिस्ती या दोघास सारख्याच प्रिय असलेल्या 'बोएन' साहेबाने रचलेल्या *समुद्रकिनारीचा वादविवाद* ह्या पुस्तकातील प्रस्तावनेने सुरुवात केली आहे. त्यात ते म्हणतात की,

मी १८५६ मध्ये परभू लोकांच्या विद्यालयात व १८५७ साली समुद्रकिनारी ब्रह्मचारी बाबांशी ख्रिस्ती धर्मावर पुष्कळ वादविवाद केला. त्यातील हकीकती *बॉम्बे गार्डियन* मधून आपण प्रसिद्ध केल्या आहेत. त्यात बाबांची कोणतीच शंका निरसन केल्याचे राहिलेले नाही.[१५] बाबांनी ख्रिस्ती लोकांशी वादविवाद करून त्यांना चूप बसविले व त्यांच्या तंगड्या त्यांच्याच 'गळ्यात घातल्या' हे *बाळबोध*कर्त्याचे मत कसे हास्यास्पद आहे व समुद्रकिनारी

व इतरत्र झालेल्या वादविवादात बोएनसाहेबाने बुवांना चारी मुंड्या चीत कसे केले आहे, हे बाबा आवेशाने सांगतात. ह्या पुस्तकाच्या शेवटी बोएनसाहेब म्हणतात,

> बाबांशी वाद करण्यास मला हा प्रसंग मिळाला म्हणून मी देवाचे आभार मानतो. जी नास्तिक मते ह्या सभेत निघाली ती मुंबईत फार दिवस घोटाळत होती, आणि ज्यांनी ही मते धरली होती त्यांस आता समजले की, ख्रिस्ती धर्म त्याचे खंडन करण्यास समर्थ आहे

हे उद्‌गार उदधृत करून *बाळबोध*कर्त्यांचे तोंडच आपण गप्प केले आहे, असे बाबांना वाटते.

'परमार्थसाधनाच्या संबंधाने सगळे धर्म सारखे आहेत. त्यात कमीजास्त कोणताहि नाही, असा जो ग्रह आमच्या मंडळीत अलीकडे झालेला दिसतो, त्या ग्रहास विष्णुबुवा ब्रह्मचारी ह्यांच्या भाषणांनी व वादविवादांनी पुष्कळ भर पडली असावी' हे *बाळबोध*कर्त्यांचे मत बुवांची ग्रंथांतरीची वचने उदघृत करून फोल ठरविण्याचा प्रयत्न बाबांनी केला आहे. बाबा म्हणतात

> जोपर्यंत ख्रिस्ती लोक स्वधर्मप्रचाराचे यत्न व त्याला यश येण्यासाठी प्रार्थना करण्याचे सोडीत नाहीत तोपर्यंत बाबांसारखे सहस्त्रावधी ब्रह्मचारी जरी उत्पन्न झाले तरी ख्रिस्ती धर्मास धक्का पोहोचावयाचा नाही.

'ख्रिस्ती धर्म चालू आहे पण बाबा निवर्तले' याची जाणीव *बाळबोध*कर्त्यांना उपहासाने करून देण्यात या पत्रात बाबांनी धन्यता मानली आहे.

बुवांना 'आत्मश्लाघी, गर्विष्ट, आत्यंतिक अहंकारी' अशी शेलकी विशेषणे बाबा बहाल करतात. त्यांच्या आत्मनिवेदनातील 'मला दत्तात्रेयाचा वर आहे. त्यामुळे मला बोलण्यात कोणी जिंकील असे नाहीच. लाखों मनुष्यांवर वादविवाद करून मी त्यांची मते खंडन केली आहेत. मला हजारो मनुष्यांच्या सभेत ज्या ज्या समयास जे जे पाहिजे तेच सुचते. 'ही वाक्ये उद्‌धृत करून' 'ज्ञानी कोठे? शास्त्री कोठे? व या जगातील वादविवाद करणारा कोठे?' असे छद्‌मी प्रन करून विष्णुबुवा बह्मचारी किती क्षुद्र होते हे सांगण्याचा आटापिटा बाबांनी केला आहे.

**पंडिता रमाबाई व बाबा पदमनजी**

पंडिता रमाबाईंचा जन्म इ. स. १८५८ साली झाला. त्यांचे वडील अनंतशास्त्री हे होत. बाईंनी लहानपणीच संस्कृताध्ययन केले. १६ वर्षेपर्यंत त्या अविवाहित होत्या. वडील व आई दोघांनी रमाबाईस संस्कृत शिक्षणाचा वारसा दिला. ६ महिन्याच्या अंतराने ती उभयता निवर्तली. त्यांच्या घरची अत्यंत गरीबी होती. रमाबाई व त्यांचा भाऊ यांची भ्रमती सुरू झाली. स्त्रीशिक्षणाचा त्यांनी पुरस्कार केला. भावाच्या निधनानंतर त्यांनी बंगाली पदवीधराशी विवाह केला. प्रथम त्यांचा हिंदू व ख्रिस्ती कोणत्याच धर्मावर विश्वास नव्हता. लग्नानंतर १९ महिन्यांनी रमाबाईचा पती कॉलऱ्याने निधन पावला. पतिनिधनानंतर अल्पावधीतच पंडिता रमाबाईंनी एका कन्येस जन्म दिला.

विधवा रमाबाई संस्कृत अध्ययन करीत. पुण्यात त्यांनी 'आर्यमहिला समाज' स्थापन केला. स्त्रीशिक्षण, बालविवाहाचा निषेध इत्यादींचा प्रचार त्यांनी केला. नंतर त्या इंग्लंडला

गेल्या. इ. स. १८८४ मध्ये इंग्रजी भाषा शिकल्यावर त्या संस्कृतच्या प्रोफेसर झाल्या. इ. स. १८८६ मध्ये त्यांनी किंडरगार्डन अध्यापकांच्या कॉलिजात नाव घातले. इ. स. १८८७ मध्ये बोस्टन येथे त्यांनी 'रमाबाई असोसिएशन' सुरू केले. इ. स. १८८७ मध्ये 'शारदा सदन' सुरू झाले. इ. स. १८९३ मध्ये त्यांना सल्लागार समितीने सतावले होते. २९ सप्टेंबर १८८३ रोजी त्यांनी बाप्तिस्मा घेतला. मायलेकींनी धर्मांतर केले.

पंडिता रमाबाई ख्रिश्चन झाल्या तरी त्या उदारमतवादी होत्या. त्यांच्या वर्तनात कर्मठपणा नव्हता. बार्शीसारख्या खेडेगावात त्यांनी देवळात जाऊन व्याख्यान दिले. आपण पूर्वी हिंदू होतो. आईवडील हिंदू होते. आपणावर ते संस्कार झालेले आहेत. देवळात वा मशिदीत जाऊन व्याख्यान देणे पुराण वा कुराण यातून काही उतारे ऐकविणे यात त्यांना विशेष निराळे असे काही वाटले नाही. पण बाबा पदमनजींनी मात्र या निमित्ताने त्यांच्यावर जाहीर पत्रातून टीकेची झोड उठविली. अशी तीन पत्रे झाली आहेत.

### ख्रिस्ती धर्माचा कडवा अभिमान

बाबा पदमनजी व पंडिता रमाबाई दोघेही वास्तविक पाहता प्रथम हिंदूच होते. नंतर दोघांनीही धर्मांतर केले. दोघेही ख्रिस्ती झालेले. अर्थात प्रत्येकाची धर्मांतराची कारणे विविध असू शकतील. बाबा पदमनजींनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यावर कर्मठपणाने त्याचे पालन केले. स्वपत्नीस धर्मांतराचा सल्ला त्यांनी दिला. परिस्थितीने ते जमले नाही. बाबांनी घटस्फोट घेऊन ख्रिस्ती लग्न केले. दोनतीन वर्षांनी हिंदू पत्नी बाबांच्या (पतीच्या) आश्रयास येऊ इच्छित होती. पण बाबांनी ख्रिस्ती धर्माप्रमाणे 'मला दोन स्त्रियांशी लग्न करता येणार नाही. तू ख्रिस्ती हो. तुझे लग्न करून देईन' असा सल्ला दिला. वाडीतली फुले तोडण्यास आलेल्या विधवेला मूर्तिपूजेसाठी फुले हवीत हे कळताच बाबांनी तिला मज्जाव केला. त्याच-प्रमाणे पंडिता रमाबाईने परदेशातून परत आल्यावर बार्शीस व्याख्यान दिले, हे व्याख्यान देवळात झाले. मंगलाचरण, सरस्वती, गणपतिस्तुती, दीप, आरती, नमस्कार इ. प्रकार त्या वेळी झाले अशी वार्ता पसरली, पुराणातील प्रसंगावर बाईंनी उपदेश केला, वगैरे माहिती बाबांच्या कानावर येताच ख्रिस्ती धर्मात मज्जाव असलेल्या गोष्टी पंडिताबाईंनी आचरून अनन्वित कृत केले असा बाबांचा ग्रह झाला. त्यांनी बाईंना खरमरीत जाहीर पत्र लिहिले. खुलासा मागितला. या वाग्युद्धात समोर 'स्त्री' आहे, काही स्त्रीदाक्षिण्य दाखवावे याचे भान बाबा ठेवीत नाहीत. धर्माच्या बाबतीत कोणतीच तडजोड बाबा स्वीकारीत नाहीत. *ज्ञानोदयात* या दोघांचा जाहीर पत्रव्यवहार झाला.

### पंडिता रमाबाई व बाबांचा सवाल–जबाब

२९ सप्टेंबर १८८३ रोजी पंडिता रमाबाईंनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. इ. स. १८९९ मध्ये *ज्ञानोदय* पत्रातून रमाबाईंच्या धर्ममतांवरून बाबांच्यात त्यांच्यात व वादविवाद झाला. त्या वादात बाबा पदमनजी ह्यांनी 'ख्रिस्तदास', 'लक्ष' अशी नावे धारण करून पंडिता रमाबाईंवर

कडक शब्दात टीका केली. धर्माच्या बाबतीत आपण कधीच तडजोड स्वीकारणार नाही असे त्यांनी एका पत्रात जाहीरच करून टाकले. ते म्हणतात,

बाईंच्या मते मी हिंदुस्तानचा तिरस्कार करणारा आहे, तर अशी गोष्ट नाही. मी सर्व सुनीतीचा व सुबोधाचा अभिमानी आहे. परंतु तारक सत्याची तडजोड पाहाणारा अथवा कावड करणारा नव्हे. . . लक्ष.[१६]

याच पत्रात बाबा पदमनजींनी पंडिता रमाबाईंनी बार्शीच्या देवळात प्रवचन केले म्हणून त्यांच्या वर टीकेची झोड उठवली. पुराणातील एखादे वाक्य घेऊन व्याख्यान देण्याऐवजी *बायबला*तील वाक्य घेऊन व्याख्यान देता आले नसते का? देवळाऐवजी अन्यत्र व्याख्यान देता आले असते असे त्यांचे म्हणणे. ते लिहितात,

पंडिताबाई म्हणतात की, ख्रिस्ती मनुष्याने हिंदु देवळात हिंदु पुराण सांगितले यात काही अनन्वित केले नाही. विशेषतः मिशनरी लोक जसे मॅजिक लॅन्टर्न दाखविण्यास लोकांस बोलावून धर्मोपदेश करतात वा आपल्या भाषणात व लेखात हिंदु ग्रंथांतील वाक्ये होतात तशातलेच हे पुराणपठण होते.[१७]

पंडिता रमाबाईंनी पण आपल्या एका पत्रातून बाबांचा चांगलाच समाचार घेतला. त्या लिहितात,

लक्ष्यांस (म्ह. बाबा पदमनजीस) हिंदूंच्या पुराणांचा व कुराणांचा एवढा तिटकारा का वाटतो कोण जाणे? ते मराठी भाषा बोलतात. तेव्हा बहुत करून अशा हिंदूंच्या देशातच त्यांचे जन्म झाले असावे असे वाटते. ते ह्या हिंदूंच्या भूमीवर राहिले तरी कसे? हिंदूंचे व मुसलमानांचे तितके अपवित्र असा समज होईल इतका 'सद्धर्माचा आवेश' माझ्या अंगात नाही, हे मी प्रांजलपणे कबूल करते. माझी आईबापे हिंदू होती. त्यांचे नीतिपर उपदेश माझ्या हाडांस खिळून गेलेले आहेत. हिंदुशास्त्रे, स्मृती व पुराणे वगैरेची अध्ययन करण्यात माझे अर्धेअधिक आयुष्य गेले. त्यात त्याज्यांश जरी पुष्कळ आहे तरी चांगला ग्राह्यांशही पुष्कळ आहे. असे म्हणणे जर लक्ष्यांस फार अनन्वित वाटत असेल तर ते खुशाल वाटो.

मुंबई, ता. ११ जुलाई, १८८९. रमाबाई[१८]

अशा प्रकारे पंडिता रमाबाईंच्या राष्ट्रीय दृष्टीकोणाने व औपरोधिक भाषेतील पत्राने बाबांच्या कर्मठ श्रद्धाळू ख्रिस्ती आचारविचारांची भंबेरी उडविली. 'ख्रिस्ती मिशनरी, त्यांचा लाघवी उपदेश, ख्रिस्ती पुस्तकातून हिंदुग्रंथ, पुराणे, तुकाराम, रामदास इ. संतवचनांचा सर्रास उपयोग केलेला बाबांना चालतो, पण आपण हिंदुस्त्रियांसाठी नीतिपर व्याख्यान दिले किंवा पुराण सांगितले तर बाबांना चालत नाही' असे का, असा बाईंचा बाबांना जाहीर सवाल होता. त्या लिहितात,

ख्रिस्ती लोक हिंदूंच्या घरात जातात, पान-सुपारीला जातात, सभांतून, लग्नमंडपातून वगैरे जातात. देवळात जाऊन उपदेश करायला कोणी सांगितल्यास ते नाकारणार नाहीत असे मला वाटते. मात्र त्या देवळात त्यांचा उपदेश कोणी ऐकून घेईल की नाही ह्याचीच शंका आहे.

आपण बार्शीस नवीन पद्धतीचे पुराण सांगितले, उभ्याने व्याख्यान दिले. असे त्या म्हणतात. बाबांच्या संस्कृत ज्ञानाविषयी त्यांनी जाता जाता शंका व्यक्त करून एक कोपरखळीदेखील या पत्रात मारली आहे.

**घराची कळा अंगण सांगते**

बाबा पदमनजींनी अनेक प्रकारच्या टोपणनावांनी पत्रे प्रसिद्ध केलेली आढळतात. विशेषत: पंडिता रमाबाई आणि विष्णुबुवा ब्रह्मचारी या बाबांच्या काळी गाजलेल्या व्यक्तींच्यासंबंधी लिहिताना, आपले धार्मिक मत हिरीरीने मांडताना, ख्रिस्ती धर्माचे मंडन व हिंदूधर्माचे खंडन करताना त्यांनी कधी 'ख्रिस्तदास', कधी 'लक्ष', कधी 'बी.पी.' व कधी 'बा. प.' अशा सहीनिशी *ज्ञानोदयात* पत्रे प्रसिद्ध केलेली आढळतात. प्रतिपक्षावर अत्यंत जहाल टीका त्यांनी प्रस्तुत पत्रांमधून केली. उपहास, उपरोध व मर्मभेद करण्याचा त्यांच्या लेखनगुणांचा परिचय होतो, तो येथेच. बाबांनी पंडिता रमाबाईवर केलेला शाब्दिक हल्ला काही पत्रातून व्यक्त झाला तो पुढीलप्रमाणे :

> पंडिता रमाबाईची धर्ममते नारूच्या तंतूप्रमाणे शनैः शनैः बाहेर पडत आहेत. ह्या बाई विलायतेत ख्रिस्ती झाल्यापासून तर आजदिनापर्यंत त्यांच्या धर्ममतांविषयी अनेक चर्चा वर्तमानपत्रांतून झाल्या, लोकांत नाना प्रकारची कुणकुण चालली व बाजारगप्पा पुष्कळ उठल्या. परंतु त्यांनी स्वतःहून येथील ख्रिस्ती पत्रास खासगत काही लिहून पाठविले नाही अथवा आपल्या ख्रिस्ती मित्रास खासगत रीतीने काही कळविले नाही, किंवा येथे त्यांचे आगमन झाल्यावरही एखादी ख्रिस्ती लोकांची सभा मिळवून खुलासेवार काही मजकूर त्यात निवेदन केला नाही. ह्या बाईंची पहिल्यापासून सर्व ओढ एकेश्वरी मताच्या लोकांकडे आहे.

अशा प्रकारे बाबांनी आपल्या पत्राची सुरुवातच मोठी बोचरी केली आहे. पंडिता रमाबाई संस्कृत जाणणाऱ्या म्हणून त्यांच्याविषयीच्या पत्राचा प्रारंभ मुद्दाम संस्कृत शब्दांनी करणे, पण त्यातही नारूच्या तंतूचा दाखला देण्याचा खवचटपणा त्यांनी केला आहे. धर्माच्या बाबतीत स्त्रीपुरुष आपपर असा भेदभाव ते करीत नाहीत. स्वधर्माविरुद्ध जो कोणी उभा ठाकेल त्याचे पारिपत्य आपल्या तरवारीसमान लेखणीने ते करीत असताना आढळतात.

बाबा लिहितात,

> 'अस्तु. घराची कळ अंगण सांगते, अशी एक म्हण आहे. त्याप्रमाणे पत्रिकेतील पूर्व-भागाच्या वरून पंडिताबाईची धर्ममते काय असतील याचे अनुमान करिता येते. संपूर्ण *बायबल* अस्सल नाही, त्यात मागाहून घुसडून दिलेले 'क्षेपक भाग' व 'पोटभेद' पुष्कळ आहेत, हे एक त्यांचे मत बाहेर पडले आहे. दुसरे हे की, सर्व *बायबल* ईश्वरप्रेरित नाही, केवळ ख्रिस्ताचा जो उपदेश समूह आहे तोच काय तो 'अनादि व दोषशून्य सत्यांनी' भर-लेला आहे, असेही पत्रिकाद्वारे प्रगट झाले आहे.[१९]

म्हणींचा वापर, मर्मभेदक उपहासपर संस्कृत शब्दयोजना इत्यादी अस्त्रांचा वापर बाईंच्या

धर्ममतावर हल्ला करताना बाबांनी वरीलप्रमाणे उपयोगात आणला.

पंडिता रमाबाई ख्रिस्ती असूनही त्यांचा ओढा एकेश्वरी मताकडे आहे, याचा बाबांना राग दिसतो. त्या आपली धर्मविषयक मते ख्रिस्ती पत्रात प्रसिद्ध करीत नाहीत. *बायबल*मधील सर्व गोष्टी त्यांना खऱ्या वाटत नाहीत. *बायबलात* प्रक्षेपित भाग आहे, ते ईश्वरनिर्मित नाही इ. त्यांची मते आहेत. *बायबल*चे भाषांतर देखील त्यांना पसंत नाही, वगैरे तर्कुतर्क बाबांनी आपल्या पत्रात मांडले आहेत. पंडिता रमाबाईंचे आचरण ख्रिस्ती धर्माप्रमाणे नाही अशी रुखरुख बाबांना लागल्याचे दिसते. रमाबाईंनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला नाही कारण त्यांची श्रद्धा त्या धर्मावर नाही, तो धर्म त्याना स्वीकारावयास भाग पाडला असे त्या वेळी लोक म्हणत असत. बाबांनाही ही गोष्ट फार खटकते असे त्यांच्या पत्रांवरून दिसून येते. रमाबाईंच्या वर्तनावरून त्यांना हिंदूधर्म प्रिय आहे असा समज होतो. त्याविषयी त्या खुलासा करीत नाहीत म्हणून बाबा चिडलेले दिसतात. रमाबाईंनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला तरी त्या ख्रिस्ती धर्माभिमान दाखवित नाहीत, हिंदूधर्मास दोष देत नाहीत, कर्मठ ख्रिस्ती धर्म आचार पाळीत नाहीत म्हणून तर बाबांनी रमाबाईंवर ही टीकेची झोड उठविली आहे. बाबांच्या पत्रातील वाक्यावाक्यावरून ख्रिस्ती धर्माचा कडवा अभिमान व्यक्त होत आहे.

प्रस्तुत पत्रात बाबांनी पंडिता रमाबाईंच्या ख्रिस्ती धर्ममताचे वाभाडे काढलेले दिसतात, पंडिता रमाबाई इंग्लंड अमेरिकेहून परतल्यावर त्यांनी इंग्लंडमधील जातीभेदाचा उल्लेख केला. इंग्लंडमधील धर्मासंबंधी जुलूम करणाऱ्या वर्गाची माहिती दिली. हिंदुस्थानात आल्यावर उच्च वर्णियांशी संबंध ठेवले. शूद्र, अतिशूद्र यांची बाजू घेऊन हिंदूधर्मदोषदिग्दर्शन केले नाही. *सुबोध पत्रिका*, *ज्ञानदीप* इ. पत्रात धर्मविषयक मते जाहीर केली. *ज्ञानोदय*, *सत्य दीपिका* ख्रिस्ती पत्रांशी संपर्क साधला नाही. त्यांचे वर्तन कर्मठ ख्रिस्तीसारखे नव्हते व आचरणात उदारमतवाद दिसत होता. *बायबलात*ले वाक्य प्रवचनासाठी न निवडता त्यांनी पुराणातले वाक्य विवेचानासाठी घेतले. ख्रिस्ती उपदेश न करता व्याख्यान म्हणून प्रवचन पद्धतीचे विवेचन केले. बाबा पदमनजींना हे अर्थात सहन झाले नाही. त्यांनी सडेतोडपणे, स्पष्ट शब्दात बाईंच्या धर्ममतावर हल्ला चढविला. बाईंचे धर्ममत कसे पाखंड आहे हे उघड केले. या पत्रव्यवहाराच्या निमित्ताने धर्मांतरीत ख्रिस्ती व्यक्तींचे वेगवेगळे मनोधर्म स्पष्ट झाले. अर्थातच बाईंची बाजू सबळ व राष्ट्रीय वृत्तीची असल्याने तिचा उजळपणा स्पष्ट झाला.

बाबा एका पत्रात लिहितात,

> *बायबलात*ील ख्रिस्ती धर्म काय आहे हे पत्रिकेतील मजकूर लिहिणारास पंडिताबाईपेक्षा चांगले समजते असे म्हटले पाहिजे . . . तेथून त्यांनी धर्माचा चोथा आणावा ही मात्र अत्यंत शोचनीय गोष्ट होय. पंडिताबाईंनी अमृत टाकून धूण घेतले. परीस फेकून पाषाण पदरी बांधला.[२०]

या अधिक्षेपाने बाई चिडल्या नाहीत हे विशेष.

बाबांनी या पत्रात रमाबाईस्वीकृत ख्रिस्ती धर्मात कोणकोणते दोष आहेत याची निर्भीड चर्चा केली आहे. *बायबलात*ील ख्रिस्ती धर्म त्यांनी समजून घेतला नाही. 'खऱ्या ख्रिस्ती

बा. प. १६.

धर्माचा भोग काढून घेऊन त्यांनी त्यांत युनिबेरियन पाखंडाचा पेंढा भरला आहे.' तात्पर्य बाईंचा ख्रिस्ती धर्म स्वकपोलकल्पित आहे. असे बाबांचे म्हणणे आहे. इतकी वर्षे इंग्लंड अमेरिकेत राहून पंडिता रमाबाईंनी खरा ख्रिस्ती धर्म जाणला नाही याबद्दल त्यांनी खेद व्यक्त केला आहे. पत्राच्या शेवटी थोडक्यात बाईंना ख्रिस्ती धर्मातील कोणकोणत्या गोष्टी मान्य नाहीत याची एक यादीच दिली आहे. तसेच बाईंनी प्रोटेस्टंट ख्रिस्ती लोकांच्यासाठी त्या यादीतील प्रत्येक गोष्टीचे जाहीर स्पष्टीकरण द्यावे अशी विनंतीही करतात. ख्रिस्ती धर्मावरची कमालीची निष्ठा, ख्रिस्तावरचा परम विश्वास, ख्रिस्ती शास्त्राचा सखोल अभ्यास इत्यादी बाबांच्या विशेष गोष्टी प्रस्तुत पत्रावरून स्पष्ट होतात.

बाबांनी ख्रिस्ती धर्माचा सूक्ष्म सखोल अभ्यास केला होता. शास्त्रावर त्यांचे प्रभुत्व होते. बाबांनी याच पत्रात पंडिता रमाबाईंच्या ख्रिस्तीमतात पाखंड कसे आहे याचा उलगडा केला आहे. 'दाहांची दाहा कपोलकल्पित मते' असे पंडिता रमाबाईंचे ख्रिस्ती धर्ममत असे बाबा त्यास संबोधतात. ईश्वराच्या त्र्यैक स्वरूपाविषयी ही पाखंडे आहेत. हिंदूंच्या त्रिमूर्तीसारखेच काहीजण हे त्र्यैक स्वरूप मानतात. येशू ख्रिस्ताच्या देवत्वास नकार देणारे हे पाखंड आहे. त्याची भक्ती परमेश्वराप्रमाणे करू नये असेही त्यांचे मत आहे. पंडिता रमाबाईंचे असेच अकरावे पाखंड वा कपोलकल्पित मत ख्रिस्ती धर्माबाबत आहे असा बाबांचा दावा या पत्रात उघड झाला. आपल्या मताच्या पुष्टयर्थ बाई *बायबला*मधील उतारा घेताना त्या श्रेयस्कर तेवढाच भाग घेतात. संपूर्ण उतारा वा मागचा पुढचा संदर्भ सोडून देतात, हे बरोबर नाही. त्याचे कारण बाईंची ख्रिस्तनिष्ठा डळमळीत आहे, असे बाबा देतात.[२१] ख्रिस्ती झाल्यापासून आज दिनापर्यंत त्यांच्या धर्ममताविषयी अनेक चर्चा वर्तमानपत्रातून झाल्या. लोकांत नाना प्रकारची कुजबुज चालली व बाजारगप्पा पुष्कळ उठल्या परंतु त्यांनी स्वतः होऊन येथील ख्रिस्ती पत्रास काही लिहून पाठविले नाही, अथवा आपल्या ख्रिस्ती मित्रास खासगत रितीने काही कळविले नाही, किंवा एथे त्यांचे आगमन झाल्यावरही एखादी ख्रिस्ती लोकांची सभा मिळवून खुलासेवार मजकूर त्यास निवेदन केला नाही.[२२] बाबा पदमनजींच्या मते बाईंचा ओढा एकेश्वरी मताकडे कारण त्यानी *ज्ञानदीपक* या प्रार्थनासमाजाच्या पुस्तकात बरीच पत्रे प्रसिद्ध केली. *ज्ञानोदय*, *कुटुंबमित्र*, *सत्यवादी* इत्यादीमध्ये मात्र काही प्रसिद्ध केले नाही. त्यांचे नातलग पण त्या समाजाचे आहेत वगैरे वगैरे या पत्रात बाबा पदमनजींनी सुरुवातच संस्कृतनिष्ठ भाषेने केली. पंडिताबाई 'संस्कृतबाई' (बाबांच्या मते) होत्या. म्हणून तर हा पर्याय त्यांनी स्वीकारला नाही. तरीही बाईंनी आपली धर्ममते एकदा स्वतः प्रसिद्ध करावीत. अस्तु. 'घराची कळा अंगण सांगते' या म्हणीप्रमाणे *सुबोधपत्रिके*तील बाईंच्या पत्रावरून त्यांची धर्ममते काय असतील याचे अनुमान काढता येते. संपूर्ण *बायबल* अस्सल नाही. त्यात काही भाग प्रक्षिप्त आहे. सर्व *बायबल* ईश्वरप्रेरित नाही. त्यातील ख्रिस्ताचा उपदेश समूह तेवढा अनादि व दोषशून्य सत्यांनी भरलेला. हे एक बाईंचे मत. पण त्यामुळे हिंदू विचारतात की, तो भाग तरी अस्सल कशावरून? तीच गोष्ट *बायबल*च्या भाषांतराविषयी त्यांच्या मतें आहे. सुधारलेले भाषांतर ( revised

version ) त्या पसंत करतात. या त्यांच्या मतांमुळे ख्रिस्ती धर्माच्या 'जिव्हाळ्याची अंगे' जी आहेत व म्हणून बाई जर ती छिन्न विछिन्न करू लागल्या तर त्यांचा बंदोबस्त आपण केलाच पाहिजे. विश्वासातील अंतर ख्रिस्तदासाने उघड करून दाखविले आहे. त्यानंतर १८ एप्रिल रोजी प्रसिद्ध केलेल्या पत्रात पंडिता रमाबाईंनी म्हटल्याप्रमाणे,

> दाहाची दहा कपोलकल्पित मते व युरोपियन पाखंडाविषयीचा मजकूर विस्ताराने लिहिला आहे. पंडिताबाई आपल्या लेखात ख्रिस्ती शास्त्रातील प्रमाणार्थ म्हणून जी वचने घेतात त्यांचे मराठीत अक्षरश: भाषांतर करीत नाहीत, व त्यांचे स्थळही दर्शवीत नाहीत. ही प्रशस्त रीत नाही. आणि त्यापेक्षा अप्रशस्त रीत त्यांनी अशी धरली आहे की, शास्त्रवचनांचा उतारा त्याबरोबर घेत नाहीत.[२३]

पंडिता रमाबाईंच्या टीकात्मक लेखनात कसे दोष होते व कोणती अप्रशस्त रीत होती हे बाबा पदमनजींनी सोदाहरण या पत्रात कथन केले आहे. देवदत्त टिळक म्हणतात त्याप्रमाणे *ज्ञानोदय*कार, बाबा पदमनजी यांनी बाईंना 'सळो का पळो' करून सोडले होते हेच खरे. बाईंनी ही अप्रशस्त रीत लोकांच्या डोळ्यात धूळ फेकण्यासाठी स्वीकारली असे बाबा पदमनजींनी ८ एप्रिल १८८९ च्या पत्रात अगदी शेवटी स्पष्टपणे सांगून टाकले आहे. पंडिता रमाबाईंच्या धर्ममताच्या या झगड्यात त्यावेळी 'मि. सदोबा मिसाळ' यांनीं बाईंच्या बाजूने पत्र लिहिले. त्याची पण हजेरी बाबा पदमनजी यांनी स्पष्ट शब्दात, सडेतोडपणे घेतली. बाबा लिहितात,

> मिस्तर मिसाळ यांच्या पत्राच्या प्रस्तावनेचा मी विचार करीत बसत नाही. ती 'घरापेक्षा ढेकन मोठी' किंवा 'हातभर लाकूड व सात हात ढलपी' ह्या म्हणीप्रमाणे आहे.

त्यानंतर बाईंशी चर्चा करून एकांतात समजूत घालायची होती ती जाहीर चर्चा कशाला? अशा अर्थाच्या एका प्रश्नाचे उत्तर देताना ते मिसाळांना प्रतिप्रश्न करतात.

> पंडिता रमाबाईंनी स्वत: होऊन ज्या गोष्टी वर्तमानपत्राद्वारे चौघात आणल्या त्याविषयी त्यांची समजूत घालण्यास एकांत कशास पाहिजे?[२४]

याच पत्राचा शेवट स्वत:च बोलका असल्याने तो तसाच उदधृत करणे योग्य होईल. तो असा :

> *ज्ञानोदय*कर्ते महाराज, पत्रविस्ताराबद्दल क्षमा असावी. मि. मिसाळ यांच्या शेवटच्या पत्राचा जाब राहिला आहे. तो ख्रिस्ती लोकांस जे सूचनापत्र मला लिहायचे आहे त्यातच सामील केला जाईल ही विनंती. ख्रिस्तदास. या संबंधाने आणखी वादविवाद चालविण्याचे अगत्य नाही.[२५]

अशा प्रकारे बाबा पदमनजींनी आपल्या पत्राने सदोबा मिसाळाच्याही पत्राचा चांगलाच समाचार घेऊन टाकला. या प्रकारे बाबा पदमनजींनी आपल्या पत्रांच्या द्वारे पंडिता रमाबाईंवर त्यांच्या धर्ममत संबंधात टीकेची झोड उठविली. अर्थात यात वैयक्तिक स्वार्थ किंवा द्वेष कुठेच नव्हता. व्यक्तीपेक्षा धर्म मोठा व धर्मसंरक्षण तर त्याहून मोठे याचे धर्मनिष्ठेतून प्रस्तुत पत्रे जन्मास आली.

**बाबा पदमनजी व सदोबा मिसाळ***

सदोबा मिसाळांच्या पत्राची प्रस्तावना 'धरापेक्षा ढेकण मोठी वा हातभर लाकूड व सात हात ढलपी अशी आहे' अशी सुरुवातीसच बाबांनी सदोबांची विकेट घेतली, हे आपण मागच्या पत्रातच पाहिले.

बाबांनी पंडिता रमाबाईंच्या धर्ममतांवर चर्चा केली. त्याच वेळी सदोबा मिसाळ या अहमदनगरच्या एका पत्रलेखकाने बाबांना जाहीर उपदेश केला होता,की बाबांनी ख्रिस्ती धर्मवचनाप्रमाणे पंडिताबाईंची खाजगी भेट घेऊन त्यांना त्यांच्या वर्तनाची जाणीव करून द्यावयाची होती. बाबा म्हणतात,

> पंडिताबाईंनी माझ्यावर खासगत अन्याय तर काही केला नाही. तेव्हा त्यास एकांती सांगण्याचे मला प्रयोजन दिसले नाही. शिवाय हा नियम मंडळीतील ख्रिस्ती भावांविषयी आहे. पंडिताबाई जरी आपणांस ख्रिस्ती म्हणवितात तरी त्या आजपर्यंत कोणत्याही प्रोटेस्टंट मंडळीत मिळाल्या नाहीत व तसे मिळण्याची त्यांची इच्छा नाही. असे मागेच त्यांनी अमेरिकेतील त्यांच्या पत्रांतून प्रसिद्ध केले होते . . . 'स्त्री नाजुक पात्र आहे' हे शास्त्रवचन मि. मिसाळ यांनी पुढे केले आहे. परंतु त्यावरून चालू विषयाच्या संबंधाने काहीच चर्चा केली नाही. ह्या अशक्त पात्राशी मी कोणत्या प्रकारे असभ्यतेने किंवा दांडगाईचे वर्तन केले अथवा त्यांस काही अपशब्द बोललो तर तो सांगायचा आहे.[२६]

हे उद्गार बाबांनी सदोबा मिसाळाच्या पत्रास उत्तर म्हणून लिहिलेले आहेत. बाबा सदोबांना विचारतात की, 'इतर पत्रांनी पंडिताबाईसाहेबांवर अर्वाच्य व अमर्याद शब्दांची वृष्टी केली तेव्हा सदोबा मूग गिळून का बसले होते? तसेच पंडिताबाईंनी स्वतः होऊन ज्या गोष्टी वर्तमानपत्राद्वारे चौघात आणल्या त्याविषयी त्यांची समजूत घालण्यास 'एकांत' कशास पाहिजे? मी पंडिताबाईंसाठी वारंवार प्रार्थना करितो,बाई मजसाठी काय करितात? तसेच बाईंनी ख्रिस्ती हे नाव घेऊन ह्या विशाल कामात यश मिळविले तर ख्रिस्ताच्या नावाने त्या कार्यास आरंभ का करीत नाहीत?' अशा प्रकारचे अनेक प्रतिप्रश्न सदोबा मिसाळांस बाबांनी बाईंच्या संदर्भात विचारले आहेत. पंडिताबाई उघडपणे ख्रिस्तीधर्मपालन करीत नाहीत. तर धर्मविरोधी कृती करतात असा बाबांचा म्हणण्याचा आशय आहे. स्पष्टवक्तेपणा, परखड विचार, शास्त्रावर प्रभुत्व आणि प्रतिपादनात म्हणींचा योग्य वापर इ. बाबींचे विशेष या पत्रात दिसून येतात.

---

* रे. *सदोबा बापूजी मिसाळ* यांचा बाप्तिस्मा घोड नदी येथे झाला. ते प्रथम नगरच्या मिशन शाळेत शिकत होते. पण घोडनदीस मिशनने शाळा काढल्याने तेथे त्यांनी अभ्यास केला. पुढे नगरास बालंटाअिन साहेबाजवळ शास्त्राभ्यास करून सन १८५५ साली सनद मिळविली. नंतर ता. २३ जून १८५९ रोजी त्यांची दीक्षा घोडनदी मंडळावर झाली. त्या मंडळीचे काम त्यांनी फार मेहनतीने केल्यावर ते 'फ्री चर्च' मिशनात मिशनरी झाले व अखेर त्याच कामात असताना त्यांनी जग सोडले. त्यांच्या नावावर पुढील पुस्तके आहेत. (१) '*बोधामृत* किंवा *कुणबी लोकांस पत्रे* (३ आवृत्त्या.) (२) *ज्ञातिभेदावर संभाषण* (३) *शेतकीविषयी संवाद*.

पंडिता रमाबाईंद्दलची बाबांची कटु भावना कालांतराने निवळलेली दिसते, कारण त्यांनी २८ ऑगस्ट १८९५ रोजी आपल्या दैनंदिनीत लिहिले आहे की,

मुंबईतील स्त्रियांच्या वार्षिक सभेकरिता पंडिता रमाबाई ह्या आमच्या शेजारी येऊन राहिल्या आहेत. पूर्वी त्या कित्येक ख्रिस्ती लोकांच्या घरी येऊन उतरत असत, परंतु त्यांची माझी कधी भेट झाली नाही. सुमारे सहा वर्षामागे रेव. मा. निकंबे यांच्या घरी त्यांची क्षणभर गाठ पडली होती, परंतु तो प्रसंग अगदी असमाधानकारक झाला. कारण त्या काळी पंडिता रमाबाईंची धर्ममते निराळयाच प्रकारची असून त्यांनी जे माझ्याशी भाषण केले ते मला अगदी आवडले नाही, इतकेच नाही तर मला दुःखही वाटले. त्या भेटीनंतर त्यांच्या मतांच्या संबंधाने मी *ज्ञानोदयात* काही पत्रे लिहिली व खाजगी रीतीने त्यांच्याशी माझा कित्येक वेळा पत्रव्यवहारही झाला.[२७]

बाईंनी बाबांच्या *अनुभवसंग्रह* या आध्यात्मिक आत्मवृत्ताची आस्थेने मागणी करताच बाबा निवळलेले दिसतात. बाबा मुद्दाम आपण होऊन बाईंची भेट घेतात व त्यांच्या भेटीने प्रभावित होऊन आनंदीत होतात. बाईंनी *अनुभवसंग्रहा*च्या २५ प्रती रोख पैसे देऊन विकत घेतल्यामुळे बाबा कृतज्ञतेने भरून येतात.

ह्या भेटीतून मला फार संतोष झाला. त्यांचे भाषण फार आवडले. खरोखर त्यांच्यामध्ये आता देवाचा आत्मा वसत आहे व त्याच्या बोधाप्रमाणे त्या चालतात, असा मला अनुभव आला. मी त्यांच्याकरिता पुष्कळ प्रार्थना केल्या हे देवाला ठाऊक, त्याविषयीचा उल्लेख माझ्या रोजनिशीत एका ठिकाणी आहे. डॉ. पॅंटिकॉस्ट यांच्या उपदेशावरून देवाने ह्या बहिणीस आपल्या पुत्राविषयी व आपल्या आत्म्याविषयी यथार्थ ज्ञान करून दिले, म्हणून मी त्याचे उपकार मानितो.[२८]

बाबांचे हे मतपरिवर्तन पाहून बरे वाटते.

### गोकुळ अष्टमीच्या त्राक्टाचे स्पष्टीकरण

बाबा पदमनजींनी गणेशचतुर्थी, श्रावणी पौर्णिमा, होळी वगैरे विषयांवर त्राक्टे लिहिलेली आहेत. 'हिंदुसण' साजरे करीत असताना कित्येक मूर्ख समजूती व रूढी असल्याचे त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आले. बाबांनी 'कृष्ण व ख्रिस्त यांची तुलना' केलेली आहेच. कृष्णचरित्रातील रासक्रीडा, गोरस–लोणी इ. वस्तूंच्या कृष्णाने चोऱ्या केल्या, गोधने चोरली इत्यादी पुराणातील कथाप्रसंग आधारास घेऊन बाबांनी कृष्णचरित्रातील ही कृष्णकृत्ये म्हणून रंगविली आहेत. गोवर्धनपर्वत श्रीकृष्णाने उचलून लोकरक्षण केले, कालियामर्दन करून लोकांना संकटमुक्त केले, कंस, चाणूर आदी आसुरांचे निर्दालन करून लोकांना सुरक्षित केले, अनेक विवाह करून असुरांच्या कैदेतील अनेक नारींना सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिली, या कृष्णचरित्रातील आदर्श घटनांचा बाबांनी विचार केला नाही. केला असल्यास त्याचा अर्थ विपरीत लावला. त्यांचा हेतू कृष्णाच्या तथाकथित काळधाकुट्ट बाजूवर ख्रिस्ताची उज्वल बाजू लोकांसमोर आणण्याचा होता. ख्रिस्ती धर्मप्रचारकाच्या भूमिकेशी हे सुसंगत होते. बाबांनी जन्माष्टमी

किंवा गोकुळाष्टमी या नावाचे एक व्राक्ट लिहिले आहे त्यात लिहिले,

महाराष्ट्रातील हिंदू लोक कृष्णास दोष लावीत नाहीत. पण जगन्नाथ पुरीचे लोक कृष्णास शिव्या देतात. कृष्ण त्यांना व्यभिचारी वाटतो म्हणून ते असे वागतात.

अशा अर्थाचे उद्‌गार बाबांच्या व्राकटातील वाचून लोक त्याविषयी चर्चा करू लागले. बाबांना प्रश्न विचारू लागले. त्या सर्वांना बाबांनी स्पष्टीकरणात्मक एक पत्र लिहिले. 'ओरिसा प्रांतात कृष्णसुभद्रेच्या व्यभिचाराची कथा आहे' असे बाबा सांगतात. 'हिंदु देव व धर्म यांच्या कथा कोणत्या एकाच ग्रंथात व प्रांतात एकसारख्या नाहीत. देश व ग्रंथपरत्वे भिन्नता असते. 'पुराणात अनेक दंतकथा असतात. कृष्णचरित्रातील काही दंतकथांचा उपयोग बाबा कृष्णचरित्र कलंकित करण्यासाठी कौशल्याने करून घेतात. शेवटी बाबा म्हणतात,

हिंदु देवाचे वर्णन करण्याचा सर्व ख्रिस्ती ग्रंथकारांचा हेतू केवळ एकच आहे. त्याची निंदा करावी अथवा भक्तांची मने दुखवावी हा त्यांचा हेतू नाही. तर अशा देवाची भक्ती सोडून खरा व एकच देव जो परमपवित्र परमेश्वर त्याला एकच जो तारणारा प्रभू येशू त्याच्याद्वारे शरण येऊन सुखशांती पावावी हाच आमचा सर्वांचा हेतू आहे.[२९]

### इंदुप्रकाशाची ३०० वर्षे पिछेहाट

ऑक्टोबर १८९१ मध्ये *इंदुप्रकाश*च्या संपादकांनी बाबा पदमनजींच्या 'गोकुळ अष्टमी या व्राकटाच्या स्पष्टीकरणावर व त्या व्राकटावर टीकेची झोड उठविली. *इंदुप्रकाश*सारख्या प्रगतीची इच्छा असलेल्या पत्राने ही टीका केली हे बाबांना आवडले नाही. बाबा लिहितात,

ह्या एडिटोरिअलच्या योगे आज ३० वर्षे पुढे पाऊल टाकीत असलेल्या इंदूने ३०० वर्षे पिछेहाट केली असे सर्व विचारी पुरुष म्हणतील. ख्रिस्ती लोकांचा उद्देश्य हिंदुधर्माची अथवा कोणत्याही धर्माची निंदा करण्याचा मुळीच नाही, हे वारंवार सांगणे नको. जर त्यांचे लेख निंदापर आहेत तर त्यांची सर्व पुस्तके सरकारने जप्त करून जाळून टाकली पाहिजेत, मिशने बंद केली पाहिजेत, त्यांच्या शाळा, कॉलेजे मोडली पाहिजेत व त्यांच्या सर्व उपदेशकांची तोंडे बंद करून प्रत्येक मिशिनरीस व क्याटिकिस्टास ज्ञानमठात (तुरुंगात) नेऊन ठेविले पाहिजे, म्हणजे ते तेथे काही तरी ज्ञान शिकून शुद्धीवर येतील.

अशा प्रकारे *इंदुप्रकाशास* लिहिलेल्या उत्तरात बाबांनी *इंदुप्रकाशास* तरी अशी टीका करणे शोभत नाही असे सुचवले आहे. पुढे आपल्या पत्रात बाबा पदमनजी *इंदुप्रकाश*कारांना विचारतात की,

हिंदुधर्मातले तुकारामादि अनेक संत मूर्तिपूजा, शाक्तपंथ, गणपती यांची निंदा करतात. त्यांचा समाचार संपादक का घेत नाहीत? रामदासांनी देखील अनेक देवांचा सावळा गोंधळ धर्मात माजला असल्याचे कथन केले आहे. तसेच प्रत्येक मनुष्याला धर्मसंबंधी स्वतंत्रता बाळगण्याचा व आपल्या धर्माची कर्तव्ये आचरण्याचा हक्क आहे हे न्यायतत्व हिंदू लोकांस कोठून समजले? त्यांच्या मन्वादिक धर्मशास्त्रावरून समजेल कां? ख्रिस्ती माणसे प्राण पणास लावून ख्रिस्ती धर्मप्रसार करणारच, कारण त्यांच्या प्रभूने त्यांस शुभवर्तमानाचा

प्रसार करण्याची आज्ञा दिली आहे.

ही बाबांची प्रबळ धारणा या पत्रात व्यक्त झाली आहे. अशा प्रकारे बाबांनी प्रस्तुत पत्रात संतप्त ब्रह्मदंड सहनतारप् जलाने थंड करण्यास समर्थ असल्याचे दाखवून दिले आहे. पत्राच्या शेवटी इंदूप्रकाशाच्या संपादकीयातील अनेक गोष्टींचा समाचार पुढे घेण्याचे आश्वासन त्यांनी दिले आहे.[३०]

बाबांच्या या उपलब्ध पत्रव्यवहाराने तत्कालीन काही वादांवर फार चांगला प्रकाश पडतो. एरवी शांत, सौम्य वृत्तीचे धर्मप्रवण बाबा ख्रिस्ती धर्माबद्दलच्या उत्कट अभिमानाने आग्रही, एकांगी, असहिष्णु व आक्रमक कसे बनतात, हे धर्मविषयक तुलनात्मक अभ्यासनिदर्शक अशी जी त्यांची पुस्तके आहेत त्यावरून मागच्या प्रकरणातून दाखविले होते. पत्रव्यवहारासारखे मतप्रसाराचे व लोकजागृतीचे साधन हाती सापडल्यानंतर त्याचा आपल्या कडव्या धर्माभिमानापोटी बाबांनी चांगला उपयोग करून घेतला आहे. त्यांच्या कडवेपणामुळेच ही पत्रे परिणामकारक उतरली आहेत यात शंका नाही. 'वृत्तपत्र' ही एक नवी शक्ती, नवी जाणीव पाश्चात्यांनी आपल्याला दिली. वृत्तपत्रातील सार्वजनिक स्वरूपाचा पत्रव्यवहार अधिकाधिक लक्ष्यवेधी करण्यामध्ये अव्वल इंग्रजीत व नंतरच्या काळातले महत्वाचे श्रेय बाबांना दिले पाहिजे. अर्थातच बाबांचा पत्रव्यवहार धार्मिक बाबींपुरताच मुख्यत्वेकरून मर्यादित आहे, हे लक्षात घेतले पाहिजे.

## टीपा

१. *अनुभवसंग्रह*, भाग १, मुंबई, १८९५, पृ. १९.
२. *अनुभवसंग्रह*, भाग २, मुंबई, १९०४, पृ. १९.
३. *अनुभवसंग्रह*, भाग २ उनि., पृ. ४८.
४. 'प्रस्तावना', *अरुणोदय*, मुंबई, १८८८, पृ. ७.
५. 'प्रस्तावना', *अनुभवसंग्रह*, भा. १, उनि. पृ. ७.
६. *विश्रब्ध शारदा*, सं. ह. वि. मोटे, मुंबई, १९७१, पृ. ६० वरून उद्‌धृत.
७. *ज्ञानोदय*, १५ सप्टेंबर १८५४, पृ. २८२.
८. *अरुणोदय*, उनि., पृ. ३१८.
९. *अरुणोदय*, उनि., पृ. २४७.
१०. *ज्ञानोदय*, १ ऑगस्ट १८६०, पृ. २९९.
११. *ज्ञानोदय*, २ मे १८६४, पृ. १३७ ते १३९.
१२. *सत्यदीपिका*, जुलै १८७५, पृ. ७०–७१.
१३. *ज्ञानोदय*, ८ मार्च १८८८, पृ. ७५, ७६. मूळ पत्र या प्रबंधाच्या सहाव्या परिशिष्टात आहे. पत्र–१.
१४. *ज्ञानोदय*, २३ मार्च, १८८८, पृ. ९१, ९२. (मूळ पत्र परिशिष्टात आहे. पत्र नं. २)
१५. *ज्ञानोदय* २९ मार्च १८८८, पृ. ९९, १००, १०१. (मूळ पत्र परिशिष्टात आहे. पत्र क्र. ३).
१६. *ज्ञानोदय* ८ ऑगस्ट १८८९, पृ. २५३. (परिशिष्ट क्र. ६, पत्र क्र. ५ येथे मूळ पत्र दिले आहे.)
१७. *ज्ञानोदय* २५ जुलै १८८९, पृ. २३५, २३८.
१८. *ज्ञानोदय* २५ जुलै १८८९, पृ. २३७. (मूळ पत्र परिशिष्टात आहे. पत्र क्र. ५.)
१९. *ज्ञानोदय*, २८ मार्च १८८९, पृ. १०२, १०३. (मूळ पत्र परिशिष्टात पाहा. पत्र क्र. ६)
२०. *ज्ञानोदय*, ४ एप्रिल, १८८९, पृ. १०९, ११०. (मूळ पत्र परिशिष्टात आहे. पत्र क्र. ७)
२१. *ज्ञानोदय*, १८ एप्रिल १८८९, पृ. १२५, १२६. (मूळ पत्र परिशिष्टात आहे. पत्र क्र. ८.)
२२. *ज्ञानोदय*, २८ मार्च १८८९, पृ. १०२, १०३.
२३. *ज्ञानोदय*, १ एप्रिल १८८८, पृ. १२५, १२६.
२४. *ज्ञानोदय*, २ मे १८८९, पृ. १४१.
२५. *ज्ञानोदय*, २ मे १८८९, पृ. १४२.
२६. *ज्ञानोदय*, २ मे १८८९, पृ. १४१ (मूळ पत्र परिशिष्टात दिले आहे. पत्र क्र. ९.)

२७. *अनुभवसंग्रह*, भा. १, उनि., पृ. ५.

२८. तत्रैव.

२९. *ज्ञानोदय*, २४ सप्टेंबर १८९१, पृ. ३०९. (मूळ पत्र परिशिष्टात दिले आहे. पत्र क्र. १०)

३०. *ज्ञानोदय*, १ ऑक्टोबर १८९१, पृ. ३१५, ३१६. (मूळ पत्र सहाव्या परिशिष्टात दिले आहे. पत्र क्र. ११)

१२

## अरुणोदय : बाबांचे ख्रिस्ती होणे : सहजसुंदर कलात्मक आविष्कार

बाबांच्या कर्तृत्वाचा विशेष हा की मराठी वाङमयाच्या अनेक क्षेत्रात त्यांना अग्रेसरत्वाचा वा अग्रदूतत्वाचा मान मिळाला. मराठीतील पहिली कादंबरी, मुलांच्या मासिकाचे आद्यकर्ते, पहिले निबंधमालाकार, नव्या कराराचे पहिले टीकाकार, येशू ख्रिस्ताच्या समग्र चरित्राचे पहिले लेखक इत्यादी त्यांच्या अग्रेसरत्वाची अनेक कार्ये आतापर्यंत आपण अभ्यासली. त्यांच्या या सन्मानामध्ये त्यांच्या *अरुणोदय* या आत्मचरित्राचीही गणना करावी लागते हे विशेष होय.

वास्तविक 'आत्मचरित्र' हा वाङमयप्रकार आंग्लाईत नव्याने निर्माण झाला असे नाही. मध्ययुगीन काळात मराठीत आत्मचरित्रे लिहिली गेली होती. संतांच्या आत्मनिवेदनातून साकारलेले भावचित्र हे आध्यात्मिक आत्मचरित्राचेच निदर्शक होय. संत बहिणाबाई, कचेश्वर, निरंजनमाधव यांची आत्मनिवेदने त्यांच्या धार्मिक व लौकिक जीवनाचा काही अंशी मागोवा घेतात तर नाना फडणीस, गंगाधरराव पटवर्धन, बापू कान्हो इत्यादी ऐतिहासिक कर्त्या पुरुषांची आत्मचरित्रे या ना त्या स्वरूपात त्यांची जीवनचित्रे स्थूल स्वरूपात साकार करण्याचा प्रयत्न करितात. या मध्ययुगीन आत्मचरित्रांपेक्षा अर्वाचीन काळातील आत्मचरित्रे निश्चितच वेगळी आहेत. त्यांचा वेगळेपणा, ही आत्मचरित्रे ज्या आंग्ल वाङमयापासून स्फूर्ती घेऊन लिहिली गेली त्या नव्या प्रकाराच्या नव्या वैशिष्ट्यांमुळेच निर्माण झाला आहे, हे निश्चित. अशा नव्या जाणिवेने लिहिलेल्या पहिल्यावहिल्या आत्मचरित्रांमध्ये दादोबा पांडुरंग व बाबा पदमनजी यांच्या आत्मचरित्रांचा विशेष गौरवाने उल्लेख करावा लागतो. यापूर्वी विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी आपल्या *वेदोक्तधर्मप्रकाश* या ग्रंथाला लिहिलेल्या प्रास्ताविकपर मजकुरातून आपले चरित्र सरधोपटपणे व जंत्रीवजा स्वरूपात मांडले होते. वाङमयीन दृष्ट्या ते अगदीच सामान्य होते. दादोबा पांडुरंगांचे आत्मचरित्र मुळात इ. स. १८८२ मध्ये लिहिले

गेले असले तरी अंत:काळच्या आजारामुळे त्यांचे लेखन अर्धवट राहिले व ते प्रकाशित होण्यासाठी विसावे शतक उजाडावे लागले. बाबांचे *अरुणोदय* हे आत्मचरित्र इ. स. १८८८ साली प्रसिद्ध झाले असल्यामुळे प्रसिद्धीचा प्रकाश लाभलेले अव्वल दर्जाचे मराठीतील पहिले आत्मचरित्र म्हणून त्याचे महत्त्व वादातीत आहे.

एका विशिष्ट हेतूने आणि विशिष्ट दृष्टिकोणाने लिहिलेले बाबांचे हे 'स्वलिखित चरित्र' स्वयंपूर्ण आहे. 'यात पुस्तककर्त्याने आपले हिंदुधर्मसंबंधी जिणे व ख्रिस्ती होणे या गोष्टीचे वर्णन केले आहे', या पुस्तकाच्या मुखपृष्ठावरील वर्णनावरून त्याचे स्वरूप अधिक स्पष्ट होते. हे वर्णन करण्यासाठी बाबांनी ज्या ज्या सामग्रीचा उपयोग केला त्याची तपशीलवार माहिती त्यांनी प्रस्तावनेत दिली असली तरी त्या अशा स्वरूपाचे स्वचरित्र लिहिण्यासाठी बाबांच्या पुढे असलेल्या आदर्शांचा त्यांनी कुठेही उल्लेख केला नाही. तरी देखील या पुस्तकाची जगातल्या अनेक प्रसिद्ध भाषात झालेली भाषांतरे, ट्रॅक्ट सोसायटीच्या सभासदांनी दिलेले अभिप्राय व बाबांनी उपयुक्त करून दिलेले इ. स. १८९१ सालचे बोस्टनच्या *दी मिशनरी हेरल्ड* या पुस्तकातील परीक्षणात्मक कात्रण यावरून त्याची योग्यता आणि जगातल्या श्रेष्ठ अशा धार्मिक आत्मचरित्रांशी त्याचे असलेले नाते लक्षात येते. *मिशनरी हेरल्डने* बाबांच्या लेखणीचे सामर्थ्य व स्वचित्र उभे करण्यातली त्यांची तरल प्रतिमा यांचा उल्लेख करून 'जॉन न्यूमन' व 'थॉमस कॉट' यांच्या स्वचरित्राशी याची तुलना केली आहे.[१] खरे पाहिले तर सर्व प्रसिद्ध अशी जी जागतिक कीर्तीची धर्मपर आत्मचरित्रे आहेत त्यामध्येच बाबांच्या या कृतीची गणना करावी लागेल. 'सेंट ऑगस्टीन'चे *कन्फेशन्स*, पास्कलचे *penses* (*Thoughts*) *पिलग्रिम्स प्रोग्रेस*कर्ता जॉन बन्यनचे *ग्रेस अबाऊंडिंग* व 'कार्डिनल जॉन न्यूमन'चे *Apologia* यांना आत्मचरित्र वाङमयात जे स्थान आहे तेच बाबा पदमनजींच्या कृतीचे मानावे लागते, इतके हे आत्मचरित्र महत्त्वाचे आहे. बाबा पदमनजींनी ही सर्व किंवा यातील काही महत्त्वाची आत्मचरित्रे नजरेखालून घातली असावीत असे जरी प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावी म्हणता आले नाही तरी त्यांच्या अंतरंगातील आत्मभावप्रकटीकरणाच्या उत्कटतेवरून त्यांनी त्यापकी काही पाहिली असावीत असे निश्चितपणाने म्हणता येईल. 'सेंट ऑगस्टीन'ने ख्रिस्ती श्रद्धेचा निष्ठेने स्वीकार केल्यानंतर आपल्या पूर्वजीवनातील अनीतीने व अश्रद्धेने भरलेल्या घटनांचा वेध पश्चातापदग्ध मनाने घेण्यासाठी *कन्फेशन्स* लिहिले. (इ. स. ३९७–४०१). पास्कलने अशाच स्वरूपाच्या पश्चातापदग्धमनाने लिहिलेल्या आठवणी त्याच्या मृत्यूनंतर १६६० च्या सुमाराला जनतेला ज्ञात झाल्या. 'जॉन बन्यन'नेही आपल्या आयुष्यातील अनेक मोहांचे, त्यांना बळी पडून केलेल्या पापांचे व परमेश्वरी कृपेने मिळालेल्या सद्गतीचे चित्र १६६६ मध्ये *ग्रेस अबाऊंडिंग दी चीफ ऑफ सिनर्स* या नावाने प्रसिद्ध केले. 'चार्लस् कीग्स्ले' याने केलेल्या आरोपांचे खंडन करण्यासाठी 'कार्डिनल जॉन न्यूमन'ने १८८३ च्या सुमारास *Apologia* प्रसिद्ध करून आपल्या आयुष्यातील धार्मिक स्थित्यंतराचे विलक्षण परिणामकारक असे चित्र रेखाटले. *अरुणोदय* लिहित असताना नुकतेच काही वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेले हे 'न्यूमन'चे पुस्तक बाबांच्या हाती पडले असावे असे वाटते. कारण आपल्या धार्मिक विचारांचा

आलेख न्यूमनने जितक्या विस्ताराने या पुस्तकातून मांडला आहे तितक्याच विस्ताराने बाबांनी आपल्याही धार्मिक स्थित्यंतराचे चित्र रेखाटले आहे.

वर उल्लेखिलेल्या आत्मचरित्रांचा जन्म धार्मिक उद्देशाने झालेला असला तरी त्यांचे महत्त्व आज आपणास जाणवते ते त्यांच्या उत्कटतेमुळे निर्माण झालेल्या वाङमयीन गुणांमुळेच होय. त्यांनी केलेल्या पापकृत्यांपेक्षा त्यांच्या वर्णनातील भेदक सत्यदर्शनामुळे व त्यातून निर्माण झालेल्या लालित्यामुळे आणि त्यांच्या धार्मिक स्वरूपाच्या परिणामापेक्षा तत्कालीन जग व त्या जगात वावरणारी त्यांची व्यक्तीमत्वे यांच्या भावपूर्ण दर्शनामुळेच. 'किंग्स्ले'च्या आरोपामुळेच 'न्यूमन'ने आपल्या धार्मिक स्थित्यंतराचे चित्र रेखाटले असले तरी 'किंग्स्ले'चे आरोप आज कोणाच्या लक्षातही राहिले नाहीत. परंतु न्यूमनचे आत्मचरित्र मात्र एक अभिजात कृती म्हणून चिरस्मरणीय ठरले आहे. त्याचप्रमाणे *अरुणोदय* बाबांनी कदाचित खिस्ती धर्मप्रसारासाठी लिहिले असेल परंतु रसिक वाचकांना प्रसारापलिकडे गेलेले एक अभिजात वाङमयीन रूप म्हणूनच भुरळ घालते हे निःसंशय.

*अरुणोदय*ला हे नितांत रमणीय वाङमयीन रूप कशामुळे प्राप्त झाले असावे याचा विचार करू लागल्यानंतर त्याच्या अंगोपांगात दडलेले सहजस्फूर्त नाटय आपल्या लक्षात येऊ लागते. बाबांनी इ. स. १८५४ साली खिस्ती धर्म स्वीकारला आणि त्यापूर्वीच्या हिंदूधर्मातील जिण्याचे चित्र रेखाटून त्या धर्मातील कर्मकांडाचे, उपासनेच्या अनेकत्वाचे, दुष्ट चालीरीतींचे, बुद्धिशून्य लोकभ्रमांचे, आध्यात्मिक जंजाळाचे चित्र रेखाटण्याच्या हेतूने 'स्व'ला मध्यबिंदू कल्पून त्यांनी हे चित्र साकार केले आहे. ते साकार करीत असताना जणू काही बाबा चाळीसपन्नास वर्षांपूर्वीच्या त्या जगामध्ये पुन: आत्मभावाने जगू पाहतात आणि तल्लीनतेने त्या जगाचे व त्या जगातले आपले रूप न्याहाळताना कुतूहलाने आणि कौतुकभरल्या नजरेने ते रूप शब्दचित्रांच्या साहाय्याने जिवंत करू पाहतात. असे करीत असताना बाबांच्या मधला संवेदनाक्षम, जिज्ञासू, जीवनप्रेमी आणि कुतुहलप्रेरित लेखक अनेक अंगानी आत्मप्रत्ययाने भारलेले लालित्यपूर्ण विश्व आपल्यासमोर सहजगत्या साकार करतो. पन्नास-साठ वर्षे मागे जाण्याचा हेतू अगदी स्पष्ट आणि उघड असला तरी त्यांचा साक्षेप आणि त्यांची जिज्ञासा त्या हेतूवर सातत्याने मात करीत राहतात आणि एक पूर्णपणे विस्मृतप्राय झालेले आणि इतक्या परिणामकारक रीतीने क्वचितच मनासमोर उभे राहणारे दीडशे वर्षांपूर्वीचे ते जग अनेक बारीक-सारीक व नाटयपूर्ण तपशिलांनी आपल्यासमोर साक्षात अवतरते. हिंदु संस्कारामुळे, हिंदू जिण्यामुळे आपण एका फसव्या पाखंडात रुतलो होतो या खंतीने बाबा या पाखंडाचे वर्णन करायला बसले असले तरी त्या पाखंडाचे उपहास–उपरोधाने भरलेले केवळ प्रचारकी चित्र न रेखाटता त्या मंतरलेल्या दिवसांच्या साक्षात्काराचा अनुभव बाबांची लेखणी देऊन जाते आणि म्हणूनच हे आत्मचरित्र अनन्यसाधारण म्हटले जाते. बाबांची मातापितरे, सगेसोयरे, शेजारीपाजारी, सखेसोबती, शिक्षक व गुरुजन यांच्या संबंधातल्या आठवणी बाबा स्वतःला मध्यवर्ती कल्पून सांगायला जातात. त्यावेळी त्यांची मनोहारी शब्दचित्रे तर साकार होतातच परंतु त्यांचा आपल्या मनावर झालेल्या परिणामांचा भाव ते ठायीठायी उमटवून जातात. तत्कालीन लोकसमजुती, प्रस्थे, धेंडे,

लोकविलक्षण व्यक्ती, धर्माची नैतिकतेपासून झालेली फारकत यांचा अनेकरंगी परंतु प्रामाणिक भावनेने विणलेला पट बाबा पुढे ठेवतात. साक्षेप, प्रामाणिकपणा, उत्कटता, तन्मयता, कोणताही भाव वा प्रसंग उमटविण्याचे सामर्थ्य असलेली मराठमोळी सहजसाधी भाषा यामुळे हे जरी स्वचरित्र असले तरी 'स्व'ची बाधा न झाल्यामुळे, आत्मगौरव व आत्मसमर्थन या दोषांमुळे बहुतांश आत्मचरित्रे जशी डागळली जातात व मनातून उतरतात तसे बाबांच्या या आत्मचरित्रात कुठेही चुकूनसुद्धा घडत नाही. तत्कालीन सामाजिक व धार्मिक स्थितीचे अंतरंग न्याहाळण्याच्या दष्टीने तर ते बेजोड आहे. दत्तो वामन पोतदारांनी म्हणूनच, 'महाराष्ट्राचा सामाजिक व धार्मिक इतिहास लिहिण्यास याचा उपयोग फार होईल व त्याच विषयावरील वाङमय व एका कर्त्या व्यक्तीचा इतिहास या दृष्टीनेही त्याचा उपयोग मोठा आहे', या प्रकारे त्याचा गौरव केला आहे.[२] दादोबा पांडुरंग हे बाबांचे समकालीन. त्यांच्या आत्मचरित्रातही अव्वल इंग्रजीचेच चित्र प्रतिबिंबित झाले आहे. बाबांच्या ख्रिस्ती धर्मप्रसारासारख्या हिंदुधर्मियांना अप्रिय अशा हेतूपासून ते पूर्णपणे मुक्त असले तरी *अरुणोदयासारखा* मोठा परिणाम ते करू शकले नाही. प्रा. गं. बा. सरदार यांनी त्यासंबंधाने मोठी मार्मिक तुलाना केली आहे. ते म्हणतात,

> बाबा पदमनजी यांच्या *अरुणोदय* नामक आत्मचरित्राचा, मराठी साहित्याचा एक अमोलिक अलंकार म्हणून नेहमीच गौरव करावा लागेल. वाचकाला विश्वासात घेऊन त्याच्या पुढे आपले अंतःकरण खुले करण्याची बाबा पदमनजींची हातोटी कांही विलक्षण आहे. प्रत्येक प्रकरणात लेखक स्वतः तर रंगतोच पण वाचकालाही तल्लीन करून सोडतो. याच काळातील दुसरे श्रेष्ठ साहित्यिक दादोबा पांडुरंग यांचेही आत्मचरित्र उपलब्ध आहे. पण बाबा पदमनजींच्या लेखनशैलीतील जिव्हाळा दादोबांच्या भाषेत नाही. दादोबांचे आत्मचरित्र म्हणजे खुल्या गद्य अनुभवांची रुक्ष संहिता वाटते. उलट बाबा पदमनजींचे आत्मनिवेदन वाचतांना त्यांचा आयुष्यक्रम म्हणजे एक सत्याचा शोध वाटतो, एक ध्येयाची साधना आहे असा प्रत्यय येतो.[३]

केवळ स्वतःचे, स्वतःच्या मानसिक स्थित्यंतराचे, धर्मांतराचे, ख्रिस्ताच्या मोठेपणाचे आणि हिंदुधर्मातील कर्मकांडाचे वर्णन करण्यात बाबांना स्वारस्य नाही. त्यांना स्वतःबरोबरच स्वतःचे कुटुंबिय, इष्टमित्र, सगेसोयरे, गुरुजन आणि त्यांच्याशी संबंधित अशा साऱ्या आठवणी जागवायच्या आहेत.

> आता ह्या पुस्तकात मी आपल्या खासगत गोष्टी का घातल्या असा कोणी प्रश्न विचारतील, तर त्यास हेच उत्तर आहे की, ज्या कुटुंबात माझा जन्म झाला व जेथे मी लहानाचा मोठा झालो त्याचा व माझा वेळात वेळ वाढल्याप्रमाणे जो संबंध तो सोडून माझी एकट्याचीच गोष्ट कशी लिहिता आली असती? वाडवडिलांचा जो कुळधर्म तो त्यांच्या लेकरांचा, त्यांच्या ज्या चाली व रीतिभाती त्या त्यांच्या मुलांच्या, त्यांचे जे विचार ते ह्यांचे विचार, हा प्रकार सर्वत्र आहे.[४]

या भूमिकेतून त्यांनी आपल्या घराण्याची माहिती 'मुळे' कुटुंबांतील एका वृद्धाकडून बऱ्याच

प्रयासाने (रा. रा. गोपाळराव मुळे) यांच्या द्वारे मिळविली होती.[५] प्रारंभीच ते आपल्या कुळाची, ज्ञातीची, मातापित्यांची, स्वतःच्या जन्माची, बेळगावच्या स्वतःच्या राहत्या बंगलेवजा घराची, घर ज्या गल्लीत होते त्या गल्लीची, त्या गल्लीत राहणारे शेजारीपाजारी, त्यांच्या जातिपाती, रीतिभाती, खाणेपिणे, वागणे बोलणे इत्यादीची बारीक सारीक वैशिष्टये आपल्या समोर उभी करतात. बाबा स्वतः त्या काळात मनन चिंतनाने जातात ते आपल्यालाही त्यांच्या-बरोबर घेऊनच. आपले कुटुंब, कुलदैवते, घरातील दानधर्म, कर्मठपणा, सोवळे ओवळे, आईची भक्ती, कलावंतिणींचा नाच व हरिकीर्तने, ब्राह्मणांचे मंत्रघोष, त्यांचे आशीर्वाद व शाप या सर्व गोष्टी त्यांना स्मरतात आणि शब्दांच्या पंखावर बसून आपल्या चक्षूंसमोर येऊन त्या उभ्या ठाकतात. एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध आपल्यासमोर साकारतो तो बाबांच्या या बालपणीच्या हकीगतींनी. त्यांच्या त्या लहानपणच्या आठवणी खरोखरच बालपणासारख्याच रम्य आहेत. आज अद्भूत ठराव्यात असेच त्यांचे स्वरूप आहे. त्या सर्व गोष्टींचे वर्णन बाबांनी असे काही विलक्षण सामर्थ्यानिशी केले आहे की आपणास वाटते आपण एखादा चित्रपट तर पाहात नाही ना? व तो संबंध कालच जिवंत झाल्याप्रमाणे वाटू लागते.

> माझी मातापितरे मुंबईच्या कासार ज्ञातीची असून सुरतकरांच्या घराण्यातली होती. आमचे कूळ सधन व प्रतिष्ठित होते. . .आमचे उपनाम मुळे. माझे चुलत चुलत आजे बापुशेठ सुरतकर कासार मोठे वजनदार व धनवान गृहस्थ होते.[६]

अशी साधी सरळ सुरुवात करून बाबा त्यांचे घराणे, त्यांचे आईवडील, त्यांचे समाजातील स्थान, वडिलांनी त्या काळात घेतलेल्या स्थापत्यशिक्षणामुळे ऐहिक जीवनात त्यांना मिळालेली बरकत व प्रतिष्ठा यांची हकीकत देतात. ती देताना अधूनमधून अनेक आख्यायिकांची मनोहारी गुंफण करतात. उदाहरणार्थ आपल्या वडिलांचा शेटचे (कासार जातीच्या मुख्यास शेटे म्हणत) पणाशी असणारा संबंध व्यक्त करून बाबा भाईशेठ पेशव्यांची नाटयपूर्ण हकीगत सांगतात,

> भाईशेठ पेशवे या नावाचे एक फार वृद्ध पुरुष होते, त्यांस मी पंधरा सोळा वर्षांचा असताना पाहिले तेव्हा त्यांचे वय ८०–९० वर्षांचे असेल असे वाटते. ते पेशवे सरकारात दुभाषाचे काम करीत. त्यांस इंग्लिश येत होते. पेशवाई बुडाल्यावर इंग्लिश सरकार त्यांस पेंशन देऊ लागले. परंतु ते घेईनात. त्यांच्या चित्तास कांहीसा भ्रम झाला असल्यामुळे ते सर-कारापाशी पेशव्यांच्या राज्याचा हिशेब मागत. . .त्या करितां कुंपणी सरकारास पत्रे लिहीत, आपल्या भार्येस देखील त्यांनी पेनशन घेऊ दिले नाही. स्वतः मात्र ओळखीच्या साहेबांकडून व पारशी गहस्थांपासून मदत घेत.[७]

आपल्या वडिलांचे नाव पदमनजी माणिकजी. त्यांचा जन्म सन १८०५ ला झाला, एवढेच ते सांगत नाहीत तर, त्यांची जन्मपत्रिका आपल्यापाशी आहे असे ते आवर्जून लिहितात व नंतर आपल्या घरी जन्मपत्रिकेची कित्येक मोठमोठी भेंडोळी होती. त्या करण्याकरिता पुष्कळ खर्च कसा लागतो, त्यावर मनुष्याच्या जन्मापासून मरणापर्यंत प्रत्येक वर्षी वा ग्रहदशेच्या काळी काय काय होईल हे लिहिलेले असते वगैरे माहिती ते देतात. वडिलांची जन्मपत्रिका चाळीस

हात लांबीची होती. आपली स्वत:ची जन्मपत्रिका कशी सापडत नाही याचे सविस्तर वर्णन बाबा करतात. त्याचवेळी आपल्या लग्नाच्या पूर्वी जोश्याने आम्हा उभयतांच्या जन्मपत्रिका पाहिल्या होत्या. परंतु आमचा जिवंतपणीच वियोग होणार हे त्याला समजले नाही,[८] असे खुबीने व गमतीने आमच्या सनातनी समजुतींचा उपहास करतात.

जरी मी फलज्योतिषावर पूर्ण विश्वास ठेवीत असे, तरी काही काळाने माळव्यातील सिहोर-नगरस्थ सुभाजी बापू यांनी केलेला एक छापील ग्रंथ माझ्या हाती आला, त्यात भास्कराचार्य व कोपरनिकस यांच्या ज्योतिषाचा मेळ घालून दिला होता व पौराणिक ज्योतिष आणि शकुन मुहूर्त इत्यादींचे युक्तीने व हिंदुधर्मग्रंथांच्या आधाराने खंडण केले होते. ते वाचून माझा विश्वास बराच ढळला, आणि ग्रहादिकांचे भय माझ्या मनातून कमी कमी होत गेले.[९]

याप्रमाणे आपल्या मानसिक स्थित्यंतराचा हवाला देतात. त्याचप्रमाणे आपण इ. स. १८३९ मध्ये 'घरातून मुहूर्त पाहून चांगल्या शकुनावर निघालो तरी मार्गात आमच्यावर विघ्ने आली व आमचे फार हाल झाले' असे मुद्दाम सांगून शकुन मुहूर्तातील निरर्थकता बाबा स्पष्ट करतात. साहजिकच आपण नेपोलियन बोनापार्टची शकुनवंती हे त्याच (शकुन, मुहूर्त) विषया-वरील पुस्तक लिहिले याची आठवण त्यांना होऊन 'तो अज्ञानांधकारांतील उद्योग' होता असे लिहावयास चुकत नाहीत. ह्या पार्श्वभूमिवर बाबांनी मुहूर्त, ज्योतिष, जन्मपत्रिका, शकुन वगैरेवरील आपला अंधविश्वास स्वानुभावाने कसकसा नष्ट झाला याचे निवेदन केले आहे. बाबांच्या काळात उपरोक्त अज्ञानांतर्गत समजुती समाजात सर्रास रूढ होत्या. विशेषत: जन्म, मृत्यू, विवाह, प्रवासाचा प्रारंभ, शुभ गोष्टीचा आरंभ इत्यादी कामात शुभशकुनांचा विचार समाजमनावर फारच मोठ्या प्रमाणावर होता याची कल्पना आपणास बाबांच्या या निवेदनावरून येते. तत्कालीन समाजदर्शन हा बाबांच्या आत्मचरित्राचा एक सहज आविष्कार आहे. तो त्यांच्या भावजीवनाशी एकजीव झाल्यामुळे हृद्य झाला आहे.

आपल्या आत्मचरित्रात बाबांनी हिंदुधर्माविषयीच्या आपल्या साऱ्या संवेदना कसलाही आडपडदा न ठेवता व लपवाछपवी न करता मांडल्या आहेत. समाजातील कर्मकांडाबरोबर, कर्मठपणाबरोबर, उच्चनीचतेच्या कल्पनेबरोबर आपण कसे वाहात जात होतो, त्या कल्पनांशी आपण किती तन्मय झालो होतो याचे त्यांनी रेखाटलेले चित्र म्हणजे तत्कालीन हिंदूंच्या भाव-नेचे ठसठशीत चित्रिकरणच होय! कुटुंबात व समाजात तेव्हा कर्मठपणा, सोवळे–ओवळे, मूर्तिपूजा, अनेक देवतांची भक्ती, मंत्रतंत्र, ताईत, गंडेदोरे, ब्राह्मणभोजने, श्राद्धपक्ष, यज्ञयाग, उपासतापास, भूतपिशाच्च, अंगात वारे येणे, स्पृश्यास्पृश्यता, जातिभेद, पंक्तिप्रपंच, देवदर्शन, यात्राजत्रा, नाचतमाशे यांना ऊत आला होता. बाबा लिहितात,

बेळगावात कधी कधी एखादा हरदास कथेच्या आरंभी आध्यात्मविषयावर काही व्याख्यान देत असे, पण ते ऐकायास फारच थोडे लोक जमत, व ते संपून कथानुसंधान केव्हा लागेल याची वाट पहात.[११]

आपल्याला वेदांत विचार कधी आवडला नाही व तीच स्थिती इतर लोकांची होती असे बाबा सांगतात. आपण मनापासून रामकृष्ण, शिव, विठोबा, मारुती यांची पूजा केली, कीर्तने ऐकली

पुराणे श्रवण केली असे बाबा सांगतात. उदा. :

देवांची उपासना व क्षुद्र दैवतांची भक्ती एकाच काली मजकडून चालली होती. एकीकडे शिवरात्री व एकादशी करावी व दुसरीकडे छाछू करणाऱ्या पंचाक्षऱ्याच्या नादी लागावे. एके दिवशी पुराण श्रवण करावे व दुसऱ्या दिवशी नागाची कहाणी ऐकत बसावे. देवळात विष्णू किंवा कृष्ण सर्व देवात थोर आहे, रामनामासारिखे दुसरे काही नाही असे साधूच्या मुखाने ऐकावे व तिकडे घरात खंडोबाची तळी भरताना 'एलकोट' म्हणावे, मुरळ्यांचे गाणे ऐकावे. एकदा ब्राह्मणाचे चरण तीर्थ घ्यावे. व दुसरेंदा देवीचे तीर्थ (मद्य) घ्यावे. एकदा कपाळास गंध लावावे व दुसरेंदा भस्म चर्चावे. पुनः खंडोबाचा भंडार (हळद) चोळावा व त्याच्या मागून विठोबाचा अबीरबुका फासावा, आणि शेवटी देवीचा कुंकुम तिलक लावावा आणि होळीत सर्वांगावर धूळ घ्यावी! संध्येतील मंत्र जपत असता, गोसाव्यापासून घेतलेला साधक मंत्रही मी पुटपुटत असे. शिवस्तोत्र व सर्पस्तोत्र ही मला सारखीच मोलाची वाटू लागली.[१२]

ब्रह्मज्ञानी व वेदांती देखील अनेक देवतांची भजने करीत. क्षूद्र दैवतांचे भय बाळगीत. इंद्राची स्तुती व सर्पपूजा व सोमरस काढण्याच्या पाट्यावरवंट्याची पूजा वेदकाळात देखील होती असे बाबा सांगतात. त्याचीच सुधारलली आवृत्ती आपल्या काळातील समाजात व कुटुंबात होती हे बाबांनी सूचित केले आहे.

देवभक्तीत व धर्माचरणात आपणास पापाचे भय समजले नव्हते. फक्त आपण सोवळ्या-ओवळ्याचे आचार व खाण्यापिण्याचे नियम यापासून दूर होतो. असत्य भाषण, चोरी करणे, खोटी शपथ वाहणे, विषयवासनांची लगाम ढिली सोडणे इ. गोष्टीत देवाचे भय आपणास वाटले नाही, असे सांगून बाबा लिहितात,

मी होळीच्या दिवसात चोरी करावी, व दिवाळीत जुगार खेळावा, जुगारी अड्ड्यात बसण्याचेही मला वारंवार प्रसंग येत. हे जुगार रात्रंदिवस चालत व थैल्या भरभरून रुपये एकेकापाशी असलेले व ते त्यांनी हरलेले मी पाहावे. परंतु देवाने मजवर मोठी दया करून ह्या आखाड्याच्या खड्ड्यांत मला पडू दिले नाही.[१३]

शाळेच्या सोबत्यांबरोबर एकीबेकीच्या खेळात पैसे हरवावे, दिवाळीत प्रसिद्ध रीतीने चारचौघात जुगार खेळावा, चैनबाजीसाठी घरातील पैसे चोरावे व ती पचण्यास मारुतीस नवस करावा, चुलत्याच्या खोलीतून फणसपोळी चोरावी, वर्गातील पारशी मुलांचा रुपाया पायाखाली कसा दाबला वगैरे आपल्या जीवनातील अनीती बाबा कथन करतात. आपणास भोवतालच्या मनुष्याच्या वर्तनावरून ही सवय जडली, तसेच कोणी ही अनीती म्हणून शिक्षा केली नाही व एखाद्या साधुसंताने तसा उपदेश पण आपणास केला नाही म्हणून हे घडले असे ते म्हणतात. तरी देखील अनीतीने वागण्यात बेअब्रू, लज्जा व ऐहिक हानी आहे हे ठाऊक होते, असे त्यांनी म्हटले आहे.

आपण वडिलांचा धर्म, जातीचा व लोकांचा धर्म म्हणून तो मनोमन पाळत होतो. ज्याचा धर्म त्याला खरा अशी आपली धारणा असूनही आपण पिराची भक्ती केली, फकिरांचा मान

राखला. प्रत्येक धर्म खरा मानून आपण वागल्याचे ते सांगतात. मूर्तीचे स्मरण, ध्यान, पूजन, देवदर्शन, देवपूजा, देवतार्पण, प्रदक्षिणा, स्तोत्रे म्हणावी, प्रार्थना करावी अशी भक्ती बाबांनी निष्ठेने प्रथम प्रथम केली. ते लिहितात,

> येणेकरून माझ्या अष्टांगी मूर्तिपूजा भरलेली असे. मूर्तितच देव आहेत असे मला वाटत असे. जशी वस्तुशिवाय रंगाची कल्पना होत नाही तशी मूर्तिशिवाय देवाची कल्पना माझ्या मनात आली नाही.[१४]

असत्य, लांडयालबाडया, चोऱ्या व इतर कुवर्तन यापासून मुलांना लांब ठेवण्याचा प्रयत्न त्या काळात कुणी फारसा करीत नव्हते. दररोज या ना त्या मार्गाने वरील दुर्गुण मुलांच्या डोळयांदेखत समाजात लोक करीत. त्यांचे हे अनुभव बाबांना आले ते असे, 'दारापुढे जो बाग होता त्यातील झाडांवर फुले म्हणून क्वचित राहात कारण शेजारपाजारचे राहणारे आम्हास विचारल्यावाचून ती आपल्या देवपूजेकरिता रात्री, पहाटेस, दोनप्रहरी काढून नेत. हिंदुमताप्रमाणे अशा कृत्यास चोरी समजत नाहीत!' (पृ. ३) तसेच 'साधारण एकादशीस आम्ही मुले उपास करीत नव्हतो तरी बाहेरून उपास केल्यासारखे दाखविण्यास व सांगायास आम्हास शिकवले होते.' (पृ. ५) आणखी एके ठिकाणी बाबा आपल्या आठवणीत लिहितात,

> वर्गणीपटावर आकडा मांडण्याची कित्येकांची अशी युक्ती होती की, १० रुपये मांडून १ रुपया द्यावा, म्हणजे दुसऱ्याने १० चा आकडा पाहून, किंवा आपल्या घरचे मोलवान पागोटे ज्याची संभावना करणे असेल त्याच्या डोईवर घालावे व एखाद्या रेशमी किनारी धोतराचे नवे कोरे पान त्याच्या अंगावर टाकावे म्हणजे त्याने लोकांत सांगत सुटावे की हे मला अमक्याने दिले. नंतर ते ज्याचे त्यास परत करावे! हे वर्गणीची यादी फिरवणारे किंवा वर्गणी घेणारे यांच्या सूचनेवरून होत असे. (पृ. ९)

आपल्या लहानपणी व म्हातारपणी परिस्थितीत कसा फरक झाला हे सांगताना ते लिहितात,

> आताच्या काळात दहा पंधरा वर्षांच्या मुलास देशसुधारणुकेसंबंधी पुष्कळ लोकवार्ता माहीत होतात. त्या वेळी तसे नव्हते. मी आडातील मंडुकाप्रमाणे आपल्या आळीत होतो. ज्या लोकवार्ता माझ्या कानी पडत त्या अशा होत्या की आज आमक्याच्या घरी अमुक ब्राह्मणांची समाराधना झाली. अथवा अमक्याने आपल्या मुलाच्या मुंजीत किंवा मुलीच्या लग्नात अमुक संख्या (५००, २००) ब्राह्मणास चार चार आणे, आठ आणे, चवली-चवली दक्षिणा वाटली. आज अमक्याचे घरी पुराण झाले, कीर्तन झाले, नाच झाला अशी वर्तमाने माझ्या कानी पडायची. दुसरी वर्तमाने अशी होती की ब्राह्मणाच्या अमुक विधवेने. . .पाडले. किंवा तिला सरकारने कैदेत ठेवले, तिने अमक्याचे नाव सांगितले. लोक सुधारणेची कोणतीही गोष्ट आमच्या आळीतील लोकांमध्ये कधी निघालेली माझ्या आठवणीत नाही. (पृ. २७)

या प्रकारचे अनुभव बाबास नित्य आले व त्यांचे याबाबतचे विचारचक्र सुरू होऊन त्यांनी नवा मार्ग धुंडाळण्यास सुरुवात केली. या बाबतीत बाबांचे पुढील उद्‌गार विचार

करण्यासारखे आहेत. ते लिहितात,

ब्राह्मण, साधुसंत, गुरु, संन्याशी यांस मी अत्यंत पवित्र व पूज्य मानीत असे. परंतु त्यांच्या ठायी कोणती पवित्रता आहे याचा विचार मी कधी केला नाही. त्यांचे दर्शन घेतल्याने, त्यांचा प्रसाद व आशीर्वाद मिळाल्याने पुण्यप्राप्ती होते एवढे मात्र मी समजत होतो. त्याचा प्रसाद म्हणजे त्यांच्या हातचे नारळ, केळी वगैरे पदार्थ, त्यांचे उच्छिष्ट किंवा त्यांचे चरण-तीर्थ मिळाले म्हणजे मोठा लाभ झाला असे मी समजत असे.

त्यांचे मंत्र, जप, आशीर्वाद वगैरे आपण मिळवीत असू. त्यांचा उपदेश मात्र आपण कधी अगत्याने मिळविल्याची आठवण नाही असे ते सांगतात. गुरुमंत्र, हरिपाठ, नामजप वगैरे कडकडीतपणाने, नेमाने पठन करणारांचा कित्ताच आपण गिरविला होता ही गोष्ट बाबांनी निवेदन केली आहे.

आपल्या कौटुंबिक वातावरणाचे बाबा थोडक्यात पण समर्पक व यथातथ्य वर्णन करताना लिहितात,

माझ्या घरची मनुष्ये हिंदुधर्माप्रमाणे अत्यंत भाविक व कर्मठ होती व धर्माचरण करण्यात काही अंतर पडू देत नसत, जरी त्यास ब्राह्मणांचे व साधुसंतांचे आशीर्वाद मिळत, व ते अनेक दैवतांची भक्ती मनोभावे करीत, तरी त्यांच्यामध्ये तंटे व भांडणे वारंवार होत. माझे आजोबा कडकडीत शिवभक्त व शक्तिउपासक असून ते आपल्या दोघांही पुत्रांशी फार भांडत. खाण्यापिण्याच्या पदार्थांवरून भांडणे, वस्त्रालंकारावरून भांडणे, मानापमानाच्या गोष्टी-वरून भांडणे; सारांश, भांडण म्हणून घरातून कधी गेले नाही. भांडणे करावी, देवपूजा करावी, देवाचे मंत्र जपावे, व घरातील माणसाशी अबोलपणा धरावा; भांडणे करावी व व्रते उपोषणे करावी, दानधर्म करावे, तुळशीपुढे बसून एकमेकांचे अनिष्ठ चिंतावे.[१५]

असे प्रकार आपल्या कुटुंबात तत्कालीन हिंदु कुटुंबाप्रमाणे होते. विवेक, सुस्वभाव, सुज्ञान, साधुसंताचे बोधपर ग्रंथवाचनाचे फळ, मूर्तिपूजा केल्याचे, मंत्र जपण्याचे, व्रतउपोषणादिक केल्याचे, तीर्थयात्रेचे, ब्राह्मणास केलेल्या ज्ञानधर्माचे, त्यांच्या आशीर्वादाचे फळ म्हणून कुटुंबात शांती, समाधान, प्रेम इत्यादी नांदताना दिसत नव्हत्या. त्यामुळे पंचांग, पोथ्या, धर्मकृत्ये, भविष्ये, मंत्र, तंत्र, पूजा, जपजाप्य, आशीर्वाद, तीर्थ, अक्षता, पूजापाठ, सोवळेओवळे, जातिभेद, दानधर्म, दक्षिणा इत्यादींवरील आपला विश्वास संपल्याचा अनुभव त्यांनी उत्तम रीतीने कथन केला आहे.

आपल्या घरातील कर्मठपणाचे वर्णन करताना बाबा शाक्तपंथीय पूजा पद्धतीचे वर्णन करतात:

आमच्या घरी कालिकादेवी होती. तिची पूजा शाक्तांच्या पद्धतीप्रमाणे होत असे. माझे आजोबा शक्तीचे निःसीम भक्त होते. नित्य रात्री देवीला मद्य अर्पण केल्याशिवाय ते भोजन घेत नसत. पर्वणीच्या दिवशी शाक्त ब्राह्मण आमच्या घरी पूजेस येत, त्यावेळी दुसऱ्याही जातीचे शाक्तास बोलावणे होत असे. देवीची पूजा व भोजन फार रात्रीपर्यंत चालत असे. त्यात मद्यप्राशन, मांस व मिष्टान्नभक्षण यांच्यापलिकडे दुसरे कांही होत नसे.[१६]

त्याचप्रमाणे बेळगावातल्या बाळंभट बोकड या नावाच्या ब्राह्मणाच्या घरच्या शक्तिपूजेची

आठवण बाबा याच ओघात सांगून जातात. त्याच्यापाशी एक कुळंबीण होती व पूजेच्या वेळी तिची सर्वजण पूजा करीत. तिला शक्ती समजत. खेड्यापाड्यातले कुणबी लोक चोरून मारून स्वस्त दरात बाळंभटास दारू देत. आपले आजोबा गावात आलेल्या शाक्त शास्त्री, पंडित, ब्रह्मचारी व संन्यासी यांस घरी बोलावत, पूजा करीत. ते गावात शाक्त शंकराचारी आल्यास शक्तीचा नैवेद्य, ब्रांडी, अंडी, खिमा, पुऱ्या रात्री गुप्त रीतीने पोहोचता करीत. अशी आपल्या आजोबांची शक्तिपूजा बाबांनी वर्णिली आहे. बाबांनी तर एकदा या पूजेचा, प्रसादाचा व उपाध्यायांचा चांगलाच अधिक्षेप केला होता.[१७]

याशिवाय सणावारी खंडोबाची व कालिकेची पूजा त्यांच्या घरी थाटाने होत असे. देवात गणपती, लक्ष्मीनारायण या मूर्ती तर होत्याच, पण तीर्थाच्या पाण्याचा गडवा, देवस्थानाचा नारळ, चौकोनी तांब्याच्या प्रत्यावरील यंत्र, लहान शिवलिंग, अकबरी मोहर व होन, सोन्याच्या जिनसा यांची पूजा होई. सोन्याच्या जिनसा एरवी कुलपात असत. उपास, व्रते, दानधर्म नेहमी होत असे, भिक्षेकऱ्यांना भिक्षा, ब्राह्मणांना भोजने, सदावर्ते, बैरागी, साधुसंत, हरदास यांना पीठ वा तांदूळ व प्रतिष्ठित भिक्षेकऱ्यांची संभावना होत असे. स्नान केल्याशिवाय कोणी जेवत नसे. संध्या, देवपूजा व भोजनाच्या वेळी सोवळे नेसत. देव खोलीत वा स्वयंपाकघरात शुद्र चाकर येत नसे. आईच्या धर्माचरणाने आपणास व्रते, उपास व विविध पूजा माहीत झाल्याचे ते म्हणतात. 'तिची गुप्त पूजापद्धति व प्रसिद्ध पूजापद्धती मी शिकलो. तुळशीची पूजा, गाईची पूजा, पिंपळाची पूजा, भटाची पूजा, सुवासिनींची पूजा' व वडिलांची तांत्रिक पूजा, गीतेच्या पोथीची पूजा याचे सविस्तर वृत्त बाबा या संदर्भात देतात: सणावारी नाच, कीर्तने होत असत.

बाबांनी आपल्या आत्मचरित्रात प्रसंगानुसार काही नाट्यपूर्ण आठवणी लिहिल्या आहेत. आठवणी माणसाच्या मनात घर करून बसतात. त्यामुळे त्यास आपला भूतकाळ चांगला स्मरतो. बाबांच्या आठवणी विविध असल्याने त्यांच्या काळावर प्रकाश पडतो व आपले देखील रंजन होते. अशा काही आठवणी पाहण्यासारख्या आहेत. उदाहरणार्थ :

...मुलास शाळेत घालताना सरस्वती पूजनाच्या निमित्ताने त्यास शक्तिप्रमाणे पागोटे, निदान दक्षिणा द्यावी लागत असे. शाळेतल्या मुलास मिठाई वाटत, तसेच गुरुपत्नीने कधी सधन पालकास जेवायास बोलावल्यास तीस भोजनाच्या दामदुप्पट दक्षिणा व चोळखण द्यावा लागे.

आपल्या एका गुरूस गांजा ओढण्याचे व जुगाराचे व्यसन होते व त्यामुळे त्यास दंड झाल्याचे बाबा सांगतात.' (पृ. ११)

नंतर 'पुस्तकात युरोप खंडाचा नकाशा होता. त्यातील अस्त्रियाचे नाव पाहून तो हिंदु लोकांच्या समजुतीतला स्त्रीराज्याचा देश आहे असे मी घरच्या माणसांस सांगावे' अशीच चुकीची माहिती आदन म्हणजे युरोपातील आथेन्स हे सांगितल्याचे बाबांनी लिहिले आहे. (पृ. १४) नंतर एका ब्राह्मण शिक्षकाने 'स्वर्गलोकी मनुष्ये अमृत पिऊन अशी गुपचुप बसतात, तसे त्याने बसून दाखवले.' पर्वताची शिखरे महारोग्याच्या हाताच्या बोटाप्रमाणे गळून पडतात असे त्यानेच एका मिशनऱ्यास सांगितल्याची आठवण बाबांनी कथन केली. बाबा ख्रिस्ती

झाल्यावर हा भटजी भेटे तेव्हा विचारी 'कां आताशी बंगल्यातच असता काय?' अशी, त्या भटाची कोकणस्थी व कुजकी भाषा बाबांनी जाणीवपूर्वक दिली आहे (पृ. १५). तसेच हरदासाच्या पाया पडावे, त्याला पैसे घरून चोरून आणून द्यावेत. त्याच्या बिऱ्हाडी जावे. त्याच्या तयारीची गाणी ऐकावी. पुराणिकाचे प्रवचन देखील नेमाने ऐकावे आणि गावांतील व्यंकोबा विठोबा इ. देवांच्या उत्सवात पालखीपुढे मिरवावे. आरती करावी. हा आपला क्रम होता याची स्मृती बाबांच्या मनात मोठेपणी देखील तरळत राहते. अशासारख्या अनेक गमतीजमतीच्या आठवणी या *अरुणोदयात* जागोजागी विखुरल्या आहेत. त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे होत्या :

बेळगावच्या मारुतीच्या देवळात बाबा वारंवार जात असत. मसाणा त्यांच्या सोबतीला होता. साष्टांग नमस्कार घालावेत व उड्या मारून तेथील घंटा वाजवणे, हात जोडून स्तुतीचा श्लोक म्हणून अंगारा लावणे व थोडा भक्षण करणे, मारुतीचा प्रसाद मिळविणे, प्रदक्षिणा घालणे वगैरे गोष्टी बाबा करीत. याच देवळात केलेल्या बालसुलभ खोड्यांचा उल्लेख बाबा पुढीलप्रमाणे करतात,

> एकदा आम्ही पोरांनी देवळाच्या घुमटात एक गरीब बिचारे घुबड बसले होते, त्यास धोतराच्या तोब्यांनी जीवे मारून त्याचे पंखास दोरी बांधून ते मोठ्या थाटाने सगळ्या आळीत फिरवले! ह्या क्रूर कर्माबद्दल आम्हास कोणी दोष लावला नाही, कारण घुबड हा अशुभ पक्षी मानला आहे. तसेच मी व माझ्या सोबतीच्या मुलांनी सोमवारी शिवाच्या देवळात जाऊन तेथे जितके सापडतील तितके भुंगे मारावे. असे केल्याने पुण्य मिळते असे सांगत.[१८]

आपल्या खोड्या वर्णन केल्यावर बाबांनी तत्कालीन व आजच्या नट, नाटक व नाटककारांची एक सुंदर तुलना थोडक्यात पण समर्पक रीतीने केली आहे. बाबा लिहितात,

> ह्या देवळात दशावताराचे खेळ होत, हे पाहण्याचा मला फारच नाद असे, तेणेकरून मला हिंदुधर्माचे बरेच ज्ञान झाले. हे दशावतारी कर्नाटकी ब्राह्मण असून ते स्त्रियांची सोंगे वगैरे घेतात म्हणून नीच मानले असत. परंतु आताच्या नाटककारांविषयी लोकांना तसे वाटत नाही; व अशी नाटकेही तेव्हा नव्हती. नाटकगृहे तर मुळीच नव्हती. देवळाच्या आवारात जागा न मिळाली तर गावातील चावड्यात ती होत.[१९]

एकोणिसाव्या शतकातील पूर्वार्धातील नाटकाच्या बाबतीतही परिस्थिती त्या काळाची निदर्शक आहे. 'नाटक', ह्या संस्थेचे तत्कालीन दर्शन विचारात घेण्यासारखे आहे. मराठी नाट्य-वाङमयाच्या व रंगभूमीच्या प्रारंभकालाचा जो इतिहास बाबांच्या *अरुणोदयात* सहजगत्या आला आहे तोही लक्षणीय आहे!

त्या काळातील लोकभ्रमांचे दर्शन बाबांच्या लेखनात झाले आहे ते असे.

बाबा लिहितात, 'आपल्या घरात कोणतेही धर्मकृत्ये ब्राह्मणाशिवाय चालत नसे. घरात ब्राह्मणाच्या पूजा, दाने, दक्षिणा चालत. काही वेळेस ब्राह्मणाची आमच्या कुटुंबाकडे बाकी निघत असे. . .असे बाबा सांगतात.' 'एक कऱ्हाडा ब्राह्मण शनिवारी मारुतीची पूजा

करण्यास ठेवला होता. तो आमच्याकरिता एकादशण्या, महारुद्र वगैरे करीत असे. त्याचा आणलेला नैवेद्य आम्ही फार तपासून घेत असू.' कारण त्याने त्यात विष वगैरे घातले असेल अशी शंका त्या काळास अनुसरून बाबांच्या कुटुंबियास येत असे. तत्कालीन जनरुढी व जनसमजुती बाबा यथाकाल सहज सांगतात. जोशी घरी येऊन पंचांग सांगत. ग्रहांची दाने, जन्मपत्रिका, शुभमुहूर्त, साडेसाती वगैरेचा त्या काळात लोकांच्या मनावर बराच प्रभाव होता. भूतबाधा, पंचाक्षरी, मंत्री, ब्रह्मदेव, साठवारी वगैरेवर सामान्यतः लोकांचा विश्वास होता. भुताचे झपाटणे, करणी करणे, बळी, अंगारे, धुपारे, भुताची शेरणी, भगतांचे इलाज वगैरे त्या काळातील वेडेखुळे प्रकार आपल्या कुटुंबात चालल्याचे ते प्रांजलपणाने, प्रामाणिकपणाने सांगतात. याच संदर्भात अंगात वारे येण्याच्या रीतीचे उत्तम शब्दचित्र ते रेखाटतात.

> ह्या बाईच्या अंगात ही वारी येण्याचा प्रकार फार सोपा होता. तिने आपले केश मोकळे सोडून बसावे (ती सकेशा विधवा होती) व हात जोडून ते कपाळाशी धरावे. तिचे डोळे झाकलेले व श्वासोच्छवास कांही वेळ स्तब्ध झालेला दिसे. अशा अवस्थेत क्षणभर राहिल्यावर तिचे अंग मागे पुढे डुलू लागावे व श्वास प्रथम घोगरा नंतर मोकळा होऊन तिने आसन बदलून खुरमांडी घालून बसावे. हात मात्र गुडघ्यावर टेकलेले व त्यांनी अंगठ्या जवळील दोन बोटे लांबवलेली व बाकीची मुठीत वळून घेतलेली असत. वारे फार बोलत नसे. आम्ही विचारलेल्या प्रश्नास उत्तरे देऊन बाकीचा वेळ घुमत राही. अंगात वारे येण्याच्या पूर्वी त्याच्यापुढे उद किंवा कापूर जाळावा लागत असे.[२०]

तसेच कित्येक वारी येताना जमिनीवर लोळत, कित्येक उठून नाचत, कित्येकास हातात नाचते वेळी तरवार किंवा छडी लागत असे. देवीची वारी आली म्हणजे त्या विधवा बाईने आपल्या कपाळास मळवाट भरावा व डोक्यात फुले घालावी आणि वारे गेल्यावर ती काढून टाकावी व मळवट पुसून काढावा. ही तपशीलवार माहिती त्या काळाच्या संदर्भात बाबा देतात. 'कांही प्रसंगी कोंबडी, बकरी, अंडी, दारू, मेवामिठाई, पक्वान्ने, पुष्कळ फुले व सुवासिक द्रव्ये आणावी लागत.'

> बाबा पुढे लिहितात, 'ह्या प्रकाराला मांड किंवा मंडळ भरणे म्हणत. तेव्हा पुष्कळ वारी एकामागून एक अशी येऊन खाऊन पिऊन खेळून आम्हास प्रसाद म्हणजे त्यांच्या पुढे ठेवलेल्या नैवेद्यातून कांही पदार्थ देऊन जात. ह्या खेळात संबळ, सनई, ताशे, ढोल वगैरे वाद्ये वाजवावी लागत.[२१]

सूक्ष्म निरीक्षण, तपशीलयुक्त माहिती देणे हा बाबांचा विशेष आपणास त्यांच्या या आत्मचरित्रात जागोजागी दिसतो. त्याचप्रमाणे बाबांनी आपल्या घरातील सर्पभक्ती, चेटकिणी, संकल्प मंत्र, सिद्धीचा मंत्र वगरेची अद्‌भुत माहिती दिली आहे. आपली आजी घराच्या माळ्यावरच्या सर्पाची हात जोडून परतपाळ करण्याची विनंती करी, चेटकिणी भिक्षेच्या मिषाने येत व कोल्ह्याचे शिंग, भारलेली वनस्पती, मणी, दोरे, अंजन, वाघनखे देत व घरातील माणसे त्यांच्या मंत्रांचा प्रयोग करीत. घरात वेदोक्त फलप्राप्त्यर्थ हा मंत्र उपाध्ये न म्हणवता पुराणोक्त फलप्राप्त्यर्थ हा मंत्र म्हणवत, अन्नपूर्णेचा मंत्र कडक नियम पाळून जपावा लागे, घरात सर्व

मुलांकरिता रमण शेटीकडून ताईत करपून घेतले व अडचणीत असता ते सोन्याचे ताईत विकले, परीस शोधण्याचे आपले वेड, बेळगावच्या असतखान नावाच्या पिराची आपल्या घरची भक्ती, भावाचे डोळे देवीने गेले त्याच्या प्राप्तीसाठी मुगुटखान या हुबळीच्या पीराची भक्ती कशी केली व त्यात द्रव्यक्षय कसा झाला, मारुतीस विनंती लावणे, धनगरी देवास विचारायास जाणे वगैरे गोष्टी आपल्या घरात सर्रास कशा पाळीत याचे हितगुज बाबा आपल्याशी करतात. आपल्या सण पाळण्याच्या हौसेचे वर्णन करताना बाबा त्या काळातील लोकांच्या उत्सवप्रियतेचे यथातथ्य दर्शन घडवितात. घरी गणपती बसविण्याची रूढी नव्हती तरी बाबा गणपतीच्या सणात सवंगडी जमवून गावात घरोघर गणपती बघावयास जात. त्याच्या रंगरूपावर चर्चा करीत नमस्कार करीत. बाबा लिहितात,

> कसबिणीच्या येथील गणपतीची आरास पाहाण्यास आम्हांला काही लाज वाटत नसे. तेथे तर आम्ही अधिक वेळ उभे राहावे. दसऱ्याच्या सणात सोने वाटण्याविषयी मी फार आवेशी होतो. शमीचा श्लोक मला येत असे. तसेच संक्रांतीचे तिळगुळ चित्रविचित्र कागदाच्या पेटीत घालून मित्रास द्यावे व मुंबईस टपालातून इष्टमित्रास पाठवावे. होळीचा सण जरी मला आवडत नव्हता तरी एकदा मित्रमंडळीने मला घरातून जबरीने ओढून काढल्यावर त्यांच्याबरोबर होळीचा होळकर बनण्यास मला लाज वाटत नसे. तसेच मोहरमच्या सणातही मी गावात फार हिंडावे. वाघाचे नाचणे उडणे व कुस्त्या पाहण्यात माझा फार वेळ जात असे. मी रात्री ताबूत पाहत फिरावे.[२२]

अशी तत्कालीन हिन्दुलोकांची उत्सवप्रियताही बाबांच्या या स्वानुभवनिवेदनात प्रतिबिंबित झाली आहे. आपली आई पिरास नवस करीत असे, त्यासाठी आपणांस फकिरी देत. बेळगावचे ब्राह्मण मुलास फकिरी देत नाहीत तर अहमदनगरकडचे ब्राह्मण देखील मुलास फकिरी देतात ही नवलपूर्ण माहिती बाबा या संदर्भात आपणांस पुरवितात. शुद्र जातीचे लोक तर चहूकडे फकीर होतात व कित्येक जण तर डोले देखील करतात असे बाबा सांगतात. जाता जाता बाबा जैनधर्मावरील अश्रद्धा व वैष्णवांचे पाखंडाबाबत मनोरंजक माहितीचे निवेदन करतात. जैन नग्न साधू, त्यांचे भोजन, त्यांचे मौन, नग्न स्थितीत त्यांना भोजन वाढणाऱ्या स्त्रिया, कडक सोवळ्यातील वैष्णव मंदिरे यांची माहिती थोडक्यात देण्यात बाबांनी यश मिळविले आहे. अशा प्रकारे बाबांनी स्वकालीन आचारविचार सविस्तरपणे शब्दांकित केले आहेत. बाबांनी त्या वेळचा काळ, समाज, चालरीत यांचे जणू प्रत्यंतर आणून दिले आहे.

आपण जातीभेद कसा मोडला याचे बाबांनी जे विवेचन केले आहे ते मोठेच चित्तथरारक आहे. तो काळ कट्टर सनातन्यांचा होता. 'त्या काळात 'सुधारलेला' हा शब्द मुंबईत विशेषतः पुण्यात फार निंद्य असे. 'सुधारलेला' ह्या शब्दाची व्याख्या जातीचे आचार मोडणारा, मद्यमास खाणारा, चौपायी उडणारा अशी जुन्या समजुतीचे लोक करीत.' म्हणून बाबा स्वतःस सुधारक समजत नसत. परंतु मित्रांच्या संगतीत त्यांनी परमहंस सभेत प्रवेश केला. तेथे जातिभेदावर निकराचा वाद झाला. तेथेच बाबांनी जातिभेद मोडण्याची कबुली दिली व पुढील प्रसंग त्यांच्यावर गुदरला.

पण आमचे संभाषण होत असता त्यातून एकजण मुकाटयाने बाहेर जाऊन थोडयाच वेळाने काही बिस्कुटे घेऊन आला व ती आमच्यापुढे ठेवून म्हणाला की, 'जर तुम्हाला जातीभेद खोटा वाटतो तर ही खा पाहू'. आम्ही म्हटले, 'प्रथम तुम्ही खा' 'मग आम्ही खाऊ'. तेव्हा त्यानी त्यातून काही खाल्ली मग आम्हासही खाणे प्राप्त झाले. परंतु त्यावेळी माझी जी गाळण उडाली ती सांगता पुरवत नाही. माझ्या अंगास कंप सुटून चळचळा घाम आला व आता घरी गेल्यावर आई घरातून हाकून लावील असे वाटू लागले. जसा काही एखाद्यावर डोंगर कोसळून पडतो अशी माझी गत झाली. आता मी कुटुंबाच्या सर्व माणसांस मुकलो व जातीतून उठलो. परागंदा झालो. सर्वजण मला बाटगा म्हणतील असे वाटू लागले. कारण तोपर्यंत मी कधी पावबिस्कुटे खाल्ली नव्हती.[२३]

शेवटी मित्रास तर ग्लासात पाणी आणून दिल्यावर पावबिस्कुटे त्याच्या घसात उतरली याप्रमाणे आपण प्रथम हिंदु मित्रमंडळीतच जातिभेद गुप्तरितीने मोडला असे बाबा म्हणतात. बाबा ख्रिस्ती झाल्यावर त्यांच्या हिंदु पत्नीनेही जातिभेद मोडला होता असे ते सांगतात.

'म्हणजे एकदा भांडयात पाणी आणून त्यासुद्धा मला शिवून नंतर ते प्याली. हे तिने मी न सांगता केले.'[२४]

ज्या काळात हे घडले त्या काळात ब्राह्मणांच्या विहिरीचे पाणी देखील बाबांना व त्यांच्या घरच्यांस मिळत नसे. घरच्या स्त्रियास ब्राह्मणांच्याकडे दुरून हळदकुंकू घ्यावे लागे. ब्राह्मणाच्या घरचे वाढणे दुरून आमच्या पात्रात पडे. गोरगरिबांना वा महारमांगाना तर ब्राह्मणाच्या उष्टया पत्रावळीवरच समाधान मानावे लागत असे. 'दक्षिणेच्या आशेनेच आम्हांस ब्राह्मणांच्या घरी एखाद्या वेळी जेवावयास बोलवीत' असा उल्लेख बाबा करितात.[२५] जातिभेद मोडला या प्रकारेच बाबांनी आपली शेंडी काढून टाकली त्यावेळी त्यांनी मनःस्थिती अशीच बिकट झाली होती. त्यासाठी आपणास बराच प्रयत्न व विश्वास लागला व बऱ्याच वेळा प्रार्थना कराव्या लागल्या असे बाबा *अनुभवसंग्रहात* सांगतात.[२६]

जातिभेद मानू नये, विधवांच्या पुर्नविवाहाविषयी संमती असावी, मूर्तिपूजा करू नये इत्यादी मतांची पुरस्कर्ती परमहंससभा त्या वेळी गुप्त रीतीने भरत असे. बाबा या सभेच्या बाबत लिहितात,

मंडळीत प्रवेश करणारास तिचे नियम वाचून दाखवीत व त्याने त्यास आपली संमती दर्शविल्यावर तो ओंजळीत पाणी घेऊन खाली सोडी. नंतर एक दुधाचा प्याला आणून प्रथम अध्यक्षाने व दुसऱ्या कित्येकांनी तोंडास लावल्यावर त्यास प्यायला देत, आणि रोटीचा (पावाचा) तुकडा खावयास देत. ह्याप्रमाणे प्रवेशक विधि करून मला व माझ्या मित्रास मंडळीत घेऊन आमची नावे सभासदांच्या पटावर मांडली. सभेच्या आरंभी व शेवटी मराठीत प्रार्थना वाचीत. त्या दादोबा पांडुरंग यांनी रचल्या होत्या.

या प्रकारे परमहंस मंडळीची इत्थंभूत हकीगत बाबांनी कथन केली आहे. सभासदांपैकी काही महत्त्वाच्या माणसांची नावे, पोलिटिकल ऋषि, त्याचे *इंदूप्रकाशा*तील वृत्त, मंडळीचा बोभाटा, मंडळीबाबतचे निंदात्मक कवन व ते कवन करणार हलकट ब्राह्मण या सर्वांचा खराखुरा इतिहास

बाबा या ठिकाणी देतात. मंडळीच्या प्रवेशक संस्कारात रोटी व मुसलमानाचे पाणी देत. एकदा फोर्टातून रोट्या हातात घेऊन मिरवत ते सभास्थानी आले, सभेचे रजिस्टर कुणीतरी चोरले व रहस्यस्फोट करण्यासाठी वर्तमानपत्रात नावे दिली. हिचे सभासद १००० होते. शाखा बऱ्याच ठिकाणी होत्या वगैरे सनसनाटी वृत्त त्या काळातले, बाबांनी या सभेच्या वृत्त-निवेदनाच्या निमित्ताने तळटीपातून दिलेले आहे.[२७] बाबांचे हे आत्मचरित्र ऐतिहासिक दृष्ट्या माहितीपूर्ण ठरते ते असे. त्या काळातील महत्त्वाच्या गोष्टी आपणास या आत्मचरित्राने समजतात.

बाबांच्या या आत्मचरित्रात तत्कालीन शिक्षणाचे दर्शन देखील सहजगत्या घडते. प्राथमिक, माध्यमिक व उच्च शिक्षणाचे त्या वेळचे प्रतिबिंब *अरुणोदयात* पडलेले आहे. स्वतःच्याच नव्हे तर वडील व चुलते यांच्या शिक्षणाचाही उल्लेख त्यांच्या लेखनात आढळतो. *अरुणोदयाचे* दुसरे प्रकरण 'मराठी शाळेतील विद्याभ्यास व प्राकृत धर्मग्रंथाचा अभ्यास' याच नावाचे असून त्यात इ. स. १८३५–३६ च्या आसपासच्या सरकारी मराठी शाळेच्या शिक्षणाचे स्पष्ट चित्र रेखाटले आहे. अभ्यासक्रम, पुस्तके, पंतोजी, शिक्षणाची रीत, शिक्षेचे प्रकार, बक्षिसे वगैरे सांगोपांग विचार यात सापडतो. बाबांच्या वेळचे मराठी शाळेचे हे पुढील वर्णन पहा :

> ही शाळा इ. स. १८३० मध्ये स्थापलेली होती. तीत खोल्या नव्हत्या. केवळ लांबच लांब घोडसाळ किंवा उतार शाळेप्रमाणे ती होती. एकच दरवाजा असून पायऱ्या मात्र ऊंच. शाळेत घड्याळ नव्हते. सावलीच्या खुणांवरून सुटी देत असत. मुलांकरिता सरकारी पाट्या होत्या. कोणी मुले आपल्या घरच्या पाट्या आणून तेथेच ठेवीत. स्लेटीच्या ऐवजी मुले टिनाचे तगट वापरीत, त्यावर शाईने हिशेब मांडीत व ते ओल्या फडक्याच्या बोळ्याने पुसून टाकीत. स्लेट पेन्सिलच्या ऐवजी 'बळू' (कानडी) नावाच्या मातीच्या तुकड्याने लिहित. सुट्या फार असत.[२८]

बेळगावसारख्या शहरातील शाळेची ही परिस्थिती होती मग खेड्यापाड्यांचा विचार न केलेलाच बरा! तत्कालीन विद्यार्थ्यांना होणारी शिक्षा ते पुढील शब्दात सांगतात.

> गावात रात्री कीर्तन किंवा नाटक झाले असता जर दुसरे दिवशी जागरणामुळे मुले शाळेत आली नाहीत, तर त्यांस शिक्षा होत नसे.[२९]

पूर्वीच्या अघोरी शिक्षा त्यांनी कथन केल्या आहेत.

> शिक्षेचे प्रकार जुन्या गावठी शाळेप्रमाणे होते. म्हणजे घोडीवर चढवणे, पाठीवर पाट्या ठेवणे, कान धरून उठाबशा काढावयास लावणे, जमिनीवर हाताचे एक बोट टेकावयास लावणे व एक पाय मागे उचलावयास लावून ओणवे करणे, इत्यादी. वेतानेही मुलांस खूप बडवीत.[३०]

शिक्षा हे विद्यार्थी सुधारण्याचे माध्यम त्या काळातले. बाबांनी हे मोठ्या कौशल्याने व स्मरण-पूर्वक सुचविले आहे. 'अभ्यास म्हणजे साधारणच, म्हणजे धुळाक्षर, कित्ते वळविणे, खरडे लिहिणे, मोडी कागद वाचणे, असा होता. संध्याकाळी मुले परवचा म्हणत. वरच्या वर्गात काही भूगोल, व्याकरण, गणित शिकवित. वाचनाकरिता बालगोष्टी, मनोबोध कथा, इसाप-

नीति, लघु हितोपदेश . . . इत्यादी पुस्तके होती.' लघुहितोपदेशातील 'तू परमेश्वराचे भय धरीत जा व राजाचा सत्कार करीत जा' इ. उपदेश आपले पाठ होते. आपल्या गुरुने त्याचा अर्थ मात्र आपणास कधी सांगितला नाही असे ते टीपेत म्हणतात. अर्थहीन पाठांतर त्या काळात कसे अस्तित्वात होते याचे प्रत्यंतर बाबांच्या स्वतःच्या अनुभवावरून आपणांस समजते. ही गोष्ट मुद्दाम सांगण्यात बाबांना तत्कालीन शिक्षण पद्धतीतील दोष सांगावयाचा आहे. 'आमच्या अखवानजीला (पंतोजीला) व्याकरण किंवा गणित फार चांगले येत होते असे नाही व त्यांचे मोडी अक्षर चांगले नव्हते, ते ब्राह्मण असून त्यास सही करण्यापुरते इंग्रजी येत असे.'[३१] त्यानंतर गुरुदक्षिणा, गुरुंच्या सवयी, व्यसने व शाळेतील पास, नापासाबाबत होणारी वशिले-बाजी इ. आठवणीने लिहिले आहे. त्यांच्या शाळेतील एक नमुनेदार किस्सा ते लिहितात,

> एकदा कलेक्टर साहेब शाळा पहाण्यास आले असता हे (शिक्षक) शाळेत हजर नसून अशा खेळात गुंतले होते, त्यावरून त्यांस दंड झाला. त्यांस जुगाराचे व गांजा ओढण्याचे व्यसन लागले होते.[३२]

ते त्यापुढे लिहितात की गुरूजींनी आपणास वशिल्याने वरच्या वर्गात घातले आणि आपले विषय त्यामुळे कच्चे राहिले. आपलाच तोटा झाला. आजही शिक्षणाचे स्वरूप फारसे बदलले आहे असे म्हणवत नाही. बक्षिसाच्या बाबतीत शाळेतील मुले किती उत्सुक असतात हे त्यांनी विस्ताराने कथन केले आहे. आपणास क्यांडीकृत भूगोल खगोलाचे व दादोबाकृत नकाशाचे पुस्तक बक्षीस मिळाल्याचे ते सांगतात. ती पुस्तके पाहुण्यांना व घरी येणारांना आपण दाखवीत असू व नकाशातील देश, गाव, नद्या वगैरे सांगून पृथ्वीच्या वर्तुळाकाराबाबत सकारण, माहिती सांगत असू असे ते म्हणतात. एका सावकाराच्या मुलाने स्वतःच नवी पुस्तके विकत आणून 'बक्षिस मिळाले' असे त्यावर लिहून ती घरी दाखविली तर दुसऱ्या एकाने आपण शाळा सारवतो म्हणून बक्षीस द्यावे अशी शास्त्र्यांजवळ गळ घालून बक्षीस मिळविले.[३३] या बक्षिसाच्या संदर्भात बाबांनी कथन केलेल्या घटना शिक्षण क्षेत्रातील बक्षिसे या महत्त्वाच्या बाबीवर विचार करावयास लावणाऱ्या आहेत. विद्यार्थ्यांना शिक्षेचे भय असते तसेच बक्षिसाने प्रोत्साहन मिळते. शिक्षकांनी त्यांचा किती व्यवस्थित उपयोग करून घ्यावयास हवा यासाठी बाबांचे हे अनुभव खचित उपयोगी आहेत.

निबंधलेखन, वाचन, परीक्षा व सांस्कृतिक सण साजरे करणे यांचा शिक्षणात मोठा भाग असतो. याबाबत बाबा लिहितात,

> शाळेत काही अल्पस्वल्प निबंध वगैरे लिहिण्यास मुळीच देत नसत. जे मोडी वाचावयास देत ते अगदी किरकोळ व साधारण असे. घोकंपट्टी चाले. दर शनिवारी सरस्वती पूजन, गणपती पूजन होई. मामलेदार कचेरीतील चाकरी साठी परीक्षा होई. त्यासाठी कायदे पाठ करणारी मुले होती. कोणी आठ आणे परीक्षा उतरला, कोणी बारा आणे असा मार्कांचा हिशेब आणेवारीत होई. एक ब्राह्मणाचा मुलगा अभ्यास करताना झोपू नये म्हणून खुंटीस दोरी अडकवून ती स्वतःच्या शेंडीस बांधीत असे.

अशा प्रकारच्या उल्लेखनीय गोष्टी बाबांनी तत्कालीन शिक्षणाचे दर्शन घडविताना कथन

केल्या आहेत.[३४] बाबांच्या काळातले हे शिक्षणक्षेत्र चित्रण मनोरंजन करणारे पण विचार करावयास लावणारे, सुधारणेस प्रवण करणारे खचितच आहे.

शाळेव्यतिरिक्त शिक्षणाची सोय त्या काळात कशी होती याचा पण अंदाज बाबांच्या या आत्मचरित्रावरून बांधता येतो. बाबा एके ठिकाणी लिहितात,

मला प्राकृत ग्रंथ (*रामविजय, पांडवप्रताप, हरिविजय*) वाचावयास शिकविण्याकरिता एक हरदास ठेविला होता. संस्कृत शिकवण्यास एक ब्राह्मण येत असे. त्याने मला *रूपावली, समासचक्र, अमरकोश* व *रघुवंश* (२ रा सर्ग) इतके शिकविले. त्याला केवळ दरमहा २ रुपये देत असत.[३५]

आपल्या एका शिक्षकाचा भूगोल कच्चा होता, त्याला घेडगुजरी हिंदी येत होते व भटकी भिक्षुकी, ज्योतिषकथन व शिक्षकी पेशा असे अनेक उद्योग तो करीत असे. हे बाबांनी मुद्दाम सांगितले आहे. आजही आपण अशा प्रकारचे शिक्षक या क्षेत्रात पाहातो शिक्षणाचा दर्जा खालावण्याच्या अनेक कारणांपैकी हा अशा प्रकारचा शिक्षकही कारण असतो. पण लक्षात कोण घेतो!

इ. स. १८३२ साली स्थापन झालेल्या बेळगावच्या मिशन शाळेत बाबांच्या इंग्रजी शिक्षणाचा श्रीगणेशा झाला. आणि त्यानंतर इंग्रजी शिक्षणाचे आगर असलेल्या मुंबई शहरात शिकण्याचे बाबांना भाग्य मिळाले. ते लिहितात,

'मिशन शाळेत श्रीमंतांची, गरिबांची व सर्व जातीची मुले येत. मुलांस काही फी द्यावी लागत नसे. उलट गरीब मुलांस आठ आण्यांपासून तीन चार रुपयांपर्यंत सहाय्य मिळत असे.

आपल्या हायस्कूलचे हेडमास्तर बहुभाषी होते, हे त्यांनी स्मरण ठेवून सांगितलेले आहे. त्यास इंग्रजी, मराठी, कानडी, तेलंगी, तमिळ, गुजराथी, उर्दू, अशा भाषा येत होत्या असे ते म्हणतात. त्या भाषा जाणणाऱ्या मुलांना ते ती भाषा शिकवीत. पुस्तके त्यांच्या घरून न्यावी लागत. इंग्रजी शिक्षणाबाबतही त्यांनी अभ्यास, सुटी, खेळ, शिक्षा, परीक्षा, शिक्षणपद्धती व शिक्षक या सर्व घटकांचा जाणीवपूर्वक व त्याचे वैशिष्ट्य दर्शविणारा उल्लेख केला आहे. बाबा स्वतः शिक्षक होते याचा तर हा परिणाम नसेल? बाबा लिहतात,

या शाळेत शिकविण्याची रीत येणेप्रमाणे होती. मुलांस धडे तयार करण्याकरिता शाळेत वेळ देत असत, आता जसे एकसारखे धडे घेतच राहातात तसे नव्हते. मुलांच्या कापी लिहिण्याकडे फार लक्ष असे, प्रत्येक वर्गाचा मास्तर आपापल्या मुलांस कित्ता (कापी) घालून जाई. वरच्या वर्गातील मुले दर बुधवारी काही तरी विषयावर इंग्रजीत स्वल्प निबंध लिहून आणून एका विशिष्ट पद्धतीने तो बेन साहेबाकडून तपासून घेई. तो निबंध विद्यार्थ्यांच्या देखत शुद्ध केला जाई.

याप्रकारे लेखन तपासणी त्या काळात होत असे. ते तेथील शिक्षा सांगताना म्हणतात की मराठी शाळेप्रमाणे येथील शिक्षा क्रूर नव्हती. तरी विद्यार्थ्यांनी आणलेल्या छडीचा प्रसाद त्यास गुरूच्या हातून मिळे. कान पिळणे, गालावर चपडाका मारणे, बाकावर उभे करणे, चोरी वा अभ्यास न करण्याच्या अपराध्यास एक खास टोपी घालून त्यास शाळेतून फिरवित. मुलांच्या वस्तू

हरविल्यास प्रत्येकाची झडती होई. प्रार्थना होई, व बाईट अक्षर काढणारास, कापी न लिहिणारास शिक्षा होई. अशा प्रकारे आपल्या काळातील इंग्रजी शिक्षणाच्या शाळेचेही त्यांनी सुंदर शब्दचित्र रेखाटले आहे. क्वचित कटू पण हितावह गोष्टींचा उल्लेख करून पुढीलांवर एक प्रकारचा उपकारच त्यांनी करून ठेवला. बाबा लिहितात,

> गावात कोणी मौज करणारा आला म्हणजे टेलर साहेबांनी त्यास पैसे देऊन शाळेत आणून मुलांस त्याची मौज दाखवावी. एकदा एक जंगम आला होता तो पशुपक्षांसारखे आवाज करी.[३६]

तसेच त्या काळी शालोपयोगी पुस्तके कमी होती म्हणून व मुले गरीब म्हणून एकमेकांची पुस्तके घेऊन धडे शिकावे लागत व शब्दकोशाच्या अभावी शब्दार्थ वहीत घ्यावे लागत. एकाने तर मारवाड्याच्या खाते वहीसारखी वही केल्याचा उल्लेख ते करतात. शाळेच्या वार्षिक परिक्षेस पुष्कळ साहेब लोक येत. मडमा देखील परिक्षा घेत असत. इ. स. १८४७ साली बाबांनी एल्फिन्स्टन् स्कूलमध्ये प्रवेश घेतला. प्रवेश घेतांना त्यांना मिशन स्कूलचे सर्टिफिकेट ब्राह्मण जात नसल्याबद्दलचे दाखवावे लागल्याचे ते म्हणतात. बाबा लिहितात,

> त्यांनी मला प्रोफेसर दादाभाई (आनरेबल दादाभाई नवरोजी, एम.पी.) यांच्या स्वाधीन केले. त्या गृहस्थांनी मला खालच्या डिवीजनांतील दोन चार वर्गांत फिरवून व तेथील अभ्यासाचे एक एक पुस्तक वाचावयास लावून शेवटी (वरून) तिसऱ्या क्लासात बसविले.[३७]

अशी प्रवेश घेण्याची विचित्र पद्धती त्यांनी कथन केली आहे. याच शाळेत असतांना बाबांचे पहिले लग्न झाले. लग्नापूर्वी देवकार्यासाठी त्यांनी प्रथम रजा घेतली. नंतर परत थोडे दिवस बाबा शाळेत आले. लग्नतिथिच्या आसपास परत रजा मागितली. परंतु ती शाळेचे प्रिन्सीपाल काही केल्या देईनात. त्याला लग्नाच्या पूर्वी करावयाची धर्मकृत्ये व लग्नविधी याचा भेद समजेना. मग आजारी पडल्याचे सोंग घेऊन रजा घेतली. पुढे कुटुंब आदनास गेल्यावर त्या शाळेत जाण्याचा प्रसंगच आला नाही. पुढे आदनाहून परत आल्यावर इ. स. १८४९ मध्ये त्यांनी पूर्वीच्या अनुभवावरून एल्फिन्स्टन् स्कूल ऐवजी फ्री चर्च विद्यालयात प्रवेश घेतला. तेथे त्यांना रे. नारायण शेषाद्रि हे शिक्षक होते. त्यास शाळेत मुलांचे इनसाफाचे कोर्ट होते.

> नारायण साहेबांनी मुलांच्या अपराधाची चौकशी करण्याकरिता एक कोर्ट स्थापिले होते. शाळा सुटल्यावर सर्व अपराधी मुलांस ह्या कोर्टापुढे आणीत. त्या कोर्टात जुरर होते, त्यांनी आपला अभिप्राय स्लेटीवर किंवा कागदावर लिहून दाखवावा अथवा तोंडीच सांगावा, मुलांवर दोषारोपही त्यांचे मास्तर लिहून आणीत. मि. नारायण हे स्वतः त्या कोर्टाचे जज्ज होते. कोर्टाचा इन्साफ बहुधा सर्वांस मान्य होई.[३८]

असे इन्साफाचे कोर्ट मनीस्कूलांतही त्या वेळी होते. हल्ली शाळेत मुलांचे पार्लमेंट व स्वयं-शासन मंडळ असते, पण शंभर वर्षांपूर्वी बाबांच्या शाळेतील मुलांच्या कोर्टाचा प्रयोग खास शैक्षणिक होता. बाबांनी आत्मचरित्रात त्याचा आवर्जून उल्लेख करणे महत्त्वाचे आहे. विशेष आहे.

इंग्रजी शाळेतील शिक्षणाच्या चित्रणानंतर कॉलेज डिव्हिजनमधील शिक्षणाचे चित्रण बाबांनी

आपल्या आत्मचरित्रात पुढीलप्रमाणे केले आहे :

> त्यावेळी ते (बाबांचे वडील) साताऱ्यास होते. त्यांनी माझ्या मनाची स्थिती जाणून मला मिशन स्कुलातून काढण्याचा उपाय योजला. तो असा की मी ग्रांट मेडिकल कॉलेजात जाऊन वैद्यक शिकावे अशी इच्छा दर्शविली, ह्या इच्छेस मी आड आलो नाही. मलाही त्यावेळी त्या विद्येचा अभ्यास करावा असे वाटले. आणि त्याप्रमाणे मी सन १८५२ नात त्यात प्रवेश केला.[३९]

पुढे तेथील अभ्यासाच्या पुस्तकात धर्मसंबंधी विषय मुळीच दृष्टीस पडत नसे या कल्पनेने बाबा अस्वस्थ होत. एकदा बकेन्स अनाटामीच्या पुस्तकात काही ईश्वरविषयक विचार आले त्यामुळे त्यांना बरे वाटले. प्रोफेसरांच्या लेक्चरांचा सारांश त्यांना लिहावा लागे. तेथील शवविच्छेदनाच्या खोलीत जाण्यास बहुतेकांस किळस येई. कॉलिजमध्ये मन न रमल्यामुळे त्यांनी कॉलेज सोडले. त्यावेळी आठ नऊ महिन्याचे स्कॉलरशिपचे पैसे परत करावे लागले. मेडिकल कॉलिजातून निघाल्यावर पुन: फ्री चर्च विद्यालयात जाऊ लागल्यानंतर बाबांना काहीसे बरे वाटले. कारण तेथे धर्मशिक्षणाची उत्तम सोय होती. तेथील शिक्षक विद्वान व लोकप्रिय होते. मनुष्याच्या उद्धाराची त्यांना कळकळ होती. ईश्वरी विद्या, धार्मिक व व्यावहारिक विद्या मुलांना यावी म्हणून ते श्रम घेत. व्याकरण व मराठी श्रमाने शिकवित. धर्मशिक्षणाची विलक्षण ओढ तरुणपणीच बाबांना लागली व त्यांचे सारे आयुष्य त्यामुळे बदलले. शास्त्रीय शिक्षणाकडे बाबांचा ओढा नसला तरीही त्यांनी त्या काळांतील शिक्षणाचा परिचय करून देण्याचेही कार्य केले आहे.[४०]

*अरुणोदय* हे बाबांचे आत्मचरित्र एका विशिष्ट हेतूने केलेले आत्मनिवेदन आहे. आपले हिंदु जिणे व आपले ख्रिस्ती होणे व त्यानंतरचे परिणाम याबाबत बाबांना सांगावयाचे होते. केवळ मनोरंजनार्थ अथवा तीस चाळीस वर्षांमागे महाराष्ट्र देशात सुधारणा व विद्या यांची वाढ झाली याची माहिती व्हावी म्हणून आपण *अरुणोदय* लिहिले नाही, तर गाढ अंधःकारातून आपल्याला आश्चर्यकारक प्रकाशात बोलावले त्याचे ज्ञान इतरास व्हावे इतकेच अज्ञानांधकारातून ज्ञानसूर्य उगवण्यापूर्वीचा हा *अरुणोदय* आहे. ही यामागची भूमिका होय. एकदा हे ध्येयधोरण ठरवल्यावर बाबा संपूर्ण आत्मचरित्रात हे सर्व निवेदन अतिशय प्रामाणिकपणे करतात. लपवाछपवी, दांभिकता किंवा आढ्यता कोठेही आढळत नाही. आपल्या अंतःकरणाचे यथार्थ दर्शन प्रामाणिकपणे घडविणे हेच कार्य त्यांच्या *अरुणोदयाने* केले आहे. स्मरणातील गोष्टी, स्मरणवहीतील टिपणे, पत्रव्यवहारासंबंधी कागद, दिनचर्यालेख, छापील पुस्तके, रिपोर्ट व वर्तमानपत्रे मित्रांपासून मिळविलेली तोंडी माहिती, या साधनांचा आपण उपयोग करून प्रस्तुत ग्रंथ रचल्याचे ते सांगतात. प्रत्येक साधन सामग्रीचे खुलासेवार विवेचन प्रथम त्यांनी केले आहे. *अरुणोदयाचे* वाचन छापखान्यात पाठविण्यापूर्वी पाच वेळा झाले होते. त्याचप्रमाणे 'इ. स. १८३१ ते इ. स. १८५४ पर्यंत ज्या ज्या विशेष गोष्टीशी व व्यक्तींशी माझा निकट व दूर, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंध होता त्या गोष्टींचे व व्यक्तींचे विषयाच्या योग्यतेप्रामाणे स्वल्प किंवा सविस्तर वर्णन केले आहे.[४१] बादरायण संबंध आणून वा खोगीरभरती अशी माहिती दिली

नाही. 'हे केवळ त्यांचे स्वतःचे जीवनचरित्र नाही. बाबा स्वतःच *अरुणोदया*चा हेतू सांगतात,

> तो हाच की एक दीन पाप्यावर ईश्वराने जी परम दया केली तिचे वर्णन करावे आणि ते वाचून त्याजसारख्या इतर पाप्यांनी त्या दयेचा अनुभव घ्यावा व ज्यास असा अनुभव झाला आहे त्यांनी तिचा महिमा गावा.

याप्रकारे *अरुणोदया*चा हेतू व स्वरूप आणि साधने याबाबत लेखकानेच निवेदन केलेले आढळते. अज्ञानाचा नाश होऊन मती ज्ञानसूर्याचा उदय होऊ लागला त्या काळाचे हे निवेदन म्हणून *अरुणोदय* हे शीर्षक यथार्थ वाटते.

पापमुक्तीसाठी व स्वोद्धारासाठी बाबांनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार जरी केला तरी *अरुणोदय* हे काही आपल्या पापाचा कबुलीजबाब देणारा बटबटीत व केवळ निंदा व्यंजक आढावा नव्हे! तसा तो असता तर त्याची काळाच्या उदरात केंव्हाच वाताहत होऊन गेली असती. *अरुणोदय* हे अद्यापही आस्वाद्य ठरते ते त्यातल्या नितांत सुंदर साधेपणामुळे आणि मानसिक स्थित्यंतरांच्या कलात्मक आविष्कारामुळे! बाबांच्या मनावरच्या सात्विकतेचा पगडा अगदी लहानपणापासूनच किती प्रभावी होता याचे चित्र त्यांच्या धार्मिक श्रद्धांच्या वर्णनाने जसे लक्षात येते, तसेच उच्चतम नैतिक मूल्यांचा संस्कार त्यांच्या मनावर कसा होत गेला हेही त्यांनी त्यांचा मागोवा ज्या पद्धतीने घेतला आहे त्यावरून चांगल्या रीतीने जाणवते. फ्री चर्च विद्यालयात गेल्यानंतर सहा महिन्यांनी त्यांनी केलेली प्रतिज्ञा एका कागदावर लिहून ठेवून ती त्यांनी जपून ठेविली आहे. तिच्यात त्यांनी लिहिले आहे:

> सकल विश्वाचा उत्पन्नकर्ता श्री जगद्गुरू सर्वोत्तम नारायण याच्या पवित्र चरणांते स्मरून मी शपथ करतो की, आजपासून मी ह्याखाली लिहिलेल्या गोष्टी कदापि प्राण गेल्यासही करणार नाही व ईश्वर मला अशा गोष्टी करण्यास बुद्धि न देवो. जर मजपासून असे घडले तर शतगोहत्येच्या पातकाचे फळ माझ्या मस्तकी पडो; व यमराज मला अक्षय नरकात टाको. १ असत्य भाषण, २ चोरी, ३ रंडीबाजी, व्यभिचार, शिंदळकी व तत्संबंधी कर्मे, लावण्या, नाच, तमाशा, ख्यालीखुशाली, गप्पा व जर कदाचित यातून काही मजपासून घडले तर तात्काल 'हे परमेश्वरा' तुजपाशी क्षमा मागून पश्चात्ताप करीन. का की तुझ्यादयेशिवाय मनुष्याचे कोणतेही चांगले उद्योग सिद्धीस जात नाहीत. ता. २५ ऑगस्ट १८४९.[४२]

नीतीसंबंधी वर्तनाचा हा लेख आपण फ्री चर्च विद्यालयात जाऊ लागल्यावर का लिहून ठेवला, ख्रिस्ती शास्त्रातील संस्कारांच्या शिकवणीमुळे असा निश्चय करण्याचे अगत्य का वाटू लागले हेही त्यांनी लिहिले आहे.[४३] आणखी एके ठिकाणी बाबा लिहितात,

> मि. नारायण ह्यांच्या वर्गात गेलो तेव्हा मला तपकीरीचे व्यसन होते. आम्ही कित्येक मुलांनी मिळून तपकीर विकत आणण्याचा व डबी एकमेकांस देऊन बाहेर जाऊन ती ओढण्याचा एक लहानसा क्लब केला होता.

नंतर नारायण यांना ही गोष्ट समजली. त्यांनी तंबाखूपासून तोटे व हानी काय होतात यावर निबंध लिहून आणावयास सांगितले. इतर सर्व विद्यार्थ्यांनी त्याप्रमाणे परिश्रमपूर्वक निबंध लिहून आणले. लिहिण्याची अतोनात हौस असलेल्या बाबांनी मात्र एक ओळही लिहिली नाही.

शिक्षकांनी विचारताच 'आजपासून मी तपकीर सोडून दिली हाच माझा निबंध' असे बाबा म्हणाले!

किती बोलका प्रसंग हा आणि त्याचे वर्णनही! ह्या एवढयाशा उदाहरणानेही बाबांच्या व्यक्तीमत्वावर एकदम मोठा प्रकाश पडल्यासारखा वाटतो!

नाटचपूर्ण प्रसंगांच्या मनोवेधक हकीगती, स्वतःच्या मनाचे पारदर्शक प्रतिबिंब यांजबरोबरच अनेक प्रकारच्या व्यक्तींची वेधक चित्रणे यांमुळेही हे आत्मचरित्र लक्ष वेधून घेते.

> त्या दिवसात मि. नारायण हे ब्राह्मणी पोषाख करीत असत. त्यांची सर्व वस्त्रे पांढरीशुभ्र व स्वच्छ असत. पांढरे पागोटे, पांढरा अंगरखा, पांढरे उपरणे, पांढरे धोतर, पायात परभुशाई जाधवी जोडा व लांब पांढरे इस्टकीन, असा त्यांचा पोषाक होता. त्यात दोन गोष्टी मला विलक्षण दिसल्या. म्हणजे त्यांचे डोक्याचे इंग्लिश चालीप्रमाणे राखलेले केश व पायातील इस्टाकीन.[४४]

नारायण शेषाद्री यांचे बाह्यरूप या वर्णनातून नेमके उभे रहाते. बाबा पुढे लिहितात

> त्यांचे इंग्रजी बोलणे शुद्ध व स्पष्ट परंतु अंमळ मंद होते. ते मुलांशी क्वचित मराठी बोलत. ते फार श्रमाने व आस्थेने शिकवीत. त्यांच्या वर्गातील मुलेही हुशार व आनंदी असून त्यांचा मान राखीत. कोणी कोणी त्याजवर प्रीति करीत. ते कित्येक गरीब मुलास आपल्या खर्चाने शिकण्याची बुके देत. इतकेच नाही तर कपडेही देत. कधी कधी मी त्यांच्याशी वाद घाली, परंतु ते लवकरच मला कुंठित करीत.[४५]

याच प्रकारे बाबा आपल्या वडिलांचे चित्र रेखाटतात.[४६] 'जरी माझे वडील सुधारलेल्या लोकांपैकी नव्हते तरी त्यांनी आपल्याशी सूज्ञपणाची वर्तणुक केली. आपली मते समजून घेतली' असे सांगून ते म्हणतात,

> त्यांनी माझे लालनपालन करून मला लहानाचे मोठे केले, इतकेच नव्हे तर पुष्कळ द्रव्य खर्च करून मला सुशिक्षण व सुविद्या दिली; पुष्कळ वर्षे शाळेत राहू दिले; जी पुस्तके लागतील ती पुरविली; काही मोलवान पुस्तके वरिष्ठांकडून परदेशाहून मागवून दिली. अन्नवस्त्राची व संसारोपयोगी दुसऱ्या कोणत्याही गोष्टींची वाण पडू दिली नाही. मी उधळेपणाने खर्च करी. ते मला कधी रागे भरत, कठोर भाषण करीत, पण कधी दुजाभाव ठेवला नाही. मी ख्रिस्ती झाल्यास कुळास बट्टा लागेल व कुटुंबाची हानी होईल असे भय त्यांना वाटे.

या भयापोटी त्यांनी सामदामदंडभेद वगैरे सर्व प्रकार करून पाहून त्याचा काही उपयोग होत नाही म्हटल्यावर डोक्यात राख घातली नाही व बाबांशी संबंध तोडला नाही. आपल्या वडिलांच्या समजूतदार व प्रेमळ स्वभावाचे व मुलगा ख्रिस्ती झाल्यामुळे आपणास दुरावला म्हणून अंतरी व्याकुळ झालेल्या आपल्या आईचे फार वेधक चित्र रंगविले आहे.

बाबांच्या प्रथम हिंदू पत्नीविषयक वर्तनाबद्दल प्रा. म. वा. धोंड व प्रा. रा. ग. जाधव यांनी बाबांवर काही दोषारोप केला आहे, तो कितपत समर्थनीय वा योग्य आहे, ते पाहिले पाहिजे. धोंड म्हणतात,

> ख्रिस्ती झाल्यावर बाबांनी पत्नीच्या येण्याची सहा वर्षे वाट पाहिली पण तिच्या आई

वडिलांनी तिला जाऊ दिले नाही. शेवटी बाबांनी दुसरे लग्न केले, आणि त्यानंतर दोन वर्षांनी तिचे आईवडिल वारल्यावर ती बाबांकडे परत आली पण बाबा तिचा स्वीकार पत्नी म्हणून करू शकत नव्हते. त्यांनी तिला ख्रिस्ती होऊन दुसरे लग्न करण्याचा सल्ला दिला. तिने तो मानला नाही. ती मुक्यानेच मेली. या सगळ्या घटनांचे निवेदन बाबांनी काहीशा अलिप्तपणानेच केले आहे. सबंध आत्मचरित्रात तिचे नाव एकदाही आलेले नाही. माझी स्त्री, माझी बायको असाच उल्लेख आलेला आहे. जणू तिला त्यांच्याशिवाय स्वतःचे असे अस्तित्वच नव्हते.[४७]

त्याचप्रमाणे प्रा. रा. ग. जाधव यांची पण तक्रार अशीच आहे की बाबांनी या आत्मचरित्रात आपल्या हिंदू पत्नीला योग्य तो न्याय दिला नाही. ते म्हणतात,

पत्नीभावाने याचना करणाऱ्या स्वपत्नीबाबतचा प्रसंग बाबांनी पाषाणधर्मी वृत्तीने व स्थितप्रज्ञतेने वाटेस लावला. आत्मचरित्रात या प्रसंगास न्याय मिळाला नाही.[४८]

हे दोन्ही दोषारोप बाबांवर अन्याय करणारे आहेत असे मला वाटले. १८५४ पर्यंतचा *अरुणोदया*चा नियोजित कालखंड असतानांही बाबांनी अठराव्या प्रकरणात पहिल्या हिंदु-पत्नीसंबंधाने नियोजित मर्यादेबाहेर जाऊन सारी हकीगत बऱ्याच विस्ताराने दिली आहे. बाबांना पहिल्यापासूनच आपल्या पत्नीनेही आपल्यासारखेच ख्रिस्ती व्हावे असे वाटत होते म्हणून वारंवार घरी जाऊन तिला भेटून ते तिचे मन वळवण्याचा प्रयत्न करीत. ती बाबा ख्रिस्ती झाल्यानंतर त्यांच्याबरोबर जावयासही तयार होती इतकेच नव्हे तर आपण जातिभेद मोडला हे नवऱ्याला पटविण्यासाठी एकदा तिने बाबांनी न सांगताच, त्यांना शिवून मुद्दाम भांड्यातील पाणी प्याली. बाबांनी यासंबंधात वडिलांशी प्रदीर्घ चर्चा करून वडील फिरतीवर गेले म्हणजे तिने बाबांच्याबरोबर जावे यासाठी संमती मिळविली. परंतु अचानक सासऱ्याने आपल्या अन्य जावयाबरोबर येऊन हा सर्व बेत धुळीस मिळविला. या सर्व प्रकाराने बाबांच्या वडिलांसही फार वाईट वाटले. सासऱ्याने आपल्या मुलीला काढून घरी नेले व सतत चार वर्षे प्रयत्न करूनही बाबांना तिच्याशी संसार करण्यात यश मिळाले नाही. चार वर्षानंतर तिच्या शेजारच्या मनुष्याकडून तिची बाबांच्याकडे येण्याची तीव्र इच्छा आहे परंतु तिला तिच्या आईबापांचा अटकाव आहे असे समजल्यानंतर बाबांनी तिला भेटून विचारण्याचा मार्ग अगदी बंद असल्याने त्या वेळच्या सुप्रीम कोर्टात (हल्लीच्या हाय कोर्टात) फिर्याद करून तिला न्यायाधीशापुढे हेबियन कार्पस अन्वये समन्स काढले. या प्रकरणामुळे बाबांच्या सासऱ्याने व त्याच्या नातेवाईकांनी रात्रंदिवस बाबांच्या पत्नीभोवती कोंडाळे करून तिने न्यायाधीशासमोर 'नाही' म्हणण्यासाठी इतका दबाव आणला की त्यामुळे कोर्टात तिने रडत रडत 'नाही' म्हणून सांगितले.[५०]

न्यायाधीशासमोर बाबांनी तिला खूप समजावून पाहिले परंतु सासऱ्याच्या धाकामुळे त्याचा काही उपयोग झाला नाही. त्यामुळे बाबांना किती वाईट वाटले व त्यांचे समाधान कसे झाले याचे वर्णन मुळातूनच वाचण्यासारखे आहे. बाबा म्हणतात,

आम्ही चेंबर्समधून बाहेर पडताना माझ्या वकिलाने माझ्या समाधानार्थ मला एक

शास्त्रवचन म्हणून दाखविले ते असे की, 'जर अविश्वासी मनुष्य वेगळे होते तर वेगळे होवो'. ही गोष्ट १८५७ साली घडली व ह्या खटल्यास मला सुमारे दोनशे रु. खर्च आला हे पैसे *यमुनापर्यटन* पुस्तकात मला मिळाले होते, व ज्या अर्थी ते पुस्तक विधवांच्या हितार्थ छापले होते, त्या अर्थी त्याचा नफा नवरा जिवंत असून जी वैधव्यात पडली होती, तिला त्या अवस्थेतून सोडविण्यासाठी खर्ची घातला त्याविषयी मला वाईट वाटले नाही; परंतु माझा यत्न सफल झाला नाही म्हणून वाईट वाटले.[५१]

पुढे तीन वर्षांनी म्हणजे इ. स. १८६० मध्ये बाबांचे ख्रिस्ती लग्न झाले, तोपर्यंत बाबांनी आपल्या हिंदू बायकोची वाट पाहिली, परंतु ती आली नाही. परंतु हे लग्न झाल्यावर एकदा बाबा पुण्याहून येऊन मुंबईस एका मित्राच्या घरी उतरले असता ज्या दिवशी परत जाणार त्याच दिवशी दि. २ मे १८६२ बगीत सामान टाकून बसत आहे इतक्यात अकस्मात ती बाबांना भेटायला आली. तिच्याबरोबर कोणी नव्हते. बाबा लिहितात,

तिला पाहून मी चकित झालो. कारण आठ वर्षांनी मी तिचे तोंड पाहिले; मध्ये केवळ एक वेळ पाच वर्षांमागे कोर्टात मात्र ती दृष्टीस पडली. तिने आपल्यास पुण्यास घेऊन जावे व बायकोच्या नात्याने घरात ठेवावे, असा मला गळ घातला. तिला आता एकटी बाहेर पडण्याची मोकळीक मिळण्याचे कारण तिने सांगितले की तिची आईबापे व वडील भाऊ ही मरण पावली असून तिच्या भावाच्या मुलांकडून तिला पूर्वीप्रमाणे प्रतिबंध नव्हता. नंतर मी तिला सांगितले की आता माझ्याने तुला घेववत नाही. ख्रिस्ती धर्मात दोन बायका करण्याची मनाई आहे. तरी ती काही ऐकेना. मग मी राहणे करून तिला दुसरे दिवशी येण्यास सांगितले. त्याप्रमाणे ती आली. त्या भेटीच्या वेळी माझे बहुप्रिय ख्रिस्ती बंधू रेव. धनजीभाई नवरोजी हे माझ्या विनंतीवरुन आले होते. त्यांनी तिला पुष्कळ समजावून सांगितले पण ती आपला हेका सोडीना. मला त्याच त्याच असे म्हणत बसली. मलाही फार वाईट वाटले. परंतु माझा उपाय नव्हता. मी तिला असे सुचविले की जर तुझी ख्रिस्ती होण्याची इच्छा असली तर माझ्याबरोबर पुण्यास चल. तेथे तुला दुसऱ्या ठिकाणी ठेवून विद्या व धर्म शिकविन, आणि मग तुझी इच्छा असली तर दुसरे लग्न कर; अथवा शाळा वगैरे शिकविण्याचे काम कर. परंतु ही गोष्ट तिला मान्य झाली नाही. याप्रमाणे सुमारे दीड तासपर्यंत बोलणे झाल्यावर ती फार कष्टी होऊन मोठ्या नाखुषीने परत गेली.[५२]

विधवांशी पुनर्विवाहाचा पुरस्कार करूनही कुमारिकांशी लग्ने उरकणाऱ्या, गोवऱ्या स्मशानात गेल्या असताही तरुण कुमारिकेचा हात धरून बोहल्यावर उभे राहणाऱ्या, अनेक लग्ने करणाऱ्या, उघडपणे अखंड सौभाग्यवतीशी अखंड संबंध ठेवणाऱ्या कित्येक कर्त्या व नाकर्त्या सुधारकांपेक्षा बाबांचे हे वर्तन अत्यंत उज्ज्वल व अनुकरणीय नाही काय?

तसेच बाबांची हिंदू पत्नी त्यांच्याकडे याचनाभावाने आली तेव्हा बाबांनी ख्रिस्ती लग्न केले होते. हिंदू पत्नीशी घटस्फोट घेऊनच ही कृती त्यांनी केली होती. त्यामुळे जेव्हा हिंदू पत्नी त्यांच्याकडे येण्याची याचना करते तेव्हा त्यांचा इलाज नसतो. धर्मनिष्ठ बाबांनी आपली असमर्थता व पत्नीबाबतची हळहळ त्याप्रसंगी वर्णन केलीच आहे. आत्मचरित्र कलाकृती

असली तरी खरेपणाची बांधिलकी तिला असतेच. नाटयपूर्ण प्रसंग म्हणून तिचे भावपूर्ण वर्णन करणे ही प्रा. रा. ग. जाधव यांची अपेक्षा फारशी या बाबतीत तरी योग्य नव्हती कारण बाबांचे व या हिंदू पत्नीचे नाते यापूर्वीच तुटले होते. तेव्हा या भांवबंधनात अडकण्याचा प्रश्नच नव्हता. उलट बाबांनी त्या हिंदू पत्नीच्या असहाय्य परिस्थितीचा फाजील फायदा घेतला नाही. तिची फसवणूक न करता तिला मदत करण्याचा त्यांच्या परीने प्रयत्न केला. या पत्नीबाबत जे घडले त्याचे प्रामाणिक व प्रांजळ निवेदन त्यांनी केले आहे. त्यात आत्मसमर्थन किंवा पत्नीला दोषही दिला नाही. या हिंदू पत्नीस नंतर ते उघड उघड घरी ठेवू शकले असते. त्या काळच्या रीतीभातीत ते बसूही शकले असते. पण तसा मोह बाबांना कुठेही झाला नाही. इतकी धर्मनिष्ठा व इतके मनाचे शुद्धत्व त्या पिढीत दुर्मिळच! धोंड व जाधव यांनी विनाकारण दिशाभूल केली आहे असेच म्हटले पाहिजे!

धर्मांतरासारख्या महत्त्वाच्या व मौलिक विषयासंबंधीचे आत्मानुभव व्यक्त करणाऱ्या या ग्रंथाकडे कुतुहलाने वळलेल्या प्रा. जाधवांनी केलेल्या आणखी एका विधानाचा उल्लेख करणे जरुर आहे.

ह्या ग्रंथाचे मनापासून परिशीलन करणारा मनुष्य ख्रिस्ताचा झाल्यावाचून राहणार नाही या रे. टिळकप्रणीत पुरवणीतील प्रशस्तीचा आधार घेऊन जाधवांनी, मी *अरुणोदय* वाचले मग ख्रिस्ती का झालो नाही, अशा स्वरूपाचा युक्तिवाद केला आहे.[५५] हा सर्वच युक्तिवाद किंबहुना जाधवांचा हा सर्वच लेख इतका हास्यास्पद आहे की, त्याची अधिक चर्चा करण्याची आवश्यकताच नाही.

मराठीतील नव्या स्वरूपाच्या 'आत्मचरित्र' या वाङ्मयप्रकाराची मुहूर्तमेढ रोवणारी आद्य असूनही डौलाने तळपणारी व नंतर येणाऱ्या समृद्ध वाङ्मयाला दिशा दाखविणारी, *अरुणोदय* ही एक अत्यंत महत्त्वाची कलाकृती आहे, याबद्दल कोणत्याही जाणकाराचे दुमत होत नाही, होणार नाही यासंबंधाने विश्वास वाटतो.

## टीपा

१. *अरुणोदय*, आ. २, मुंबई, १९०८, पृ. १३ वर उद्धृत केलेले *मिशनरी हेरल्ड* मधले अवतरण पाहा. 'जॉन न्यूमन' ऐवजी 'ज्यॉन न्यूटन' असे छापले गेले आहे. तो उघड उघड मुद्रण दोष आहे. यापुढील *अरुणोदयाचे* सर्व संदर्भ दुसऱ्या आवृत्तीवरून घेतले आहेत.
२. *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार*, पुणे, १९२२, पृ. ९६.
३. 'बाबा पदमनजी' 'आकाशवाणी पुणे केंद्रावरुन १२ जानेवारी १९५५ रोजी केलेल्या भाषणाचे हस्तलिखित. पृ. ५.
४. *अरुणोदय*, आ. २. मुंबई १९०८ पृ. ९. प्रस्तावना, पृ. ९.
५. तत्रैव, पृ. ८.
६. तत्रैव, उनि., पृ. १.
७. तत्रैव, पृ. ३५.
८. तत्रैव, पृ. ५६.
९. तत्रैव, पृ. ३५.
१०. तत्रैव, पृ. १२३.
११. तत्रैव, पृ. ७०.
१२. तत्रैव, पृ. ७१.
१३. तत्रैव, पृ. ७२.
१४. तत्रैव, पृ. ७३.
१५. तत्रैव, पृ. ७३.
१६. तत्रैव, पृ. ७.
१७. तत्रैव, पृ. १०२.
१८. तत्रैव, पृ. २९.
१९. तत्रैव, पृ. ३०.
२०. तत्रैव, पृ. ३७.
२१. तत्रैव, पृ. ३७, ३८.
२२. तत्रैव, पृ ४४.
२३. तत्रैव, पृ. ९४, ९५.
२४. तत्रैव, पृ. १७३.
२५. तत्रैव, पृ. ४.
२६. *अनुभवसंग्रह भाग १*, मुंबई, १८९५, पृ. १८०.

२७. *अरुणोदय*, पृ. ९६, ९७.
२८. तत्रैव, पृ. १०.
२९. तत्रैव.
३०. तत्रैव.
३१. तत्रैव, पृ. ११.
३२. तत्रैव, पृ. १२.
३३. तत्रैव, पृ. १३.
३४. तत्रैव, पृ. १४.
३५. तत्रैव, पृ १५
३६ तत्रैव, पृ २२
३७ तत्रैव, पृ ५१, ५२.
३८. तत्रैव, पृ. ६५.
३९. तत्रैव, पृ. १३४.
४०. तत्रैव, पृ. १४०.
४१. 'प्रस्तवाना', तत्रैव, पृ. ९.
४२. तत्रैव, पृ. ८०.
४३. तत्रैव, पृ. ८०.
४४. तत्रैव, पृ. ६६.
४५. तत्रैव, पृ. ६५.
४६. तत्रैव, पृ. १४५.
४७. *ज्ञानोदय*, सप्टेंबर १९७१, पृ. ९.
४८. 'अरुणोदय नि वाचकांच्या समस्या', *नवभारत*, वाई, एप्रिल, १९६४, पृ. ४५.
४९. तत्रैव, पृ. १७३, १७४.
५०. तत्रैव, पृ. १७५.
५१. तत्रैव, पृ. १७५.
५२. तत्रैव, पृ. १७६.
५३. उनि. पृ. ३९.

# १३

## अनुभवसंग्रह : बाबांचे ख्रिस्ती जिणे

*अनुभवसंग्रह* म्हणजे बाबांचे एक प्रकारचे आध्यात्मिक आत्मवृत्त होय. *अरुणोदया*त बाबांनी आपले हिंदु जिणे व ख्रिस्ती होणे मोठ्या कलात्मक रीतीने व्यक्त केले; तर आपल्या ख्रिस्ती जिण्याचा, चाळीस–पन्नास वर्षांचा अनुभव या *अनुभवसंग्रहा*मध्ये ग्रंथित केला आहे. आपल्या बाप्तिस्म्याच्या चाळीसाव्या वर्षी या पुस्तकाचा पहिला भाग त्यांनी इ. स. १८९५ साली प्रसिद्ध केला. अनुभवाची तत्त्वे, ईश्वरी कृपेचा अनुभव आणि ख्रिस्ती जीवनातील कित्येक स्मरणीय व अनुभूत गोष्टी देऊन बाबांनी आपल्या पारमार्थिक आयुष्याच्या वेळोवेळी दैनंदिनीत केलेल्या नोंदी संग्रहीत केल्या आहेत. याचा दुसरा भाग दहा वर्षांनी याच पद्धतीने बाप्तिस्म्याच्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त प्रसिद्ध केला. बाबांच्या शब्दात सांगावयाचे तर 'दोन्ही पुस्तकांचा हेतू एकच, व दोन्हींची रचना व रूपेही एकच आहेत.'[१] दोन्ही पुस्तकांतील लेख त्यांच्या दैनंदिनीतीलच आहेत. फक्त पहिल्या भागात केवळ मराठी तर दुसऱ्यात मराठी व इंग्रजी असे दोन्ही भाषांतील लेख आहेत. मनाच्या स्फूर्ती व प्रेरणेनुसार हे लेखन केले आहे व 'माझ्या दिनचर्यालेखाचे संग्रहण, स्पष्टीकरण व प्रकाशन इतरांस यथायोग्य करता आले नसते म्हणून मूळ २०० पानांतून निवड करून आपण आपले अनुभवसंग्रह सिद्ध केले.' असे बाबा सांगतात. यातील माहिती सलग नाही. तरी बाबांच्या व्यक्तिमत्वाचे, त्यांच्या उत्कट ख्रिस्तनिष्ठेचे, ख्रिस्ती धर्मतत्त्वांचे व त्यांच्या समकालिनांच्या अनेक विशेषणांचे त्यातून स्पष्ट होत असल्यामुळे ती अत्यंत उपयुक्त आहे.

*अनुभवसंग्रहा*विषयी बाबा लिहितात,

ह्या पुस्तकात माझे जीवनचरित्र लिहिले नाही. तथापि जो अनुभव यात लिहिला आहे त्याचा माझ्या जीवनाशी संबंध अति निकट संबंध आहे. माझ्या जीवनाचे मुख्य दोन भाग मानले असता पहिल्या भागाला 'जुने जीवन' व दुसऱ्या भागाला 'नवे जीवन' असे नाव दिले

पाहिजे. जुन्या जीवनाचा वृत्तांत *अरुणोदयात* व नवीन जीवन *अनुभवसंग्रहात* आहे. ह्या पुस्तकात माझे नवीन जीवन व अनुभव ही मागावरील ताण्याबाण्याप्रमाणे परस्परांत विणलेली आहेत. तरी त्यात नवीन जीवनाचे सर्व तंतू दृश्यामान नसून जे दृश्य आहेत ते वाचकांस सहज ओळखता येण्याजोगे नाहीत. यास्तव ही येथे थोडक्यात दाखवितो म्हणजे त्यावर अनुभवरूप तंतू कसे गुंफले आहेत हे त्यास विषेश स्पष्ट रीतीने समजेल.[२]

जुन्या जीवनातील काही गोष्टी सांगताना ते लिहितात,

माझे वडील मूळचे मुंबई येथील रहिवाशीं असून द. म. देशातील बेळगाव येथे पुष्कळ वर्षे सरकारी इंजिनियर खात्यात नोकरीवर होते. तेथे सन १८३१ साली माझा जन्म झाला. माझा मराठी अभ्यास तेथील सरकारी शाळेत झाला व इंग्लिश अभ्यासास आरंभ त्याच ठिकाणच्या लंडन मिशनच्या शाळेत होऊन पुढे मुंबई एलफिन्स्टन विद्यालयांत व त्यानंतर फ्री चर्च विद्यालयात समाप्त झाला.[३]

हे सांगून पुढे ते लिहितात,

माझा बाप्तिस्मा सन १८५४ साली बेळगावी झाला. माझी आईबापेही त्या वेळेस तेथेच होती. नंतर मुंबईस फ्री चर्च विद्यालयात शिक्षकाचे काम पत्करिले, आणि ईश्वरविद्या शिकण्याच्या वर्गात मी होतो. परंतु प्रकृती नादुरूस्त झाल्याने मी तो वर्ग सोडला. पुढे माझे वडील बेळगावी सरकारी कामावर असता एका मनुष्याने एक खटला उभारून मुंबईच्या हायकोर्टात त्यांच्यावर सुमारे १५००० रुपयांची फिर्याद लावली.[४]

त्या खटल्याची पूर्ण हकीगत बाबांनी दिली आहे. वडिलांनी भोळेपणाने एका काँट्रेक्टरला एका कागदावर काही मजकूर लिहून दिला. त्याच्या भागीदाराने त्या कागदाचा गैरवापर करून बाबांच्या वडिलांवर खटला भरला. तीन वर्षे खटला चालला. १५०० रु. खर्च या खटल्याप्रीत्यर्थ आला. वादी ५००० रु. मागत होता. ह्या संकटात त्यांना जो ईश्वरी कृपेचा अनुभव आला तो ह्या पुस्तकात सांगितला आहे. त्यानंतर १८५७ साली २०० रु. च्या लालचीने वडिलांच्या हापिसातील ब्राह्मण सरकारकुनाने हापिसरचे कान भरले. वडिलांवर ४० आरोप ठेवले. वडिलांना कामावरून दूर केले गेले. अब्रू गेली. पैसा गेला. पण बाबा वडिलांच्या मदतीस बेळगावी गेले व ईश्वरकृपेने ते संकट टळले. बाबांच्या वडिलांना कामावर घेतले. पगार मिळाला व पेन्शन पण मिळाली. हा अनुभव बाबांनी आपली प्रापंचिक अडीअडचणीतून देव कशी सुटका करतो हे स्पष्ट करण्यासाठी कथन केला आहे.

त्यानंतर जीवनातील काही महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख त्यांनी यात केला आहे. ते म्हणतात, 'सन १८६० साली मी मुंबई सोडून पुण्यास जाऊन राहिलो. त्याच वर्षी माझे पहिले ख्रिस्ती लग्न तेथेच झाले.' त्यासंबंधी ईश्वरकृपेचा अनुभव त्या सालातील *अनुभवसंग्रहात* आहे. तो असा,

पुण्यात मी १६ वर्षे होतो. त्या काळात मी जी पुस्तके रचिली त्यांत माझ्या दोन कोशासंबंधी कामाचे विचार ह्या पुस्तकात संग्रहित केले आहेत. (द्रव्य सहाय्य व काम शेवटास गेले ते ईश्वरी कृपेने हा त्यांचा मानस.) लग्न व पुस्तक रचना ह्या खेरीज मला पाळकाची

> दीक्षा मिळणे ही ह्या काळातील माझ्या जीवनचरित्रातील एक मोठी गोष्ट होती. (इ. स. १८६७.)[५]

त्यानंतर बाबांनी इ. स. १८७३ मध्ये पाळकपद सोडले. सहकुटुंब वडिलांच्या भेटीसाठी बेळगावला जाणे, मित्रांच्या भेटीसाठी व पुस्तकाच्या कामाप्रित्यर्थ मुंबईस जाणे इ. गोष्टी चालूच होत्या. ते लिहितात,

> सन १८७२ साली माझे कुटुंब निवर्तले. त्याच्या पुढल्या वर्षी मी दुसरे लग्न केले. १८७९ साली मी पुनः विधूर झालो. आणि इ. स. १८८१ साली मी तिसऱ्यांदा विवाहित झालो. ह्या अवस्थेत दहा वर्षे होतो. सन १८९० त माझे तिसरे व शेवटले कुटुंब वारले.[६]

त्यानंतर बाबांच्या कथनाप्रमाणे बाबांना इ. स. १८७७ मध्ये मुंबई बैबल व ट्राक्ट सोसैटी यांजकडून काम मिळाले, ह्यांपैकी ट्राक्ट सोसैटीचे काम पैशाच्या तुटीमुळे दोन वेळा सुटले होते, दुसऱ्या वेळी तर तीन वर्षे कामच नव्हते. असे बरे वाईट अनुभव येत होते. ईश्वरी कृपा प्रत्ययास येत होती. तिची नोंद या *अनुभवसंग्रहात* केली आहे.

त्यांना आपल्या मातापितरांचे व त्यांच्या प्रेमळपणाचे अनुभव आले. ते म्हणतात,

> माझी प्रिय आई १८६५ मध्ये बेळगावी निवर्तली. त्या वेळी मी अहमदनगरास होतो. तिच्या मरणाची खबर आल्यावर मी रडू लागलो. तेव्हा माझी प्रिय पत्नी सेरा (पहिले कुटुंब) माझे शांतवनाकरिता जे बोलली ते अद्याप माझ्या आठवणीत आहे. ती म्हणाली की तुमची आई मरण पावली तर मी तिच्या जागी तुमची आई होईन व ती खरोखर तशीच होती.[७]

अशा प्रकारे ईश्वरी दयेचा, कृपेचा, सहाय्याचा अनुभव बाबांना येत होता. गोरगरिबांना सहाय्य, विद्यार्थ्यांना मदत, परदेशीय सधनांचे बाबांना सहाय्य, संकट निवारण, बढती, धर्म, परोपकार, पुस्तकरचना, प्रवास, रोगराई निवारण, धर्मप्रचार इ. प्रत्येक प्रांतात परमेश्वरी कृपेचा आलेला प्रत्यय, झालेला आत्मोद्धार व लोकोद्धार या बाबतीतील विविध अनुभव प्रामाणिकपणे, सत्यापलाप न करता त्यांनी या पुस्तकात कथन केलेले दिसतात. बाबांची खरी ओळख यात होते.

बाबांचे खाजगी, सामाजिक जीवन व्यक्त करणारे अनेक प्रसंग *अनुभवसंग्रहात* निवडलेले आहेत. ते अभिरुचिसंपन्न आहेत. व्यक्तिगत अनुभव, प्रार्थना, विश्वास व श्रद्धा यांचे फळ, लेखकाचा भक्तीभाव, लेखकावर परमेश्वरी करुणेचा झालेला कृपाप्रसाद, ऐहिक व पारलौकिक कल्याण, आत्मिक उद्धार, दैवी साहाय्य वगैरे अनंत बाबी या पुस्तकात आलेल्या आहेत. हे सर्व प्रसंग लेखकाचे स्वानुभवाचे असल्याने त्यात एक प्रकारचे सामर्थ्य आहे. यातील काही अनुभव कसोटी पाहणारे असले तरी त्यांत बोध व आत्मिक सामर्थ्य निश्चितच आहे.

*अनुभवसंग्रहात* त्यांच्या ख्रिस्ती जीवनाचे अनेक अनुभव नोंदलेले सापडतात. ते सर्व अंतर्मुख वृत्तीचे आहेत. धर्मांतरानंतर ख्रिस्ताची आपणावर झालेली कृपा, ख्रिस्ती जिण्याने आत्म्याचा झालेला उद्धार, अडीअडचणीतून झालेली ख्रिस्ताची मदत वगैरे गोष्टी बाबांनी या *अनुभवसंग्रहातून* जाणीवपूर्वक लिहिल्या आहेत. अनुभवांचा संग्रह करून तो इतरांना मार्ग-

दर्शक व्हावा या हेतूने बाबा पदमनजींनी तो ग्रथित केला आहे. *ज्ञानोदयाने अनुभवसंग्रहाचे* परिचयात्मक वृत्त खालील प्रकारे प्रसिद्ध केले आहे :

> ह्या पुस्तकात रेवरंड बाबा साहेब यांच्या चाळीस वर्षाच्या ख्रिस्ती जिण्यातील ईश्वरी कृपेचा काही अनुभव व कित्येक अनुभूत गोष्टी वर्णिल्या आहेत. ह्या गोष्टी तीन मुख्य भागांत छापल्या म्हणजे अनुभवाची लक्षणे, ईश्वरी कृपेचा अनुभव व कित्येक स्मरणीय व अनुभूत गोष्टी. प्रत्येक विषयाच्या संबंधाने फार थोडक्यात टिपण दिले आहे. असे की, वाचणारांस कंटाळा न येता उलट त्या विषयावर आणखी समजण्याची जिज्ञासा उत्पन्न होते. तशात या पुस्तकात अनुभविक ख्रिस्ती वाचकास वाचताना बहुत ठिकाणी डोळ्यांत पाणी आणावे लागते. . .जुन्या व नव्या ख्रिस्ती मनुष्यास हा अनुभवसंग्रह फार उपयोगी आहे, यात संशय नाही.[८]

*अनुभवसंग्रह* या आपल्या पुस्तकाच्या रचनेस आपल्या दिनचर्यालेखाचे खूप सहाय्य झाले असे बाबांनी त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहून ठेवले आहे. या दिनचर्येत काय काय असते याचे विवेचन बाबा एका नोंदीत करतात, ती नोंद अशी :

> तरी एक गोष्टी मी जाणतो, ती ही की, यात पूर्वीप्रमाणे प्रभूच्या दयेचे अनुभव लिहून ठेवले जातील, प्रभु मला काय सांगतो व काय शिकवितो व काय करावयास आज्ञापितो तेही सवड सापडेल त्याप्रमाणे यात येईल.[९]

यावरून बाबांची मनोवस्था कशी ख्रिस्तमय झाली होती याची कल्पना येते. बाबा आणखी एके ठिकाणी लिहितात,

> मी पुरा पापी व ख्रिस्त पूर्ण तारणारा आहे. संसारातील सुखदुःखावरून मला स्वर्गीय वस्तूविषयी वारंवार बोध झाला. स्वर्गात ज्या उत्तम वस्तू मला प्राप्त होणार आहेत त्यांत निर्भयता, विश्रांति, पापा पासून पूर्ण मुक्ति, प्रिय प्रभूचे दिव्य दर्शन व सतत समागम, भक्तांची संगत, दूतांचा सहवास इ. गोष्टी मला प्राप्त होतील.[१०]

शास्त्राचा अर्थ सांगण्यात, बोध करण्यात व प्रार्थनेत आपल्याला ईश्वराकडून प्रेरणा मिळाली असेही बाबा म्हणतात,

> माझे पुष्कळ जुने मित्र प्रिय जग सोडून गेले आहेत तरी तू मला सोडिले नाहीस. तू खरा मित्र आहेस. तू चिरकाल राहातोस. मला तुझा कधी वियोग घडत नाही. माझे नातलगही मला सोडून गेले. तरी तू माझा ज्येष्ठ बंधू आहेसच. तुला माझी काळजी आहे. माझ्या सर्व गरजा तू करितोस. मजवरील तुझी प्रीति अखंड व अढळ आहे.

अशी जळीस्थळी, काष्टीपाषाणी ख्रिस्त, त्याची कृपा, त्याची दया त्यांना दिसते. बाबांनी मार्च १९०२ मध्ये पेनशन घेतले. याबाबत आपण 'मनुष्याच्या सेवेतून निवृत्त झालो, देवाच्या सेवेतून नाही. जीवात जीव आहे तोपर्यंत त्याची सेवा आपण करणारच. कारण तो म्हातारपणीं आपला व मुलाबाळांचा संभाळ करितो' अशी त्यांची दृढ श्रद्धा त्यांनी प्रकट केली आहे.[११]

असे अनेक अनुभव या पुस्तकात आहेत.

आपल्या बाप्तिस्म्याच्या ४० व्या वाढदिवसानिमित्त बाबांनी *अनुभवसंग्रह*ही एक स्मरण गाथा लिहिली आहे असे दिसते. *अनुभवसंग्रह भाग १* मध्ये एकूण तीन भाग आहेत. त्यापैकी पहिल्या भागांत बाबांनी ख्रिस्ती अनुभवाची मूल तत्त्वे कथन केली आहेत. सर्व ख्रिस्ती अनुभवाची सर्व तत्त्वे, किंवा पद्धतवार व सविस्तर असे त्यांचे स्वरूप नाही तर स्वानुभव व शास्त्र यांच्या आधाराने ती मांडली आहेत. बाबा प्रथम 'प्रार्थने'विषयी म्हणतात, 'प्रार्थना ही आग्रहाची व आस्थेची असली पाहिजे.' प्रार्थनेने पापांगिकार व उपकारस्तुति झाली पाहिजे. आपण प्राप्य वस्तूसाठी मनमोकळेपणाने प्रार्थना करावी. प्रार्थनेने आपले आत्मिक व दैहिक हित झाले असे बाबांना वाटते. तसा त्यांचा अनुभव आहे. क्वचित प्रार्थनेत त्यांनी आळस केला. प्रत्येक प्रसंगी प्रार्थना करणे उचित आहे. हिंदू नामस्मरणाप्रमाणे 'ख्रिस्ती प्रार्थना' अहर्निश करावयाची असते, असेच जणू बाबांना सुचवायचे आहे. ख्रिस्ती माणसाने आपला उद्योग व व्यवसाय देवाकरिता, देवाच्या मंडळीकरिता व जगाकरिता करावा असे त्यांना वाटते. आपले काम देवास संतोषविणारे आहे की नाही हे पाहावे असे त्यांचे मत या अनुभवात प्रगट झालेले आहे. देव आपली सर्व कामे पाहातो हा बाबांचा महत्त्वाचा अनुभव आहे. आपल्या चांगल्या वाईट कामाबद्दल आपणास परमेश्वरापुढे जाब द्यावाच लागेल. बाबा लिहितात,

> मला काम करण्याकरिता जी बुद्धि व शक्ति हवी होती ती वारंवार मी ख्रिस्तापाशी मागितली आणि जशी ती तो देत गेला तशी मी ती खर्चण्याचा यत्न केला. नावासाठीच किंवा डौलासाठीच एकदम मोठे काम हाती घेऊन उपयोग नाही. मुंगीप्रमाणे सतत काम करीत गेल्याने शेवटी त्याचे फळ मोठे होते.[१२]

संसाराच्या कामातही प्रभूला तोषविता येते. ही कामे क्षणिक असली तरी देवाचे भय धरून केली असता, त्याच्या गौरवार्थ केली असता त्यापासून आपणास आत्मिक फळ प्राप्त होते. अन्य धर्मियांना ख्रिस्ती धर्माचे महत्त्व आकलन होते व अन्य धर्माचे दुर्बलत्व त्यांच्या ध्यानी येते. परमेश्वर जर आमच्याकडून काही न घेता आमची कामे फुकट करितो तशी आम्ही दुसऱ्या माणसांची कामे करावीत. निष्काम कर्म केल्याने प्रभूची आठवण होते व आपण उपकार केलेल्यांनीही जरी उपकार केला तरी वाईट वाटत नाही. तरी आपण प्रभूस आवडणारे काम केले हे आत्मसमाधान वाटते, असे बाबा म्हणतात.

बाबा उद्योगाच्या संदर्भात लिहितात,

> हिंदु धर्मातील दैववाद, शकुन व मुहूर्त व ग्रहांची अनुकूलता किंवा प्रतिकूलता यांच्या बंधनापासून मुक्त झाल्याने मला उद्योग करण्यास किंवा व्यर्थ भय किंवा कल्पित विघ्ने आड आली नाहीत. आणि वृथा आशेने मी उत्तेजित झालो नाही. ईश्वरी सूत्रावर माझा पूर्ण भरवसा असल्याने व त्याच्या आशीर्वादाने सर्व कामे सफळ होतात, असा विश्वास धरल्याने माझी ज्या ज्या वेळी कार्यसिद्धी न होता ऐहिक हानी झाली त्यावेळी 'ईश्वर मला पुरवील व तो माझा वाटा होईल' ह्या गोष्टीकडून माझे बहुत समाधान झाले, आणि दुसरी कामे हाती घेण्यास धैर्यही आले.[१३]

द्रव्यसंचय करण्यापेक्षा त्याचा सद्व्यय करावा, ऋणमुक्त व्हावे, गरीबी पापामुळे वा श्रीमंती

ईश्वरी कृपेने येते असे न समजणे, आपला चरितार्थ व कौटुंबिक गरजा प्रभू भागवितो, कर्ज न काढता परमेश्वरावर भरवसा ठेवला असता तो आपणास अनेक मार्गांनी साहाय्य करतो असा बाबांचा अनुभव आहे. आपल्या आवाक्याच्या बाहेर कर्ज काढू नये, ते पाप आहे, हाही अनुभव स्वानुभवातून त्यांनी मांडला आहे. पाप, जग, सैतान हे तिघे ख्रिस्ती मनुष्याच्या आत्म्याचे वैरी आहेत. त्यांचा मोह टाळणे हे महत्त्वाचे आहे. बाबा म्हणतात, 'पाप घातक आहे. जग मोहक आहे. सैतान कपटी आहे.' प्रभू येशूच्या गुणवर्तनाचा कित्ता गिरवून आपण या त्रयीपासून सहीसलामत बचाव करू शकतो असा अनुभव बाबा कथन करतात. बाबा ख्रिस्ती पवित्र शास्त्राबाबतचा आपला अनुभव लिहितात की,

> पवित्र शास्त्र मात्र परमेश्वराने मनुष्यास दिलेले पवित्र शास्त्र आहे. त्याच्या योगेकरून मला देवाची ओळख झाली व तारणारा मिळाला. आणि आज चाळीस वर्षे ते माझ्या पायास दीप व माझ्या वाटेस प्रकाश असे आहे. मी जरी अनेक वेळा ते साद्यंत वाचले तरी त्याचा मला कंटाळा आला नाही, व त्याचा जितका मी मन लावून अभ्यास केला तितका त्याचा मला अधिक अर्थ समजला. ते समुद्रासारखे खोल व ओहळासारिखे उथळही आहे. त्यात महाबुद्धिरूप गलबते चालतात व त्यातून मुंगीसारखा अल्पमति पोहून जातो. त्यात शोधले असता नित्य नवी रत्ने सापडतात. त्याचे अध्ययन पवित्र आत्म्याच्या साहायाने केले पाहिजे.[१४]

शास्त्रवाचन, शास्त्रापासून बोध घेणे इत्यादी गोष्टी नित्यनियमाने कराव्यात हा बाबांचा अनुभव अतिशय महत्त्वाचा आहे.

कर्तव्ये, सत्कर्म व परोपकार यांच्या आचार ख्रिस्ती माणसाने ख्रिस्तासारखा करावा. ख्रिस्त जनात वागून सर्व कर्तव्ये पूर्ण रीतीने पाळत असे, सत्कर्मे करीत देशात फिरत असे व सर्वांवर उपकार करीत असे. कर्तव्य, सत्कर्म व परोपकार यांच्या आचरणाआड स्वार्थ, अभिमान, कुरकुरी, कंजूषपणा, ढोंग, कपट, लोकभय, लोकप्रियता, लोकलज्जा इत्यादी गोष्टी येतात. याचा बाबांना अनुभव आला होता. याबाबत बाबा लिहितात,

> जेव्हा आपण ईश्वराविषयीची कर्तव्ये करण्यास जपतो तेव्हा मनुष्यांविषयीची कर्तव्ये आपल्या हातून नीट होतात. आणि जेव्हा आम्ही आपल्या ख्रिस्ती भावांविषयीची कर्तव्ये प्रभूच्या आज्ञेप्रमाणे बजावितो तेव्हा जगावरही उपकार करण्यास आम्हास प्रेरणा व उत्तेजन व सहाय्य मिळते.[१५]

ईश्वरभक्ताशी समागम ठेवणे आत्मिक वृद्धीसाठी आवश्यक आहे. ख्रिस्ती भक्ताच्या सहवासाने बाबांना आनंद व बोध झाला. स्वतःच्या चुकांचे ज्ञान झाले तसेच ईश्वरभक्तीची प्रेरणा पण मिळाली. आपल्या १२००० पत्रांपैकी शेकडो पत्रे भक्तसमागमाविषयी लिहिली होती असे ते म्हणतात. आपण ख्रिस्ती मंडळीत जातो हे भक्तसमागमाचे साधन आहे. आपण ४० वर्षांत त्र्यैक परमेश्वराची भक्ती केल्याचे बाबांनी सांगितले आहे. ते म्हणतात,

> ख्रिस्ती ईश्वरभक्ती ही ख्रिस्ती मनुष्याच्या जिण्याचा जिव्हाळा असून त्याच्या धर्माचरणास उत्तेजक आहे. नित्य ईश्वरभक्ती केल्याने ईश्वर आपल्या संगती आहे असा अनुभव होतो

(यथा) तो आपली सर्व कर्मे पाहतो व सर्व बोलणे ऐकतो, असा विचार सर्वदा मनात येऊन त्याची सदा भीति अंतःकरणात वसते. तिच्या योगे भक्तांचा संसार पवित्र व सुखकर होतो.[१६] बाबांना दुःखे–संकटे–परीक्षा याबाबत असा अनुभव आला की एखाद्या पित्याच्या प्रेमाने परमेश्वर भक्तावर करुणा करतो. त्याला दुःखमुक्त करतो. 'भिऊ नको, तू अग्नीतून चालशील व पाण्यासून जाशील तेव्हा मी तुजसंगती होईन.' ह्या वचनानुसार दुःखामध्ये प्रभु येशूच्या कळवळयाचा अनुभव बाबांना आल्याचे आपणांस कळते ईश्वरी पालन कृती व ईश्वरसूत्र याबाबतचा अनुभव कथन करताना बाबा लिहितात की परमेश्वर आपल्या लेकराचे पालन-पोषण तर करतोच पण त्याच्या पारमार्थिक व प्रापंचिक कार्यात त्यास दयाळूपणाने सहाय्य करितो.

'परमेश्वर मजकरिता सर्व कांही करितो' असे त्यास वाटू लागते. तसेच 'मनुष्याच्या मनात अनेक कल्पना असतात परंतु जो परमेश्वराचा संकेत तोच ठरेल' हे सत्यही त्यांना या अनुभवात गवसले होते. संसारासंबंधी देवाचे चांगुलपणा व दया ही कबूल करून व त्याचे ईश्वरी सूत्र अवलोकन करून वागल्याने ख्रिस्ती मनुष्याचे जिणे पवित्र, परोपकारिक, सत्कर्मभारित, क्षमाशील, शांत, सहनशील व सुखी होते, अशी त्यांची दृढ श्रद्धा आहे.

*अनुभवसंग्रहा*त पाप, पश्चाताप, रुदन व जगाचा तिरस्कार यांचाच संग्रह केला नाही तर ख्रिस्तावर विश्वास ठेवल्याने जी खरी शांती, समाधान, आनंद इत्यादींची प्राप्ती होते हा बाबांचा जो अनुभव होता त्याचा संग्रह केला आहे. हे अनुभव काल्पनिक वा प्रचाराच्या थाटाचे नसून त्यातून त्यांच्या स्वानुभूतीचे व प्रामाणिकपणाचे दर्शन घडते.

एका हिंदू झालेल्या ख्रिस्ती माणसाचे हे जिणे असून त्यात ख्रिस्तकृपा, आत्मोद्धार, आत्म्याचा विकास, तारण इत्यादी गोष्टींबाबत लेखकाचे प्रांजळ, प्रामाणिक अनुभवकथन आहे. आध्यात्मिक जीवनाचा वाटाड्या असे या पुस्तकाचे एक निराळेच महत्त्व आहे.

देवबाप प्रीती आहे. देवपुत्र तारणारा आहे. देव पवित्र आत्मा पवित्र करणारा आहे. या त्रयीचे ज्ञान प्रस्तुत अनुभवांच्या वाचनानंतर होते.

ख्रिस्तावर विश्वास ठेवणारे, ख्रिस्ताचा स्वीकार करणारे, ख्रिस्तसेवक, क्षमा मागणारे व आपल्या पापाचा पश्चाताप करणारे, आत्म्याच्या भ्रष्टतेशी युद्ध करणारे ख्रिस्तभक्तच या अनुभवातील स्वारस्य जाणू शकतील. त्याच्याशी समरस होतील. त्यालाच या अनुभवांचे मोल समजेल. श्रेष्ठत्व समजेल. इतरेजन त्यांच्याशी समरस होणे कठीणच.

ख्रिस्ती मनुष्य जसजसा ह्या भ्रष्ट स्वभावाशी युद्ध करितो व त्यावर जय मिळवितो तसा तो पवित्र व लीन होतो. त्याची भक्तिशीलता व धार्मिकता वाढते. बाबांच्या अनुभवाचे बोल हे निवेदन वाचून आपणांस उमगत जातात. 'अनुभवी ख्रिस्ती माणसाच्या नयनात अश्रू उत्पन्न करण्याचे सामर्थ्य या ग्रंथात आहे. तो देवाची स्तुति गाऊ लागतो. ख्रिस्ती वाचकास देवाने आपणांस तसा अनुभव द्यावा अशी उत्कंठा लागते.' असे *ज्ञानोदय*कार म्हणतात त्यात तथ्य आहे.

देवाची दया ही देवाची प्रार्थना व उद्योग या साधनांनी प्राप्त होते हा मुख्य विषय या

पुस्तकात दिसतो. परमेश्वराच्या वरचा विश्वास या अनुभवांच्या वाचनाने वाढीस लागतो. ख्रिस्ती जिण्याचे अनुपम आधार देणारे वर्णन यात आहे. *अनुभवसंग्रह* साक्षात बाबांचे स्वानुभव असून त्याची रचना मात्र कादंबरीसारखी रोचक आहे. अर्थात यात काल्पनिकता मात्र नाही. परमेश्वराने आपल्या एका लेकरास (बाबास) कसे बोलावले, कसे राखले, संकटे, मोह व त्रास यापासून कसे सांभाळले याचे हे एक आत्मनिवेदन आहे. या कामी प्रत्येक ठिकाणी पावला–पावलावर प्रभु आपला मार्गदर्शक आहे, तो दयाळू व कृपाळू आहे, त्याचा शब्द आपल्या कानी येतो व मग आपण त्याला अनुसरतो अशी ठाम श्रद्धा त्यांची असल्याचे या पुस्तकावरून जाणवते. परमेश्वरास अनुसरण्यात खरे सुख आहे अशी त्यांची खात्री होते.

बाबांनी हे पुस्तक परिश्रम, काळजी व खर्च यांनी तयार केले. 'ख्रिस्ती जिण्याच्या चाळीस वर्षांच्या तयारीचे जणू लोणचेच' असे *अनुभवसंग्रहाचे* महत्त्व त्या काळात *ज्ञानोदयास* जाणवले.[१७] ख्रिस्ती जिण्यास बळकटी आणणारे व ख्रिस्ती जिण्यास मदत करील असे हे पुस्तक आहे. लेखकाने आपल्या जीवनाच्या अखेरच्या पर्वात याची रचना केलेली असल्याने त्यांच्या अनुभवाचे विश्व त्यात सामावलेले आहे. अनुभवाची लक्षणे, ईश्वरी कृपेचा अनुभव, कित्येक स्मरणीय गोष्टी, अनुभूत गोष्टी यांच्याविषयी अतिशय थोडक्यात मराठी–इंग्रजी टिपणे दिलेली आहेत. या गोष्टी वाचण्याचा कंटाळा येत नाही तर या विषयावर आणखी समजावे अशी जिज्ञासा वाचकाच्या मनात निर्माण होते. बाबांचे हे अनुभव आहेत पण इतरांना मार्गदर्शन करण्याचे सामर्थ्य त्यात आहे. बाबांना ज्या ठेचा लागल्या त्या इतरांना या *अनुभवसंग्रहाच्या* वाचनाने, मननाने व चिन्तनाने चुकविता येतील. बाबांच्या अनुभवातील विविधता आपणास मनोरंजक ठरते.

धर्मांतरापूर्वी व धर्मांतरानंतर आपल्यात काय फरक झाला याचे एक सुंदर मनोनिवेदन बाबांनी *अनुभवसंग्रहाच्या* प्रारंभीच दिले आहे. बाबा लिहितात,

> मागल्या वर्षी ह्या महिन्यात मी कोणत्या स्थितीत होतो, व आता कोणत्या स्थितीत आहे! केवढे अंतर! त्यावेळी माझ्या मनांत किती भये व दुःखे होती! किती चिंता व निराशेची कारणे होती. त्या वेळी मला मनुष्याचे केवढे भय होते. त्यावेळी स्वर्ग व नरक यांतून मला काय मिळेल याविषयी मला केवढा संशय व अनिश्चय होता! परंतु आता मला केवढे सुख व केवढा आनंद झाला आहे! आता मी माणसाच्या भयातून किती मोकळा झालो.

३ सप्टेंबर १८५४ रोजी बाबांचा बाप्तिस्मा झाला. ख्रिस्ती धर्मात प्रवेश केल्यावर आपणास कसे सुख समाधान प्राप्त झाले याचे मनमोकळे निवेदन करूनच बाबा थांबत नाहीत तर आपल्या घरातील इतर माणसांनीही ख्रिस्ती धर्माचे महत्व पटावे असे देवा तू कर असे बाबा त्याला विनवितात.

> हे ईश्वरा, त्या सर्वांचे रक्षण व पालनकर्ता तू हो, त्यांचा देव त्यांचा बाप तू हो, व त्यांस आपल्या राज्यात व कुटुंबात घे. देवा, तुला त्यांचा कळवळा येवो; जगदुद्धारका येशु, तुला त्यांची दया येवो, हे शांतीच्या पवित्र आत्म्या, अनादि परमेश्वरा, त्र्येक याहोवा, तुला माझ्या कुटुंबातील मनुष्याची दया येवो व त्यांचे तारण तुजकडून होवो.[१८]

आपल्या धर्मांतराने आपले आईबाप, भाऊबहिण व आप्तेष्ठ यांना पण धर्मांतर करण्याची इच्छा व्हावी, हिंदुधर्मात राहून त्यांनी आपल्या आत्म्याचा नाश करून घेऊ नये तर त्यांच्या आत्म्याचा उद्धार व्हावा म्हणून येशू ख्रिस्ताने दया करावी अशी ही एकप्रकारची त्याची प्रार्थनाच बाबांनी प्रारंभी केली.

हिंदू असतानाची आपली भक्ती व ख्रिस्ती झाल्यानंतरची भक्ती यातील फरक त्यांनी सांगितला तो असा :

> मी हिंदूधर्मात असता त्या धर्माप्रमाणे धर्मशील होतो खरा, मी कधी नास्तिक किंवा धर्मनिंदक झालो नव्हतो, तथापि खरा देव न मिळाल्यामुळे माझी ती भक्ती व्यर्थ व अज्ञान होती, जसे बालकास मातेजवळ असताना भूक लागली म्हणजे ते आपला अंगठा चोखीत राहते व तेणे करून त्याची तृप्ती होत नाही, तद्वत माझी अवस्था झाली होती.

परमेश्वराची ओळख येशूच्या द्वारे झाली व आपला भक्तिभाव परमेश्वरावर बसला तो अद्याप ढळला नसल्याचे ते सांगतात :

> पूर्वीप्रमाणे मी बारा पिंपळाकडे धाव घेतली नाही व अनेक देवांच्या भक्तीस लागलो नाही; एका परमेश्वराच्या वाचून मी अन्य देव म्हणून आराधिलाच नाही; आणि कोणी अन्य देव खरोखर आहेत अशी कल्पना माझ्या मनात कधी आली नाही. खरा व जिवंत देव असा एकच आहे व त्यावाचून दुसरा नाही अशी माझी खात्री ख्रिस्ती शास्त्रावरून जशी झाली तशी पूर्वी कोणत्याही तत्त्वज्ञानाच्या विचाराने झाली नाही. पिता, पुत्र व पवित्र आत्मा यांच्या देवत्वाविषयी माझी पूर्ण खात्री झालेली असून त्यांच्या एकत्वाविषयीही माझा दृढभाव आहे.[१९]

या त्रैक्य परमेश्वराची भक्ती आपल्या ख्रिस्ती जिण्याच्या ४०–५० वर्षात केल्याचे ते सांगतात. परमेश्वरावर प्रेम करणे, त्यावर विश्वास ठेवणे, त्याचा भरवसा धरणे, त्याची स्तुती, प्रार्थना करणे, त्याचे चिंतन करणे, त्याचे सद्भय बाळगणे, त्याचा आदर करणे, त्याचे उपकार मानणे व त्यास संतुष्ट करायास झटणे ही त्यांची भक्तीची नऊ अंगे होती. त्याला स्वार्पण करणे, त्याच्या इच्छेनुसार वागणे व त्याच्या आज्ञा पाळणे अशी त्रिविध सेवा बाबा करीत. अद्भुत दृष्टांत, किंवा प्रगटविणे यांच्याआशेने मी भक्ती वा सेवा केली नाही तर शांती व पवित्रता आणि सुख ही मिळाली असे ते सांगतात. ख्रिस्ताची सेवा करणे कष्टाचे नाही. त्याच्या आज्ञा पाळणे व कर्तव्य करणे हीच त्याची सेवा. सहनशीलता, ज्ञानप्रसार, शुभवर्तमानाचा प्रसार, सदुपदेश हा त्याच्याच सेवेचा भाग होय. तसेच जो मनुष्य लोकांती व एकांती ईश्वरभक्ती करितो तो कुटुंबातही ती केल्यावाचून राहाणार नाही. आपणही तशीच भक्ती ख्रिस्ती जिण्यात केल्याचे समाधान त्यांनी वेळोवेळी व्यक्त केले आहे.

ख्रिस्ती धर्मातील प्रार्थनेचे महत्त्व बाबांच्या *अनुभवसंग्रहा*तील एक महत्त्वाचे तत्त्व आहे. येशू ख्रिस्ताच्या प्रार्थनेवर त्यांची अंधश्रद्धा आहे असे देखील म्हणता येईल. त्याचमुळे ख्रिस्ताची प्रार्थना ते पदोपदी करताना आढळतात. ऐहिक असो वा आध्यात्मिक असो, अडीअडचण म्हटली की बाबा परमेश्वराची प्रार्थना श्रद्धायुक्त अंतःकरणाने करतात. आपल्या वडिलांवर काही नोकरीच्या बाबत संकट आले होते त्याच्या निवारणार्थ बाबांनी प्रार्थना केली व त्यामुळेच

आपल्या वडिलांची सुटका व्हावी व त्यांचे खरेपण उघड व्हावे आणि या निमित्ताने त्यांना पण समजावे की येशू ख्रिस्त परमेश्वर आहे व त्यावर जे विश्वास ठेवतात त्यांना काही उणे पडत नाही.[२०] द्रव्यप्राप्ती व्हावी, पाऊस पडावा, आपण ईश्वराचे अधिक भक्त व्हावे, शरिराचा अशक्तपणा जावा म्हणून प्रार्थना, आत्मिक संजीवनार्थ प्रार्थना, शक्ती मिळावी एतदर्थ प्रार्थना, धर्म संजीवनार्थ प्रार्थना, इतकेच नाहीतर चांगले घर मिळावे म्हणून देखील प्रार्थना, स्वतःच्या मुलाकरिता प्रार्थना, सत्यशोधकाकरिता प्रार्थना व सुधारणेकरिता प्रार्थना करताना बाबा आपणास दिसतात. आपण परमेश्वराची प्रार्थना मनापासून केली की तो आपली गरज पुरवितो. संकटे दूर करतो. पाऊस पाडतो, धनधान्य, आरोग्य सर्व काही देतो. अशी एका आर्तभक्ताची प्रतिमा बाबांची आपणांसमोर उभी राहते. आपल्या जीवनात धर्मांतराने जशी क्रांती झाली तशीच प्रार्थनेमुळे आपली जीवननौका सुरळीतपणे संसारसागराचा प्रवास करू शकली असेच बाबांना प्रार्थनेबाबतचे आपले अनुभव सांगताना सुचवावयाचे आहे. आपण केलेल्या प्रार्थनेस परमेश्वर उत्तरे पण देतो असा त्यांचा अनुभव याच संदर्भात त्यांनी दिला आहे.

डिक्शनरी छापण्याच्या कामात परमेश्वरी साहाय्य आपणांस मिळते. अत्यंत कठीण काम, स्वतःची दुर्बलता, इंग्रजीतील कोते ज्ञान, परीक्षण व विचारशक्तीची कमतरता इ. सर्व गोष्टी असूनही हे कोशरचनाकार्य आपणाकडून घडले. छापखान्याची बिले देण्यासाठी लोकांकडून अगदी वेळेवर पैसे येतात इ. गोष्टी परमेश्वराच्याच कृपेचा परिणाम आहे. हे कंटाळवाणे व कष्टाचे काम करताना, प्रुफे तपासताना अगदी लहानसहान चुका आपल्या दृष्टीस येतात हे खचितच देवाचे काम आहे, असे त्याना वाटते. बाबा लिहितात,

ह्याप्रमाणे देव मला ह्या कामात व दुसऱ्या इतर कामांत साहाय्य करितो. हे माझ्या जीवा, परमेश्वराचे सुवंदन कर व त्याचे उपकार विसरू नको.

आपणाकडून या प्रकारे प्रार्थना करवून घेण्याचे व त्या प्रार्थनेस साहाय्याच्या रूपाने उत्तर देण्याचे काम परमेश्वरच करतो असा त्याचा पूर्ण विश्वास होता. आजारपणातून उठण्यासाठी ते प्रार्थना करितात तशीच आपले आईबाप व इष्टमित्र यांच्या आत्मिक कल्याणासाठी देखील प्रार्थना करतात. ख्रिस्ती मंडळीतील भ्रष्टता जावी, ती शुद्ध व्हावी म्हणून देखील बाबा प्रार्थना करताना दिसतात. आपल्या मुलांचा अभ्यास व्हावा, त्यांनी पापासून दूर व्हावे, मोहापासून दूर व्हावे यासाठी बाबा प्रार्थना करतात. सत्यशोधकाकरिता प्रार्थना यात ते ख्रिस्ती धर्माचा अभ्यास करणारांना सत्याचा शोध व स्वीकार करण्याची बुद्धी व्हावी याकरिता प्रार्थना करतात. लगेच 'त्या चौघांपैकी मि. बंदुजी व मि. पेदामकर ह्यांनी प्रभु येशूला पत्करून बाप्तिस्मा घेतला.' हे आपल्या प्रार्थनेचे उत्तर मिळाल्याचे देखील ते सांगून टाकतात.

आपण धर्मांतर केले, येशू ख्रिस्ताची प्रार्थना केली आणि आपला उद्धार झाला, ऐहिक सुखसमाधान लाभले, चिंता दूर झाल्या, संकटनिवारण झाले. आपला हा अनुभव आहे. प्रार्थना ही आपली शक्ती आहे हे कथन करण्यासाठी बाबांनी आपल्या जीवनातील अनेक प्रसंग निःसंकोचपणे व प्रांजलपणे *अनुभवसंग्रहा*त कथन केले आहे. ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याचा व ख्रिस्ती प्रार्थनेचाच हा प्रभाव असेही त्यांना वाटते.

बाबा स्वतःच आपल्या प्रार्थनांच्या संदर्भात दि. ६ जानेवारी १९०२ च्या दिनचर्येत लिहितात,

माझ्या प्रार्थनेचे नेम व विषय : सकाळी स्वतःविषयी, व मुलांविषयी. संध्याकाळी दिवसा जे लोक मला भेटावयास येतात त्यांच्याविषयी; त्या दिवशी ज्यांकडून पत्रे आली असतील त्याविषयी; ज्यांस पत्रांची उत्तरे पाठविली त्या विषयी; मंडळीतील (ज्यानी मला माहिती दिली आहे असे) रोगी, दुःखी, दुर्गुणी इ. विषयी., लढाई, प्लेग, दुष्काळ ही बंद व्हावीत म्हणून,

आपण प्रार्थना करतो असे त्यांनी सदर रोजनिशीच्या नोंदीत कथन केले आहे. बाबा लिहितात,

हे देवा, मुंबईत व इतर ठिकाणी प्लेग वाढत चालला आहे; पुण्यात तर त्याने कहर करून सोडला आहे. बापा, दया कर व लोकांना स्वस्थता दे.

हिंदुस्थानातील ३,००० मिशनेरी (स्त्रिया व पुरुष) व त्यांस सहकारी २,००० एतद्देशीय यांनी विश्वासूपणे आपापली कामे करावीत व प्रभूची सेवा त्यांच्या हाताने घडावी म्हणून कधी ते प्रार्थना करताना दिसतात.[२१] तसेच मिसेस बिझेंटबाईने पश्चातापी होऊन ख्रिस्ताकडे फिरावे व दया पावावी म्हणून देखील ते प्रार्थना करतात. २४ डिसेंबर १८९९ रोजी बाबा पुढील प्रार्थना करतात. 'ह्या देशात अज्ञानाची विपुलता आहे. ती दूर करून सज्ञान समृद्धि कर.' तसेच विठोबा कोलपोर्चर हा सशक्त, मेहनती व विश्वासू आणि तत्पर ख्रिस्तभक्त होता. तो मरण पावला. तेव्हा त्याच्या बायकोचे प्रभू तिच्या दुःखात सांत्वन करो, अशी प्रार्थना बाबा करीत असताना दिसतात. बाबांच्या प्रार्थनेत विविधता आहे. अंतःकरणाची तळमळ आहे. परमेश्वरावरचा अथांग विश्वास आहे. ऐहिक व पारमार्थिक संकटनिवारणार्थ बाबांना सापडलेला रामबाण उपाय म्हणजे प्रार्थना होय. आपली प्रत्येक समस्या या प्रार्थनेने सोडविली हा त्यांचा महानुभव आहे.

प्रार्थना करतात तसेच बाबा नेहमी आत्मपरिक्षण करताना दिसतात. आत्मपरिक्षणाने आपल्या गुणदोषांचा आढावा घेतात, प्रगतीचा अंदाज बांधतात. ते लिहितात,

हे माझ्या जीवा, आता तू जागा हो, आणि आपली तपासणी करण्याचे काम चालव. हे जीवा तुला वाटत असेल की, मी सद्‌गुणी आहे परंतु जी झाकलेली स्थळे आहेत ती उघड.[२३]

यातून अमंगळ व ओंगळ गोष्टी कोणत्या आपल्या जवळ आहेत हे कळेल असे त्यांना वाटते व हे बरोबर आहे. आपल्या चुका, आपला अहंभाव, नम्रतेचा अभाव, द्रव्यलोभ, मत्सर व ईर्षा इत्यादी आपल्याच दुर्गुणांची ओळख आपणास होते हा बाबांचा स्वानुभाव सर्वांनाच येणारा आहे. बाबांनी तो कबूल करून ठेवला आहे इतकेच. परोपदेश सोपा आहे पण आपले आचरण त्याप्रमाणे आहे का हे बाबांना पाहावेसे वाटते. आपण दुसऱ्यांच्या दोषांचा निषेध जरूर करावा पण तेच दोष आपल्यात नाहीत व आपला मोठेपणा मिरवण्यासाठी आपण हे दोषदिग्दर्शन करीत नाही ना हे पण बघणे महत्त्वाचे आहे असे बाबांना वाटते.

आपण आपल्या पापांचा पाढा देवापुढे कबूल केला व त्यामुळे त्या सर्व गोष्टी लिहिल्या नाहीत

असे बाबा म्हणतात. दुसऱ्या एका आत्मपरीक्षणात बाबा लिहितात,

मी जितकी माझी तपासणी अधिक करतो व माझे विचार पारखून कसोटीस लावितो, तितका माझ्या ठायी अधिक वाईटपण व दुष्टपण सापडते. कसा मी कठीणमनाचा व अविश्वासी! हे पवित्र आत्म्या, माझे मन ठेच, मला चेच व मज मध्ये पापासाठी रडणे व शोक उत्पन्न कर. का की मी देवावर पूर्ण विश्वास ठेवित नाही, का माझ्या मनात संशय उत्पन्न होतात, का मला माझ्या पुढल्या दिवसांची काळजी लागली आहे,

हे आपल्या अंतःकरणाचे प्रतिबिंब शब्दांकित करून बाबा शेवटी लिहितात,

माझ्या सर्व तपासणीवरून मला आता व पहिल्यापासून हेच समजले आहे की, मजमध्ये काही शक्ती नाही व मी स्वतः दुर्बल व दुराचरणामध्ये पडण्याजोगा असा आहे; पण देव मला संभाळतो. तो माझा हात धरून चालवितो, म्हणून मी उभा आहे. हे देवा येशू ख्रिस्ता, मला धर व मला संभाळ. डावीकडे व उजवीकडे मला जाऊ देऊ नको. मरणापर्यंत माझा सांभाळ कर व मरणानंतर मला आपल्यापाशी ने.[२४]

आणखी एका आत्मपरीक्षणात बाबा आपल्या अंतर्मनाचा संघर्ष चांगल्या प्रकारे व्यक्त करतात :

माझ्या अंतर्यामात जो कलह व जी झोंबी चालली आहे त्यावरून काय दिसून येते? मी दुर्बळ व अशक्त आहे असे ती दाखवतात. जसे एखाद्या महायुद्धात कमी भरलेल्या जहाजावर पाण्याच्या लाटा आदळू लागल्या म्हणजे ते जसे खालीवर उचमळू लागते, त्याचप्रमाणे मजवर संकटे आली म्हणजे मज गरिबाचा दीन व शून्य आत्मा हेलकावे खाऊ लागतो. हे माझ्या जीवा, तुझी धार्मिकता व भलाई आणि प्रभूवरील विश्वास व निष्ठा ही कोठे आहेत, तू स्वतः किती क्षुल्लक आहेस! तर अशी माझी कंगाल दशा दिसून आल्यावर मी काय करावे![२५]

आपण स्वतः परमेश्वरापुढे धूळ व राख आहोत असे त्यांना वाटल्याचे एका आत्मपरिक्षणात दिसते. मळीण, विषयलंपट व संसारी असे आपण असल्याने परमेश्वराने आपली भेट घ्यावी आणि दर्शन द्यावे असे आपल्यात काही नसल्याचे ते कबूल करतात. परमेश्वर न्यायी, पवित्र, सुंदर असल्याचे त्यांना पटते. स्वतः रोज निश्चय करून अपराध करीत असल्याचे ते कबूल करतात. 'हे प्रिय येशू! तू मजवर केवढी प्रीती करतोस, आणि माझी प्रीती किती थोडी आहे! तुझी प्रीती पर्वतासमान आहे आणि माझी प्रीती तिलप्राय आहे. तू रात्रंदिवस माझी आठवण व काळजी करितोस आणि मी केवळ क्षणमात्र तुला स्मरतो.' असे सांगून शेवटी ते म्हणतात, 'द्येक याहोवा माझा उध्दारणारा आहे. तोच इस्त्रायेलाचा प्रकाश आहे.' आपले ज्ञानचक्षू उघडावेत व आपणांस स्वर्गसुख दिसावे अशी त्यांची इच्छा याच आत्मपरिक्षणात प्रकट झालेली दिसते. परमेश्वरी कृपेने आपला आत्मा प्रकाशित होईल. पापांधःकार व संशयतम नाहीसा होईल व आपली सर्व भये नष्ट होऊन आपण सुखी होऊ असा त्यांचा आत्मविश्वास या परिक्षणात उघड दिसून येतो. आत्मपरिक्षणातून आपली मनोव्यथा बाबा बोलून दाखवितात व आपल्यात कोणती सुधारणा येशूच्या कृपेने व्हावी, याचा निदिध्यास व्यक्त करतात.

हिंदुधर्मात ईश्वर सृष्टीचे पालन करतो व आपल्या सूत्राने, आपल्या इच्छेप्रमाणे सर्व गोष्टी घडवून आणतो असे जरी म्हटले असले तरी या धर्मातील लोकांस दैववादाने घेरले आहे. आपण ख्रिस्ती झाल्याने या दैववादाच्या पाशातून सुटल्याचे बाबांना अगदी निश्चयाने वाटते. तरीही 'परमेश्वराचे चांगुलपण किंवा दया ही साधारणपणे त्याच्या सर्व प्राण्यांचे पालन पोषण करितात. . .परमेश्वर मजकरिता सर्व काही करितो ही भावनाच त्यांच्यामध्ये प्रबळ आहे. बाबा लिहितात,

> मी ख्रिस्ती झाल्यानंतर ईश्वरी सूत्राने मला माझ्या राहण्याची स्थळे निवडून दिली; व त्या त्या ठिकाणी मला काम करण्याची योजना केली. विद्यालयात शिकविणे, ग्रंथ रचणे, मंडळीची सेवा करणे, लेकरांस शिकविणे, इ. कामे फार आश्चर्यकारक रीतीने मला मिळाली. तसेच माझ्या लग्नाच्या बाबतीत झाले. मला राहण्याची घरेही मला देवाच्या सूत्राने मिळाली, त्या सर्वांविषयी बिस्ताराने सांगवत नाही. मित्रांची जोड व शत्रूंचा मोड, पुस्तक व द्रव्यप्राप्ती यांतही मी देवाचा हात व सूत्र पाहिले. . .

ईश्वरी सूत्राचे अवलोकन करून वागल्याने ख्रिस्ती माणसाचे जीणे पवित्र, परोपकारिक, सत्कर्मभरित, क्षमाशील, शांत व सहनशील आणि सुखी होते असा बाबांचा अनुभव होता व तो त्यांनी विस्ताराने कथन केला आहे. आपल्याप्रमाणे आपल्या नातलगांचा उद्धार व्हावा व हिंदू मित्रांची सुटका व्हावी असे त्यांस वाटते. ते लिहितात,

> हे देवा, माझ्या आईबापांवर दया कर. त्यांस आपल्या कुटुंबात घे. हे परमात्म्या, त्यांचा नाश होऊ देऊ नको. हे देवा, माझ्या बायकोवर व भावांवर दया कर. त्यांची मोकळीक कर. पापाच्या बंधनातून त्यांस सोडीव. हे ईश्वरा, तूच जर त्यास मोकळे करशील तर ते मोकळे होतील. ते पापाचे दास आहेत. हे प्रभू, माझ्या हिंदू मित्रांस प्रकाश दे. त्यांस चांगले ज्ञान दे व त्यांनी नम्रतेने व विश्वासाने तुझ्या पुत्राचे पुण्य स्वीकारून तारण पावावे असे कर.

*अनुभवसंग्रहा*मध्ये बाबांनी ठिकठिकाणी परमेश्वराची उपकारस्तुती केलेली आढळते. प्रथमच ईश्वर आपल्या लेकरांच्या भ्रामक योजना नष्ट करून त्यांस सन्मार्गावर आणतो यासाठी त्यांनी ही उपकारस्तुती केलेली आहे. ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यापूर्वी आपल्या मनात कसे भ्रामक विचार आले होते याची त्यांनी एक यादीच दिली आहे. एखादा अनिवार रोग झाला असता तर ख्रिस्ती धर्मोपदेशकास बोलावून प्रार्थना करता आली असती. रोग बरा झाल्यावर आपल्या मातापित्यास अनायासेच ख्रिस्ती धर्म-माहात्म्य समजले असते. त्याच प्रसंगाने बरा झाल्यावर ख्रिस्ती मंडळीत शिरेन असा निश्चय करता आला असता. तसेच एकाएकी मरण आले तर मरणसमयी प्रभु येशूवर विश्वास ठेवून लागलीच त्यापाशी जाता येईल. त्यामुळे आपला व आपल्या मातापित्यांचा छळ किंवा जाचणूक होणार नाही असे त्यांस वाटत असे किंवा मुंबईतून निघून एकदम कलकत्त्यास, मद्रासेस किंवा चीन देशास जावे व तेथे उघडपणे ख्रिस्ती धर्म आचरावा. तेथेच चाकरी करावी. अशा प्रकारे काही भ्रामक बेत केल्याचे बाबा सांगतात. असा उपरोक्त आचार आपल्या हातून झाला नाही म्हणून प्रारंभीच देवाची स्तुती केली म्हणून ते लिहितात,

परंतु परमेश्वराची स्तुती असो की, मला त्याने अशा अविचाराच्या मार्गाने जाऊ दिले नाही.[२७]

आपण घरदार सोडले, प्रेमळ मातापित्यांचा त्याग केला, बायकोचा विरह पत्करला, चिमण्या भावंडाच्या मायेची कास सोडली, आणि मुंबईस निघालो त्या वेळी परमेश्वर आपल्या सांगाती होता असा त्यांचा विश्वास या उपकारस्तुतीत प्रगट झाला आहे. भ्रष्ट अंतःकरण, दुष्ट वासना, मोह, संकटे इत्यादीपासून दूर ठेवण्यास परमेश्वराने आपणास हात दिला, प्रवासात रक्षण केले, असे त्याना वाटते. ते लिहितात, 'हे परम दयावंत देवा, असे तुझे उपकार किती वर्णू!' नंतर एकदा आसन्नमरण स्थितीतून उठवले ते देवाने म्हणून ते उपकारस्तुती करतात. आपले प्रेमळ मातापिता अद्याप जिवंत आहेत, भावंडे सुखात आहेत, एतदर्थ बाबा त्याची उपकारस्तुती करतात, आभार मानतात. त्याच भरात ते लिहितात,

हे बापा, सर्व जगामध्ये तुझे ज्ञान पसरावे, आणि सर्वांनी तुझा पुत्र जो माझा प्रभु येशू ख्रिस्त याला जाणावे.

सर्व जगात ख्रिस्ती धर्म पसरावा, ख्रिस्तभक्ती वाढीस लागावी, लोकांनी ऐक्याने, सुखाने, प्रीतीने राहावे अशी इच्छा शेवटी ते प्रगट करतात.[२८]

आपल्या वडिलांची खटल्यातून सुटका झाली. त्यांना पुन्हा काम मिळाले म्हणून बाबा उपकारस्तुती करतात. वडिलांच्यावरचे संकट ते आपल्यावरचे संकट असे मानतात. आपले वडील निर्दोष होते तरी प्रभूच्या कृपेस ते पात्र होते का हा त्यांच्यापुढे प्रश्न होता. म्हणून वडिलांवरील संकट टळताच बाबा परमेश्वराची उपकारस्तुती करतात. आजारपणातून उठल्याबद्दल, वैद्याभावी बहिणीच्या मुलाला परमेश्वरानेच वाचवले म्हणून, आपले लग्न झाले म्हणून, पुत्रप्राप्ती झाली म्हणून बाबा उपकारस्तुती करीत असताना दिसतात. आपली पत्नी प्रेमळ व ममताळू आहे म्हणून त्यांना परमेश्वराची स्तुती करावीशी वाटते. संसाराच्या गरजा देव पुरवतो, आपणास काम पुरवतो, चांगले घरदार देतो, देणी फेडतो, बळ, आरोग्य व धन देतो म्हणून बाबा त्याची उपकारस्तुती करतात. मित्रांच्या भेटी आल्या, आपले कर्ज फेडता आले, पुस्तकाचा खप झाला, पुस्तक निर्विघ्नपणे लिहून झाले, नवीन महिना सुरू झाला, नवे वर्ष सुरु झाले, कुटुंबात कोणी आजारी पडला नाही, अन्नवस्त्राची वाण पडली नाही, नवीन पुस्तके वाचावयास मिळाली, प्रतिदिवशी शास्त्र वाचावयास मिळाले, कुटूंबातील माणसास सत्यतेचा अर्थ सांगण्यास मिळाला, त्यांना ख्रिस्ताकडे नेण्यासाठी प्रयत्न करण्यास मिळाला की बाबा विनम्रपणे देवाची उपकारस्तुती करतात. आपला श्वास आणि उच्छ्वास देखील परमेश्वराच्या उपकाराने होत असतो, ऐहिक व पारलौकिक कोणतीही गोष्ट परमेश्वराच्या उपकाराभावी होणे शक्य नाही इतकी समरसता बाबांना शेवटी शेवटी प्राप्त झाली होती असे दिसून येते. प्रत्येक वर्षाच्या शेवटी परमेश्वराने आपल्यावर कोणकोणते उपकार केले याची नोंद घेताना बाबा आढळतात. आपल्या हातून घडणारी प्रत्येक गोष्ट, संसारात घडणाऱ्या घटना, जीवनातील सर्व प्रसंग ही परमेश्वराच्या आपल्यावरील उपकाराची खूण आहे असे

त्यांना वाटते. त्या उपकाराबद्दल बाबा क्षणाक्षणाला परमेश्वराची उपकारस्तुती करताना दिसतात. सर्व जग ब्रह्ममय जसे भारतीय तत्त्वज्ञानात तसेच सर्वजग ख्रिस्तमय बाबांच्या जीवनात झालेले आपणास त्यांच्या *अनुभवसंग्रहात* जाणवते. त्याची उपकारस्तुती ते करतात. परमेश्वर आपल्यावर कृपेचा पाऊस पाडतो. आपल्या मृत्यूची अफवा कोणी तरी शत्रूंनी पसरवली, त्यामुळे आप्तेष्ट, मित्र विनाकारण घाबरले. आपल्या पूर्वधर्मात व पूर्वीच्या जातीत आपला कळवळा व काळजी करणारे लोक आहेत हे पाहून बाबा परमेश्वराची उपकारस्तुती करतात. बाबा लिहितात,

जेव्हा त्या लोकांनी मजविषयी ही बातमी ऐकली तेव्हा कितीजण मजसाठी चिंताक्रांत झाले व किती जणांनी मजवर आपली प्रीती दाखविली? यात मी देवाचे किती आभार मानू. हे माझ्या जीवा, तू त्याचे सर्व उपकार आठीव, त्याला कधी विसरू नको.[२९]

याच उपकारस्तुतीत परमेश्वरामुळे आपली व आपल्या बहिणीची व तिच्या सुंदर मुलाची भेट झाली असे त्यांना वाटते. मग ते देवाचे स्तवन करतात. आपल्या बोलण्याचालण्यात, वागण्यात, काही कामासाठी बाहेर गेल्यावर परत सुरक्षित घरी येण्यात परमेश्वर आपणास सांभाळतो असा त्यांचा विश्वास दिसतो व ते त्याची स्तुती करतात. बाबा लिहितात,

प्रभु येशू ख्रिस्तामुळे तू मजवर किती प्रिती करतोस, केवढी ही दया! केवढी ही प्रीती! हे बापा, तुला व तुझ्या पुत्राला सदासर्वकाळ स्तुती व गौरव असोत.[३०]

आपण पापी व उणे असताही परमेश्वर आपल्यावर उपकाराची वृष्टी करतो म्हणून ते त्याची स्तुती करतात. प्रार्थनेच्या वेळी अंतःकरण प्रफुल्लित झाले हे परमेश्वराचेच उपकार ही त्यांची भक्तिभावना येथे स्पष्ट होते. कोणी शब्दभंग केला की त्याचा निषेध करण्यास लागणारे धैर्य, वडिलांनी संकटापासून बोध घ्यावा हे त्यांना लिहिण्यास लागणारे धैर्य मिळाले म्हणून त्यांनी देवाची उपकारस्तुती केली. चाकर बरा व्हावा, चांगले मित्र मिळाले व मिळावेत, खटल्याची चौकशी न्यायाधिशाने न्यायाने व नीतीने करावी वगैरे कामांसाठी बाबा मोठ्या भक्तिभावाने देवाची उपकारस्तुती करताना आढळतात. या उपकारस्तुतीतून एक ख्रिस्ताचा आर्तभक्त आपणास ठायी ठायी दिसून येतो. हिंदूधर्मातील दैववादावर, धर्मभोळेपणावर तुटून पडणाऱ्या बाबांचा हा ख्रिस्ती धर्मभोळेपणा पाहून गंमत वाटते! बाबा केवळ श्रद्धावादी, आस्तिक होते यात शंका नाही. बुद्धिवाद त्यांच्या अंतःकरणात शिरूच शकला नाही.

बाबांच्या *अनुभवसंग्रहात* शास्त्रभागांवर विचार हा विषय देखील कोठे कोठे आलेला आढळतो. त्यावरून एका हिंदू माणसाने धर्मांतरानंतर म्हणजेच ख्रिस्ती झाल्यावर *बायबल*-वर, ख्रिस्ती शास्त्रावर, केवढे प्रभुत्व मिळविले हे बघून आश्चर्य वाटले. दैनंदिन जीवन जगताना कित्येक प्रसंगी शास्त्रातील विचारांची आठवण बाबांना होते. त्यापासून त्याना आधार सापडतो. अंगीकृत कार्य नेटाने पुढे नेण्यास उत्साह प्राप्त होतो. बाबा लिहितात,

परमेश्वराने आपल्या शास्त्रात मज पाप्यासाठी किती चांगल्या गोष्टी लिहून ठेवल्या आहेत! मनशे याचा इतिहास वाचून म्या काय समजावे? देवाची दया किती अपार आहे! पाप्यास तारावयास तो किती संतोषित आहे! तो किती सहनशील व मंदक्रोध आहे! हे परमेश्वरा,

मजविषयी तू असाच वागलास! (२ का. वृ. अ. ३३)

या शास्त्रवचनाच्या मननानंतर लगेच त्यांना पुढील शास्त्रवचनाचे स्मरण होते. 'हे बापा, पवित्र येरुशालेमास पोहोचेपर्यंत मला मार्गात बहुत शत्रू आहेत. त्यांच्या हातून तू मला सोडीव.' (एज्रा. अ. ८) 'परमेश्वरापासून माझे सहाय्य येते' असे त्यांना सतत वाटते. (गीत १२१:२) एकदा ते शास्त्र वाचीत होते. त्यातील १०४ थे गीत ते वाचीत होते. घराबाहेर पाऊस पडत होता. अशा त्या वेळी त्यांच्या अंतःकरणात वरील क्र. १०४ थे गीत वाचून मधुर व भक्तीपर भावना उत्पन्न झाली. 'सृष्टीचा देव आपले वैभव व चांगुलपण यांचा आपल्या कृत्यांत बाहेर वर्षाव करीत आहे आणि मी घरात त्याचे वैभव व चांगुलपणा त्यांच्या शास्त्रामध्ये पाहात आहे.' याच गीताच्या शेवटी म्हटल्याप्रमाणे बाबा म्हणतात, 'गीतकर्त्याचा व माझा देव एकच नव्हे काय? हे माझ्या जीवा, परमेश्वराचे सुवंदन कर.' याप्रकारे अनेक ठिकाणी आपले जीवन शास्त्रातील प्रसंगांप्रमाणे अनेक प्रसंगांनी युक्त असून प्रभूची कृपा, दया आपल्यावर आहे, तो आपले साहाय्य करतो, आपले पाप क्षमा करतो व आपला उद्धार झाला अशी भावना या ख्रिस्तभक्ताच्या उरी असल्याचे प्रत्ययास येते.

प्रभूचे शास्त्र म्हणजे *बायबल*. 'देवाच्या आत्म्याने शास्त्रज्ञान मला विशेष प्रकारे दिले. त्याचे शास्त्र सोन्याच्या खाणीपेक्षाही मला मोलवान झाले होते.' असा उल्लेख बाबांनी पवित्र शास्त्राबाबत केला आहे.[३१] निरनिराळ्या प्रसंगी बाबांना शास्त्रातील त्या त्या प्रसंगाची आठवण येते. बाबा त्यांचा संदर्भ त्या प्रसंगानुसार देतात. मिसेस एलिझाबेथ बार्णबस (आका) बाईच्या मरणप्रसंगी बाबांनी आकाबाईची सविस्तर माहिती देऊन शेवटी लिहिले आहे, 'आम्ही दृश्य वस्तूंकडे नाही तर अदृश्य वस्तूंकडे लक्ष लावितो. कारण दृश्य वस्तू क्षणिक व अदृश्य वस्तू अनंतकालिक आहे. (२ कर. ४ : १८)' 'या आयुष्यात जर आम्ही ख्रिस्तावर आशा ठेवणारे असे केवळ आहो तर सर्व मनुष्यांपेक्षा आम्ही लाचार आहो. (१ कर. १५ : १९)[३२] तसेच 'चिंता देवावर टाकणे' या सदरात ते लिहितात,

> याप्रमाणे प्रभूने आपल्या भक्तांच्या मालमत्तेचा सांभाळ केला. सर्व लहानमोठ्या गोष्टीत आम्ही प्रभूवर चिंता टाकून वागू तर किती बरे होईल? आमचे डोक्याचे केस देखील सर्व मोजलेले आहेत. (लू. १२ : ७)[३३]

एका प्रार्थनेत बाबा लिहितात,

> देवा बापा, तुझ्या आत्म्याची सुवृष्टी सर्व देशावर होवो, म्हणजे मोठा आनंद होईल. मनुष्याच्या अंतःकरणास सुफळे व सुमने देऊन ते एदन बागेसारखे सुंदर व सुशोभित होवो. तुझी महिमा होईल. मंडळातील मलीनता धुवून जाईल; ती चंद्रासारखी सुंदर, सूर्यासारखी स्वच्छ, झेंडे उभारलेल्या सेनेसारखी भयंकर होईल. (श. गी. ६ : १०)
> कृपाळू आत्म्या, आम्हा मृतास सजीव कर. आपल्या प्रसादाने संतृप्त कर.[३४]

एकदा बाबांची बरीच कामे गुंतागुंतीची व घोटाळा उत्पन्न होणारी होती. परंतु ती सुरळीत झाली ती हकीगत ते सांगतात. त्यांत शेवटी ते लिहितात. 'ह्या गोष्टीत प्रभूची दया दिसून येते. संकटात तो आपल्या भक्तांचे किती त्वरीत सहाय्य करितो.' (गी. ४६ : १) (पृ. २३)

इ. स. १८९७ च्या रोजनिशीत ते लिहितात, 'जिकडे तिकडे रोग, मरण, दुष्काळ, हालअपेष्टा, जुलूम, मोठ्या ठकबाज्या, अधर्म, ढोंगे, पाखांडे, देवनिंदा, शास्त्रनिंदा, नास्तिकमत, राजद्रोह, वडिलांचा अपमान, ही मोठ्या जोराने चालली आहेत. खरोखरच हे शेवटचे दिवस आहेत. (१ तिम. ४ : १ इ.) देवाची लेकरे अशा स्थितीतून सुटतील तेंव्हा कोठे जातील?' या प्रश्नाचे उत्तर 'मी तुम्हासाठी जागा तयार करावयास जातो.' या देववचनात बाबांना सापडले, व धीर आला. अशा प्रकारे बाबांना ख्रिस्ती जीवनात वेळोवेळी शास्त्र-वचनांची आठवण होते.

इ. स. १८५७ च्या आसपासची बेळगावची स्थिती व बाबांच्या वडिलांच्या कुटुंबाची स्थिती पुढीलप्रमाणे होती. त्या काळचे दर्शन यात घडते. धर्मांतरानंतर बाबांनी काही काळ बेळगाव सोडले होते. ते मुंबईस गेले. इ. स. १८५७ साली ते एकदा बेळगावास गेले असताना त्यांच्या मनात जे विचार आले ते त्यांनी दि. १ नोवेंबर १८५७ रोजी आपल्या दैनंदिनीत लिहिले.

> मी पुनः एकदा येथे आलो आहे. ही माझी जन्मभूमी. माझे आत्मिक जन्मही येथेच झाले. येथेच मी लहानाचा मोठा झालो. शरीराचे तसे माझ्या आत्म्याचेही संवर्धन येथेच झाले. वडिलांच्या कुटुंबस्थितीतही बदल झाला आहे. माझा एक लाडका भाऊ गेला. मृत्यूने उचलून नेला. वडिलांच्यावर घरची व बाहेरची संकटे आली. त्यास चाकरीवरून सस्पेंड केले. मतलबी लोकांनी त्यांच्या घराचा झाडा घेवविला, त्यांच्यावर मॅजिस्ट्रेटपुढे खटला झाला. पण त्यात जिल्ह्याच्या जज्जांनी त्यास निर्दोष ठरवून सोडून दिले. इतक्याने झाले नाही, आता तर त्यास चाकरीवरून बडतर्फ केल्याचा सरकारातून हुकूम आला : या संकटा-तून मला नम्र करण्यासारखे काहीच नाही काय?

या संकटापासून बाबा बरेच अंतर्मुख झाले. देवाचा न्यायीपणा शोधू लागले. 'ईश्वरा, माझा विश्वास निरंतर दृढ कर. तुझ्यापासून मला शक्ती प्राप्त व्हावी, एतदर्थ मला सामर्थ्य दे.' असे ते म्हणू लागले. प्रत्यक्ष बेळगावाबाबत बाबा याच अनुभवात लिहितात. . .

> दुसऱ्या सर्व मोठ्या गावांप्रमाणे बेळगाव हाही मूर्तिपूजकांचा गाव असून तेथे सारा पसारा मूर्तिपूजेचा आहे. तेथील लोक आत्मिक दृष्ट्या मेलेले असून नीतिदृष्ट्या केवळ मृतप्राय झालेले आहेत. त्यांची व खऱ्या प्रिती करणाऱ्या देवाची ओळख नाही. आपल्या अंतः-करणात त्याचे ज्ञान असावे असे ते इच्छित नाहीत. येथील बहुतेक तरुण लोक अनीतीचे गुलाम आहेत. दुर्व्यसनांचे दुष्परिणाम, जिकडे तिकडे उभे आहेत. सरकारला लुटून आपले खिसे भरण्याचा उद्योग चाललेला! सरकारी नोकर कपटी व विश्वासघातकी कामे करीत आहेत. युरोपियन देखील सुधारणूक व सुशिक्षेच्या दाबात आहेत. द्रव्य व विषयसुख यांचे ते भक्त आहेत. सन्मार्गात चालण्याची शक्ती त्यात नाही. या लोकांत ख्रिस्ताचे सेवक कमी व जे आहेत ते ख्रिस्तासारखे वर्तन करीत नाहीत. बाह्यतः ते धार्मिक आहेत. आचरणात नाहीत. देवळात जाणारे अल्प. प्रभुभोजन करणारे फार कमी. देवाच्या पुत्राच्या प्रकाशात चालणारांची संख्या ह्या बेळगावात वाढो ही इच्छा व्यक्त करून सदर रोजनिशीचा हा भाग संपतो.[३५]

...असा तो काळ आपल्यापुढे उभा राहतो.

बाबांनी आपल्या एका अनुभवात जसे बेळगावच्या वर्णनात तेथील लोकांची वर्तणुक, स्वभाव, नीती इत्यादींचे वर्णन करून तो काळ सजीव केला आहे तसाच आणखी एक अनुभव त्या काळाचे प्रतीक ठरणारा बाबांनी वर्णन केला आहे. दि. ११-६-९९च्या (भा. २ पृ. २७) दैनंदिनीत बाबांनी लोणावळ्याच्या आपल्या घराच्या शेजारीपाजारी जे लोक होते त्यांचे वर्णन मोठे वाचनीय केले आहे. बाबा लिहितात,

> आमच्या आळीत फार भांडणे होत. एका मनुष्याची बायको शेक्सपियरने वर्णिलेल्या बायकोप्रमाणे मोठी कर्कशा होती. तिचा नवरा तिला खूप मारी, तरी तिचे तोंड बंद होत नसे. तिच्या रडण्याओरडण्याने सर्व आळी दणाणून जाई. आमच्यासमोर राहणारे पठाण सावकारीचा धंदा करीत. त्यांच्या व्याजाचा दर जबर होता. म्हणजे रुपयामागे दरमहा चार आणे ते अगोदर कापून घेत; मुदतीवर एक दिवस चढला की आणखी चार आणे लागू झालेच. त्यांच्यापासून कर्ज काढण्यास रेल्वेच्या कामगारांची मोठी गर्दी होत असे. मोहरमच्या सणात रुपयामागे आठ आणे व्याजावर पैसे घेण्यास लोक आले होते. पण पठाणांनी दिले नाहीत. याप्रमाणे लोक ऋणाग्नीत जळत आहेत. (अनु. भा. २ पृ. २८)

याप्रकारे तत्कालीन कर्जबाजारी लोकांचे यथातथ्य व चक्षुर्वैसत्यं हे वर्णन बाबांनी केले आहे. बाबा स्वतः देखील पूर्वी कर्जबाजारी होते पण ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर त्यांच्या या वृत्तीत बदल घडत गेला. त्याचे सविस्तर वर्णन त्यांनी *अरुणोदया*त केले आहेच. बाबांचा हा अनुभव प्रापंचिक व पारमार्थिक दृष्टया मोलाचा होय. 'दिवाळी आली व गेली' या सदराच्या अनुभवात देखील त्यांनी लोक कसे कर्जबाजारी होतात. ऋण काढून सण करतात याचे वर्णन केले आहे व आपली याबाबतची तीव्र नापसंती व्यक्त केली आहे.

सर्व लहान मोठ्या गोष्टीत आपण प्रभूवर चिंता टाकून वागल्यास तो आपणास रक्षितो हा स्वानुभव सांगताना बाबा अनेक घटना आपल्यासमोर ठेवतात. त्यापैकी काही अशा :

> अमेरिकन स्पॅनिश युध्द चालू झाल्याचे वर्तमान आले. स्पॅनिश लोक फार जुलमाने वागतात. लाख दीड लाख यामुळे मेले. शुद्ध ख्रिस्ती धर्माचे विरोधक व प्रोटेस्टंट ख्रिस्ती लोकांचे मोठे छळक आहेत. पवित्र शास्त्राचा प्रसार ते होऊ देत नाहीत. ते शास्त्र वाचू देत नाहीत. स्पेन देशात पोपचे महत्त्व फार. देवाच्या आज्ञेप्रमाणे ते चालत नाहीत म्हणून जणू काही त्यांना शिक्षा म्हणून हे युध्द सुरू झाले असे बाबांना वाटते.[३६]

'आजच्या दिवशी मुंबईत पाऊस सुरू झाला. हे देवा केवढे तुझे चांगुलपण' असे लगेच बाबा म्हणतात. एकदा देशात मोठा दुष्काळ पडला. लगेच बाबा लिहितात,

> हे देवा! तुझी कर्मे किती भयंकर आहेत! केवढी मोठी शिक्षा तू या देशाला लावीत आहेस! दुष्काळाने किती लोक पिडले आहेत! तीस लक्ष माणसे अन्नासाठी सरकारच्या आश्रयास आली आहेत म्हणजे काय?' या दुष्काळात परदेशी मदत आली. राजेरजवाडे यांनी मदत केली. अनेकांना अन्नवस्त्र व ख्रिस्ती धर्माचे शिक्षण मिळते, शुभवर्तमान वाचून दाखविले जाते. या गोष्टींमुळे बाबांना ईश्वरी दयेचा हा प्रसंग एक पुरावा वाटतो.[३७]

एकदा पंडिता रमाबाईंचे कारभारी मि. गंगाधरपंत गद्रे बाबांना भेटावयास आले होते. त्यांच्याबरोबर त्यांचा मुलगा होता. त्यांच्याबरोबर बिछाना, बॅग वगैरे सामान होते. सामान बाहेरच्या खोलीत उघडया दाराशी होते. गद्रे, त्यांचा मुलगा व बाबा आत घरात गेले. तेथे उपहारापूर्वी गद्रे यांनी प्रार्थना केली. बाबांनाही त्यांनी प्रार्थना करण्यास सांगितली. बाबांनी प्रार्थना केली. एवढया वेळ बाहेर सामान तसेच होते. बाहेर एक पोलिस कुणाशी तरी गप्पा मारीत दाराशी उभा होता. मधली मुलगी पण सामानावर लक्ष ठेवून उभी होती. बाबांनी मनात सामानाच्या रक्षणार्थ प्रार्थना केली होतीच. भक्ताच्या सामानाचा संभाळ देवाने केला असे बाबा म्हणतात. इ. स. १९०४ साली महाराष्ट्रात टोळधाड आली होती. तेव्हा सभेत टोळ जावेत म्हणून प्रार्थना झाली व टोळधाड गेली. देवाने लोकांची प्रार्थना ऐकली.[३८]

बाबांचा एक अनुभव मोठा विलक्षण आहे. तत्कालीन परिस्थितीवर प्रकाश टाकणारा व विचारप्रवण करणारा व तो अनुभव पुढीलप्रमाणे आहे :

हिंदुधर्मात साधुसंत म्हटलेले संन्याशी, ब्रह्मचारी, गोसावी, बैरागी, जती, जोगी इत्यादी ५२ लक्ष संख्या आहे. असे गेल्या खानेसुमारीच्या रिपोर्टावरून समजते. केवढी मोठी ही संख्या! तीत निरुद्योगी, आळशी, व्यसनी, अज्ञानी, भटके व लटके असे किती असतील! यांजपासून देशास काय लाभ आहे? दरिद्र, अज्ञान, आळस, अधर्म, दुर्व्यसन यांची वृद्धि हाच लाभ. ह्यांच्या शापास लोक भितात व यांच्या आशीर्वादाची इच्छा बाळगतात व तो त्यांची सेवा करून व त्यांस द्रव्य देऊन मिळवितात. (पृ. ५० : अनु. भा. २)

हाच त्यांचा अनुभव आजही आपणांस येऊ शकेल. यात अतिशयोक्ति नाही. अशा साधूंचे दर्शन सर्वत्र होते पण बाबांना एक सुशिक्षित साधू भेटला. तो अनुभव पण ते संग्रहात लिहून ठेवतात. अर्थात हा अनुभव बाबांनी इंग्रजीत लिहिला आहे. आपल्या २–११–१८९९ च्या रोजनिशीत ते लिहितात, "Visit from an Educated Sadhu. Poona–2–11–99.

Had a visit from the brother of the Late Mr. Balkrishna (Morgan Balkrishna). He was loaded with रुद्राक्षमाळा. He has become a Sadhu. He was educated in the Poona mission school, in the time of Dr. Murray Mitchell. He does not believe in idolatary, and caste and in Pantheism. He quoted Tukaram, Ramdas, Kabir and other poets readily and appropriately to establish his points. I wish, I could do so with the Bible. He believes in Jesus Christ. He is somewhat gone in head, yet he argues very soundly. I advised him to read the Bible. (He has a copy of it.) So that he would get more light...May the spirit of God lead him to Christ....[३९]

मराठीप्रमाणेच बाबा इंग्रजी भाषेत उत्तम तऱ्हेने आपले अनुभव मांडतात. किंबहुना बरेच

अनुभव त्यांनी इंग्रजीतच लिहिले होते व त्याचे मराठीत रूपांतर त्यांनी *अनुभवसंग्रहा*साठी मुद्दाम केले होते. थोडक्यात पण पकड घेणारा बाबांचा हा आणखी एक इंग्रजीतील अनुभव पाहा :

Our visit to Lonauli—16-4-1899. We came here on 14th. The goodness of the Lord brought us all in safety. There were trials in Bombay and there are fears of the plague here. But the Lord is with us and has removed all our fears.[४०]

अशा प्रकारे बाबांचे इंग्रजी भाषेतील अनुभव देखील चटकदार, थोडक्यात व परिणाम साधणारे आहेत असे दिसून येते. मनाची पकड घेण्याचे व जीवनाचा वेध घेण्याचे सामर्थ्य याही अनुभवात आहेच.

बाबा एका अनुभवात पुढीलप्रमाणे लिहितात,

मि. बायलीसाहेबास काही इंग्लिश व मराठी पुस्तके दिली. ख्रिस्ती भावाबहिणीस क्रि. लिटिरेचर सोसायटीची मराठी व इंग्लिश पुस्तके दिली. कित्येकांस द्रव्यसहाय्य केले. मि. बायलीसाहेबांच्या दुष्काळातील मुलांसाठी १० रु. दिले. चार ख्रिस्ती बायास लुगडी दिली. कित्येकास कांही पेटंट औषधाच्या बाटल्या दिल्या. कित्येक भावांच्या घरी मटन पाठविले.

आपण हे सर्व प्रभूप्रित्यर्थ केले आणि यासाठी आपणांस इतरांनी सहाय्य केल्याचेही ते पुढे मुद्दाम कथन करतात.[४१] नंतर बाबा कथन करतात की,

प्लेग व दुष्काळ यांच्यामध्ये देवाने गतवर्षी आमचे रक्षण केले. त्याच्या नावाची स्तुती असो. आम्हांस काही उणे पडू दिले नाही. आमचे रोजचे अन्नपाणी आम्हास पुरवले. वस्त्र व घर दिले. प्लेगच्या भयाने रानात किंवा उघड्यावर जाण्याचे कारण पडू दिले नाही. घरातही काही मोठा आजार शिरला नाही. तंटे भांडणे झाली नाहीत. नित्य देव, बापाची भक्ती कुटुंबात झाली. प्रती शाब्बाथवारी शास्त्राभ्यासाचा वर्ग झाला. एकांती मी शास्त्र-भागाचे पठन व चिंतन केले. याप्रमाणे धर्माची ज्योत आमच्या कुटुंबात प्रज्वलित राहिली.

ख्रिस्ती परोपकार, देवाची स्तुती, ख्रिस्ती धर्माचरण याप्रमाणेच ख्रिस्तात मरण पावणारा-बाबत ते लिहितात,

ख्रिस्तात मरण पावतात ते प्रभु येशूच्या व दूतांच्या समागमात व सद्भक्तांच्या समाजात आहेत, त्याविषयी आपणाला काळजी करावयास नको. त्यांचे श्राद्ध करणे नको, व त्यासाठी प्रार्थना किंवा दानधर्म करणे नको.

ख्रिस्तावर विश्वास ठेवून मरण पावलेले सुखावस्थेत जातात. मुक्त होतात. आपण ख्रिस्ती नसतो व हिंदू असतो तर काय झाले असते याचे चित्र बाबा पुढे रेखाटतात,

जर मी हिंदू धर्मात असतो तर मला ही आशा असती काय? पौराणिक हिंदुमताप्रमाणे स्वर्गसुख अशाश्वत आहे. वेदांतमताप्रमाणे ब्रह्मस्वरूप होणे हा आत्म्याचा विलय आहे. शास्त्रशून्य एकेश्वरी मताचे स्वर्ग धूम्रव्याप्त आहे. ते सर्व अनुमानाचे गाठोडे व भ्रमाचा

भोपळा आहे. नास्तिकमत तर मरणाच्या पलिकडे आत्म्यास अस्तित्व नाही, असे म्हणते. अज्ञेय मत (agnosticism) डोळे झाकून व कानावर हात ठेवून म्हणते की पुढे आपले काय होईल हे काहीच सांगवत नाही. हे प्रभू येशू, तूच मात्र मार्ग, सत्य व जीवन आहेस. तुझ्यावाचून देवाचे सत्यज्ञान होणे नाही असा जो तुझ्या एका सद्‌भक्ताने ह्या तुझ्या महावचनाचा अर्थ केला आहे तो अगदी खरा आहे.[४२]

याप्रमाणे बाबा जीवनाचे ख्रिस्ती झाल्याने सार्थक झाल्याचे निवेदन करतात.

धर्मांतर करणाऱ्या माणसांच्या नेमक्या यातना तपशीलवारपणे बाबांनी आपल्या एका अनुभवात वर्णन केलेल्या आहेत. तो अनुभव कल्पित नसल्याने, त्याला स्वानुभवाची धार असल्याने अत्यंत वेधक व जिवंत आणि परिणामकारक असा आहे. बाबा लिहितात,

तिसरी गोष्ट. माझ्या जेवणाच्या संबंधाने जी दया परमेश्वराने मजवर केली तिचा उल्लेख जर येथे न केला तर मी कृतघ्नतेचा दोषी होईन. हिंदूधर्मातून ख्रिस्ती झालेल्या मनुष्यास चांगले जेवण सर्वत्र मिळत नाही, ही गोष्ट निर्विवाद आहे. माझी व माझ्या पुष्कळ ख्रिस्ती बंधूंची प्रकृती नीट राहत नाही त्याचे हे एक कारण होय. जेव्हा त्यास आपले घरदार सोडावे लागते, तेव्हा त्याच्या आई किंवा बहिणीची ममतेची जतनही त्यास सोडते. त्याचा एक नवीन समाजात प्रवेश होतो. त्या समाजाच्या बहुतेक रीतिभाती निराळ्या असून त्या ते अगत्यामुळे अथवा आवडीने आदरितात. पुढे आपल्यास तो एक चाकर ठेवतो. हा चाकर गोवेंकरी, मुसलमान अथवा महार या जातीपैकी असतो. तो बहुदा दारुबाज अथवा चोर असतो. त्याचा स्वयंपाक चांगला नसतो. तो आपल्या तरुण व गैरमाहित धन्याला जे करून घालीन तेच मिष्ठान्न, भुकेच्या सपाटघात त्याला कच्चे पक्के खावे लागते. मग त्याला आपल्या घरची वरण भात भाजी, इत्यादी पंचपक्वान्नांची आठवण होते. कधी त्याचे जेवण पाणचट, तिखट किंवा खारट, कधी थंड किंवा कधी गरम असे असते. असे अन्न खाऊन तो जगतो कसा? हा प्रश्न तत्त्वज्ञान्याला सुद्धा गोंधळात पाडण्याजोगा आहे.[४३]

धर्मांतर केलेल्या माणसाची पूर्वाश्रमीच्या समाजात उपेक्षा, अधिक्षेप होत असे. बाबा धर्मांतरानंतर प्रथमच आपल्या हिंदु बहिणीच्या घरी जेवले तेंव्हा त्यांच्या मनात पुढील विचार आले :

जो माझा मेहुणा थोड्याच दिवसांपूर्वी मजशी अगदी वाकडा असे तो मला अशा प्रकारे वागवील असे माझ्या कधीतरी मनी आले होते काय? गेल्या वर्षी माझ्या आईबापास भेटण्याकरिता तो पुण्यास आला होता. तेव्हा माझी भेट घेण्याची त्याने परवा केली नाही. आणि थोड्या महिन्यांपूर्वी माझी मातापितरे मुंबईत त्याच्या घरी राहत असता एके दिवशी वडील मला भेटण्यास निघाले तेव्हा त्याचबरोबर माझ्या घरी येण्यास तो कबूल होईना.

पुढे मेहुण्याने गोड भाषण केले, आदरसत्कार केला, मन दुखवू नये म्हणून कशी काळजी घेतली याचे बाबा मोठ्या समाधानाने वर्णन करतात.[४४] बाबांच्या पत्नीने त्यांच्याशी घटस्फोट घेतला, वडिलांनी मात्र घेतला नाही. बाबांना धर्मांतरानंतर लोक पहावयास जमत, क्वचित त्यांच्या बग्गीवर धोंडमार होई, काही जणांचा वारसाहक्क जात असे वगैरे धर्मांतरानंतरच्या

वेणा त्या काळातल्या बाबांनी अन्यत्र वर्णन केल्या आहेत. धर्मांतरानंतरच्या जाचाचे उपरोक्त बाबांचे अनुभव हृदयद्रावक आहेत व त्या काळावर प्रकाश टाकणारे आहेत.

बाबांच्या काही अनुभवनिवेदनातून दिसते की बाबा ऋणनिषेधक व व्यभिचार निषेधक होते. आपल्या शिक्षकांच्या (गो. ना. माडगांवकरां–) कडून त्यांना हा वारसा मिळाला होता. प्रथम बाबा स्वतःच कर्ज काढीत पण अनुभवाने ते शहाणे झाले. धर्मांतरानंतर तर त्यांचे पूर्वीचे रूपच पालटलेले दिसते. २० ऑक्टोबर १८९५ च्या दैनंदिनीत ते लिहितात,

> गेल्या आठवडयात दिवाळी आली व गेली. अन्नवस्त्र, खानपान, आरास फटाकडे, दारू यांत खूप द्रव्य उधळले. काही जण तर कर्जबाजारी झाले.

बाबा लिहितात,

> पण धर्माच्या व नीतीच्या संबंधाने काय फायदा झाला? परमेश्वराचे भजन कोणी केले काय? धनाची (लक्ष्मीची) व हिशेबांच्या चोपडयांची पूजा मात्र केली. केवढा हा अधर्म! देवळात व घरात कलावंतिणींचा नाच व बैठका झाल्या. केवढा हा अनाचार![४५]

पुढे मतलबी उपाध्ये, लोभी सराफ, दुर्गुणी नायकिणी, कसबिणी, नाटककार व तमासगीर, जुगार व देशी व विलायती दारू यांच्या तावडीतून लोकांना सोडविण्याचा प्रयत्न स्वदेशाभिमानी लोकांनी करावयास हवा असे बाबा सुचवितात. लोकांनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यास त्यांची उपरोक्त दुर्गुणांपासून मुक्तता होईल असा विश्वास याच लेखात बाबांनी व्यक्त केला आहे.

एका दिनचर्यालेखात बाबांची ख्रिस्तावरची जबरदस्त श्रद्धा पुढीलप्रमाणे व्यक्त झाली आहे :

> हे देवा बापा, माझी स्थिती तुला ठाऊक आहे. माझ्या अडचणी, माझ्या गरजा तू जाणतोस. मी अशक्त आहे. तु मला बहुत संकटापासून सोडविलेस. माझ्या सर्व मुलांनी तुझ्या मार्गाने चालावे अशी माझी उत्कट इच्छा आहे. त्यांनी उत्तरोत्तर निर्मळ व सत्कर्मभरित व्हावे. सर्व हिंदुस्थान देश ख्रिस्ती व्हावा, व सर्व हिंदू, पारशी, मुसलमान व सर्व नगरवासी व अरण्यवासी यांची मुले ख्रिस्ती व्हावीत, हेच माझे मागणे आहे. मिशनांच्या कामास आशीर्वाद दे, त्यांच्या कामाचे बहुत फल त्यांस पाहू दे.[४६]

याप्रकारे देवांवर सर्व चिंतांचा भार घातला आहे आणि अगदी आडपडदा न ठेवता ख्रिस्ती धर्मप्रचार आवेशाने लोककल्याणार्थ केला आहे. आत्मोद्धार जसा ख्रिस्तीधर्म स्वीकाराने झाला तसाच इतरांचा उद्धार यानेच होईल ही बाबांची श्रद्धा होती व त्यातूनच वरील लेखन त्यांनी केले.

बाबा ख्रिस्ताचे आर्तभक्त होते. त्यांच्या *अनुभवसंग्रहा*वरून त्यांच्या अनन्य ख्रिस्तभक्तीची स्पष्ट कल्पना आपणास येते. बाबा कधी पावसाकरिता तर कधी डिक्शनरीसाठी काढलेल्या कर्जाचा हप्ता फेडण्याकरिता म्हणून प्रार्थना करताना आढळतात. एकदा त्यांना काम नव्हते म्हणून त्यांनी देवाची प्रार्थना केली, तो त्यांना त्राक्त व बायबल सोसायटीच्या सेक्रेटरीकडून दुसंयुक्त पत्र कामाविषयी आले. आपण हे काम स्वीकारावे की नाही याच्या उत्तरासाठी

देखील ते देवावरच भार टाकतात. आपले मातापितर मायाळू होते व पत्नी सेरा प्रिय होती याचे कारण प्रभू येशूची कृपा असे त्यांना वाटते. आपली तीन ख्रिस्ती लग्ने, वडिलांची संकटातून सुटका, स्वतःची कर्जे काढण्याची सवय सुटणे, धर्मांतरानंतरचे आपल्या नातलगांचे आपल्याशी प्रेमळ वागणे इत्यादी गोष्टी देवाच्या उपकाराचे प्रतीक म्हणून ते त्यांचा उल्लेख करतात. ईश्वरी कृपेचा अधिकाधिक अनुभव आल्याची नोंद त्यांनी १८५९ मध्ये केली आहे. त्यात आजारी नातलग उठवले, वाख्याच्या साथीत स्वतः व नातलग वाचले, पाळकपदी नेमणूक झाली, डिक्शनरीसाठी बरेच वर्गणीदार जमले वगैरे कामे प्रार्थनेमुळे झाली असा त्यांचा भाव व्यक्त झाला आहे. बाबांची आर्तभक्ती त्यांच्या जीवनात पदोपदी व्यक्त होते.

बाबांनी द्रव्यसंपादन, द्रव्यव्यय व ऋण या संदर्भात एक हृदयस्पर्शी अनुभव लिहून ठेवला आहे. द्रव्य संपादन करताना आपण नित्यनैमित्तिक खर्च करून संचय केला असे ते म्हणतात. द्रव्यसंचयापेक्षा सत्‌व्यय हा त्यांचा विशेष होय. ख्रिस्ती जिण्याच्या आरंभी आपणास पूर्वीच्या संवयीने कर्ज काढण्याची संवय होती. प्रसंगी कर्ज काढावे पण डामडौल दाखविण्याकरिता व नावलौकिकासाठी कर्ज काढू नये हे त्यांना नंतर पटले. अन्न व ऐषारामासाठी कर्ज काढणे हे पाप असे त्यांना वाटू लागले. शक्तीपलिकडे कर्ज काढणे त्यांना खटकले. कर्ज काढणे व याचना करणे या गोष्टीत पाप आहे व त्या कमीपणाच्या आहेत असे बाबांना वाटू लागले. पूर्वी बाबा कर्ज फेडण्यासाठी अल्पस्वल्प, घरगुती चोरी देखील करीत असत पण ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर 'पाप' व 'पापक्षमा' इ. कल्पना स्पष्ट होत गेल्यामुळे त्यांचे आचारविचार सुधारले असे दिसते. चोरीचहाडी बंद झाली. व्यसनाधीनता लोपली. आचार व विचारांची शुद्धता आली. सत्यव्रत आले.

बाबांचा पत्रव्यवहार प्रचंड होता. अक्षरशः हजारो पत्रे त्यांनी लिहिली असावीत. हिंदुस्थानात सर्वत्र, युरोप व अमेरिका याही देशात ते पत्रे पाठवीत व त्यांना उत्तरे देत. त्यांच्या *अनुभवसंग्रहा*त याबाबत अनेक नोंदी आहेत. ओळखीच्या व नात्याच्या लोकांना पत्रे पाठविणे, आलेल्या प्रत्येक पत्रास उत्तरे देणे, यावर त्यांचा विशेष कटाक्ष होता. मृत्यूपूर्व दोन दिवस आधी त्यांनी *ज्ञानोदया*स एक गोड व विस्तृत पत्र पाठवल्याचा उल्लेख *ज्ञानोदय*कारांनी केला होता.[४७] आपणांस आलेली पत्रे ते जपून ठेवीत. एकदा जुन्या पत्रांवरच्या सह्या कापून एका निराळ्या वहीवर त्या डकवून ठेवल्या होत्या. याप्रकारे त्यांनी आपणास आलेल्या पत्रांच्या मदतीने एक स्वाक्षरसंग्रह केला होता. आपला *अनुभवसंग्रह* सिद्ध करताना त्यांनी पत्रांचा भरपूर उपयोग करून घेतला.

सुट्टीमध्ये बाबा इगतपुरी, लोणावळे वगैरे ठिकाणी जात. तेथे स्वतःच्या व इतरांच्या ख्रिस्तीधर्मपर पुस्तकांचा प्रचार नेटाने व श्रद्धेने ते करीत. ट्रॅक्ट सोसायटीकडून अनेक पुस्तके ते मागवीत. लोणावळे, खंडाळे, इगतपुरी इत्यादी ठिकाणच्या लोकांना ते पुस्तके वाटीत. पुस्तकांचे बिल मात्र बाबा स्वतः भरीत. पुस्तके वाटल्याच्या, लोकांकडून कोणत्या वस्तू, किती पैसे आले व त्यांचा विनियोग कसकसा केला याबाबतच्या हिशेबाच्या अनेक नोंदी *अनुभवसंग्रहा*त आहेत. परदेशातील लोकांशी पत्रव्यवहार करून बाबा मदत मिळवीत व त्यात भर

घालून ती मदत विद्यार्थ्यांना करीत. त्यांच्याकडे शिकलेले अनेक विद्यार्थी पुढे मोठे झाले. *अनुभवसंग्रहा*त ह्या अशा, बाबांच्या अनेक स्मृतींचा संग्रह आहे. बाबा सतत उद्योगात निमग्न असताना दिसतात. मुंगीप्रमाणे सतत काम केल्याने शेवटी त्याचे फळ मोठे होते. ख्रिस्ताने आपणास उद्योगासाठी सतत शक्ती व बुद्धी दिली असा त्यांचा विश्वास होता. जगाकरिता, देवाकरता व मण्डळीकरिता सतत उद्योग केला पाहिजे या त्यांच्या कर्मयोगी निष्ठेमुळे त्यांच्या हातून प्रचंड लेखन झाले!

बाबांच्या पन्नास वर्षांच्या जीवनातील विविध अनुभव आपण पाहिले. आत्मचरित्रात त्यांचे महत्त्व खूपच आहे. *अनुभवसंग्रहा*मध्ये जे बाबांचे व्यक्तित्वदर्शन घडले आहे ते महत्त्वाचे आहे. आपणास या *अनुभवसंग्रहा*वरून बाबांची सुखदु:खे, त्यांच गुणवगुण, त्यांचा स्वभाव, त्यांचे अंतरंग व त्यांचे प्रश्न आणि त्या प्रश्नांची बाबांनी शोधलेली उत्तरे या गोष्टी समजतात. हिंदूधर्मातील दैववाद, शकुन, मुहूर्त, व ग्रहांची अनुकूलता या प्रतिकूलता यांच्या भयापासून व बंधनापासून ते मुक्त झाले. त्यामुळे उद्योग करण्यास व्यर्थ भय किंवा कल्पित विघ्ने आड आली नाहीत. बाबांची ख्रिस्तावरची कमालीची श्रद्धा, त्यांच्या रोमारोमात भिनलेले प्रार्थनेचे महत्त्व, पावलापावलावर त्यांना आढळणारी येशू ख्रिस्ताची दया, घडीघडीला त्यांनी केलेली देवाची उपकारस्तुती, अवघे जग ख्रिस्तमय बघण्याची त्यांची वृत्ती, अनन्यभावाने त्यांनी केलेली ख्रिस्ताची भक्ती, सातत्याने ख्रिस्तीमंडळयांकडून त्यांनी केलेले कार्य, पाळकपदावरून केलेला सदुपदेश, त्राकटे वाटण्यासाठी केलेली पायपिटी, धर्मांतरानंतर त्यांनी सोसलेल्या अनंत वेणा, ख्रिस्ताला केलेले आत्मार्पण, शास्त्रावर भिळविलेले अपूर्व प्रभुत्व, ख्रिस्तासाठी व वाङमयासाठी झिजविलेली लेखणी, लेखनाचा केलेला प्रचंड उद्योग व श्रमाने सिद्ध केलेले कोश इत्यादी त्यांच्या व्यक्तित्वाचे आगळे दर्शन या *अनुभवसंग्रहा*त घडते. *अनुभवसंग्रहा*नेच एकोणीसाव्या शतकात झालेल्या या प्रचंड व्यक्तित्वाची लोभस ओळख आपणांस होते.

बाबा पदमनजी यांचे धर्मांतराचे जीवन कसे घडले, त्यांच्यावर ख्रिस्ती धर्माचे कोणकोणते संस्कार झाले, त्यामुळे त्यांचे ख्रिस्ती जीवन कसे होते व त्याला कसकसे वळण लागले याचे प्रत्यंतर त्यांच्या अनुभवसंग्रहातून येते. बाबांचे वडील पदमनजी माणिकजी, त्यांचे काका नारायणजी माणिकजी, त्यांचे शिक्षक रे. टेलर, मि. नारायण शेषाद्री, महादेवशास्त्री, कोल्हटकर डॉ. मरे मिचल व डॉ. विल्सन यांच्या सान्निध्यात, त्यांच्या मार्गदर्शनाने व त्यांच्या प्रेमामुळे बाबांचे जीवन घडले यांत शंकाच नाही. तथापि बाबा लिहितात,

> प्रभु येशू ख्रिस्ताचे गुणवर्तनाचा कित्ता गिरविण्यास मी झटलो. प्रभु येशूचे प्रेषित संसारात वागणारे असून वैराग्यशील होते. जुन्या करारातील पुष्कळ भक्त धनिक असून त्यांची दृष्टी परमार्थाकडे होती. अशांचा कित्ता घेऊन व माझ्या दृष्टीपुढे देवाने जे भक्त ठेविले त्यांकडे पाहून व दूरच्या सद्‌भक्तांची चरित्रे वाचून मी जगाचे मोह टाळण्यास झटलो.[४८]

असा त्यांचा आध्यात्ममार्ग त्यांना गवसत गेला. मनाचा विकास झाला. शास्त्राभ्यासाकरिता धार्मिक ग्रंथकारांच्या टीका वगैरे साहित्याचा खूपच लाभ झाल्याचे ते लिहितात,

> शास्त्र वचनाचे स्मरण व नित्य पठण, कर्तव्ये, सत्कर्म, व परोपकार यांनी, भक्तसमागमाने

ईश्वरभक्ती व ख्रिस्तसेवा यांनी आपल्या ख्रिस्ती जिण्याची घडण झाली.

. . . असे ते सुचवितात,

मनुष्याच्या सुखाकरिता केलेल्या अन्नवस्त्रादि पदार्थांच्या ठायी देखील मोहकत्व घालण्याचे जगास सामर्थ्य आहे. वस्त्रालंकार, घरदार, शेत-मळे, माडया–हवेल्या, मोठी विद्या व मोठचा पदव्या, यामुळे ख्रिस्ती मनुष्याची बुद्धी जड होते व त्याची आत्मिक रुची बिघडते या गोष्टीचा वारंवार अनुभव आला व आपण देवकृपेने सावध झालो. असे ते लिहितात.

आत्मिक स्थिती, कोरडी भक्ती व मरणकाल स्थिती इत्यादीवरून प्रापंचिक गोष्टीत लुब्ध असणारांच्या उदाहरणाने आपणास प्रबोधित केले. असेही ते म्हणतात.

शुष्क आत्मिक स्थिती, कोरडी भक्ती व मरणकाळ स्थिती यांनी बाबांना प्रबोधित केले. ऐहिक जीवनाचा आनंद लुटण्यासाठी पारमार्थिक जीवनांची त्यांनी कास धरली. या पारमार्थिक ओढीच्या वेळोवेळी केलेल्या नोंदी म्हणजे *अनुभवसंग्रहा*चे दोन भाग होत.

बाबांनी आपले आध्यात्मिक जीवनचरित्र म्हणून *अनुभवसंग्रह* प्रसिद्ध केला असला तरी आठवणीरूप आत्मकथन म्हणून हा संग्रह अगदीच रुक्ष व सामान्य वाटतो. *अरुणोदया*चे सामर्थ्य यात नाही. कलात्मकतेच्या दृष्टीने तर *अरुणोदया*च्या जवळपासही तो येऊ शकत नाही. असे होण्याचे कारण अगदी स्पष्ट आहे. *अरुणोदय* कौटुंबिक हकीकतींनी हिंदुधर्मातील धार्मिकतेच्या चित्रमय वर्णनांनी बाबांच्या आंतरिक संघर्षांनी नटलेला आहे. आपल्या ख्रिस्ती होण्याचे चित्र बाबा मोठचा तन्मयतेने, उत्सुकतेने न्याहाळतात. ख्रिस्ती झाल्यानंतर बाबांच्या मनाचा संघर्ष संपला. ख्रिस्ती मिशनच्या आणि मिशनऱ्यांच्या एककल्ली, एकांगी अशा भूमिकेशी त्यांना जखडून राहावे लागले. वृद्धापकाळात ख्रिस्ती धर्माचा त्यांना कंटाळा आला असेल व जी धर्मतत्त्वे आरंभी रसरशीत समजून बाबांनी स्वीकारली ती आता निःसार लागत असतील, अशा अर्थाचे बडोद्याहून त्यांना एक पत्र आले. त्यावरून कित्येक हिंदू लोकांस तसेच वाटत असेल या भावनेने, 'जर ईश्वराने मला आयुष्य व शक्ती देऊन आणखी ४० वर्षे वाचविले तर पूर्वीपेक्षा अधिक उत्कंठतेने व हर्षाने प्रभु येशूची सेवा करीन' हे जिद्दीने सांगण्यासाठी त्यांनी *अनुभवसंग्रहा*चा पहिला भाग प्रसिद्ध केला.[४९] पहिल्या भागाच्या प्रसिद्धिच्या वेळीच आपल्या 'डोळयांच्या व डोक्याच्या स्थितीत' आपल्या जवळच्या पत्रव्यवहाराचा वगैरे उपयोग करणे दुःसाध्य आहे असे त्यांना वाटले.[५०]

जोम ओसरलेला, इंद्रिये क्षीण झालेली, जीवनाकांक्षा उदासवाण्या झालेल्या अशा अवस्थेत *अनुभवसंग्रह* अवतरला आहे. हे लक्षात घेतले म्हणजे त्याच्या नीरसतेचे, रुक्षतेचे, सामान्यतेचे कारण समजते!

## टीपा

१. 'प्रस्तावना', *अनुभवसंग्रह,–भाग २*, मुंबई, १९०४.
२. *अनुभवसंग्रह–भाग १*, मुंबई, १८९५, पृ. २७४.
३. तत्रैव, पृ. २७५.
४. तत्रैव, पृ. २७५.
५. तत्रैव, पृ. २७६.
७. तत्रैव, पृ. २८०.
८. *ज्ञानोदय*, १२ सप्टेंबर १८९५, पृ. २९६.
९. *अनुभवसंग्रह–भाग २*, पृ. १४.
१०. तत्रैव, पृ. ४०.
११. तत्रैव, पृ. ४१.
१२. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ५.
१३. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ६.
१४. तत्रैव, पृ. १२.
१५. तत्रैव, पृ. १७.
१६. तत्रैव, पृ. २३.
१७. *ज्ञानोदय*, १२ सप्टेंबर, १८९५, पृ. २९४.
१८. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ३४, ३५.
१९. तत्रैव, पृ. २०, २१.
२०. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ३९.
२१. *अनुभवसंग्रह–भाग २*, पृ. ५०.
२२. तत्रैव, पृ. ४९.
२३. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ५२.
२४. तत्रैव, पृ. ७२.
२६. *अनुभवसंग्रह–भाग २*, पृ. २७, २८.
२७. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. २९.
२८. तत्रैव, पृ. २९, ३१.
२९. तत्रैव, पृ. ५७.
३०. तत्रैव, पृ. ५८.
३१. *अनुभवसंग्रह–भाग २*, पृ. १८
३२. तत्रैव, पृ. ६१.

३३. तत्रैव, पृ. ६४.
३४. तत्रैव, पृ. ३३.
३५. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ७५, ७६.
३६. *अनुभवसंग्रह–भाग २*, पृ. २४.
३७. तत्रैव, पृ. ३१.
३८. तत्रैव, पृ. ६५.
३९. *अनुभवसंग्रह–भाग २*, The English portion, p. 23.
४०. —do— —do— p. 26.
४१. *अनुभवसंग्रह भाग २*, पृ. २६.
४२. तत्रैव, पृ. ५४.
४३. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. ९३.
४४. तत्रैव, पृ. २०३.
४५. *अनुभवसंग्रह–भाग ३*, पृ. ९.
४६. तत्रैव, पृ. २१.
४७. *ज्ञानोदय* दि. ६-९-१९०६.
४८. *अनुभवसंग्रह–भाग १*, पृ. १२.
४९. 'प्रस्तावना', तत्रैव, पृ. ६.
५०. तत्रैव, पृ. ७.

१४

## बाबांची लेखनशैली

विष्णुशास्त्री चिपळूणकरांपासून मराठीत उर्जस्वल अशा गद्य शैलीचा प्रादुर्भाव झाला व त्यामुळे त्यांच्या पूर्वीच्या पिढीतील दादोबा पांडुरंग, बाबा पदमनजी, लोकहितवादी यांच्या निरलंकृत परंतु त्यांच्या अंतःकरणाचे स्वच्छ प्रतिबिंब जीत पडले आहे. अशा प्रसादयुक्त पारदर्शक शैलीचा लोप झाला आणि त्याचा विसरही पडला. माडखोलकरांनी तर अर्वाचीन मराठीच्या आजच्या ग्रांथिक शैलीचे सारे श्रेय कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनाच दिले आहे. ते म्हणतात,

> शास्त्रीबुवांनी एकही स्वतंत्र मराठी ग्रंथ लिहिलेला नसताना आणि त्यांचा प्रायः एकही ग्रंथ आज वाचला जात नसताना सुद्धा, त्यांचे जे नाव अद्याप मराठी साहित्यात टिकून राहिलेले आहे ते मुख्यतः त्यांच्या भाषाप्रभुत्वामुळे. बापू छत्रे, हरि केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, परशुरामपंत तात्या गोडबोले, दादोबा पांडुरंग, गोविंद नारायण माडगावकर प्रभृती त्यांच्या प्राक्कालीन किंवा महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री राजवाडे, लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित, बाबा पदमनजी प्रभृती त्यांच्या समकालीन लेखकांनी विविध आणि विपुल वाङमय लिहिले, ही गोष्ट खरी. पण यांपैकी एकही लेखक भाषाप्रभु नव्हता. कृष्णशास्त्री हे आधुनिक महाराष्ट्राचे पहिले भाषाप्रभु, पहिले शब्दशिल्पी, पहिले शैलीकार साहित्यिक! आज जी प्रौढ, बव्हर्थ, प्रभावशाली, लालित्यपूर्ण मराठी भाषा शास्त्रीय, ललित आणि नियतकालिक वाङमयातून लिहिली जात आहे, ती अर्वाचीन मराठीची ग्रांथिक शैली शास्त्रीबुवांनी आपल्या आरस्पानी मुलायम कलमाने घडविली आणि रंगरूपाला आणली.[१]

माडखोलकरांची ही कृष्णस्तुती शिवलीलामृतकर्त्याप्रमाणे "हा तो अवघ्यांत श्रेष्ठ" या बाण्याची आहे. या अशा वर्णनामुळे अनेक चांगल्या शैलीदार लेखकांवर निश्चितच अन्याय होतो!

सुदैवाने, बाबांच्या शैलीचे गुणगान कांही जाणकार समीक्षकांनी चांगल्या रीतीने केल्यामुळे माडखोलकरांच्या वरील विधानांचे परस्पर खंडन होऊन जाते!

बाबा पदमनजींच्या पिढीतील दुसऱ्या कोणत्याही लेखकाच्या हातून एवढे अवाढव्य लेखन झालेले नाही. त्यांच्या भाषेवर ख्रिस्ती धर्मग्रंथांची छाप पडली आहे यात मुळीच शंका नाही. पण त्याचबरोबर बालपणापासून रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप, इत्यादी ग्रंथांची त्यांनी पारायणे केली असल्यामुळे श्रीधराच्या वाणीतील सुबोधता व सोज्वलता, प्रसन्नता आणि प्रेमळपणा हे गुण त्यांच्या भाषेत उतरले आहेत.[२]

या गं. बा. सरदारांच्या उद्‌गारात बाबांच्या भाषाशैलीचे सार एकवटलेले आहेत. त्याचप्रमाणे,

बाबांच्या हातून बनलेली मराठी पुस्तके वजा केली तर आज मराठी ख्रिस्ती साहित्य असून नसल्यासारखे होईल. त्यांनी एकटयांनी लिहिलेली लहान–मोठी पुस्तके शंभरावर आहेत. त्यांत त्यांच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या लेखांचा समावेश केला तर हे वाङमय कसे एखाद्या डोंगरासारखे दिसू लागते. ह्या वाङ्‌मयाच्या ठायी प्रतिमाही तशीच विलक्षण आहे.

या प्रा. म. वा. धोंड यांच्या उद्‌गारावरूनही बाबांचे लेखनविशेष आणि त्यांच्या लेखनसामर्थ्याची कल्पना येते.[३] बाबांचे *अरुणोदय* आणि त्यांची इतर पुस्तके वाचून त्यांतील खरा कळवळा, खरी भक्ती, साधेपणा व निरिच्छता या गुणांनी प्रभावित होऊन आपण ख्रिस्ती झालो असे रे. ना. वा. टिळक यांना वाटते. एखाद्या अद्वितीय पंडिताच्या लेखणीत इतकी प्रतिमा व परिणामकारकता असत नाही. बाबांच्या लेखणीत हे सामर्थ्य होते असे टिळकांनी या संबंधाने म्हटले आहे.[४] महामहोपाध्याय द. वा. पोतदार बाबांच्या शैलीविषयी लिहितात,

बाबांची भाषापद्धती खरोखरच गोड आहे. त्यात भक्तीचा जिव्हाळा आहे. समाजसुधारणेची तळमळ आहे. वाक्ये शुद्ध, साधी, सरस व चटकदार आहेत. लिहिणे गंभीर व प्रौढ आहे. शब्द वेचक आहेत. वळण जरा कोकणी आहे. त्यांची गोड भाषा व सुंदर टापटिपीची मांडणी पाहता बाबांची गणना उत्तम मराठी लेखकांत केली पाहिजे. त्यांची मते काहीही असली तरी त्यांची वाङमयसेवा कौतुकार्हच आहे.[५]

*अरुणोदय* संबंधी लिहिताना पोतदारांनी पुढे कोवळा, लुसलुसीत या शब्दप्रयोगाने त्याचा गौरव केला आहे. या विशेषणांनी *अरुणोदया*तील शैलीचे मार्दव चटकन लक्षात येते.

*यमुनापर्यटन*, *अरुणोदय* या त्यांच्या ललितप्राय कृतीतून त्यांच्या लेखनशैलीचा खराखरा प्रत्यय येतो. यथातथ्य शब्दचित्रे साकार करणे, वातावरणाचा साध्यासुध्या वाक्यांतून भेद घेणे, मानसिक स्थित्यंतरांना तरल भावरूप देणे हे त्यांचे विशेष या कृतींतून कसे दिसतात, याचे विवेचन मागेच केले आहे. साध्यासुध्या वाक्यांतून अगदी सहजगत्या बाबा आपले मन आविष्कृत करतात. *अनुभवसंग्रहा*च्या प्रस्तावनेमध्ये आपल्या वृद्धावस्थेचे करुण चित्र थोडक्यात परंतु परिणामकारक रीतीने रेखाटले आहे, ते म्हणतात,

ही अनुभवांची निवड व भाषांतर, छाटाछाट करण्यास व एकंदर विषयांची जमवाजमव व

व्यवस्था लावण्यास मला बरेच श्रम पडले. दृष्टी मंद झाल्यामुळे लिहिणे, वाचणे दुसऱ्या-कडून करावे लागले. ते सर्व माझी प्रिय कन्या एस्तेर शांति (राणी) हिने मोठ्या आवडीने व बहुत श्रमाने केले. स्मरणशक्ती क्षीण होत चालल्याने मजकुराची रचना यथायोग्य रीतीने करण्यास फार श्रम पडतात. विचारात गोंधळ होतो. मनास लवकर कंटाळा व थकवा येतो. आणि गडबड व गोंगाट व व्यत्यय ही सहन होत नाहीत. ह्या तीन गोष्टींचा तर ह्या मुंबापुरीत व जेथे मी राहतो त्या रस्त्यावर विशेष सुकाळ आहे. निवांत, विश्रांती व स्वस्थता ही ऊंबराच्या फुलासारखी दुर्मिळ आहेत.[६]

वार्धक्यातील शारीरिक क्षीणतेच्या व मानसिक दुर्बलतेच्या नेमक्या गोष्टींचा संक्षेपाने उल्लेख करून बाबांनी आपले म्हातारपण वाचकांसमोर उभे केले आहे.

एरव्ही शांत, सौम्य वृत्तीच्या बाबांच्या लेखणीला ख्रिस्ती व हिंदुधर्मासंबंधी तुलनात्मक चर्चा करताना आपपरभावाने लिहिताना लयबद्ध गती प्राप्त होते. कृष्ण व ख्रिस्त यांची तुलना करताना ते म्हणतात,

जे कोणी निःपक्षपाताने हे पुस्तक साद्यंत वाचतील त्यांस हे समजेल की कृष्ण हा एक मार-णारा मनुष्य होता व ख्रिस्त हा एकच तारणारा देवाचा अवतार आहे. कृष्ण मरून गेला आणि पुनः उठला नाही. ख्रिस्त मरून पुन्हाः उठला. तो आकाशात राज्य करीत आहे व पृथ्वीवर आपल्या लोकांबरोबर सर्वदा आहे. कृष्णाच्या नावात काही तेज किंवा तारण नाही. ख्रिस्ताच्या नावाविषयी सर्व भविष्यवादी साक्ष देतात की त्याजवर विश्वास ठेवणारा प्रत्येक त्याच्या नावाने पापाची क्षमा पावेल.[७]

अशा तुलनात्मक लेखनात बाबांची लेखणी काहीशी आवेशीही बनते. उदा. आमची भक्तीसंबंधी पापे वाहणारा उपाध्या या त्यांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत ते लिहितात,

हिंदुधर्माप्रमाणे कर्मशील व बहिःशुद्धी व अशुद्धी याचा भेद वाहणारा असा दुसरा धर्म पृथ्वीत कोठे नाही. मूर्तिपूजेचे सर्व साहित्य किती शुद्ध असले पाहिजे. ज्या पाण्याने मूर्तीस स्नान घालावयाचे त्यास कोणी ओवळा मनुष्य शिवू नये, जी फुले मूर्तीवर घालावयाची त्याचा कोणी वास घेऊ नये. मूर्तीस नैवेद्य दाखवायचा तो कोणी उष्टावलेला असू नये. याप्रमाणे सर्व पूजा यथासांग करण्यासाठी ते फार जपतात. तरी इतकेही करून अंतःकरणाची जी खरी शुद्धता ती त्यांस ठाऊक नाही. कारण जसा देव तसा भक्त. देवच जर अपवित्र तर भक्त पवित्र कोठून होईल? हिंदुधर्माची पवित्रता खाणे, पिणे, वस्त्र पवित्र, स्वच्छ राखणे व जातीचे नियम विधी पाळणे यात आहे.

बाबा आपले लेखन सुसंस्कृत शब्द, म्हणी, वाक्प्रचार यांनी सजवीत. सूचकता, सूक्ष्म निरीक्षण, विरामचिन्हांचा वापर, समयानुकूल स्पष्टीकरण इ. बाबांच्या लेखनाची काही वैशिष्ट्ये त्यांच्या साऱ्याच लेखनात दिसतात. उदा. येशूचे तारुण्य वर्णन करताना बाबा लिहितात,

त्याचे लेकुरपण निर्मळ होते, लेकराच्या खोड्या, अनाडपणा, आळस, आईबापांची अवज्ञा करणे, राग, हट्ट, द्वाडपणा ही त्यात नव्हती. जशी पुष्पवाटिकेतील कोमल पुष्पकलिका

मंदगतीने प्रफुल्लीत होते व आपल्या परिमळाने आसपासच्या वायूला सुगंधित करते तद्वत ख्रिस्ताच्या बाळपणाचा सुवास नाजरेथ गावातील मुलांमध्ये पसरत गेला. जगात जे कल्पित अवतारी पुरुष झाले त्यांची बालपणाची चरित्रे वाचली असता त्यांत एक तर फार चमत्कारिक व अकटोविकट गोष्टी सापडतात व दुसरे त्यांच्या क्रीडा पापावस्थेत जन्मलेल्या इतर बालकांच्या पोरखेळांप्रमाणे पापलिप्त दिसतात. याविषयी उदाहरणे देण्याचे प्रयोजन नाही. येशूचे गावातील लोकांशी जसे प्रीतीचे व स्नेहाचे वर्तन होते तसेच त्याच्या घरातल्यांशीही होते. यात संशय नाही. जुन्या ख्रिस्ती कहाण्यांमध्ये अशी एक कहाणी आहे की, येशूच्या भोवती रात्रंदिवस निजता बसता, उठता फिरता प्रकाशाची प्रभा होती, परंतु ही प्राचीन ईश्वर मंदिरातील दयासनावरील तेजाप्रमाणे दृश्यमान होती (निर्ग. १६.७) असे आपण समजू नये. तर पवित्र आचरण व ईश्वरी मनःशांती ह्यांच्या रूपाने ती सर्वदा त्याच्या भोवती तळपत होती.[८]

बाबांच्या *यमुनापर्यटन* या कादंबरीतील विधवांच्या दुःस्थितीची वर्णने वाचताना एकीकडे अंगावर कांटा उभा राहतो तर दुसरीकडे त्यांच्याबद्दल नितांत सहानुभूती जागी राहते आणि त्याच वेळी या दुष्ट चालीरीतींबद्दलची मनात चीड निर्माण होऊन मनाचा प्रक्षोभ होतो. एकाच वेळी साध्यासुध्या वाक्यांतून असा संमिश्र परिणाम होतो, तो त्यांच्या परिणामकारक लेखनशैलीमुळेच हे सांगण्याची आवश्यकता नाही. भाष्य करण्यांत बाबांची लेखणी तत्पर व सिद्ध असते. उदा. :

या विधवांस भ्रतारसुख खेरीज करून दुसरे संसारसंबंधी सुख असावे तेही त्यांच्या स्वप्नी नाही. सारा दिवस मजूरदाराप्रमाणे कष्ट करावे; आणि एक वेळ घरातील सर्वांची मने राखून अन्न खावे, वर्षाचे काठी दोन रुपयांचे लुगडे व पैशाचे गोपीचंदन असे पाहिजे ते देखील कोणी सासूसासरा दीर वगैरे संतोषाने देत नाहीत आणि ही केव्हा मरेल ही इच्छा करतात. ज्या अगदी गरीब असतात त्यांना लोकांच्या घरी मोलमजुरी करण्यास जावे लागे तेही पुढील दाराने जाऊ नये, मागील दाराने जावे, आणि घरच्या यजमानांची खुशामत करून काम करावे. रस्त्याने फिरण्यासही तिला लाचारी. कोणी बाहेर जाऊ लागल्यास ती पुढे आली असता अपशकून होतो म्हणून त्या बिचारीस आपले तोंड झाकावे लागते.[९]

विधवांच्या स्थितीचे याप्रकारे निरूपण करताना बाबांच्या शैलीत वास्तवाबरोबरच एक प्रकारची बोचरी हेतूपूर्वकता येते. उदा. *यमुनापर्यटन*चे पुढील उतारे पहा :

या ठिकाणी थोडे दिवसांवर—भट नामक एक कऱ्हाडा ब्राह्मण होता. त्याच्या विधवेने आपणास चार पाच मुले असताही व्यभिचार करून पोट वाढविले. मग जातीत गवगवा झाला तेंव्हा तिचे पोट पाडावे म्हणून औषध घेतले. ते विकोपास जाऊन ती मरण पावली. तिला रातोरात दहन केली.[१०]

ह्या दक्षिण महाराष्ट्र देशात जाहागीरदार व ब्राह्मण व मराठे आहेत. त्यामुळे त्यांच्या अंमलातील गावात विधवा स्त्रियांवर हिंदुधर्माधिकाऱ्यांचा फारच जुलूम होतो. शंकराचार्य स्वामी जबरीने सकेशा विधवांचे वपन करवितात. तेव्हा ज्या शास्त्रात असा क्रूरपणा

करावयास सांगितले आहे. त्या शास्त्रकर्त्यास व स्वामीस आणि त्याच्या शिष्यांस शापांची व शिव्यांची लाखोली वाहतात. अशा जुलुमामुळे कित्येक स्त्रिया आपले घरदार सोडून ह्या इंग्लिश सरकारच्या अंमलात येऊन हे बेलाशक केश वाढवून कसबिणी बनून राहिल्या आहेत. अशा ह्या शहरात सुमारे पन्नास आहेत. त्या बहुतेक ब्राह्मणांच्या आहेत. त्यातून कित्येकांची नावे लिहितो...[११]

पुढे काही काळाने असे झाले की, एके दिवशी कोणी सरकारी कामगार सकाळच्या प्रहरी घोडयावरून फिरत जात असता त्याने पंताच्या परसदाराच्या रस्त्याचे बाजूवर कळकीच्या बेटात कांही लोंबत आहे व त्याजवर कावळे झडप घालीत आहेत असे पाहिले. तेव्हा त्यांस संशय येऊन त्याने ते काढवून पाहिले तो, तो एक सुंदर बाळाचा पाच महिन्याचा गर्भ आहे असे समजले. मग कोतवालास ते वर्तमान समजताच त्याने त्याविषयी चौकशी चालविली. . .शेवटी तिला गर्भपाताचे औषध कोणी दिले हे मात्र साक्षीपुराव्यानिशी कोणावरच लागू झाले नाही, म्हणून बयास सरकारने धारवाडच्या तुरुंगात कैद ठरविली. ती कैद भोगल्यावर तेथून निघून पुण्यास गेली. तेथे तिला एका पारशाने आपणापाशी ठेवून घेतली आहे. . . ह्या दुष्कर्मामुळे बयाच्या बापास म्हातारपणी फार लज्जा व दुःख प्राप्त झाले तो ते गाव सोडून दुसऱ्या ठिकाणी गेला.[१२]

बाबा पदमनजींनी इ. स. १८७५ च्या आसपास अहमदनगर जिल्ह्यात जो दौरा केला त्यावेळी अहमदनगर जिल्ह्याच्या खेडेगावची स्थिती त्यांनी साक्षात उभी केली आहे. आजच्या खेडयाचे ही फारसे निराळे चित्र आहे असे नाही पण बाबा पदमनजींनी रेखाटलेल्या चित्रावरून तत्कालीन खेडयाचे चित्र आपल्या डोळयांसमोर उभे राहते. ते म्हणतात.

खेडेगावची स्थिती देशावर राहणारास व प्रवास करणारास माहीत आहेच. दक्षिणेतील हवा पाणी व जमीन उत्तम प्रकारची असून रयत फार गरीब आहे. खेडे म्हटले म्हणजे दरिद्र, मलीनता, अव्यवस्था, अज्ञान यांचे स्थानच असते. तेथील घरे ओळीने बांधलेली नसतात. तेथे रस्ते नीट नाहीत. उकिरडयाच्या राशी गावच्या आत व बाहेर पडलेल्या असतात, गाव कुसू पडलेले, वाडयाच्या भिंतीस मोठमोठाली खिंडारे, वेस मोडकी, झोपडी पडकी, अशी सुंदर रचना दृष्टीस पडती. गावातून फिरले असता मनुष्य दृष्टीस पडावयाचे नाही. कुत्रे मात्र अंगावर भोकत यायचे. डुकरे डराव डरीत पळत सुटायची. मोऱ्यांची घाण नाकात शिरावयाची. बाजारात एखाद दुसरे वाण्याचे दुकान उघडे असायचे अशी दक्षिणेतील खेडयांची साधारण अवस्था आहे.[१३]

प्रस्तुत हकीगत बाबांनी आपल्या *सत्यदिपीके*त वाचकांसाठी मुद्दाम प्रसिद्ध केली होती. चक्षुर्वैसत्यं माहिती असल्याने त्या निबंधात बाबांची तळमळ, दलितांचा जिव्हाळा व वास्तवता इ. प्रकट झाली आहेत. प्रत्यक्ष खेडेगावचे करुण चित्र आपल्यासमोर उभे राहते. दैन्य, दुःख, दरिद्रय यांच्याबद्दलच्या कळवळयाने बाबा अधूनमधून इंग्रजानांही धारेवर धरतात. नमुना म्हणून त्याच निबंधाचा पुढील भाग बघण्यासारखा आहे. ते लिहितात,

इंग्रज सरकारचे राज्य इतकी वर्षे ह्या देशात असून खेडयाची मोडकळा जाऊन त्याला

तेज असल्याचे क्वचित दृष्टीस पडते. ही मोठी दुःखाची गोष्ट. कित्येक ठिकाणी सरकारने शाळा घातल्या आहेत खऱ्या, परंतु त्यात अभ्यास करणारी कुणब्यांची मुले फार थोडी असतात. ब्राह्मण व वाणी यांचा भरणा फार असतो. पंतोजीही ब्राह्मण तेव्हा तो शूद्र व अतिशूद्र यांची कशास काळजी बाळगतो! खेड्यातील महार व मांग यांच्या वाड्यात जाऊन पाहिले तर जणू काय मनुष्यरूपाने पशूंची वस्तीच तेथे आहे असा भास होतो व ही कोणी मळीण, ओंगळ, भयंकर जनावरे आहेत असे समजूनच जणू काय गावाने त्यांस आपल्या हद्दीच्या बाहेर रहावयास जागा दिली आहे असे भासते. एका गांवच्या मांग-वाड्यात आम्ही गेलो असता तेथे पाच विहिरी होत्या. मग त्या कोणी खणल्या असतील त्या असोत, त्या जागेत, तरी तेथील मुले डुकराप्रमाणे मळीण दृष्टीस पडली, केरकचरा व घाण यांची तर बरकत होती. कित्येक ठिकाणी महार लोकांत दरिद्र अठराविश्वे आहे. एकएकाला दोन बायका असे नवरे पुष्कळ आहेत. कित्येकांस लेकरे पुष्कळ असून रोज उपासमार होत असते. बायका एका वस्त्रावर एक वर्ष लोटतात. त्यांत एक दिवस काम मिळाले तर आठ दिवस रिकामे बसावे लागते. कुणब्यांमध्ये एकी नाही. एकमेकांचा हेवा व द्वेष आहे. बहुतेकांची शेते सावकारापाशी गहाण. त्यांच्या श्रमाचे फळ त्यांच्या पदरात पडत नाही. पोलिसांचा बराच जुलूम लोकांवर आहे. सरकारी अंमलदारांच्या स्वाऱ्या देशात फिरावयास निघाल्या म्हणजे गावकरी लोकांचा माल बराच लुटला जातो. पाटील वा कुलकर्णी हे दोघे बुभुक्षित कोल्हा व लांडगा याप्रमाणे गावात टपूनच बसले आहेत.[१४]

*ज्ञान प्रसारक मासिका*च्या १८६३ च्या एप्रिल महिन्याच्या अंकात जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचलेला एक निबंध प्रसिद्ध झाला. निबंधलेखन डोळ्यांपुढे ठेवून जीस इंग्रजीत style म्हणतात ती लिहिण्याची शैली अभिप्रेत असून त्या शैलीच्या उदाहरणात समकालीन मराठी वाङ्मयाविषयी प्रस्तुत संदर्भात लिहिताना दादोबा पांडुरंगांच्या व्याकरणाच्या प्रस्तावनेतून व मराठी कोलंबस (कोलंबसाचा वृत्तांत), थोरले माधवराव पेशवे, बाळमित्र (छत्रे) प्रस्तावना, *यमुनापर्यटन* (कादंबरी) बाबा पदमनजी इ. यांतून उदाहरणांदाखल उतारे घेतले आहेत. बाबांच्या कादंबरीतील उतारा शैलीसाठी उदाहरण म्हणून घेण्याचा मोह गाडगीळांना त्या काळी झाला यातच बाबा पदमनजींचा लेखनविशेष स्पष्ट होतो.

बाबा कित्येक वेळा परिणाम साधण्यासाठी नाट्यपूर्ण संवादाचा अवलंब करतात. उदाहरणार्थ आत्मारामपंत व मृत्यूशिपाई यांचा संवाद या पुस्तकात आत्मारामपंत व मृत्यू यांची गाठभेट झाली व ते पुढे प्रमाणे बोलू लागले असे वर्णन आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

आत्मारामपंत : शिपाई दादा, मी तुझ्या पाया पडतो. तू मला छळू नकोस. मर्जी असेल तर आपले नाव सांग.

मृ. शिपाई : अरे मी मृत्यू आहे. मला कोणी काळही म्हणतात.

आत्मारामपंत : तू येथे का आलास?

मृ. शिपाई : तुला नेण्याकरितां.
आत्मारामपंत : नको रे दादा, नको. तेवढे मात्र करु नकोस.
मृ. शिपाई : कां नको? तू आपल्या जीवाचा धनी आहेस की काय?
आत्मारामपंत : माझे घरदार, दौलत, व्यापार, मुलेंलेकरें, बायको यांस सोडून मी कसा येऊ? त्यांची माझी भेट पुढे कोठें होईल? अरे देवा, हें काय केलेस? आतांच मला मरणाच्या तोंडी कां देतोस? इतकें लवकर मरावे लागेल हे मला ठाऊक नव्हते.[१५]

अनलंकृततेसाठी त्यांची शैली प्रसिद्ध असली तरी अधूनमधून त्यांनाही अलंकृत लिहिण्याची लहर येते आणि ते सहजपणे अलंकाराच्या भाषेतून बोलून जातात. 'मृत्तिकेच्या पात्रात हा त्याच्या कृपाधनाचा संग्रह आहे असे जाणावे.' असे बाबा आपल्या *अनुभवसंग्रहा*बाबत म्हणतात तर मेजर कँडीच्या इंग्रजी-मराठी कोशाबाबत *सत्यदीपिके*त ते लिहितात,

> या ग्रंथाच्या योग्यतेविषयी आम्ही काही लिहावे तर क्षीरब्धीस तक्राचा नैवेद्य दाखविल्या-प्रमाणे होईल. हा एक शब्दार्णव आहे.[१६]

मनोरंजन करता करता उद्‌बोधन करण्याची त्यांची शैली म्हणून *स्त्रीविद्याभ्यास निबंध* हा ग्रंथच त्यांनी संवादात्मक पद्धतीने रचला. बाबा साध्या सोप्या भाषेकरिता विख्यात असले तरी मधून मधून पल्लेदार वाक्यरचना व आलंकृत रचना ते करताना दिसतात. उदाहरण म्हणून उपरोक्त *स्त्रीविद्याभ्यास निबंध* या ग्रंथातील पुढील उतारा देता येईल.

> शरीररूप पलंगावर आळसाचा बिछाना पसरून, बुद्धी उशास घेऊन वर अभिमानाची पासोडी घेतली, आणि त्याजवर अविचाराचे पडदे पाडून आज दोन अडीच हजार वर्षे खुशाल गाढ निद्रेत घोरत होतेत, तशात तुमच्या बायकांनी अज्ञानाचे पंखे घेऊन मूर्ख समजुतीचा तुम्हांवर वारा घातला, तेणेंकरून तर अधिकच गाढ झोप लागली, परंतु आता ईश्वरकृपेने विद्याभेरीचा नाद तुमच्या कानी पडून तुम्ही जागे झाला आहांत. तर पुनः त्या दुष्ट निद्रेची आवड न धरतां पुर्ते सावध होऊन आपल्या भोवतां काय होत आहे, आपण कोणत्या स्थितींत आहों हा विचार करून आपली सुधारणुक करून घ्या.[१७]

याचप्रमाणे *ख्रिस्ती लोकांचे कर्तव्यसार* या ग्रंथातील बाबांच्या अलंकृत भाषेचा हा नमुना पहा:

> प्रारंभापासून शेवटपर्यंत या पुस्तकाचा पाया ख्रिस्ती शास्त्रावर रचला आहे. याच्या इमार-तीचे दगड ख्रिस्ती शास्त्रातील वाक्यरूप मसालेदार चुन्याचे गच्च बसविले आहे. ह्याच्या खिडक्या व दारे यांसही ईश्वरीशास्त्रातील मतांचे अडसर व कडी कोयंडे बसवले आहेत, आणि या अशा शुद्ध व सुखदायक घरात सर्वांनी येऊन राहावे, म्हणजे यातील कर्तव्यकर्मे सर्वांनी आपल्या मनापासून करावी अशी माझी इच्छा आहे.[१८]

बाबांच्या लेखनशक्तीचे हे विशेष लक्षात घेऊनच म. स. दत्तो वामन पोतदार यांनी, बाबांच्या समकालीन गोविंद नारायण माडगांवकरांसारख्या अव्वल इंग्रजीतील लेखकांच्या तुलनेने बाबांची भाषा 'अधिक नीटस व गोड आहे' असे म्हटले आहे.[१९]

वृत्तपत्रीय लेखनात ख्रिस्ती धर्माचे मंडन करण्याच्या भरात आणि ख्रिस्ती धर्मातील कॅथॉलिक पंथीयांच्या मूर्तिपूजेवर टीका करताना बाबा कठोर व असहिष्णू होतात. *ज्ञानोदय* पत्रात ख्रिस्तदास, लक्ष, B.P. (बाबा पदमनजी) व खुद्द *ज्ञानोदय*कार यांनी आपल्या लेखणीने ख्रिस्तीतर लोकांइतकेच बाईंना सळो का पळो करून सोडले होते.[२०] पंडिता रमाबाई ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेऊन आल्यानंतर त्यांनी ख्रिस्ती धर्माच्या बाबतीत वर्तनात काही चूक केली. त्यामुळे बाबा पदमनजींनी आपल्या धारदार लेखणीने त्यांच्यावर हल्ला चढविला. बाबा पदमनजी ह्यांना 'ख्रिस्ती धर्माचे विष्णुशास्त्री चिपळूणकर' म्हणतात त्याचे कारण हेच की, विष्णुशास्त्र्यांनी मराठी भाषेविषयी मराठी भाषिकांत जो स्वाभिमान निर्माण केला, विचारधन, अलंकृत रचना व मराठी बाणा इ. गोष्टी चिपळूणकरांनी प्रथम आपल्या भाषेत मांडल्या, तीच गोष्ट बाबा पदमनजींनी ख्रिस्ती लोकांच्यासाठी केली. ख्रिस्ती धर्माविषयीचा प्रचंड स्वाभिमान त्यांनी प्रथम मराठीतून मांडला व विपुल रचना मराठीत केली. बाबांनी सुमारे १०० पुस्तके मराठीत रचली, त्यांपैकी कित्येकांच्या प्रस्तावनांतून व प्रारंभी, बा. प., बाबा पदमनजी असा उल्लेख आढळतो. विष्णुबुवा ब्रह्मचारी व रमाबाई यांच्यावर त्यांच्या लेखणीने कडाडून हल्ला केला हे आपण पत्रव्यवहार प्रकरणात पाहिले आहेच. बाबांची ही पत्रे परिशिष्टात दिली आहेत. उपहास उपरोध, स्पष्टवक्तेपणा, परखडपणा इत्यादी त्यांच्या लेखनाची वैशिष्टचे अशा प्रकारे दिसून येतात. बाबा पदमनजींच्या तिखट, बोचऱ्या लेखनाचा हा परिचय पाहा:

> *ज्ञानोदया*चे कर्ते यांस—वि. वि. पंडिता रमाबाईंची धर्ममते नारूच्या तंतूप्रमाणे शनैः शनैः बाहेर पडत आहेत. ह्या बाई विलायतेत ख्रिस्ती झाल्यापासून तर आज दिनापर्यंत त्यांच्या धर्ममताविषयी अनेक चर्चा वर्तमानपत्रांतून झाल्या, लोकात नाना प्रकारची कुणकुण चालली. व बाजार गप्पा उठल्या. परंतु त्यांनी स्वतः होऊन येथील ख्रिस्ती पत्रांस काही लिहून पाठवले नाही, अथवा आपल्या ख्रिस्ती मित्रांस काही खासगत रितीने काही कळविले नाही. किंवा येथे त्यांचे आगमन झाल्यावरही एखादी ख्रिस्ती लोकांची सभा मिळवून खुलासेवार काही मजकूर त्यास निवेदन केला नाही. ह्या बाईंची पहिल्यापासून सर्व ओढ एकेश्वरी मतांच्या लोकांकडे आहे. त्यांच्या मध्ये त्यांचे 'प्रिय बंधू' व 'प्रिय भगिनी' आहेत. आम्हा नेटिव्ह प्राटस्टंट ख्रिस्ती लोकांमध्ये त्यास क्वचित आप्त असतील.[२१]

पंडिता रमाबाईंची धर्ममते यां सदराखाली बाबा पतमनजींनी या वर्षी धारदार भाषेतील अनेक पत्रे प्रसिद्ध केली. त्यापैकी एकाची सुरुवात नमुन्यादाखल वर घेतली आहे. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्यावर बाबा पदमनजींनी पुढीलप्रमाणे वार केले आहेत. लेखणीपेक्षा तरवारीचे वार बरे असेच यावरून म्हणता येईल.

> याप्रमाणे हे बाबा कढत व गार अशा विपरीत गुणेकरून युक्त आहेत. अशांवर कोणी विश्वास ठेवावा? याचा एक तरी गुण घेण्या जोगा आहे काय? यांस ढोंग्यापेक्षा दुसरे नामाभिधान देववत नाही. ज्या मनुष्याची धर्म व नीतिसंबंधी मते दृढ नाहीत त्याचा विश्वास धरणे हे मोठे जोखमीचे काम आहे. अशा पुरुषांपेक्षा दगड धोंडयांचा पाया पडणारा भाविक हिंदु बरा. परंतु अशाचा सहवास नसावा. एका वृद्ध हिंदूने मला असे

सांगितले की या बाबाच्या व्याख्यानापासून नास्तिक मताचा मात्र फैलाव होईल, आणि ह्या बोलण्याचे खरेपण दिवसेंदिवस दृष्टोत्पतीस येत आहे.[२२]

बाबांच्या उत्तरकालीन लेखनात ख्रिस्ती धर्माबद्दलचा अभिनिवेश वाढीला लागला. परंतु सुरुवातीच्या त्यांच्या निबंधलेखनात हा अभिनिवेश नव्हता. त्यांच्या संवादात्मक निबंधात एतद्देशियांवर शिवराळ टिका व ख्रिस्ती धर्माची अनावर प्रशंसा असा प्रकार नाही.

> लोकहितवादींचा कठोरपणा नसला तरी त्यांची विवेकनिष्ठा मात्र बाबांमध्ये आहे. . . बाबांची भूमिका प्रचारकाची असली तरी ते सहसा खंडनाच्या मंडनाच्या भरीस पडत नाहीत. जिथे अशा भरीस पडतात तेथे मात्र वादाची पातळी ढळू धिली नाही. त्यांच्या ग्रंथांत एक स्वाभाविक ओघ व गोडवा आला आहे. त्यातून वस्तुस्थितीचे बाबांनी केलेले दिग्दर्शन पाहिले म्हणजे त्यांच्या लेखनकुशलतेची साक्ष पटते. प्रस्तुत निबंधात अभिनव किंवा मौलिक विचारसरणीही नाही परंतु जे साधेच विचार मांडले आहेत त्यांना लेखकाच्या समंजस व विवेकी भूमिकेचे वजन प्राप्त झाले आहे. . .बाबा पदमनजी यांनी धार्मिक, कौटुंबिक व सामाजिक विषयांवर निबंधलेखन केले. लोकहितवादींप्रमाणे बाबांच्या लेखनातही भावनीक तळमळ व वैचारिक तपशील यांचे दर्शन घडते. परंतु बाबांच्या लेखनात लोकहितवादींच्या लेखनातील वैगुण्य आढळत नाहीत. खरे म्हटले तर त्यांची भूमिका प्रचारकांची. त्यांच्या लेखनात अशी वैगुण्ये आढळली असती तर त्यात आश्चर्य नव्हते. परंतु बाबांचे व्यक्तीत्व समतोल असल्याने त्यांच्या लेखनांत बुद्धी व भावना यांचा यथोचित मिलाफ आढळतो. लोकहितवादींच्या तुलनेने त्यांची शैलीही आकर्षक आहे. किंबहुना, 'भाषेची प्रौढी', पदरचनेची शैली, अन्वयाची एकता, विचारांचे गांभीर्य व शब्दालंकार यांची कलात्मक जाणीव बाबांशिवाय अन्य अव्वल इंग्रजीतील निबंधकारांत अपवादानेच आढळावी.

अशी एका आधुनिक वाङमयाच्या समीक्षकानेही ग्वाही दिली आहे.[२३]

प्रौढ, अन्वययुक्त व सुबोध मराठी लिहिणारे बाबा अधूनमधून बायबली वळणाने लिहितात, त्यावेळी ते खटकल्याशिवाय रहात नाही. उदा. *श्रीकंठभूषण* या बाबा पदमनजींच्या पुस्तकातील एक उतारा देऊन श्री. कृ. भी. कुलकर्णी यांनी बाबा पदमनजींच्या भाषेवर व विचारांवर विचित्रपणाचा शिक्का मारला आहे. 'नवरा कसा करावा' या धड्यातील तो उतारा असा :

> ख्रिस्ती लोकांनी लग्न करताना जो नेम पाळायचा तो हाच आहे कीं त्यांनीं आपली लग्नें प्रभूकडल्यासीं करावीं. यांत केवळ मूर्तिपूजकांशी लग्न करू नये इतकाच निषेध आहे असें नाहीं, तर जे भक्तिवान ख्रिस्ती आहेत त्यास नांवाच्या ख्रिस्त्यांशी (ते जरी चांगल्या चालीने चालणारे असले तरी) शरीरसंबंध जोडण्याची मनाई आहे.[२४]

जातिभेद, लोकभ्रम, अस्पृश्यता या विषयासंबंधी लिहितांना, बाबा पदमनजींनी लेखनशैली उपरोध व उपहास यांनी विनटलेली दिसून येते. सुधारणेचा पुरस्कार करताना ब्राह्मणांवर काहीशा छद्मीपणाने त्यांनी प्रहार केले आहेत. ब्राह्मणांवर ताशेरे ओढणारी ही बाबांची

लेखणी पुढीलप्रमाणे आपले अस्तित्व प्रकट करीत आहे :

पुण्यात युगधर्माचा अमंल पुरता बसत चालला आहे. असे दिवसानदिवस ज्या गोष्टी तेथे घडतात त्यांजवरून स्पष्ट दिसत आहे. पुण्यातील ब्राह्मणांनी महारामांगाच्या शाळा चालविल्या, पुण्यातील ब्राह्मणांनी शिंप्याचा धंदा चालविला, तासे, बाजंत्र्याशिवाय लग्नकार्ये केली. आता त्यांच्यामध्ये हजाम झाले आहेत. याच्यापुढे हजाम हेच आडनाव पडेल किंवा कसे हे समजत नाही. परंतु एका पैशाकरिता त्यांनी ही नास्तिकवृत्ती पत्करली हे मोठे आश्चर्य वाटते. आम्ही असे ऐकतो की, कोणी केसकर नामक शास्त्री पटाईत हजाम बनले आहेत. हे कसेही असो, परंतु ब्राह्मणास मनूने अडल्या वेळी कोणतीही वृत्ती चालविण्याची जी मोकळीक दिली आहे तिचा हे द्विज पूर्ण उपयोग करीत आहेत. असेच यांचे एक एक पाऊल पुढे पडत जाईल तर बरे होईल. आज त्यांनी शूद्र न्हाव्याच्या हाती आपले डोके भादरावयास देण्याचे बंद केले. तर उद्या आपल्या विधवा स्त्रियांचे शीर मुळीच मुंडण्याचे बंद केले असता किती बरे होईल? पुढे यांनी बाल विवाह बंद करावा आणि मारुती सारिखे उड्डाण मारून विधवाविवाहरूप पर्वताच्या शिखरावर चढावे मग खरोखर पुणेकर ब्राह्मण जगाच्या स्तुतीस पात्र होतील. परंतु जर हजामतीचा एक पैसा वाचविण्यापुरतेच मात्र त्यांनी हे पाऊल पुढे टाकले असते तर त्यांत कांही विशेष नाही. आपले नाक कापून दुसऱ्यास अपशकुन केल्यासारिखे मात्र ते निन्द्य आहे.[२५]

आपला युक्तिवाद बिनतोड मांडण्यासाठी बाबा स्वकालिन सत्यघटना मांडतात व म्हणींच्या आधारे त्याचे समर्थन करताना दिसतात. पुनर्विवाहाच्या प्रश्नासंबंधी पोटतिडिकेने लिहिताना त्यांच्या शैलीला कशी उत्कटता येते हे *यमुनापर्यटन*च्या प्रस्तावनेत दिसेल. ते म्हणतात,

ही प्रस्तावना समाप्तीस नेण्यापूर्वी आणखी एका गोष्टीचा वाचणाऱ्यांच्या समजुतीकरितां थोडासा विचार केला पाहिजे. या पुस्तकांत विनायकराव व यमुनाबाई यांचें धर्मसंबंधी मत कित्येकास आवडेल व कित्येकास आवडणार नाहीं, आणि कोणी तर असें म्हणतील कीं, पुर्नविवाहाच्या विषयाशीं त्याचा संबंधच नाही, हें बोलणें जर स्त्रियांस, चिनी लोकांच्या मताप्रमाणे अमर आत्मा नसता तर मात्र मोठ्या उपयोगास पडते. अथवा या देशातील जनावरांची दुःखें निवारण्याचा उपाय कोणी करील आणि त्यासाठीं पुस्तक रचील तेव्हां घोर्पडयांची संजाब घोडी किंवा रामजी पाटलाचा सोम्या बैल आणि गोदावरीबाईची काशी गाई व मल्हारी धनगराची भवानीबकरी व कृष्णा गवळ्याची महाला म्हैस, पुतळाबाईची मैनी मांजर, तमाशेवाल्याची रत्नी पोरी व बहादूर माकड, यांची धर्मसंबंधी मतें काय आहेत, यांचा विचार करण्याची गरज नाही असें म्हटले असता चालेल परंतु स्त्रियांस जर आत्मा आहे तर त्यांचे सुख कसे वाढावे व त्याची पुढे अवस्था काय होणार हा विचार केलाच पाहिजे.[२६]

प्रस्तुत उतारा बाबा पदमनजींच्या भाषाशैलीचा एक चांगला नमुना म्हणून पुढे ठेवण्याच्या योग्यतेचा आहे. यात त्यांचे पदलालित्य दिसून येते.

आपल्या काळापूर्वी ५० वर्षे मरण पावलेला एखादा माणूस परत आला व देशाची सुधारणुक

अवलोकन करू लागला तर त्यास कसे चित्र दिसेल याचे वर्णन करीत असताना बाबा वरील प्रस्तावनेतच लिहितात,

तिचे मुख गौरवर्ण, हात सुंदर, पाय काळे व त्यावर कोड उठलेले. तिचे वस्त्र निरनिराळे पट एकत्र शिवून केलेलें. त्यांतील कित्येक पट मोठ्या मोलवान भरजरी साडीचे आहेत. आणि कित्येक ठिकाणीं त्यांवर मळकट चिंध्यांचीं ठिगळें लावली आहेत. कित्येक पट फार जुन्या व जर्जर झालेल्या वस्त्राचे आहेत आणि त्याची किनारी कोठें साध्या व कोठें जर भरलेल्या रेशमाची आहे. तिचे अलंकार पाहिले तर त्यातून कित्येक जडावाचे डागिणे आहेत. तिच्या गळ्यात एक मोत्याचा हार आहे, आणि त्यांतच मधून मधून फुटलेल्या कवड्या ओवल्या आहेत. तिच्या हातांत सोन्याचीं कांकणें व कथलाचे वाळे, पायांत रुप्याचीं पैंजणें व लोखंडाची बेडी, तेणेकरून तिचे पाऊल पुढे पडत नाहीं. केवळ तिचें तोंड मात्र सुंदर असून पुष्कळ चांगल्या गोष्टी ती बोलते. ती आपल्या आहारार्थ चांगले नाना प्रकारे ताजे व गोड पदार्थ बाजारांतून विकत घेते पण ते सर्व पोटभर खाण्यापूर्वी त्यास बहुत दिवस शिळे व आंबट आणि कुजट करून नंतर खाते, आणि कित्येक मोलवान पदार्थ तर तसेच तिच्या घरांत पडलेले असतात. कधीं कधीं अन्नसामोग्री असतांनाही ती उपास करून आपणांस नाना प्रकारचे रोग लावून घेती.[२७]

बाबा पदमनजींची वर्णनशक्ती किती प्रत्ययकारी व चित्रनिर्माणक्षम होती याचा सबळ पुरावा म्हणजे उपरोक्त उतारा होय. आपल्या देशातील सुधारणुकीचे हे चित्र एखाद्यास अतिशयोक्तिपूर्ण वाटेल पण ते तसे नसून खरोखरच ते इतके विलक्षण रूप व गुणांनी युक्त आहे असे ते म्हणतात. 'सुधारणुक बाई'ही एक स्त्री कल्पून तिचे वर्णन शब्दांनी साकारण्यात बाबांचे लालित्य दिसून येते.

सारांश, बाबा पदमनजींच्या लेखनात भावनिक तळमळ व वैचारिक तपशील आढळून येतो. बाबांची भूमिका वाङमयनिर्मितीत प्रचारकाची असूनही त्यात पाल्हाळ, पुनरावृत्ती, रुक्षपणा, इ. वैगुण्ये आढळत नाहीत. बाबांचे व्यक्तित्व समतोल असल्याने त्यांच्या लेखनात बुद्धी व भावना यांचा यथोचित मिलाफ आढळतो. त्यांची शैली आकर्षक आहे. भाषेची प्रौढी, पद-रचनेची शैली, अन्वयाची एकता, विचारांचे गांभीर्य, शब्दालंकाराची कलात्मक जाणीव, सूचकता, रंजनपरता, बोधन करण्याची सुप्त पात्रता, कमालीची परिणामकता पण त्याच-बरोबर साधेपणा, सोपेपणा, गोडी व बायबली वळण इत्यादी बाबांच्या लेखनशैलीचे विशेष म्हणून सांगता येतील. तात्पर्य बाबांनी आपली एक खास लेखनशैली निर्माण केली होती यात शंकाच नाही.

* * *

## टीपा

१. ग. त्र्यं. माडखोलकर, *विष्णु कृष्ण चिपळूणकर : काल आणि कर्तृत्व*, चतुर्थ संस्करण, अमरावती, १९५४, पृ. १०९.
२. गं. भा. सरदार, (आकाशवाणीवरील भाषण) 'बाबा पदमनजी' स. १९५५, पृ. ६.
३. म. बा. धोंड, (आकाशवाणीवरील भाषण) 'बाबा पदमनजी', जून १९७३.
४. *अरुणोदय*, ति. आ., पु. मु., मुंबई, १९६३, पुरवणी पृष्ठ २४८.
५. द. वा. पोतदार, *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार*, आ. २ री, पुणे, १९५७, पृ. १०१.
६. 'प्रस्तावना' *अनुभवसंग्रह–भाग १*, मुंबई, १८९५, पृ. ३, ४.
७. *कृष्ण आणि ख्रिस्त यांची तुलना*, ५ वी. आ., मुंबई, १९१६, पृ. ४७.
८. *येशू ख्रिस्ताचे चरित्र*, २ री आवृत्ती, मुंबई, १८९५, पृ. २९.
९. *यमुनापर्यटन*, आ. ३, मुंबई, १८९०, पृ. ९५.
१०. तत्रैव, पृ. ९४.
११. तत्रैव, पृ. ९३.
१२. तत्रैव, पृ. ९१, ९२.
१३. *सत्यादिपिका*, पु. ४–अंक २, पृ. २२, २३.
१४. *सत्यादिपिका*, पृ. २२, २३.
१५. *आत्मारामपंत व मृत्युशिपाई यांचा संवाद*, मुंबई, १८६६, पृ. ७.
१६. *सत्यदीपिका*, सप्टेंबर १८६३, पृ. २३.
१७. *स्त्रीविद्याभ्यास निबंध*, मुंबई, १८५२, पृ. ४७.
१८. *ख्रिस्ती लोकांचे कर्तव्यसार*, आ. २, मुंबई, १८७९, पृ. ९.
१९. *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार*, उनि. पृ. १०१.
२०. देवदत्त नारायण टिळक, *महाराष्ट्राची तेजस्विनी पंडिता रमाबाई*, नासिक, १९६०, पृ. १७४.
२१. *ज्ञानोदय*, २८ मार्च १८८९, पृ. १०२.
२२. तत्रैव, ८ मार्च १८८८, पृ. ७५, ७६.
२३. द. भि. कुलकर्णी, *मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड ४*, संपा., रा. श्री. जोग, पुणे, १९६५, पृ. ४३६–३९.
२४. कृ. भि. कुलकर्णी, *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति*, मुंबई, १९५६, पृ. ३३३.
२५. *सत्यदीपिका*, सं. बाबा पदमनजी, ७ सप्टें. १८७५, पृ. ११०.
२६. *यमुनापर्यटन*, मुंबई, १८५७, पृ. ११.
२७. *यमुनापर्यटन*, मुंबई, १८५७, प्रस्तावना, पृ. ७–८.

१५

# समारोप

नव्या युगाच्या नव्या जाणीवांनी लेखन करणाऱ्या थोर साहित्यिकांमध्ये बाबा पदमनजींची गणना करावी लागते. 'एकोणिसाव्या शतकातील उपेक्षित मानकऱ्यांपैकी एक' अशी त्यांची योग्यता असल्याचे आढळून येते. सतत पन्नास वर्षे मातृभाषेची सेवा करून त्यांनी विविध विषयांवर विविध ग्रंथरचना केली. त्यात निबंध, कादंबरी, चरित्र, आत्मचरित्र असे विविध वाङमयप्रकारही आढळतात. त्यांच्या या ग्रंथनिर्मितीमुळे गेल्या शतकातील मध्यकाळातील मराठी गद्य-वाङमयाच्या विकासास निश्चितपणाने मदत झालेली आहे.

बाबांचा काळ महाराष्ट्रातील सामाजिक संक्रमणाचा काळ होता. इंग्रजी शिक्षणाला नुकताच प्रारंभ झालेला होता. ख्रिस्ती मिशनऱ्यांचा धर्मप्रचार धुमधडाक्याने तेव्हा चालू होता. इंग्रजांची विद्या, कर्तृत्व, सामर्थ्य आणि प्रगती पाहून आमच्या लोकांचे डोळे दिपून गेले होते. महाराष्ट्रातील नव शिक्षितात न्यूनगंडाची भावना निर्माण होऊन इंग्रजांच्या अंधानुकरणाची प्रवृत्ती पोसली गेली. जुन्या नव्याची सांधेजोड करताना ते खूप गोंधळले. अशा मनाच्या गोंधळलेल्या मनःस्थितीतच बाबांनी आत्मोध्दारासाठी धर्मांतराचा निर्णय घेतला. साधारणपणे इ. स. १८५२ ते इ. स. १९०६ पर्यंत त्यांनी अव्याहत लेखन केले. निबंध, कादंबरी, आत्मचरित्र, चरित्र इत्यादी वाङमयप्रकारात तर त्यांचे अग्रेसरत्व आहे. त्यांची संपादकीय कारकीर्द समृद्ध आहे. शिक्षणविषयक पुस्तक रचना हे त्यांचे खास वैशिष्टय. काळाच्या गरजेतून त्यांनी कोश सिद्ध केले. आधुनिक मराठी ख्रिस्ती वाङमयाचे तर बाबा जनकच ठरतात.

बाबांच्या ग्रंथाची संख्या शंभराहून अधिक आहे हे खरे आहे पण त्यातील बरीचशी पुस्तके ख्रिस्ती धर्मप्रचारासाठी लिहिलेली आहेत हेही खरेच आहे. मात्र त्यांची पाच-पंचवीस पुस्तके तरी खचित अशी आहेत की जी सर्व मराठी वाचकांस वाचनीय व विचारप्रवर्तक वाटल्या-खेरीज राहणार नाहीत.

बाबांच्या लिखाणाचे तीन कालखंड पडतात. पहिला मुंबईच्या फ्री चर्च मिशनच्या शाळेत जाईपर्यंतचा, म्हणजेच इ. स. १८४९ पर्यंतचा. या काळात जादूटोणा, नवस-शकुन वगैरेंवर बाबांचा पराकाष्ठेचा विश्वास होता. त्या खुळचट कल्पनास साजेल असे एक पुस्तक त्यांनी या काळात प्रसिद्ध केले; ते म्हणजे *नेपोलियनची शकुनवंती*. 'ते एका इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर होते आणि आपला तो अज्ञानांधकारातील उद्योग होता' असे बाबा त्याचे वर्णन करतात. याच काळात वर्गमित्रांच्या सुधारणुकीप्रीत्यर्थ त्यांनी *बोधनिबंध* या नावाचे पुस्तक रचिले होते. वयाच्या अठराव्या वर्षापर्यंत ही दोन्ही पुस्तके त्यांच्या नावावर होती. याशिवाय फुटकळ निबंध, वर्तमानपत्रात पत्रे इ. लेखन चालूच होते.

दुसरा कालखंड इ. स. १८५० ते इ. स. १८५४ पर्यंतचा म्हणजे फ्री चर्च मिशनच्या शाळेत प्रवेश केल्यापासून तो ख्रिस्ती धर्म स्वीकारीपर्यंतचा. या कालखंडात त्यांच्या मनावर ख्रिश्चन धर्मातील नीती व विचार, आचार यांचा वाढता प्रभाव पडू लागला होता. त्यांच्या आधारे आपल्या देशबांधवांस सुधारणेचे धडे देण्याकरिता त्यांनी *स्त्रिविद्याभ्यास निबंध*, *हिंदुलोकांचे सणांविषयी निबंध*, *व्यभिचारानिषेधक बोध*, *कुटुंब सुधारणा*, व *सर्वसंग्रही* ऊर्फ *निबंधमाला* ही पांच निबंधस्वरूपाची पुस्तके लिहिली. या काळात त्यांच्या मनात ही तीव्र भावना होती की ज्या देशात ईश्वराने आपणास जन्मास घातले तेथील लोकांची दुःखे जाणून ती दूर होण्याचे स्वसामर्थ्याप्रमाणे उपाय करणे हा धर्मच होय. याच धर्मापोटी बाबांनी उपरोक्त पाच पुस्तके लिहिली. व्यक्ती, कुटुंब व समाज-सुधारक बाबांचे तळमळणारे अंतःकरण या पुस्तकातून ठायी ठायी व्यस्त होते. या पाचही पुस्तकांना तत्कालीन; 'दक्षिणा प्राईज कमिटी' वा 'पुस्तके व निबंध करणारी मंडळी' यांकडून बक्षिसें मिळालेली आहेत. यावरूनच त्यांचे तत्कालीन मूल्य व उपयोगिता इत्यादी दिसून येतात. *स्त्रिविद्याभ्यास निबंधाचे* तर *ज्ञानप्रकाश*कर्ते यांनी कौतुक करून बाबांना एक चर्मी जोडा व पितळेची वाटी बक्षीस म्हणून पाठवली होती. अशा प्रकारे तत्कालीन महत्त्वाच्या व जिव्हाळ्याच्या विषयांवर बाबांचे निबंधलेखन झालेले आहे. बाबांची भावनीक तळमळ व वैचारिक तपशील इत्यादी यात दिसून येतात. तसेच ख्रिस्तप्रणीत मानवतावादाचा पुरस्कार या त्यांच्या लेखनात आढळून येतो. वृत्तपत्रीय वा नियतकालिक स्फुट पद्धतीचे निबंधलेखन बाबांनी केले नाही तर ग्रंथस्वरूपाचे निबंधलेखन करावयाचे असे त्यांचे एक खास वैशिष्टय आपणास सांगता येते. एकोणिसाव्या शतकातील एक महत्त्वाचे निबंधकार म्हणून बाबांचे कर्तृत्व आपणास मान्य करावे लागेल.

बाबा पदमनजी हे महाराष्ट्रातील पहिले कादंबरीकार होत. *यमनापर्यटन* ही त्यांची इ. स. १८५७ मधील स्वतंत्र सामाजिक व वास्तव अशी पहिली मराठी कादंबरी होय. विधवाविवाहाच्या प्रश्नाविषयीची तीव्र तळमळ, व तत्कालीन वस्तुस्थितीचे सूक्ष्म अवलोकन यावर ती कादंबरी आधारित आहे. तिच्यातील वर्णने, संवाद, आणि व्यक्तिदर्शने ही लेखकाच्या कल्पकतेची व सहृदयतेची साक्ष देतात. कथेबरोबर वादविवाद, संभाषणे, पत्रे या रूपांनी विधवा पुर्नविवाहावर विपुल चर्चा या कादंबरीत आलेली आहे. कादंबरीचा शेवट त्यातील एका

पत्राने लिहिलेल्या पत्ररूपी निबंधाने झालेला आहे. या कादंबरीनंतर पाऊणशे वर्षांनी केत-करांनी लिहिलेल्या सामाजिक समस्याप्रधान कादंबऱ्यांशी हिचा तोंडवळा खूपच जमतो. या कादंबरीनंतर *मुक्तामाला*, *मंजुघोषा* यासारख्या अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांचे जे पीक आले,त्यांच्याशी तुलना करता हिच्यातील वास्तवताच अद्‌भुतरम्यतेसारखी वाटते. त्या काळात ही कादंबरी बरीच लोकप्रिय असल्याचे दिसते. आजही मराठी साहित्याच्या अभ्यासकांना ती ज्ञात आहेच. मराठीतील बहुतेक सर्व टीकाकारांनी प्रस्तुत कादंबरीची दखल घेतलेली दिसते. ही कादंबरी हिच्या नंतरच्या अनेक कादंबऱ्यांना अनुकरणीय ठरलेली दिसते. तत्कालीन सुशिक्षित सुधारक तरुणांच्या मनातील पत्नीविषयक स्वप्नरंजन, मराठी कादंबरीतील नायिका प्राधान्य, कल्पिता-पेक्षाही प्रखर वास्तववाद, तत्कालीन कर्त्या सुधारकांना विचारप्रवण करावयास लावण्याचे सामर्थ्य इत्यादी गोष्टी बाबांच्या *यमुनापर्यटन*च्या अनुकरणाने मराठी साहित्यात विशेषतः कादंबरी वाङमयांत आलेल्या असाव्यात. मराठी कादंबरीतील ही पहिलीवहिली कृती फारच प्रभावी व परिणाम करणारी ठरली. बाबांचे हे कर्तृत्व अलौकिक स्वरुपाचे होय.

बाबांनी *सत्यदीपिका (धाकटी)*, *सत्यदीपिका (थोरली)*, *प्रभोदय* वा *उदयप्रभा*, *सत्यवादी*, *कुटुंबमित्र* व *ऐक्यप्रदर्शक पत्रिका* इ. नियतकालिके इ. स. १८६१ ते १८८२ या काळात चालविली. या कार्यात त्यांची संपादकीय जिद्द व आवड दिसून येते. त्यांची चिकाटी, उद्योग-प्रियता यातून त्यांचे एक नियतकालिक बंद पडताच दुसरे नियतकालिक जन्म घेत असताना दिसते. कधी कधी पदर मोड करून त्यांनी नियतकालिक चालविले. *सत्यदीपिका (धाकटी)* हे नियतकालिक तर केवळ लहान मुलांसाठी चालविलेले पहिले मासिक ठरते. विषयांची विविधता या नियतकालिकातून असली तरी त्यांचे स्वरूप मुख्यतः धार्मिक असे आढळते. ख्रिस्ती धर्मप्रचार हे अर्थातच त्यांचे वैशिष्टय सांगावे लागेल.

बाबा काही काळ स्वतः शिक्षक होते. शाळेत शिकवण्याबरोबरच त्यांनी शिक्षणविषयक पुस्तकरचना देखील केलेली आहे. विद्यार्थ्यांसाठी क्रमिक पुस्तके, स्त्रियांसाठी वाचनार्थ पुस्तके, स्त्रिया व मुलांसाठी कोशरचना, इतिहासाची पुस्तके, मुलांसाठी मासिक व शिक्षकां-साठी *शिक्षणपद्धती* अशी अनेक पुस्तके त्यांनी या काळात रचलेली आहेत. *वाचनपाठावली*, *साहित्यशतक* इत्यादी त्यांची पुस्तके या विषयावरची उपयोगी पुस्तके होत. यावरून त्यांची पुस्तक रचनेची आवड व छंद यांची ओळख आपणास होते. नुसतेच अध्यापनाचे कार्य न करता शिक्षणविषयक पुस्तकरचना बाबांनी केली हे त्यांचे कर्तृत्व लक्षात घेण्यासारखे खचित आहे.

भाषेच्या दृष्टीने बाबांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांच्या कोशरचना होत. मोल्स-वर्थ व कँडी यांचे कोश सर्वसामान्य अभ्यासकांच्या आटोक्याबाहेरचे होते. त्यामुळे काळाची गरज म्हणून बाबांनी मोल्सवर्थ व कँडी यांच्या शब्दकोशाच्या आधारे मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी शब्दकोशाचा संक्षेप केला आणि कँडीच्या इंग्रजी–मराठी शब्दकोशाचा संक्षेप केला. संक्षेपातही शब्दांची व अर्थांची मांडणी यात वेगळेपणा आहे. याशिवाय त्यांनी गृहपयोगी व शालोपयोगी संस्कृत मराठी पॉकेट डिक्शनरी रचली. तसेच *शब्दरत्नावली* हा त्यांचा रॉजेट

थिजॉरस टाअिप शब्धकोश मराठीत आणलाच आहे. त्याच्या पहिल्या भागाचे स्वरूप संख्याकोशासारखे तर दुसऱ्या भागाचे 'पर्यायकोशासारखे' आहे. भांडी या शब्दाखाली ६९ भांड्यांची नावे तर मूर्ख या शब्दाखाली ४७ पर्याय शब्द आहेत. मराठीत याहून मोठा पर्याय कोश होण्याची नितांत आवश्यकता आहे.

बाबांची ख्रिस्ती धर्मविषयक रचना बरीच मोठी आहे. सतत तीस चाळीस वर्षे या प्रकारची ग्रंथरचना त्यांच्या हातून झाली. संख्यात्मक दृष्टीने त्यांचे हे लेखन प्रथम क्रमांकाचे आहे. त्यापैकी *नव्या करारावरील टीका* हा त्यांचा ग्रंथ फार महवत्त्वाचा आहे. भाष्य, भाषांतर, स्पष्टीकरणार्थ टीपा, विवरण इत्यादी या ग्रंथातील गोष्टींनी 'जुना करार व नवा करार' हे ख्रिस्तीशास्त्र सुलभ झाले आहे. ख्रिस्ती वाचक व उपदेशक यांना तर तो उपयोगी आहेच पण ख्रिस्तेतर मराठी वाचकास पण तो ख्रिस्तीशास्त्र समजण्यास उपयोगी आहे. या ग्रंथात कित्येक ठिकाणी वेद, उपनिषदे, गीता, महाभारत, *ज्ञानेश्वरी*, *दासबोध* इत्यादी ग्रंथातील अवतरणे विषय स्पष्टीकरणार्थ दिली आहेत. बाबांची तौलनिक अभ्यास करण्याची वृत्ती या ग्रंथात स्पष्ट होते.

बाबांनी सविस्तर व संगतवार असे *येशू खिस्ताचे चरित्र* मराठी वाङ्मयात प्रथमच लिहिले. डोळसपणाने ऐतिहासिक चरित्रग्रथन करण्याचा बाबांचा प्रयत्न येथे दिसून येतो. अद्भुत व दैवी प्रसंग गाळून, किंवा त्यांचे समर्पक स्पष्टीकरण करून, दंतकथांचा नामनिर्देश करून बाबांनी प्रस्तुत चरित्र सिद्ध केल्याने ते एक महत्त्वाचे ख्रिस्त चरित्र ठरले आहे. पूर्वसुरींच्या काही ख्रिस्तभक्तांची कांही समकालीन महत्त्वाच्या ख्रिस्तसेवकांची अल्पचरित्रे पण त्यांनी सिद्ध केली आहेत. त्याचप्रमाणे काही मृत्यूलेख देखील बाबांनी लिहिले आहेत. त्यांच्या या लेखनामुळे मराठी चरित्र वाङमयात अल्पस्वल्प भर पडली.

बाबांनी लिहिलेली ख्रिस्ती धर्म व हिंदूधर्मविषयक पुस्तके ख्रिस्ती मिशनरी संस्थांनी प्रकाशित केली यावरूनच ती ख्रिस्ती धर्मप्रसारात उपयोगी पडावी म्हणून तयार झाली असावीत याविशयी शंका रहात नाही. त्यामुळे या प्रकारच्या ग्रंथास आवश्यक असणारी अलिप्त वृत्ती यात आढळून येत नाही. परंतु बाबांनी त्यात जाणूनबुजून असत्य माहिती दिलेली नाही. या दृष्टीने त्यांचे महत्त्वाचे पुस्तक म्हणजे *हिंदुधर्माचे स्वरूप भाग १ व भाग २* हे ८३८ पृष्ठांचे पुस्तक होय. बाबांची व्यासंगी वृत्ती, श्रमाची आवड आणि अभ्यासूपणा इ. चा परिचय प्रस्तुत ग्रंथराजाच्या वाचनात व्हावा. यात वेद, दर्शने, धर्मशास्त्रे, इतिहास, पुराणे, जातकर्म, संस्कार आश्रम, नित्यनैमित्तिक कर्मे, देव, दैवते, तीर्थे, यात्रा, भूतपिशाच्चे, देवऋषी, जादूटोणे, शकुन, मुहूर्त इत्यादि बहुविध माहिती आलेली आहे. एका ख्रिस्ती माणसाचा हिंदुधर्माचा हा इतिहास व अभ्यास पाहून मन थक्क होते! ख्रिस्ती धर्म व हिंदुधर्म यांचा आपपरभावाने त्यांनी तुलनात्मक विचार मांडला आहे.

इ. स. १८५४ मध्ये ख्रिस्ती धर्माची दीक्षा बाबांनी घतली. ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या भूलथापांना बळी पडून एखाद्या प्रवाहपतीताप्रमाणे त्यांनी धर्मांतर केले नाही. धर्मांतराचा निर्णय घेताना त्यांना दारुण व हृदयद्रावक अशा अंतःकलहास तोंड द्यावे लागले. हिंदु देवतांवर व

धर्मावर त्यांनी नितांत श्रद्धा होती. आपल्या आईवडिलांवर त्यांचे निस्सीम प्रेम होते. परंतु याहीपेक्षा त्यांची धर्मजिज्ञासा जास्त प्रबळ होती. त्यांचे समवयस्क तरुण इंग्रजी चारपाच बुके शिकून सरकारी नोकरी मिळविण्याच्या खटपटीत दंग होते. पण अशा लौकिक उत्कर्षाचा व प्रतिष्ठेचा विचारही बाबांच्या मनात आला नाही. परमार्थसाधनेसाठी रात्रंदिवस झटणारे ते एक आर्तभक्त होते. त्यांची वृत्ती अंतर्मुख होती. म्हणून स्वतःच्या सद्सद्विवेक बुद्धिला स्मरून त्यांनी आत्मशांतीसाठी पापविमोचनासाठी, आत्मोद्धारासाठी ख्रिस्ती धर्म स्वीकारला असे म्हणावेसे वाटते.

धर्मांतरानंतर त्यांना वडिलोपार्जित संपत्तीवर व मानमरातबावर पाणी सोडावे लागणार होते याची त्यांना क्षिती वाटली नाही. याउलट आईवडिलांपासून दूर जातांना, पत्नीचा निरोप घेताना त्यांना प्राणांतिक यातना झाल्या. हिंदुधर्मावरील श्रद्धा कमी होत जाऊन ते ख्रिस्ती मताकडे कसकसे खेचले गेले आणि अखेरचा निश्चय करण्यापूर्वी त्यांना केवढा मनःस्ताप सहन करावा लागला याचा इत्थंभूत वृत्तांत त्यांनी आपल्या *अरुणोदय* नामक आत्मचरित्रात दिलाच आहे. त्यांच्या हृदयमंथनाचे व विचार परिवर्तनाचे हे प्रांजल निवेदन वाङमयदृष्टया तर सरस आहेच पण त्या वेळच्या सामाजिक परिस्थितीचे ते उत्तम प्रतिबिंब आहे. मराठी साहित्याचा एक अमोलिक अलंकार असे हे आत्मचरित्र आहे. इंग्रजी, जर्मन व चिनी या पाश्चात्य भाषात व तमिळ, तेलगू, बंगाली व उर्दू या भारतीय भाषात त्याची भाषांतरे झाली आहेत यावरून त्याची लोकप्रियता व उपयुक्तता लक्षात यावी. वाचकाला विश्वासात घेऊन त्याच्या-पुढे आपले अंतःकरण खुले करण्याची बाबा पदमनजींची हातोटी काही विलक्षण आहे. प्रत्येक प्रकरणात लेखक स्वतः तर रंगतोच पण वाचकालाही तल्लीन करून सोडतो. याच काळातील दुसरे श्रेष्ठ साहित्यिक दादोबा पांडुरंग यांचे आत्मचरित्र उपलब्ध आहे. पण बाबांच्या लेखना-तील जिव्हाळा दादोबांच्या भाषेत नाही. दादोबांचे आत्मवृत्त म्हणजे सुटचा गद्य अनुभवांची संहिता वाटते, उलट बाबांचे आत्मनिवेदन वाचताना त्यांचा आयुष्यक्रम म्हणजे एक सत्याचा, शोध वाटतो. एक ध्येयसाधना जाणवते. बाबांच्या *अरुणोदया*त बाबांच्या वडिलांचे प्रेमळ, समजूतदार, विलोभनीय दर्शन घडते. प्रस्तुत आत्मचरित्र म्हणजे तत्कालीन व्यक्ती, संस्था व समाजदर्शन घडविणारा एक अप्रतिम ग्रंथ होय.

बाबांनी बाप्तिस्मा घेतला त्या दिवशी 'तू प्रकाशात गेलास पण आमच्या घरात अंधार पडला' असा घरचा निरोप आला. बाबांच्या अंतःकरणात कोलाहल माजला होता. त्यांचे व त्यांच्या काळातील अज्ञानांधकाराचे दर्शन आपणास या त्यांच्या *अरुणोदयात* घडते. बाबांनी दीर्घकाळपर्यंत लिहिलेल्या रोजनिशीच्या आधारे, त्यांतील निवडक वेच्यानी युक्त असा *अनुभव-संग्रह* सिद्ध केला. हा अनुभवांचा संग्रह दोन भागातून असून बाबांच्या पन्नास वर्षांच्या ख्रिस्ती जिण्याची कल्पना आणून देणारा आहे. त्या काळातील काही ऐतिहासिक माहिती देखील या *अनुभवसंग्रह*द्वारे हाती लागते. बाबा एक आर्त ख्रिस्तभक्त होते. त्यांचे जीवन ख्रिस्तमय झाले होते. अनन्य ख्रिस्त सेवकांचे दर्शन बाबांच्या या आत्मचरित्रात्मक पुस्तकातून घडते.

लोकहितवादींची वैगुण्ये बाबांच्या लेखनात नाहीत. तसे पाहिले तर बाबांची भूमिका प्रचारकाची. त्यांच्या लेखनात अशी वैगुण्ये आढळली असती तर त्यात आश्चर्य नव्हते. परंतु बाबांचे व्यक्तित्व समतोल असल्याने त्यांच्या लेखनात बुद्धी व भावना यांचा यथोचित मिलाफ आढळतो. लोकहितवादींच्या तुलनेने त्यांची शैलीही आकर्षक आहे. किंबहुना, भाषेची प्रौढी, पदरचनेची शैली, अन्वयाची एकता, विचारांचे गांभीर्य व शब्दालंकार यांची कलात्मक जाणीव बाबांशिवाय अन्य अव्वल इंग्रजीतील निबंधकारात अपवादानेच आढळावी. मात्र लोकहितवादींची वैचारिक सखोलता बाबांच्या निबंधात आढळत नाहीत. ख्रिस्तनिष्ठेमुळे भारताचे पारतंत्र्य, आर्थिक शोषण या घटनांचे त्यांना आकलनच झाले नाही. तरीही ख्रिस्ती लेखकातील व अव्वल इंग्रजीतील एक संयमित विचार–विकारांचा आणि आकर्षक शैलीचा निबंधकार म्हणून बाबांचे स्थान अढळ आहे.

बाबांची भाषापद्धती खरोखरच फार गोड आहे. त्यात भक्तीचा जिव्हाळा आहे. समाजसुधारणेची तळमळ आहे. वाक्ये शुद्ध, साधी, सरळ व चटकदार आहेत. लिहिणे गंभीर व प्रौढ आहे. शब्द वेचक आहेत. वळण जरा कोकणी, त्यांच्या भाषेवर ख्रिस्ती धर्मग्रंथाची छाप पडलेली आहे यात मुळीच शंका नाही; पण त्याबरोबरच बालपणापासून *रामविजय*, *हरिविजय*, *पांडवप्रताप* इत्यादी ग्रंथांची त्यांनी पारायणे केली असल्यामुळे श्रीधराच्या वाणीतील सुबोधता, व सोज्वळता, प्रसन्नता आणि प्रेमळपणा हे गुण त्यांच्या भाषेत उतरले आहेत. त्यांच्या भाषाशैलीचा परिचय त्यांनी जो *मोल्सवर्थ कोशा*चा संक्षेप केला आहे त्याच्या प्रस्तावनेतील पुढील उताऱ्यावरून होतो :

> आता ज्या महाकोशाचा हा लघुकोश केला आहे त्याचे वर्णन करण्याची मला शक्ति नाही. सूर्य दाखवायला जसा दिवटीचा उजेड नको, तसा त्या प्रचंड ग्रंथाचा महिमा प्रगट करायास येथे स्तुतिवाद करणे न लगे. ज्यांनीं त्यांचें लक्षपूर्वक अवलोकन केले आहे त्यास त्याच्या कर्त्याची विशाल बुद्धि, विचित्र विद्वत्ता, विस्तीर्ण शोध, दीर्घ प्रयत्न, अश्रान्त श्रम व लोककल्याणाची निष्काम वासना, ही पाहून मोठा अचंबा वाटतो. विशेष काय सांगावे ह्या देशात यावत् महाराष्ट्र व इंग्लिश भाषेचा लोक अभ्यास करतील तावत त्यांस मोल्सवर्थ ह्या नामाभिधानाचे विस्मरण होणार नाही.

बाबांचा लेखनविषयक साक्षेप त्यांच्या ग्रंथात, पत्रात, नियतकालिकात इतकेच नव्हे तर कोशरचनेत देखील आढळून येतो. त्यांच्या जीवनाची शिस्त त्यांच्या लेखनात सर्वत्र दिसते. त्या काळात इतक्या साक्षेपाने दुसऱ्या कुणीही लेखन केलेले नाही. सर्व भारतात नव्हे जगात ख्रिस्ती धर्माचा प्रसार व्हावा ह्या हेतूने भारावून जाऊन त्यांनी अविश्रांत लेखणी झिजविली. दृष्टी मंद झाली, वाचवत नाही व लिहवत नाही अशा जर्जर अवस्थेत त्यांनी आपला *अनुभवसंग्रह भाग २* सिद्ध केला तो मुलगी राणी एस्तेरेच्या साहाय्यानेच! 'आपण पेंशन घेतली पण ख्रिस्तसेवा सोडली नाही' हे त्यांचे उद्‌गार त्यांच्या ख्रिस्तनिष्ठेची साक्ष देण्यास पुरेसे आहेत. शिक्षक, लेखक, पाळक, उपदेशक व संपादक अशी त्यांची भरघोस यशस्वी कामगिरी सांगता येईल.

एकोणीसाव्या शतकाच्या पार्श्वभूमीवर त्यांचे वाङमयीन कर्तृत्व खरोखरच डोळ्यात भरण्यासारखे आहे. संख्यात्मक व गुणात्मक दोन्हीही दृष्टीने मराठीची सेवा करणाऱ्या या थोर वाङमयसेवकाच्या साहित्याची जेवढी दखल घ्यावयास हवी होती तेवढी दुर्दैवाने घेतली गेली नव्हती. ती घेण्याच्या दृष्टीने हा अल्प प्रयत्न प्रस्तुतग्रंथलेखकाने केला आहे, हे सांगणे नकोच!

परिशिष्ट १

## कालपट
## इ. स. १८३१ ते इ. स. १९०६

अ.क्र. तपशील

१. मे १८३१ : बेळगाव येथे जन्म.
२. सुमारे १८३७ : प्राथमिक शाळा प्रवेश. बेळगावची सरकारी मराठी शाळा.
३. इ. स. १८४३ : बेळगावच्या मिशन शाळेत प्रवेश.
४. इ. स. १८३९ : प्रथम मुंबईस गमन—चुलत भावाच्या लग्नासाठी.
५. इ. स. १८४७ : समुद्रमार्गे मुंबईस दुसरी सफर.
६. ३ एप्रिल १८४७ : *प्रभाकर* पत्रात पहिले जाहीर पत्र प्रसिद्ध केले व अन्याय जकातीविरुद्ध दाद मागितली.
७. १८४७ : मुंबईच्या एल्‌फिन्स्टन स्कूलमध्ये प्रवेश.
८. १८४८ : बाबा पदमनजींचे प्रथम हिंदू लग्न. कलावंतीणींचा नाच.
९. १८४८ : सरकारी शाळा सोडली. विवाहबंधन हे कारण.
१०. १८४८ : एडनला (आदनाला) वडिलांची बदली व बाबांचे त्यांच्या समवेत प्रयाण.
११. १८४९ : काळबादेवी – गायवाडी येथील फ्री चर्च विद्यालयात प्रवेश.
१२. २ एप्रिल १८४९ : एडनला परत जाण्यासाठी अर्ज, सोल्जर बोर्डाचा नकार.
१३. २५ ऑगस्ट १८४९ : बाबांनी सुवर्तनाचा सत्य, नीती, वर्तन इत्यादीसंबंधीचा सुनिश्चिय केला.
१४. १८५१ ते १८५२ : बाबांची पहिली
   (१) *स्त्रीविद्याभ्यास निबंध*
   (२) *हिंदुलोकांच्या सणांच्या विषयी निबंध*
   (३) *कुटुंब सुधारणा*
   (४) *निबंधमाला*
   (५) *व्यभिचारानिषेधक बोध*
   पाच पुस्तके प्रसिद्ध झाली.
१५. १८५१ : परमहंस सभेचा बोभाटा व बाबांचे सप्टेंबर १८५१ मध्ये अडतऱ्यास (जि. सातारा) प्रयाण.
१६. १८५२ : मेडिकल कॉलिजात प्रवेश (ग्रँट मेडिकल कॉलेज मुंबई).

१७. १५-१२-१८५१ : सातारहून *ज्ञानप्रकाशास* पत्र. ते प्रसिद्ध झाले.
१८. १८५२ : फ्री चर्च कॉलेज डिव्हिजन. (विल्सन कॉलेजात) बाबांचा पुनर्प्रवेश. (अंदाजे)
१९. १८५४ एप्रिल : बाबा पदमनजींच्या वडिलांची परत बेळगावास बदली व बाबांचे बेळगावास आगमन.
२०. २९ मार्च १८५४ : *धूमकेतूस* वर्षफलासंबंधी बाबा पदमनजींचे पत्र.
२१. १९ मे १८५४ : बाबा पदमनजींना वडिलांनी नोकरी दिली. ४० रु. पगार – ट्रान्सलेटरची जागा.
२२. १३ ऑगस्ट १८५४ : बाबांनी घर सोडून चर्चमध्ये प्रवेश केला.
२३. १८ ऑगस्ट १८५४ : बाबा पदमनजींच्या धर्मांतराची तयारी, बेळगावास.
२४. ३ सप्टेंबर १८५४ : बेळगावास बाबांचा बाप्तिस्मा झाला. लंडन मिशनचे इंग्लिश देऊळ. रेव्ह. बेननची उपासना. रेव्ह. टेलरसाहेबांनी बाप्तिस्मा केला.
२५. २० नोव्हेंबर १८५४ : बाबा परत मुंबईस आले.
२६. १८५७ : सुप्रीम कोर्टात 'हाबियस कार्यस अर्ज'.
*यमुनापर्यटन*चा जन्म—कादंबरी लेखन २०० रु. नफा म्हणून मिळाले.
२७. १८५७ : बाबांचा प्रथम पत्नीशी घटस्फोट.
२८. १८६० : बाबांचे ख्रिस्ती लग्न—वडिलांनी याप्रीत्यर्थ त्यांना १०० रु. दिले. मुंबई सोडून बाबा पुण्यास राहिले. १६ वर्षे वास्तव्य.
२९. १८६२ : प्रथम पत्नीचा परत बाबांकडे येण्याचा यत्न. बाबांनी ख्रिस्ती धर्मानुसार इन्कार केला.
३०. १९ जून १८६४ : बाबांना त्यांच्या काकांनी स्वतःच्या घरी बोलावले. (धर्मांतरानंतर प्रथमच)
३१. १८६२ ते १८७३ : पुण्यास शिक्षक व पाळक म्हणून कार्य, शब्दकोश रचना, शास्त्राभ्यास, शिकवण्या वगैरे.
३२. १८६५ : बाबांची आई बेळगावी वारली.
३३. १८६७ : बाबांना पुणे फ्री चर्च मिशनच्या मंडळीचे पाळकपदाची दीक्षा.
३४. १८७२ : बाबांची ख्रिस्ती पत्नी सेराबाई हिचे निधन.
३५. १८७३ : बाबांनी पाळकपदाचा राजिनामा दिला.
३६. १८७४ : बाबांचे वडील पुण्यास मरण पावले.
३७. १८७७ : बायबल सोसायटीच्या व ट्रॅक्ट सोसायटीच्या संपादकाचे काम मुंबईस स्वीकारले. २५ वर्ष हे पद भूषविले. या काळात त्यांनी अनेक ग्रंथ रचले, संपादिले.
३८. १८८१ : बाबांचा तिसरा विवाह.
३९. १८९० : बाबांची तिसरी पत्नी वारली.
४०. ९ सप्टेंबर १८९४ : बाप्तिस्म्याचा चाळीसावा वार्षिक दिवस समारंभ. *अनुभवसंग्रह, भाग १* स्मारक ग्रंथ म्हणून प्रसिद्ध—४० वर्षांचा अनुभव.

४१. ९ सप्टेंबर १९०४ : बाप्तिस्म्याच्या पन्नासावा वार्षिक दिवस समारंभ. *अनुभवसंग्रह, भाग* १ स्मारक ग्रंथ म्हणून प्रसिद्ध—५० वर्षांचा अनुभव.

४२. १९०२ : वयाच्या ७१ व्या वर्षी वरील दोन संस्थांकडून बाबांना पेन्शन.

४३. २९ ऑगस्ट १९०६ : बाबा पदमनजी प्रभुपदी विलीन झाले.

परिशिष्ट २

## घराणे व वंशविस्तार



यशोदा भवन, सुरतवाला चेंबर, ग्रॅन्ट रोड, मुंबई येथे हेमंत (बाबांचा नातू) वय ४० व बाबांच्या स्नुषा सुंदराबाई हे दोघे हयात आहेत. वाचकांसाठी बाबा पदमनजीसंबंधीच्या काही आठवणी त्यांनी ऐकलेल्या सोबत जोडल्या आहेत.

पत्ता : हेमंत विश्वास पदमनजी,
यशोदा भुवन, सुरतवाला चेंबर,
ग्रँट रोड, मुंबई.

परिशिष्ट ३

# स्मृतिगंध

**आता उरल्या फक्त स्मृती**

बाबा पदमनजींची सून सुंदराबाई विश्वासराव पदमनजी यांचे वय ६९ वर्षांचे असून सध्या त्या आपला मुलगा हेमंत विश्वास पदमनजी यांच्याकडे राहतात. त्या स्वतः शिक्षिका म्हणून नोकरी करीत होत्या. त्यांचे पती विश्वासराव पदमनजी इतिहास व इंग्रजीचे एक नामांकित शिक्षक होते. ते विल्सन हायस्कूल, गिरगाव येथे काम करीत. अत्यंत लोकप्रिय शिक्षक म्हणून सर्वजण त्यांचा उल्लेख करीत. सुंदराबाई विश्वासरावांचे तिसरे कुटुंब. आपल्या पतीच्या सान्निध्यात ह्या सुनेने बाबांच्या काही स्मृती कथन केल्या त्या अशा. 'विश्वासराव, माझे पती, बाबा पदमनजींचा उल्लेख 'पप्पा' म्हणून करीत. मी रविवारी भरपूर खाद्यपदार्थ केले की माझे मिस्टर म्हणत, "अग सुंदरा, आमचे पप्पा घरात काही शिजवू देत नसत अन् तू किती हा पसारा मांडलास." पप्पा शनिवारी भरपूर मास (मटन) शिजवून ठेवित व तेच शिळे मटन रविवारी 'कोल्ड मटन' म्हणून खाण्याचा रिवाज घरी होता. रविवारी अगदी गडीमाणसांना पण 'रेस्ट डे'–विश्रांतीचा दिवस पाळता यावा म्हणून बाबांची वरील सारी धडपड असे.' दुसरी आठवण सांगताना सुंदराबाई म्हणाल्या, 'माझे पती सांगत की एकदा एक मनुष्य बाबा पदमनजींवर खूप रागवला. तो म्हणाला, "अरे मी तुझ्या पेटीचे खिळे ठोकीन तेव्हाच जाईन." बाबा शांत राहिले पण पुढे मात्र लवकर बाबा पदमनजींनाच वरील क्रुद्ध माणसाची प्रेतयात्रा व अंत्यक्रिया करावी लागली. बाबा त्या दिवशी खूपच दुःखी होते. त्यांनी त्या माणसासाठी 'प्रार्थना' केली.' सुंदराबाई व विश्वासराव दोघेही नोकरी करीत. विश्वासराव तर शिकवण्या व नाईट स्कूलमध्येही काम करीत. त्यामुळे फारशा गप्पा गोष्टी कधी झाल्याच नाहीत असे सुंदराबाईंचे म्हणणे दिसते. बाबा पदमनजींनी आपल्या मुलाबाळांची चांगली व्यवस्था केली. दिनकररावाने विश्वासरावांची बरीचशी रक्कम हडप केली असा सूर विश्वासरावांची पत्नी सुंदराबाई यांचा दिसला. थोरला प्रभाकर म्हशीचा धंदा करीत असे. राणी किंवा एस्तेरबाई मात्र बाबा पदमनजींची सेवा करीत असे. ती फार सुंदर होती. वडिलांच्या म्हातारपणी एस्तरने त्यांची सेवाशुश्रुषा केली. लेखन केले. एवढेच नव्हे तर आपला विवाह देखील तिने वडिलांच्या म्हणजे बाबा पदमनजींच्या मृत्यूनंतर केला. त्यांचा विवाह मि. दत्त यांच्याशी इंग्लंडमध्ये झाला. विश्वासरावांसाठी देखील बाबांनी सातआठशे रुपये ठेवले होते. पण त्या पैशाचा पुढे पत्ता लागला नाही. विश्वासरावाने *यमुनापर्यटन* या बाबांच्या कादंबरीची आवृत्ती ३ री स्वखर्चाने प्रकाशित केली. विश्वासराव मेडिकल कॉलेजात होते. त्यांच्या-

साठी हे पैसे ठेवले होते. पण दिनकररावाने फार त्रास दिला व पैसे काढून घेतले. त्यांच्या परिस्थितीच्या मानाने बाबांनी मुलांचे खूपच केले. त्यांच्याकरिता अल्पस्वल्प पै–पैसे ठेवले. घरात बहुधा दारिद्रच असे. क्वचित जेवणाची चिंता असे पण माझे मिस्टर व त्यांची आई (बाबा पदमनजींची पत्नी) हे दोघेजण खोलीत बसून प्रार्थना करीत. त्यानंतर कोणीतरी अनाहूत माणूस येई. अडचण निवारण होत असे. बाबा अत्यंत श्रद्धेने प्रार्थना करीत असत व त्याचा उपयोग पण होई.

विश्वासरावांची एक विद्यार्थिनी मिसेस शांताबाई माने, न्यू रेडीमेनी बिल्डिंग, भायखळा या पण म्हणतात, 'आमचे टीचर एबनायझर पदमनजी यांच्या वडिलांचा उल्लेख पप्पा म्हणून करीत. ते म्हणायचे, "माझ्या पप्पांनी पण माझ्यासाठी पैसे ठेवले होते पण ते मला कुठे मिळाले? माझ्या पप्पांनी तेंव्हा धर्मांतर केले तेव्हा त्यांना लोकांनी फार फार त्रास दिला. त्यांची गाडी निघाली की त्यावर (व्हिक्टोरिया) धोंडमार होत असे." पप्पाविषयी परमावधीचा आदर त्यांच्या ठायी होता. बाबा पदमनजी ख्रिश्चन कसे झाले हे ते समजावून सांगत'.

बाबा पदमनजींच्या एका मित्राची सुकन्या मिसेस एस्टरबाई जोसेफ वय ८०–८२, सध्या मुंबईस सेंट कोलंबिया कंपाऊंडमध्ये राहतात. त्यांच्याशी बोलताना त्या म्हणाल्या, 'बाबा पदमनजी माझ्या वडिलांचे घनिष्ट मित्र. वास्तविक पाहता माझ्या वडिलांचे व बाबा पदमनजींचे देऊळ (चर्च) ही भिन्न भिन्न. पण माझे वडील बाबांच्याकडीं आवर्जून जात. बाबा अत्यंत साधे होते. पांढरा फेटा, मोठे डोळे असा वृद्ध, अशी त्यांची आकृती अद्याप माझ्या डोळ्यांसमोर आहे. ते आम्हाला खाऊ व बिस्किटे वगैरे देत. आम्ही हॉलमध्ये दंगा वगैरे केला तरी रागावत नसत. त्यांची खूप पुस्तके आमच्याकडे होती. *अनुभवसंग्रह* हे त्यापैकी एक. माझ्या वडिलांच्या मनात त्यांच्या विषयी आदर असे. चेहरा हसरा, मध्यम ऊंची, लांब कोट असे त्यांचे वर्णन करता येईल.' फार वार्धक्यामुळे बाबा कधी कोणाकडे तेव्हा फारसे जात येत नसत, असे त्या म्हणाल्या. .'बाबा पदमनजी तसे पाहिले तर दुसऱ्या मिशनचे, तरी पण माझे वडील त्यांची पुस्तके विकत घेत. बाबांचा उजवा हात असलेली कन्या एस्तरबाई (राणी) फारच सुंदर होती. तिचे लग्न नंतर मिस्टर दत्त बरोबर झाले. रंग गोरा नाही पण फीचर्स फार उत्तम असे आठवते.' मिसेस एस्तरबाई जोसेफ या एबनायझर (विश्वासराव) यांच्या विद्यार्थिनी. विश्वासरावांनी आपणास इतिहास शिकविला. ते वडिलांविषयी वर्गात फारसे कधी बोलत नसत. इतिहासाची व इंग्रजीची गोडी आपणास त्यामुळे लागली हे त्यांचे कथन स्वतःच्या अत्यंत लहानपणी आपण बाबा पदमनजींच्या सान्निध्यात आलो त्यामुळे फारसे आठवत नाही, याबद्दल एस्तराबाईंना फारच वाईट वाटले. जोसेफ एस्तराबाई म्हणतात, 'बाबांचे घर साधे पण प्रसन्न होते. हॉल, बेडरुम व किचन असेच त्याचे स्वरूप. घरात स्वच्छता आढळे. बाबा मुलांवर कधी फारसे रागवत नसत. माझे वडील व ते खूप बोलत बसत. सोफा, खुर्च्या इत्यादी सामान त्यांच्याकडे होते असे आठवते.'

बाबांची सून सुंदराबाई बाबा पदमनजींप्रमाणेच थोडी फटकळ पण स्पष्टवक्ती, दुसऱ्यास मदत करण्यास तत्पर. ७० वर्षांची ही वृद्धा या दिवसात प्रस्तुत प्रबंधकर्त्याबरोबर अगदी भर

उन्हात देखील या स्मृती–पाकळ्या वेचण्यासाठी आली. १९६८ साली अमरोली चर्चचा मोठा समारंभ झाला. तसे पाहिले तर बाबा पदमनजी अमरोली चर्चचे प्रमुख सभासद. त्या वेळी बाबा पदमनजींच्या बाबतीत चर्चने उदासीनता दाखविली. 'पदमनजी घराण्यास निदान बोलावणे (निमंत्रण) तरी यावयाचे होते.' सुंदराबाईंनी ही आपली व्यथा बोलून दाखविली. आजही त्या अमरोली चर्चचा हिशेब विचारतात. अमरोली चर्चचा समारोह स्मरणिकेतील अक्षम्य चुका बाबांच्या या तडफदार सुनेने मला प्रत्यक्ष दाखविल्या. प्रामाणिक पण सत्य, सत्य पण कटु टीका करण्याचा हा वारसा ह्या सुनेला सासऱ्याकडून तर मिळाला नसेल ना? अहमदनगरचे ख्रिस्ती कवी कृष्ण रत्नू सांगळे यांची ही नात बाबा पदमनजींची सून होय. आजोबांचा व सासऱ्याचा पुरापुरा अभिमान सुंदराबाईंच्या रोमारोमात आजही आढळून येतो. 'हेमंताच्या आई, तुमच्या पतीच्या एकांतात कधी त्यांनी तुम्हाला बाबा पदमनजींविषयी ऐकवले असेल की. त्यांच्या काही आठवणी तुम्ही सांगू शकाल?'—माझा प्रश्न. 'अहो प्रोफेसर, शाळा, शिकवण्या व नाईट स्कूल यातून विश्वासराव माझ्या वाट्याला क्वचितच येत. मी देखील नोकरीच करीत असे. आठ आठ दिवस आमची गाठ भेटही शांतपणे होत नसे. त्यांतून एकांत व निवांतपणा कसला लाभणार व बाबा पदमनजींच्या आठवणी काय निघणार? शिवाय मी त्यांची तिसरी पत्नी.'—इति सुंदराबाई.

परिशिष्ट ४

## ग्रंथमाला

अहो ज्ञानोदयकर्ते महाराज, भेटीसाठी आलो आहे आज
भेटीची आशा भारी, दाखवू नका कचऱ्याची टोकरी
आपल्या पत्राची वहावा, सरकारने रिपोर्टात केली परवा,
आपले लेखन तसेच छान, म्हणून सरकारनेही दिला मान
तेणे अंतकरणा झाला उल्लास, म्हणून आलो भेट घ्यावयास
सांगतो एक नामावळी, रे. बाबा यांची पुस्तके सगळी,
पाहून लोक करतील विचार, वाचून घेतील त्यातील सार,
लाभ होतील निःसंशय फार, म्हणून केली मालिका तयार.
गणपति लोक ज्याची गातात फार कीर्ती,
त्याची हे ग्रंथकार करतात फटफजिती.
*हिंदू लोकांच्या सणाचा निबंध*, पहा तसाच *व्यभिचारनिषेधबोध*.
वाचा *श्री येशूख्रिस्तकृत शांती कल्याण दायक सुसंवाद*
होईल तेणे अंतकरण सुबोध
हिंदू व ख्रिस्तीधर्म यांची तुलना, दुसरी कृष्ण व ख्रिस्त यांची जाणा.
तशीच तिसरी हिंदू व ख्रिस्ती जिण्याची म्हणा,
पहा तोलून भरतो अधिक उणा.
*हिंदू धर्मांचे स्वरुप* भाग दोन, केले अकटो विकटो ग्रंथ शोधून
आणखी आहे स्वर्गवर्णन, पहा मूर्तिपूजेविषयी संभाषण.
राहिले *जातिभेदविवेचन*, तसेच पाहा *शंका निवारण*
वाचा *वेदधर्मी लोकांचा वृत्तांत*, वेदांत काय आहे पाहा घ्यावयाचे असल्यास ज्ञान
वाचा *सत्यवेदात काय आहे* याचे भाग दोन.
कर्तव्य ब्राह्मण विधवेचे लग्न असे दाखविते *यमुना पर्यटन*.
अंतकाळी कशी उडते घाई – वाचून पाहा *आत्मारामपंत मृत्यू शिपाई*.
तेव्हा येईल सारासार विचार मग पाहा ख्रिस्ती कर्तव्य सार.
शेवटी वाचा उद्धार मार्ग विज्ञान मग जातील अज्ञानाचे पटल निघून
पहा पहा आला *अरुणोदय* – मग जाईल मनावरचे भय.
जर व्हावा *सुप्रभात* सर्वत्र – तर पाहा *येशू ख्रिस्ताचे चरित्र*

का न करतिल लोक उल्हास – कारण झाला आहे *बंदखलास*.
*स्त्रिविद्याभ्यास* निबंध याचा लागतो साध्वीस छंद,
का न होईल आनंद साध्वीच्या मना तिच्यासाठी *कुटुंब सुधारणा*
का मिळेल तिला दूषण – वाचीत असते ती *स्त्रीकंठभूषण*.
पहा आहे एक *शब्दरत्नावली* जशी जणू भाषेची एक उत्तम किल्ली.
विद्यार्थ्यांनी करावा जयघोष – केले त्यांच्यासाठी मराठी व इंग्रजी असे दोन कोश.
अशी शालोपयोगी पुस्तके केली फार–राहिली अजून क्रमिक दोन पासून चार.
*महाराष्ट्राचा संक्षिप्त इतिहास* छानदार – वाचकांना वाटते कौतुक फार.
का न होईल आनंद शिक्षकाला – पाहुनि ती छान *निबंधमाला*.
शिवाय *शिक्षण पध्दतीचे दोन भाग*, त्याला पडतात उपयोगी शिक्षण द्यावयास.
सर्व ख्रिस्ती उपदेशक–आनंद करतात पाहुनि साहित्यशतक.
*निःशास्त्रवाद परीक्षा* एक – उपयोगी पडतो तसाच नरनायक.
*नाशिक क्षेत्राची यात्रा* तसाच *पंढरीचा वारकरी*.
वाचतात वाटेवर वरचेवरी.
*उत्पत्तीच्या पुस्तकांवर टीका* इचा उपयोग होतो फार उपदेशका.
दुसरी *नव्या करारावर*, उपयुक्त सूचना मिळतात तिच्यातून फार.
*उपेदश व सिध्दान्त दोन रत्नमाला* उपयोगी पडतात बहुतेक रेवरेंडाला.
सांगतो आणखी दोन चार *ग्रंथकर्त्यांच्या अडचणी* असतात फार.
तरी राखूनी विचार स्वातंत्र – चालविले दोन वर्षे *कुटुंबमित्र*.
आमच्या पवित्र कर्माची पापे पाहणारा ख्रिस्त आहे *सत्यवादी* खरा.
तरच दिसेल ते अतिरम्य स्थळ – तेव्हा पावतील आनंत सर्व काळ.
तेथे कसे बसावे प्रभूच्या पंगती – तर वाचा *प्रभु भोजनाचा साथी*

रे. बाबा पदमनजी यांनी जी पुस्तके रचिली त्यातील बहुतेकांची यादी कित्येक लोकांच्या संग्रही असण्याचे अगत्य सोलापूरच्या एका बंधूस वाटल्यावरून त्यांनी ही ग्रंथमाला प्रसिद्ध करविली आहे.

*ज्ञानोदय*, २१ फेब्रु. १८८९, पृ. ६०. ज्ञा. क.

परिशिष्ट ५

## बाबा पदमनजींची ग्रंथसंपदा

२१-२-१८८९ च्या *ज्ञानोदयात* एका सोलापूरकराने 'रे. बाबा पदमनजींच्या ग्रंथांची एक ग्रंथनामावली' या नावाने पद्यात्मक यादी प्रसिद्ध केली आहे.[१] त्या यादीत १८८९ पर्यंत प्रसिद्ध झालेली ५० पुस्तके आहेत. त्यानंतर इ. स. १८९९ साली प्रसिद्ध झालेल्या बाबा पदमनजींच्या *ज्ञाननीति बोधसंग्रह* या पुस्तकाच्या शेवटी एक यादी छापलेली आहे. या यादीतील बाबा पदमनजींची म्हणून एकूण पुस्तके ९५ दिली आहेत. त्याप्रमाणे जुलै १९०४ मध्ये बाबा पदमनजींच्या *अनुभवसंग्रह भाग २* या पुस्तकाच्या पाठीमागे त्यांच्या पुस्तकाची एक इंग्रजी व एक मराठी पुस्तकाची यादी दिली आहे. त्यात एकूण ९० पुस्तके आहेत. यात नियतकालिकांचा समावेश आहे. सुप्रसिद्ध दाते सूचीत बाबा पदमनजींच्या ४९ पुस्तकांचा उल्लेख आहे.[२] गं. बा. सरदार म्हणतात, 'त्यांच्या इतकी ग्रंथरचना त्या काळच्या दुसऱ्या कोणत्याही लेखकाच्या हातून झाली नाही.'[३] कृ. भि. कुलकर्णी म्हणतात, 'त्यांनी लहानमोठी १०० च्यावर पुस्तके लिहिली . . . बाबांची धार्मिक मते कोणतीही असली तरी त्यांची वाङमयसेवा कौतुकास्पद आहे.[४] रे. भा. कृ. उझगरे म्हणतात, 'रे. बाबा पदमनजी हे ख्रिस्ती वाङमयाचे भीष्माचार्य होऊन गेले. त्यांची ग्रंथसंपत्ती प्रचंड व विविध विषयावर असून त्यांची संख्या ११० आहे."[५] प्रसिद्ध कवि रे. ना. वा. टिळक बाबा पदमनजींचा उल्लेख 'मराठी ख्रिस्ती वाङमयाचे जनक' असा करतात. ते म्हणतात, 'त्यांनी एकट्यानी लिहिलेली लहानमोठी पुस्तके शंभरावर आहेत. ह्यात त्यांच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या लेखांचा समावेश केला तर हे वाङमय कसे एखाद्या प्रचंड डोंगरासारखे दिसू लागते.'[६]

मला उपलब्ध झालेल्या बाबा पदमनजींच्या ग्रंथांचे स्थूलमानाने वर्गीकरण करून प्रत्येकाची संक्षिप्त माहिती पुढे दिलेली आहे. बाबा पदमनजींच्या वाङमयाचे साधारणतः वर्गीकरण चरित्र, आत्मचरित्र, कथा, कादंबरी, इतिहास, शिक्षण, टीका, निबंध-प्रबंध, धर्म, कोश, ट्रॅक्टस्-भाषांतर व नियतकालिके असे केले आहे. अनुपलब्ध पण त्यांच्या नावावर मोडत असलेल्या पुस्तकांची एक यादी नुसती जोडली आहे. प्रस्तुत ग्रंथकर्त्यास ती पुस्तके मिळू शकली नाहीत किंवा त्यांची माहिती पण उपलब्ध होऊ शकली नाही.

## चरित्र

१ *जगत् शेटाचा पुत्र नरनायक याचे चरित्र*
नारायणय्या या पुस्तकाचा अनुवाद आ. २ री, ट्रॅक्ट सोसायटी, अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८२, ४ + ९१ (७.२×४.२), किंमत २ आणे, ४ थी. आ. १९१८, १ली आ. १८७९.

२ *नीसिमा–खरा जपानी स्वदेशभक्त–यांचे चरित्र*
भाषांतरीत, ख्रिश्चन लिटरेचर सोसायटी, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १८९३, किं. २ आणे, ८+८१ (७.९×४.८).

३ *सदारोगी सदा उद्योगी*
ट्रॅक्ट सोसायटी, निर्णयसागर छापखाना, मुंबई, १८९०, किंमत १ आणा, रिचर्ड बॅक्स्टर यांचा काळ व चरित्र.

४ *मि. बाबा पदमनजी यांचे स्वर्गवासी पत्नीचे शेवटचे तीन दिवसांचा वृत्तांत*
ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई, १८९३, ३२, (५.१×४) २ री आ., किंमत अर्धा आणा. १ली आ. फुकट वाचण्यासाठी, १ ली : खाजगी पत्रातील उतारे. दुसऱ्या आवृत्तीत उतारे गाळले.

५ *येशू ख्रीस्ताचे चरित्र*
आ. २ री, ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई, १२ + ३८३ ३९५, ॥८–, (८.४×५.४) सचित्र. बांधणी कच्ची, छाप निर्मळ व सुरेख. प्रथम पृथक पृथक भागातून प्रसिद्ध झाले.

## आत्मचरित्र

६ *अरुणोदय*
(बाबा पदमनजींचे आत्मचरित्र—ह्यात पुस्तककर्त्याने आपले हिंदू जिणे व ख्रिस्ती होणे या गोष्टींचे वर्णन केले आहे.)
१ ली आवृत्ती : बॉम्बे ट्रॅक्ट ॲन्ड बुक सोसायटी, मुंबई मध्ये अँग्लो व्हर्नाक्युलर छापखान्यात छापिली. १८८८, २० + ४१२, (६.८×५), किंमत ८ आणे.
२ री आवृत्ती (बाबा पदमनजी यांचे स्वलिखित चरित्र) सुधारलेली : बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई मध्ये निर्णयसागर छापखान्यात छापिली. सन १९०८, १६ + २५२, (१०×६).
३ री आ., ऑगस्ट १९५५, पुनर्मुद्रण, ऑक्टो. १९६३.

७ *अनुभवसंग्रह भाग १*
डी. बी. पदमनजी यांचा व्हिक्टोरिया प्रिंटिंग प्रेस.
१८९५, कापडाची बांधणी, किंहत १॥ रुपया, कागदाची बांधणी किंमत १। रुपया. २+७+१०+४+२८२+४ (८×५).

८ *अनुभवसंग्रह भाग ?*
मुंबई, जुलै १९०४, (८×४), किंमत ८ आणे (टपाल हशील निराळा).
(६+४+६+९४+२+२) यात १९८ उतारे घेतले आहेत.
इंग्रजी उतारे १ ते ७२ मराठी व १ ते ९४ पाने इंग्रजी मजकूर.

### कथा

९ *चित्रांसुध्दा शास्त्रांतील कथा*
बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई, १९७९, चार लहान चोपडी, षोडशपत्री साचा, सचित्र, सात सात चित्रे, शास्त्रातील रंग भरलेली चित्रे असून ती इंग्लंडहून आली. त्यांच्या पाठीमागे त्या विषयाच्या गोष्टी व बोध संक्षिप्त रीतीने छापलेली आहेत. ते बाबा पदमनजीने केले. किंमत १ आणा.

१० *दाविदाची कथा*
बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई, १८७९, पाने १७, षोडशपत्री साचा, किंमत १ आणा, सचित्र.

११ *प्राचीन काळच्या कथा*
बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई, १८७९, १६ षोडशपत्री साचा, किमत १ आणा, सचित्र, नोहा, अब्राहम, त्याचे पुत्र यांच्या गोष्टी.

१२ *मोश्याची कथा*
बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई, १८७९, पाने १६. षोडशपत्री साचा, किंमत १ आणा, सचित्र, १५ मोश्याचे मरण, मोश्याची निवड, (५.१×४) अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई.

### कादंबरी

१३ *यमुनापर्यटन अथवा हिंदुस्थानातील विधवांच्या स्थितीचे निरुपण*
१ ली आवृत्ती, टॉम्स ग्रॅहम यांचा छापखाना, मुंबई, १८५७.
(७×४.२) १२+२७+१८+१६१+७. आरंभी दादोबा पांडुरंगकृत हिंदु विधवांच्या पुर्नविवाहासंबंधी संस्कृत निबंध व त्याचा मराठी गोषवारा आहे.
दुसरी आवृत्ती : ७+१५१ ते १६७ (६.८ × ४) मुंबईत निर्णयसागर छापखान्यात छापिले, सन १८८२, किंमत ३ आणे.
तिसरी आवृत्ती : मुंबईत निर्णयसागर छापखान्यात छापिले.
१८९०, ७+१५१—१५१ ते १७१, पुरवण्या ७.
चवथी आवृत्ती : बॉम्बे वैभव प्रेस, मुंबई, प्रकाशक ई. व्ही. पदमनजी, मुंबई, १९३७, किमत १ रुपया. १६+१५१—१५१ ते १७५ पुरवणी अंक १–८.

## टीका

१४ *उत्पत्ति म्हणजेच पवित्र शास्त्रातील पहिले पुस्तक (उत्पत्ति ह्यावर टीका)* मुंबई, १८६६.
१२+२५० (८.४×५.४) डॉक्टर Dr. Jamieson कृत मूळ इंग्रजी ग्रंथावरून बाबा पदमनजी ह्यांनी भाषांतर केले. (ओरिएंटल छापखाना, मुंबई)

१५ *एकनाथ चरित्र परीक्षा*
३२ पाने, १८९१ (पुस्तिका), धोंडो बाळकृष्ण सहस्त्रबुद्धे यांनी लिहिलेल्या एकनाथ चरित्राचे परीक्षण बाबांनी या पुस्तकात केले आहे. पुस्तक उपलब्ध नाही. त्याची नोंद *A Supplementary Catalogue of Marathi and Gujarati Books in the British Museum* complied by J. F. Blum Hardt., 1915, p. 10 वर आहे.

१६ *नव्या करारावर टीका*
बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई, १८७७.
२+५६७, १ ला भाग, १८७४ मध्ये छापला.
अष्टपत्री साचा ४ शुभवर्तमाने.
२+४+८५५ = २ रा भाग.
१८७७. प्रेषितांच्या कृत्यापासून प्रकटविण्यापर्यंत दोन्ही भागाची किंमत २ रुपये. प्रत्येक भागाची १ रुपया चांगली बांधणी ४ रु., उत्तम बांधणी ८ रुपये.
बारीक टाईप, सुरेख व निर्मळ रीत, अक्षरशः भाषांतर नाही.
ट्रॅक्ट सोसायटीच्या सांगण्यावरून बाबांनी हा ग्रंथ केला.

## कोश

१७ *A Comprehensive Dictionary—English and Marathi*
*(क्यांडीकृत इंग्लिश मराठी कोशाचा संक्षेप)*
टॉमस ग्रॅहम याचा छापखाना, मुंबई, १८६०, किंमत ४ रुपये, २२,००० पेक्षा अधिक शब्द.
दुसरी आवृत्ती : एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई, १८७०. १४+४+६८० (९.९×६.५) किंमत ७ रु.
तिसरी आवृत्ती : एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई, १८८९, किंमत ४, रु. १२ आणे साधा टैप, व्यवस्था, छापणावळ, वगैरे फार सोयीची.

१८ *Abridgement of Molesworth's Dictionary—Marathi & English*
*(मोल्सवर्थकृत मराठी इंग्रजी कोशाचा संक्षेप)*
एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई, १८६३, अष्टपत्री साच्याची सुमारे ५०० पष्ठे, सुंदर जाड कागदाची प्रत ६ रु., साधारण पातळ कागदाच्या प्रतीस ५ रु., २९,०००

पेक्षा जास्त शब्द. शब्दांचा अनुक्रम शब्दाच्या कुटुंबाप्रमाणे, म्हणजे गुच्छ पद्धतीचा.
२ री सुधारून वाढवलेली आवृत्ती : एज्युकेशन सोसायटीचा प्रेस, भायखळा, १८७५, २२ + ६२४, किमत ५ रुपये, ३१,००० च्या वर शब्द.
३ री आवृत्ती – मुंबई एज्युकेशन सोसायटीचा प्रेस, मुंबई, १८८२. २१ + ६२४ (८.४×५.५), किमत ४ रु. १२ आणे.
४ थी आवृत्ती – इ. स. १८९०.

१९ *शब्दरत्नावली*
टॉमस ग्रॅहम याचा छापखाना, मुंबई, १८६०. ६ + १०० (७.१×४.२) द्वादशपत्री, किमत १२ आणे. मराठी–मराठी व मराठी–इंग्रजी, रॉजेट थेसॉरसच्या धर्तीवर रचना.

२० *संस्कृत–मराठी शब्दकोश*
निर्णयसागर प्रेस, मुंबई, १८९१, गृहोपयोगी व शालोपयोगी पॅकेट साईज. १४ + ३४० (४.५×३.५) किमत १२ आणे, रुढ व्यावहारिक संस्कृत शब्दांचे अर्थ.

## इतिहास

२१ *लूथरचा इतिहास* (दुसरी आवृत्ती)
ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई, १८९१. १ ल्या आवृत्तीत ॲक्ट सोसायटीचे एडिटर बाबा पदमनजी यांनी काही भर घालून तपासून काही मजकूर अधिक घालून वाढविली. १ ली आवृत्ती ४० वर्षांपूर्वी म्हणजे इ. स. १८५० साली एका परदेशीयाने केली होती. ११ + १९० (७×४), किमत ४ आणे.
२ री आवृत्ती सुधारून वाढविलेली मुंबईमध्ये निर्णयसागर छापखान्यात छापिली.

२२ *पहिल्या तीन शतकातील ख्रिस्ती मंडळीच्या अंतर्गत इतिहासाची कित्येक अंगे*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, जॉईंट स्टॉक प्रेस, मुंबई, १८९२. ४ + ५४ (७.२ × २.४), किमत ८–
हा लहानसा निबंध इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर आहे.

२३ *शाळांकरितां महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास*
ख्रिश्चन व्हर्नाक्युलर सोसायटी, ओरिएंटल प्रेस, मुंबई, १८६६. ४ + ६ + ८६ (६.३×४), दुर्मिळ, किमत २ आणे.
मराठी व इंग्लिश ग्रंथांच्या साहाय्याने तयार केले.

## स्त्रीविषयक

२४ *स्त्रीविद्याभ्यास निबंध*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅंड बुक सोसायटी, अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, १८५२.
४ + ५ + ५९ (७.२×४.२) किमत २ आणे.

२५ *स्त्रीकंठभूषण*

ख्रिश्चियन व्हर्नाक्युलर सोसायटी, मुंबई, १८६८. ८ + १४९ (७.२×४.४), सचित्र. किमत ४ आणे.

## शिक्षण

२६ *मुलांकरिता ४ थे पुस्तक*

ख्रिश्चन व्हर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटी, ट्रॅक्ट सोसायटी तर्फे प्रसिद्ध झाले. मुंबई, १८६२, द्वादशपत्री, २४५ पृष्ठे, १८० पाठ आहेत. विद्या, शास्त्र, इतिहास, नीती इ. विषयांवर यातील काही पाठ *ज्ञानोदयावरून* तयार केले आहेत. उपयोगी व हितकारक पुस्तक. किंमत ०–६–०. (२०–७–१८९९, *ज्ञानोदय*, पृ. २३२.)

२७ *वाचनपाठावली*

ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई, १८८४, १ + २ + २ + १५३ (अष्टपत्री साचा), सुमारे १६० पाने, किंमत ८ आणे, एकूण ५० वेचे आहेत. पैकी कित्येक *ज्ञानोदयातून* घेतले आहेत. धर्म, नीती, रीती, भाती, यात कसकसा फरक पडत गेला हे कळते. ख्रिस्ती, सुधारक हिंदू यांचे विचार समजतात. वेच्यांच्या विषयानुसार क्रम लावला नाही. रे. डॉ. बिसल, रे. रामकृष्णपंत मोडक व बाबा पदमनजी यांनी निवडलेले उतारे यात आहेत. बाबांनी या पुस्तकात (१) नवीन सदरे घातली. (कित्येक विषयास नवीन सदरे घातली.) (२) कित्येकांस वर्तमानपत्रातील निबंधाचे स्वरूप बदलून लेखाचे स्वरूप दिले. (३) कित्येकांची भाषा सुधारली, टीपा दिल्या, सन दिले इ. कार्य बाबांनी या पुस्तकासाठी केले.

२८ *शिक्षा पद्धति भाग १ व २*

पृष्ठे द्वादशपत्री, ४४ (१) शिक्षेचे प्रकार, (२) व्यवस्था, (३) प्रश्न विचारणे, (४) वाचन, (५) वर्णरचना व लेखन ही ५ प्रकरणे पंतोजीस पढविण्यास उपयुक्त.
(*ज्ञानोदय*, १६ डिसें. १८६१, पु. २० अंक २४, पृ. ३७२.)

२९ *अर्वाचीन ग्रंथकर्त्यांच्या अडचणी*

हा लहानसा निबंध आहे. यात या देशातील ग्रंथकर्त्यांच्या अडचणींचा विचार केला आहे. *सत्यदीपिका* या बाबांच्या नियतकालिकातच तो प्रसिद्ध झाला होता.

## स्फुट

३० *कुटुंबाची सुधारणा*

शिळा प्रेस, दक्षिणा प्राइज कमिटी, पुणे, पाठशाळा, १८८५.
४ + ११९ (७.८×५) तपासून शुद्ध करणारा नाना शास्त्री.

*कुटुंब सुधारणा*

हिंदु डोमेस्टिक रीफॉर्म, बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई, १८५१, अमेरिकन मिशन छापखान्यात छापले. ६० (५.१×४)

३१ *जातिभेद विवेचन*

ट्रॅक्ट सोसायटी, अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८१, ४+६१ (५.१×४) ०॥· (दोन पैसे) मासिक मराठी निबंधाच्या साच्याचे दोन भाग. १ ला भाग : ४ प्रकरणे. ३ ऱ्या भागात दोन प्रकरणे. जातिभेद सृष्टी, नीती, बुद्धी, सध्दर्भ विरुद्ध आहे. जातिभेदापासून तोटे व ब्राह्मण जातिविषयी ही दोन प्रकरणे दुसऱ्या भागाची. जातिभेद ईश्वरस्थापित नसून सुज्ञांनी तो पाळू नये.

३२ *निबंधमाला*

दक्षिणा प्राइज कमिटी, पुणे, १८६०, बाळकृष्ण रामचंद्र ठकार प्रेस, पुणे. (शिळा प्रेस) ४+१७८ (७.२×४.१) ***सर्वसंग्रही*** या नावाचा ग्रंथ १८५२ मध्ये तयार केला. नंतर त्याचेच नाव *निबंधमाला* ठेविले. बरेच उपयुक्त निबंध गाळून दक्षिणा प्राईज कमिटीने तो संग्रह प्रसिद्ध केला. पुष्कळ विषय इंग्रजी ग्रंथावरून भाषांतरित केले व बरेच ग्रंथकर्त्याचे स्वतःचे आहेत. दक्षिणा प्रैज कमिटीचे १२० रु. इनाम. छाप सुंदर नाही. पुसट. विषय उपयोगी मनोरंजक, ज्ञानदायक. निसबिट प्राइज रु. २५ याच ग्रंथास मिळाले होते.

३३ *नेपोलियन बोनापार्टीची शकुनवंती*

*Nepolian's Book of Fate* या पुस्तकाचे भाषांतर बाबा पदमनजींनी केले. बाबा पदमनजी सरकारी शाळेत असताना इ. स. १८४८ च्या अगोदर (कारण हे पुस्तक एडनला जाण्याच्या सुमारास केले असे ते *अरुणोदया*त म्हणतात). स्वखर्चाने वडिलांनी १००० प्रती काढल्या. सखाराम अग्निहोत्री यांच्या शिळा छापखान्यात छापल्या. त्या फुकट वाटण्यात आल्या.

३४ *बोधपर निबंध*

इ. स. १८५१च्या पूर्वीचे बेळगावच्या मिशन शाळेत असताना बाबा पदमनजींनी त्यांच्या वर्गातील एका ब्राह्मणाच्या मुलाचे वर्तन सुधारण्याकरिता लिहिलेला निबंध. अप्रसिद्ध.

३५ *मूर्तिपूजेविषयी संभाषण*

बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८१. ८+१०० (७.२×४.२) ०-॥ द्वादशपत्री वाचा छाप सुंदर.

३६ *साहित्य शतक*

अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, कि. ४ आणे. द्वादशपत्री साच्याची ७० पृष्ठे, १८७६, यात १०० विषय आहेत. अनेक संस्कृत व प्राकृत वेच्यांचा संग्रह, पोट विषय – १६९. आवृत्ती दुसरी, पृ. ६८, किंमत २ आणे.

३७ *व्यभिचारनिषेधक बोध*

मुंबईमध्ये अमेरिकन मिशन छापखान्यात छापिले. इ. स. १८५४ भाग १–२ स्वतः छापून प्रसिद्ध केले. १०+९२+७ (७.२×४.२) एकत्र आहेत. किंमत प्रसिद्धीपूर्वक ५ आणे, प्रसिद्धीनंतर ६ आणे.

## धार्मिक

३८ *आत्मारामपंत व मृत्यू शिपाई यांचा संवाद*

प्रथम *ज्ञानोदयात* पृथक पृथक प्रसिद्ध. (४ डिसेंबर १८५५) पृ. ३६१ एज्युकेशन सोसायटीचा छापखाना सेवा प्रेस. मोडी इंग्रजी व पद्य या स्वरूपात देखील हे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. पाने ४० किमत पाव आणा. (५.६ × ३.६) ६ वी आवृत्ती, १८७५. १० वी आवृत्ती पाने २४ (५.६ × ४.३)

३९ *आदामा तू कोठे आहेस?*

*सत्यदीपिकेत* प्रथम भाषण छापले. अहमदनगर येथील अमेरिकन मिशनच्या देवळात प्रथम सत्यदीपिकेच्या कर्त्याने बाबा पदमनजींनी हे भाषण दिले. हा उपदेश थोडा फार सुधारून १८७६ च्या *सत्यदीपिकेच्या* १२ व्या अंकात पृ. १७९ ते १८८ असे हे भाषण छापले आहे.

४० *आक्षेप विवेचन*

बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, जॉइंट स्टॉक प्रेस, मुंबई, १८९२. ४ + ८७ (७.२ × ४.२) किमत अर्धा आणा.

४१ *आमची भक्ति संबंधीची पापे वाहणारा उपाध्या*

बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, मुंबई, १८६२, पाने ५२ (४.८ × ३.८) किमत अर्धा आणा. ८।। मुंबई एक्स्चेंज प्रेस, १ आणा.

४२ *उपदेशरत्नमाला*

बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, ॲंग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८०, २ + २१०, किमत ४ आणे.

आवृत्ती २ री, प्रेस उ. नि., १८८२, ४ + २१४ (७.२ × ४.२) कि. ८।=

Select Sermons

४३ *उद्धार मार्ग विज्ञान*

बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी मुंबई, ॲंग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८७८, ८ + १४८ (७.२ × ४.२) *Philosophy of the Plan of Salvation* चे भाषांतर. किमत माफक.

४४ *ओळीवर ओळ भाग १*

ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, मुंबई, १९१८, प्रका. रेव्ह. जे. स्मिथ.

*बाल बोध गोष्टी भाग १ ला*

(*लाईन अपॉन लाईन* या इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर) प्रकाशक रेव्ह. जे. स्मिथ, ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, मुंबई, १९१८. कागदी बांधणी कि. ८ आणे, कापडी बांधणी कि. १० आणे. २ + २३६ (६ x ४.६).

४५ *ओळीवर ओळ भाग २*

*बालबोध गोष्टी भाग २*

(*लाईन अपॉन लाईन* ह्या इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर) प्रकाशक रेव्ह. जे. स्मिथ, ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, काळबादेवी, मुंबई, १९१८. ए. ए. मोरमकर यांचा लक्ष्मी प्रेस, मुंबई, २+१७२ (६×४.६). युरोपियन कुटुंबातील मुलांकरता *Peep of Day*, *Line upon Line* अशी काही सोप्या भाषेतील पुस्तके आढळतात. त्याच धर्तीवर प्रस्तुत ग्रंथ बाबा पदमनजींनी लिहिला. हल्ली त्याचे नाव *बालबोध गोष्टी* असे आहे. (भा. कृ. उझगरे – *मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास*) १८९१ साली जाहिरात : *ओळीवर ओळी*. *Line upon Line* has been thoroughly revised and ready for the use in Schools. Price As. 12.

१ला व २ रा भा १२+३७७, किंमत १२ आणे, निर्णयसागर छापखाना, एकत्र बांधणी. सोनेरी अक्षरात नाव, इंग्रजीचे भाषांतर, भाग १, दु. आ. कि. ४ आणे.

४६ *कृष्ण आणि ख्रिस्त यांची तुलना*

बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, ओरिएंटल प्रेस, मुंबई, ३ री आ., १८७१. ४ थी आ. १८८५. ४+४८ (८.४×४.५) एका एका पृष्ठावर दोन मोडी (कॉलम). एका मोडीत कृष्णाची माहिती, त्याच्या समोर दुसऱ्या मोडीत ख्रिस्ताची माहिती – अवतार, जन्म, कार्य, देवत्व, २ मुद्यांवर तुलना, किमत १ आणा, छापा सुंदर आहे.

४७ *ख्रिस्त आमचा त्राता*

१९०४, *अनुभवसंग्रह भाग २*, पृ. ५१ वर 'दुसरे व्रावट', ख्रिस्त आमचा त्राता व कित्ता हे सुधारून तयार होत आहे. १९ मार्च १९०३. यासाठी मला ख्रिस्ती भावाबहिणींचे सहाय्य झाले असे बाबा व पदमनजी म्हणतात. *धाकट्या सत्यदीपिकेत* 'ख्रिस्त आमचा कित्ता' हा लेख आला आहे.

४८ *ख्रिस्तवर्तन*

अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, द्वादशपत्री, ६१ पृष्ठे, कि. १ आणा.

४९ *ख्रिस्त जिणे व हिंदु जिणे यांची तुलना*

बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, आर्फनेज प्रेस, पुणे, १८८१.
६+९९ (५.५×३.५) ०॥· (अर्धा आणा).

५० *ख्रिस्ती लोकांचे कर्तव्यसार*

बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, एज्युकेशन सोसायटीचा प्रेस, १८५९, १ ली आ.; १८७२ आ. २; १२+८५ (७.२×४.२) किंमत दोन आणे. (*A Manual of Christian Duties*–इंग्रजी नाव).

५१ *गणेशचतुर्थी*

बॉम्बे ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई, १८९१. फुकट वाटण्याकरिता.

५२ *गोकुळ अष्टमी*

बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, मुंबई, १८९१, फुकट वाटण्याकरिता निबंध छापला. किमत ०–०–३ (२७–७–१८९९, पृ. २३२, *ज्ञानोदयात* वृत्त.)

५३ *नासिक क्षेत्राची यात्रा*
बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८२, षोडशपत्री साचा, पृष्ठे ३२, किमत अर्धा आणा.

५४ *निःशास्त्रवाद परिक्षा*
बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, अमेरिकन मिशन छापखाना, मुंबईमध्ये अँग्लो व्हर्नाक्युलर छापखान्यात छापिली. १८५८. (*Examination of the Claims of Deism*) २३ + १६४ (७.२x४.२) कि. २ आणे. (किमत ३ आणे १५ + ४ + १८६, १८८६) द्वादशपत्री पृष्ठे १८८.

५५ *पहारेकन्याची वाणी*
१ ली आ. १८६५, आ. ३ री १८८२. ४+५६ (७.२×४.२). ट्रॅक्ट सोसायटी, आर्फनेज प्रेस, पुणे. M.B. Cohen कृत पुस्तकावरून भाषांतर. *The Watchman's Voice*.

५६ *पित्याकडे जाणे*
निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९०४, ४+२८ (७.२x४.२) ८=
Henry Drummond वृत्त Ideal Life च्या एका लेखाच्या आधारे बाबा पदमनजींनी स्वतः प्रसिद्ध केले. प्रती त्याच्याकडे मिळतील. Tr. अत्यंत महत्त्वाचे.

५७ *पुरंधर तालुक्यातील समस्त लोकांस पत्र*
मुंबई एक्स्चेंज छापखान्यात छापिले. १८६४, पाने १४. (१३ × १०) सी. एम. एसस. प्रथम *ज्ञानोदयात* संपूर्ण प्रसिद्ध. *ज्ञानोदय* १७–७–१८६४. पृ. २१०. व्हैटसाहेबाचे मरण व त्याविषयी लोकांना जाणीव करून देणारे पत्र. त्याचेच पुस्तक केले.

५८ *पंढरीचा वारकरी*
बॉम्बे ट्रॅक्ट बुक सोसायटी, लहान साच्याची ३२ पृष्ठे, किमत पाव आणा.

५९ *प्रभु भोजन घेणाराचा साथी*
षोडशपत्री साच्याची २१६ पृष्ठे, किमत ४ आणे, रंगीत कापडाची ८ आणे, ट. ह. प्रतीस १ आणा, निर्णयसागर छापखाना. स्वतःसाठी अर्ध्या किमतीस *Bickerstehon the Lords Supper* संक्षिप्त नाव. १३ वर्षात ९ आवृत्त्या.

६० *बंदखलास*
बॉम्बे ट्रॅक्ट अँण्ड बुक सोसायटी, मुंबई, १८८२, २ री आ., मराठीत भाषांतर केले, ऑर्फनेज प्रेस, पुणे, पृष्ठे २८. (५.१×४). *Opening of the Prison, an Address by James Hamilton D.D.* चे भाषांतर

६१ *बावाचा कावा*
विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्यावर ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या दृष्टीकोनातून लिहिलेले पुस्तक (टीकात्मक स्वरूप) या पुस्तकाचा उल्लेख माडगावकरांच्या *मुंबई वर्णन* पृ. ३४६ वर आला आहे.

६२ *भगवद्गीता*
(शास्त्रमत परीक्षा) बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी. मुंबई, १८९१, २३२, (*ज्ञानोदय* २०–७–१८९९). बाबांनी हा एक निबंध सी.बी.ई. सोसायटीकरिता लिहिला. निर्णयसागर छापखान्यात छापिला. किंमत अर्धा आणा.

६३ *मत परीक्षा*
*Examination of Religions.*
Translated from Sanskrit into Marathi, 1st edition.
अमेरिकन मिशन छापखाना, मुंबई, १८५६, ७६ (७ × ४).

६४ *मत परीक्षा भाग २*
१८५८, पाने १३६ (७ × ४).
Translated from Sanskrit into Marathi.
मुंबई अमेरिकन मिशन छापखाना, ख्रिस्ती मत धर्म परीक्षा भाग २.

६५ *मानवधर्म शास्त्र : मनुसंहिता कोणी लिहिली ?*
दी ख्रिश्चियन व्हर्नाक्युलर एज्यु. सोसायटी, निर्णयसागर छापखान्यात छापिले. १८९०, किंमत ½ आणा. १ + २७ (७.२ × ४.२) सी.बी.ई. सोसायटीकरिता निबंध लिहिला.

६६ *मिसेस अॅनी बिझेंट बाअीच्या आत्मोन्नती विषयक व्याख्यानावर चर्चा*
*My Tract on Mrs. Annie Beasant*
मिसेस अॅनी बिझेंटच्या लेक्चरासंबंधीचे त्राकट, १९–३–१९०३.

६७ *मुहूर्त ज्योतिष*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, १८९१, दिसण्यात अति सुंदर, अतिस्वस्त, मार्गदर्शक, सर्वांनी घ्यावे असे पुस्तक–हा उल्लेख *ज्ञानोदय*. २०–७–१८९९ पृ. २३२ वर आहे. *सत्यदीपिका* पृ. ३ रे, एप्रिल १८६३, अंक ४. नदी पुस्तके वगैरेमध्ये उल्लेख. बाबांनी हा निबंध सी.बी.इ. सोसायटीकरिता लिहिला. आणि तिने तो निर्णयसागर छापखाना, मुंबई येथे छापिला.

६८ *रामनवमी*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, बाबांनी हा निबंध (ट्रॅक्ट) हस्तपत्रिका फुकट वाटण्याकरिता निबंध छापला. (उल्लेख : *अनुभवसंग्रह भाग २*, मराठी यादी पा. २)

६९ *लाभालाभ*
म्हणजे ब्राह्मण धर्माने हिंदुस्थानकरिता काय केले व ख्रिश्चन धर्म त्याकरिता काय करील? ख्रिश्चियन लिटरेचर सोसायटी, मुंबई, १८९४, २ + ४ + ३ ते १६२ (७.२ × ४.२) ८=, व्हिक्टोरिया प्रिंटिंग प्रेस, मुंबई, १ ली आ.

७० *वेदधर्मी लोकांचा वृत्तांत*
ख्रिश्चियन व्हर्नाक्युलर सोसायटी, एक्स्चेंज प्रेस, मुंबई, १८६१, १३ + ४४ (७.२ ×

४.२) पाने ४४, किंमत २ आणे, Dr. Willson कृत *India in Vedic Times* नामक ग्रंथाच्या आधारे, दो. मु., पृ. ९३.

७१ *वेदांत काय आहे ?*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, अॅंग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८०, पाने ७२ (५.१×४), किंमत १ आणा.

७२ *वैदिक हिंदु धर्म*
एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई, १८९२, ६ + १४६ (८.४×५.४), किंमत ८≡.

७३ *वेद कोणी लिहिले ?*
हा एक निबंध बाबा पदमनजींनी सी.बी.ई. सोसायटीकरिता लिहिला. तो तिने निर्णयसागर छापखान्यात छापिला. किंमत अर्धा आणा. १२ मार्च १८९१ च्या ज्ञानोदयात पृ. ८२ वर 'नवीन पुस्तके' या सदरात याची पोहोच आली.

७४ *शंकानिवृत्ति*
बॉम्बे ट्रॅक्ट सोसायटी, मुंबई, १८७९, द्वादशपत्री साचा, २९ पृष्ठे, किंमत अर्धा आणा.

७५ *सत्यवेदांत काय आहे, भाग १ (२ री आ.)*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, आर्फनेज प्रेस, पुणे, १८८२, ६ + ४८ (५.१×४) ८=, १ + २ + ४८ (५×४). एकूण ९ प्रकरणे आहेत.

७६ *सत्यवेदांत काय आहे, भाग २*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, अॅंग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८८०. ४ + ६६ (५.१×४) ८=.

७७ *स्वर्गवर्णन*
हिंदु व ख्रिश्चन धर्म यांच्या पुस्तकांत वर्णिलेला स्वर्ग.
बॉम्बे ट्रॅक्ट सोसायटी, अॅंग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई, १८७८. ४ + ५९ (७.२×४.२) ८– Heaven as is described in the Hindu and Christian Scriptures—Baba Padmanji.

७८ *सिद्धान्त रत्नमाला*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅंड बुक सोसायटी, ओरिएंटल प्रेस, मुंबई मध्ये छापिली, १८६६. १२ + १०८ (७.२×४.२) ३ री आ. कोल्हापूर ट्रॅक्ट सोसायटी, मिशन, १२ + ११२ (७.२×४.८) ८–॥. २ री आ. पृष्ठे १२२.

७९ *सुप्रभात*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी. एक्स्चेंज प्रेस, मुंबई, १८६४. २ + ११५ (७.२×४.२) ८≡ १८९३, २ री आ., पृष्ठे १११. किंमत बांधणीप्रमाणे २ व ३ आणे. *Daybreak in Great Britain* चा अनुवाद.

८० *शकुन, मुहूर्त याविषयी*

बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, धोबी तलाव, मुंबई, ०-०-६.

८१ *श्रावणी व नारळी पौर्णिमा*
१८८०, लहान चोपडी, एक दोन पुरवण्या, छाप बरा पण चुका फार. वाद निर्माण झालेले पुस्तक. ज्ञानोदय परीक्षण. बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, मुंबई.

८२ *श्री श्रीयेशुख्रिस्तकृत शांति कल्याण दायक सुसंवाद*
(ख्रिस्तराज्यासंबंधी अष्ट आशीर्वचनांचे विवेचन)
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, अँग्लो व्हर्नाक्युलर प्रेस, मुंबई,
२६० पाने. (७ × ४.६) १८७९, मात्थीचा ५ वा अ.

८३ *श्री येशु ख्रिस्ताची चमत्कारिक कृत्ये*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, मुंबई, १८७९, षोडशपत्री साचा, १६ पाने, किंमत १ आणा. ख्रिस्ती व इतर लोक व मुले यांना उपयुक्त. मोशे व अलिशा यांच्या योगाने व ख्रिस्ताने दाखविलेले चमत्कार.
(५.१ × ४) सचित्र, रंगीत चित्रे आहेत.
१) पान ३ – वाळलेल्या काठीस अंकुर फुटले. चित्र पा. ४.
२) पान ५ – खडकांतून पाणी निघाले हे चित्र. मजकूर ६.
३) पान ७ – आलिशाला कावळ्यांनी अन्न आणले. चित्र पां. ८.
४) माशांची चमत्कारिक धरणी चित्र पा. ९ चमत्कार पा. १०.
५) पान ११ – चमत्कार पाच हजार मनुष्यांस जेवू घातले. चित्र पा. १२ वर.
६) पान १३ – चित्र पा. १४. एक चांगला बरा झाला.

८४ *हिंदुधर्म व ख्रिस्ती धर्म यांची तुलना १८६२*
आ. २ री, बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, एक्स्चेंज प्रेस, मुंबई. १८८२ ५ वी आ.
१२ + ७९ (७.१ × ४.२) ८॥.

८५ *होळी*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटीने फुकट वाटण्याकरिता हा निबंध छापला. १८८२ व १८९१.

८६ *हिंदु जिणे व ख्रिस्ती जिणे यांची तुलना*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, आर्फनेज छापखाना, पुणे, १८८१. पाने ९९
(५.६ × ४), किंमत अर्धा आणा.

८७ *हिंदु वाचकांकारिता ख्रिस्त धर्माचे स्पष्टीकरण*
एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई, ख्रिश्चन व्हर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटी प्रकाशन, १८९२. पाने ११८ (७ × ४.१), किंमत २ आणे.

८८ *हिंदुधर्म व ख्रिस्ती धर्म यांची तुलना*
बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी, मुंबई, १८८२, अँग्लो व्हर्नाक्युलर छापखान्यात छापिले. ५ वी आ. ६ + ९३ (७ × ४) दहा संभाषणे अधिक पुरवणी (४थी आ.

१८७८, जानेवारी) (यानंतर २८ डिसें. १८६६ या साली सुधारून वाढविलेल्या आवृत्तीत उल्लेख ही आवृत्ती छापून १२ वर्षे झाली. हा उल्लेख १८६२. म्हणून १८५० – १ली आ.

८९ *हिंदुभक्ति व ख्रिस्ती भक्ति यांची तुलना*
ख्रिश्चियन लिटरेचर सोसायटी, जॉइंट स्टॉक प्रेस, मुंबई, १८९३. २+२० (७.२×४.२) किं. ८–॥

९० *हिंदुधर्माचे स्वरुप भाग १*
बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १८८३. ४+२५१+५ (७.२×४.२) किमत ४ आणे. ४ थी आ., १९१३.

९१ *हिंदुधर्माचे स्वरुप भाग २*
बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १८८४. २री आ., किं. ६ आणे ८+३५६+८ (७.२×४.२) किं. ८ आणे. १ ली आ. १०००, २री आ. १५०० (१८८७) पुस्तकाच्या ९८ पुस्तकांची याद – ग्रंथसाहाय्यार्थ घेतलेली पुस्तके. सूचिपत्र आहे.

९२ *हिंदु लोकांच्या सणाविषयी निबंध*
बॉम्बे ट्रॅक्ट ॲंड बुक सोसायटी, ॲंग्लो व्हर्नाक्युलर प्रेस (१ ली आ. १८५३) आ. ४ थी मुंबई, १८८१, ८+८० (७.२×४.२) ८–॥.
ज्ञानोदय, १–११–१८५३; या निबंधास प्रथम बक्षीस मिळाल्याचा उल्लेख.

९३ *स्त्रियांकरिता दाखले व इतर गोष्टी*
पुस्तकांच्या मलपृष्ठांवर नोंद पण अनुपलब्ध.

९४ *ज्ञाननीति बोधसंग्रह*
बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी. मेथडिस्ट पब्लिशिंग हाऊस, छापखाना, मुंबई, १८९९. ४+८+८+३०३ (८.४×४.४), किं. ॥=

९५ *Stray Notes* (Original and Selected)
From My Interleaved Bible, Bombay, 1900. Printed at Meher Printing Press-works, 1900 A.D. 4 + 94 (8.3×5.6), Price 5 annas. Post free 6 annas.
Old Testament Composition and Price 5 annas. Post free 6 annas.
Old Testament Composition and Collection of his own notes on Bible on plane leaves in the Bible given him by Mr. White.

९६ *My Struggle for Freedom*
The Autobiography of Baba Padmanji, Edt. by Rev. M.P. Davis, Raipur, 1944, pages 94 (7×5).

## नियतकालिके

९७ *ऊदयप्रभा*

मार्च १८५६. ३ वर्षे चालले. नंतर ह्याचेच नाव *प्रभोदय*. १८५९ पासून बाबा पदमनजी ह्याचे संपादक झाले. *उदयप्रभेचे* नाव *प्रभोदय* झाले. मासिक. नेटिव्ह ख्रिस्ती धर्मप्रचार व लोककल्याण. किंमत थोडी. मराठी भाषेत. वर्गणीदार बरेच.

९८ *प्रभोदय*

इ. स. १८५९ (५९ ते ६२) १७ अंक एकत्र. धर्मांतर करून आलेल्या व ख्रिस्ती धर्म जिज्ञासूंसाठी बाबा पदमनजींनी हे नियतकालिक काढले. पहिल्या तीन वर्षांचे अंक शिळा छापाचे. मुंबईस बाबू हरशेट यांच्या छापखान्यात छापत. पण नंतर ख्रिस्ती धर्मप्रचार हा हेतू न आवडल्याने बाबू हरशेटने अंक छापणे बंद केले. नियतकालिक बंद झाले.

९९ *सत्यदीपिका (धाकटी)*

जाने. १८६१ ते १८७२. पु. १३ अं. २ फेब्रु. १८७३. मुलांसाठी चालविलेले सुंदर, लहान, सचित्र, रंगीत, किंमत थोडी, आकार लहान (५.३ × ४), केवळ १६ पृष्ठांचे, किंमत दर अंकास ४ पै. विषय चांगले व लाभदायक, कथा, चरित्रे, ज्ञानात्मक. प्राणी, शास्त्री इ. *ज्ञानोदय* उतारे घेई. १८७३ला बंद पडले. ख्रिश्चन व्हर्नाक्युलर सोसायटी-करितां १८७३, ओरिएंटल प्रेस, मुंबई, बॉम्बे ट्रॅक्ट सोसायटीतर्फे.

१०० *सत्यदीपिका (थोरली)*

मार्च १८७३ ते डिसेंबर १८७७. *धाकट्या सत्यदीपिकेपेक्षा* आकार मोठा. अष्टपत्री साचा. (९.७ × ६.१) फुटकळ अंकास ०–३. वर्गणी वर्षाची आगाऊ २–०–० रुपये. एशियाटिक प्रिंटिंग प्रेस, मुंबई, पु. २ अंक ९, नोव्हें. १८७४ (पृ. १३० ते १४४ १६ पाने) (मुखपृष्ठ धरून २० पाने).

१०१ *कुटुंबमित्र*

जानेवारी १८८४. चतुष्पत्री, प्रत्येक अंकात २४ पृष्ठे. मासिक. निर्णयसागर छाप-खान्यात छापीत. किंमत वर्षाला रु. १–५० एका अंकाला २ आणे. उपयुक्त व मनो-रंजक विषय असत. १८८६ साली बंद पडले (डिसेंबर).

१०२ *सत्यवादी*

पाक्षिक. फेब्रुवारी १८८२ साली सुरू. उपयुक्त नियतकालिक (*ज्ञानोदय*, १३-२-, १८९०, पृ. ५०).

१०३ *ऐक्यप्रदर्शक पत्रिका*

त्रैमासिक. वार्षिक वर्गणी १–४–० अष्टपत्री. लहान आकार. १८९३ मध्ये बंद पडले. ता. १९ जानेवारी १८९३ (*ज्ञानोदय*), किंमत दर अंकास अर्धा आणा, मासिक जानेवारी १८९३ पासून निघणार.

## शोध

*हिंदु जिणे व खिस्ती जिणे यांची तुलना* क्र. ४९ व ८६ व *हिंधर्म व खिस्ती धर्म यांची तुलना* क्र. ८४ व ८८ या पुस्तकांची नांवे दुबार पडली आहेत.

**बाबांच्या पुस्तकांच्या मलपृष्ठांवरील जाहिरातीत ज्या पुस्तकांचा निर्देश आहे, परंतु जी प्रत्यक्षात उपलब्ध नाहीत अशा पुस्तकांची नांवे.** (यांतीलबहुसंख्य पुस्तके प्रसिद्ध झाली नसावीत, असे वाटते.)

१ *मरण आणि न्याय*
२ *अंतःकरण कसे शुद्ध होईल?*
३ *एकनाथ चरित्र परिक्षा*
४ *शाब्बाथ दिवशी सैतान कोठे असतो ?*
५ *दुसरी प्रश्नोत्तरावली*
६ *तरुणाच्या मार्गाचे शुद्धिकरण*
७ *स्टॉंडर्ट साहेबाच्या मरणांविषयी सर्मन*
८ *मुलांकारिता २ रे व ३ रे पुस्तक*
९ *पुस्तक ३ऱ्या ची पुरवणी*

## टीपा

१. *ज्ञानोदय*, २१–२–१८८९, पृ. ६०.
२. *मराठी ग्रंथ सूचि–प्रथम खंड*, सं. शं. ग. दाते, पुणे, १९४३.
३. गं. बा. सरदार, *अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका*, पुणे, १९३७, पृ. ३९–४०.
४. कृ. भि. कुलकर्णी, 'ख्रिस्ती धर्मप्रचारातून निर्माण झालेलं वाङमय', *मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड ४ था*, सं. रा. श्री. जोग, पुणे, १९६५, पृ. १३९.
५. रे. भा. कृ. उझगरे, *मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास*, सासवड, १९३१, पृ. २३.
६. 'पुरवणी', *अरुणोदय*, २ री आ., मुंबई, १९०८, पृ. २४७, २४८.

परिशिष्ट ६

## बाबांची काही महत्त्वाची पत्रे*

### पत्र क्र. १ : विष्णुबुवा ब्रह्मचारी

*ज्ञानोदयाचे* कर्ते यांस,

वि. वि. *बाळबोध*नामक मासिक पुस्तकाच्या मार्च महिन्याच्या अंकांत विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्याविषयी एक स्वल्प निबंध आहे. त्यांत जी माहिती दिली आहे ती अपरती असून बाबांच्या गुणकर्मांचें वर्णनांत तर फारच अतिशयोक्ति व पक्षपातीपणा दिसून येतो.

बाबांनी आपणांस दत्तात्रयाचा साक्षात्कार झाला व उपदेश करीत फिरायाचा वर मिळाला असे जे लिहिले ते सर्व खरे आहे असे ह्या निबंधकर्त्यांस वाटते, व तें वाटण्यास प्रमाण काय? तर "येशू ख्रिस्त, महंमद, नानक यांस जे साक्षात्कार झाले ते त्यांचे अनुयायी खरे मानितात, असा ग्रह त्या त्या धर्माच्या लक्षावधि लोकांत दृढतम आहे. तर वि. बा. विषयीं तो ग्रह आम्हा वेद धर्माभिमानी लोकांत कां नसावा?" व : काय उत्तम वाद कोटि ही! केवढें हे दृढमय प्रमाण! व्हेटलीस लॉजिक बापडें ह्या तर्कसूत्रापुढें वेडावल्या सारखें होऊन कोठें गेले असेल कोण जाणें आणि गौतमाचा 'न्याय' तर गोते खात कोठे गवतांतर जाऊन लपला त्याचाही पता नाहीं.

असो. हे बाबा 'ख्रिस्ती धर्मोपदेशकांशीं वाद करण्यांत मोठे प्रावीण होते; त्या लोकांच्या कोटचा त्यांच्याच गळयांत कशा अडकवाव्या आणि त्यांस कसें निरुत्तर करावें हें सामर्थ्य त्यांचें इतरांस असो; पण प्रसिद्ध डॉ. विल्सन, रे. भि. मंगर यांस देखील चांगले ठाऊक झालें होतें,' असे *बाळबोध*कर्ते म्हणतात.

ह्या लेखावरून बाबाच्या ह्या स्तुतिपाठकास त्यांच्याविषयींची किती थोडी माहिती आहे व जर असली तर ती प्रामाणिकपणाने लोकांपुढे ठेवल्यास ते किती नाखूष आहेत हें स्पष्ट दिसून येतें.

ह्या विषयाच्या संबंधाने मी प्रथम स्वतः कांही न लिहिता बाबाच्या वेळीं वर्तमानपत्रांतून जी चर्चा चालत असे त्यांतून कांहीं उतारे देतो. मुंबईत बाबाचे धर्मसंबंधी वादविवाद चालले असतां (१८५७ स्रांत) 'बावाचा कावा' या नांवाचे एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध झाले होते तें 'No hope from the Bawa' ह्या सदराचें एका हिंदु गृहस्थाने लिहिलेल्या निबंधाचें भाषांतर होतें. त्यांतील एकदोन उतारे येथे देतो.

* ही सर्व पत्रे मुळाप्रमाणे छापलेली आहेत.

'बावा म्हणतात कीं परलोक, स्वर्ग किंवा नरक म्हणून कांहीच नाहीं, जें सर्व कांहीं आहे तें येथेंच आहे. मरणानंतर आत्म्याचा विलय होतो.'

''हे बावा हिंदूच्या सभेंत असले म्हणजे त्यांच्या सारखे बोलून त्यास वडिलोपार्जित धर्म आचरायास सांगतात. जेव्हां कोणी सुधारलेले तरुण त्यांपाशीं जातांत तेव्हां वेदपुराणें हीं खोटीं आहेत, जातिभेद नसावा, खाण्यापिण्यांत दोष नाहीं, (पर जातीच्या लोकांबरोबर) जेवलें असतां पाप नाहीं, अशा गोष्टी बोलतात, आणखी त्यांस असें सांगतात कीं,धर्माचें आवरण आपल्यास कशास असावें. खावें, प्यावें, चैन करावी, पुढें मेलों म्हणजे सर्व आटोपलें.'

'इंग्लिश लोकांविषयीं बावांस विचारलें असतां एकदां असें म्हणतात कीं, ते लोक मोठे सुधारलेले आहेत. त्यांचा धर्म चांगला, त्यांतील नीति चांगली. येशू ख्रिस्त हा उत्तम पुरुष होता. इतकेंच कीं तो वेदांती मात्र नव्हता. आणि पुन्हा हाच प्रश्न दुसऱ्याने केला म्हणजे हेच बावा सांगतात कीं, इंग्रज लोक रानटी, ते मांसभक्षक म्हणून फार क्रूर व निर्दय आहेत. त्यांचा धर्म अगदीं वाईट; ख्रीस्त हा मोठा ठक होता, मिशनेरी हे अक्षरशत्रु व नीतिभ्रष्ट व निर्दय व विषयद्वाड असे आहेत. याप्रमाणें हे बावा कढत व गार अशा विपरीत गुणें करून युक्त आहेत. अशांवर कोणी विश्वास ठेवावा? यांचा एक तरी गुण घेण्याजोगा आहे काय? यांस ढोंग्यांपेक्षा दुसरे नामाभिधान देववत नाहीं; ज्या मनुष्याची धर्म व नीति संबंधीं मतें दृढ नाहीत त्यांचा विश्वास धरणे हें मोठ्या जोखमाचे काम आहे. अशा पुरुषांपेक्षा दगडधोंड्यांच्या पायां पडणारा भाविक हिंदु बरा. परंतु अशाचा सहवास नसावा. एका वृद्ध हिंदूने मला असें सांगितलें कीं, या बावाच्या व्याख्यानांपासून नास्तिक मताचा मात्र फैलाव होईल, आणि ह्या बोलण्याचे खरेंपण दिवसानदिवस दृष्टोत्पत्तीस येत आहे.

'बावा मुंबईंत आल्यापासून एथील एका प्रख्यात व वजनदार मराठी वर्तमान पत्राने (*धूमकेतूने*) त्यांची चांगली खबर घेतली. त्या पत्राचा कर्ता विद्वान, विचारशील व स्वदेशाचें कल्याण इच्छिणारा आहे. त्यांस बावाचें कुळकट व काळें ढवळें समजल्यावरुन त्यांचें वास्तविक रूप लोकांस दाखविण्यासाठीं वारंवार आपल्या पत्रीं पुष्कळ लिहिलें व त्याचा पत्र पाठविणाऱ्यांनीही बावाच्या काव्याचा चांगला परामर्ष घेतला.'

*ज्ञानोदय* कर्ते महाराज, पत्रविस्तार फार झाला म्हणून क्षमा करावी. ह्या विषयास पुनः एक वेळ जागा द्याल अशी आशा धरून आतां आपला निरोप घेतों.

ख्रिस्तदास

५ मार्च १८८८.

*ज्ञानोदय*, ८ मार्च १८८८, पृ. ७५, ७६.

## पत्र क्र. २ : बाळबोध आणि विष्णुबावा ब्रह्मचारी

*ज्ञानोदयाचे* कर्ते यांस,

वि. वि. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांजविषयींचे आपण माझे पहिले पत्र छापिले म्हणून आपले उपकार मानितो. आतां कृपाकरून ह्या दुसऱ्या पत्रास जागा द्यावी.

*बाळबोधाचे* कर्ते म्हणतात कीं, 'वाद करण्याच्या कामांत बावा मोठे प्रवीण होते.' ज्याप्रमाणें मागच्या पत्रांत 'बावाचा कावा' या नांवाच्या एका हिंदूच्या पुस्तकातून उतारे घेतले होते, त्याप्रमाणें यावरील लेखनांच्या संबंधानें एका हिंदूने १८५६सांत मुंबईतील एका वर्तमानपत्रांत जें लिहिले होतें तें आपल्या वाचकांस कळवितो :

'सभा पांडित्य अवलोकन करणारा हिंदू' असे लिहितो की, 'लोकहो! बावासारखीं उत्तरें ओनामा व्युत्पन्न चिटलिंगही देऊ शकतील. मी प्रश्नोत्तररूप खाली मासला दाखवितो, यावरून बावांच्या विद्वत्तेची खातरी होईल.

प्रश्न हिं. शा. ईश्वरदत्त आहे त्यास प्रमाण काय? उत्तर अनुभव घेऊन पहावे. प्रश्न : मूर्तिपूजा करावी कीं नाहीं? उत्तर : शास्त्र वाचून पाहावें. प्रश्न : तीर्थयात्रा कराव्या कीं नाहीं? उत्तर : अनुभव घेऊन कळेल. प्रश्न : देव किती आहेत? उत्तर : शोधून पाहावें. प्रश्न : पुनर्विवाह करावा की नाहीं? उत्तर : अनुभव घेऊन पाहावा. प्रश्न : असें भगवें वस्त्र धारण करुन काय होते?' उत्तर : अनुभव घेऊन पाहावें. प्रश्न : ब्रह्मा, विष्णु आणि शिव याला देव मानावे कीं नाहीं? उत्तर : शास्त्र वाचल्यावर समजेल. प्रश्न : ब्रह्मचारी बावा, खरा धर्म कोणता? उत्तर : अनुभव घेऊन पाहा म्हणजे कळेल.'

'अशा रीतीनें प्रश्नोत्तरांचे भाकड पांडित्य बावांनीं चालविले ते बिचाऱ्या चिटलिंगास काय समजें? बावांचे अस्खलित वदनोद्भव पांडित्याचा एक सारखा प्रवाह चालला म्हणजे मुळांत वाटते कीं, असा त्रैलोक्य विजयी झाला आणि असा वक्ता दुसरा कोणी होणार नाहीं. याच्या पुढें साक्षात ब्रह्मस्पति आला तरी हे बावा त्याची चवळी उडवितील. असो. असे महान वीर तुंबाभिमानी यांच्या पाशीं हे बावा त्रैलोक्य विजयी झाले समजून त्रैलोक्य विजयी झाले असें कोणी समजूं नये. मला असें वाटतें कीं एकहि प्रश्नाचें उत्तर बावाच्यानें समर्पकदेववणार नाही.'

आता बावांच्या स्वकीय लेखांवरून त्यांच्या विचारांची योग्यता काय होती हें पाहूं. बावांनी *वेदोक्तधर्मप्रकाश* नामक एक ग्रंथ प्रसिद्ध केला. त्याला त्या काळांत 'गोबाळग्रंथ' असे विचारी लोकांनीं नांव दिले होते. व तो त्या नांवास योग्य होता. हें जे कोणी आपल्या मनाचे डोळे उघडून तो वाचतात त्यास दिसतो. ह्या ग्रंथाच्या प्रसिद्धीच्या समयीं त्याजवर वर्तमानपत्रांतून अनेक चर्चा झाल्या. त्यांतून कांही उतारे देण्याचे कारण नाहीं पण त्या ग्रंथांतूनच एक दोन मासलेवाईक वचनें देतो.

'राजनीति' ह्या प्रकरणांत बावा म्हणतात कीं, 'जर कोणी वेदोक्त धर्माच्या लोकांस वेदोक्तधर्म सोडण्याचा उपदेश करील, तर त्याला दुसऱ्याची मनुष्ये चोरून नेणाऱ्यास व विकणारास व घेणारास जी शिक्षा ती करावी.'

ठीक आहे. ही शिक्षा विष्णूस (विष्णू बावास नव्हे तर, विष्णु देवास) प्रथम केली पाहिजे. कारण त्याने बौद्ध अवतार घेऊन लोकांस वेदधर्म सोडण्यास उपदेश केला व सोडविलेही खरे. (वि. पु. अंश ३ अ. १८).

बावांनी 'सुखदायक राज्य प्रकरणी निबंधी' या नांवाचा एक निबंध लिहिला तो खरोखरच अनुपमेय आहे. त्याविषयीं ते स्वतां असें म्हणतात कीं, 'असा राज्यकारभार एका शतकापर्यंत चालेल तर दुसऱ्या शतकांतील प्रजा हल्लीच्या राजांना व न्यायाधिशांना ते मनुष्य नव्हते, ते जनावर होते, असे म्हणेल.'

ह्या 'वरदी' ग्रंथकाराच्या राज्य व्यवस्थेच्या नियमांपैकीं एक नियम येणेंप्रमाणें आहे :

'राजानें असें समजावें कीं, राज्य हेच एक घर व प्रजा हेच कुटुंब. राजानें प्रजेकडून सर्व जमिनीची लागवड करावी, गाई, म्हशी इ. साठीं गवत व मनुष्यांसाठीं अन्न उत्पन्न करून गांवोगांव कोठारें भरून ठेवावीं व त्यांतून सर्व गांवकऱ्यांनी नेत जावें. सोन्या रुप्याचे अलंकार तयार करून गांवोगांव ठेवावे व ते सर्व स्त्रीपुरुषांनीं बापरावे व पुन: राजाचें खजिन्यांत ठेवावे. सर्वांची लग्नें राजानें करावी. ज्याला जी स्त्री नको त्याला दुसरी करून द्यावी व तिला दुसरा पति करून द्यावा. सर्वांची पांच वर्षांचीं पोरं झाली म्हणजे मुली व मुलगे राजाच्या ताब्यांत द्यावी.'

बाबा कांहीं साधारण पुरुष नव्हते. त्यांस 'बा. बो.'च्या कर्त्यांच्या मताप्रमाणे केवळ एका दत्तात्रयाचाच वर मिळाला होता असे नाहीं, तर शंकरपार्वती, रामसीता ह्यांनीं अनेक वेळ अरण्यांत त्यांस दर्शन व वर दिला इतकेंच नाहीं तर ज्या जगदंबेचा तुकाराम बाबांनीं कायावाचामनेंकरून त्याग केला होता, व जिचे नांव सुद्धा वेदांत आढळत नाहीं, तिने त्या विष्णुबावास मांडीवर घेऊन व कुरवाळून त्याचा मुका घेतला! आणि ती त्यास पृथ्वीचे राज्य देत असतां ह्यांनीं ते घेतलें नाहीं. (वे. ध. प्र. पृ. ७३८–७४०)

अशा साक्षात्कार प्रचुर महापुरुषाचे ग्रंथ व मतें साधारण 'बाबा वाक्य'प्रमाणें म्हणायाचें नाहींत, तर ते श्रुतिवाक्य, आप्तवाक्य असें समजायाचें. फ्रान्स, जर्मनी इ. देशांतील कम्युनिस्ट सोशियालिस्ट इत्यादिकांस ही राजनीति पसंत होईल. कारण त्यांची मतें कांहीं प्रकारें अशीच आहेत. असो. तें तर दूर राहिलें, परंतु आमच्या लोकांनीं दारापुढे आलेल्या वाहत्या गंगेंत हात धुवून स्वदेश कल्याण करून घ्यावें. 'बा. बो.'कर्त्यांस आम्ही सुचवितो की, त्यांनीं ह्या राज-प्रकरणीं निबंधाच्या प्रति आपल्या नॅशनल कॉंग्रेस व सोशियल कॉंग्रेस ह्या सभेस पाठवाव्या, व त्यांतील नियमांप्रमाणें राजव्यवस्था करण्याविषयी त्या सभांच्या द्वारे वायसरायसाहेबांस अर्ज करावे. बाबासाहेब स्वता ह्या निबंधाच्या प्रस्तावनेत असे म्हणतात कीं, 'हल्ली या भूलोकांवर अनेक राज्यें आहेत. परंतु ती चालविणाऱ्या राजांना खरी राजनीति काय आहे हे माहीत नाही. व प्रजा कोणत्या उपायाने गुन्हे करणार नाहीं हे माहीत नाहीं! यामुळे सर्व राजे व सर्व प्रजा इत्यादी मनुष्यांत सर्वकाळ चिंताग्रस्त व हायहाय करीत फिरत आहे. यास्तव या लहानशा निबंधात लिहिलेली राज्य करण्याची रीत राजांनी पकडावी व प्रजेनें त्या राज्य रीतीप्रमाणें वागण्याची रीत पकडावी.'

बाबांच्या सच्छिष्यांनीं आजपर्यंत हा बोध कसा पकडला नाहीं हे समजत नाहीं. *बाळबोध* पुस्तक आज सात वर्षे चालत आहे व त्यांत देशकल्याणासंबंधी अनेक निबंध व अनेक विचारही छापले गेले परंतु ही वरदी पुरुषाची राजनीति व सामाजिक स्थिती सुधारकाची युक्ती लोकांपुढे ठेवण्यास त्याच्या कर्त्यास कसें सुचलें नाहीं? तर आतां त्यांनीं आळस न करितां हा महाबोध त्वरीत पडकडावा म्हणजे सर्व राष्ट्रीय व सामाजिक सुखें त्यांच्या घरी चालून येतील.

बाबांचा सर्व उपदेश ईश्वर प्रेरित आहे. ते ईश्वरास म्हणतात कीं, 'हे ईश्वरा जें कांहीं तूं बोलविलेस तें मीं बोललों. बोलण्यांत चूकभूल अथवा यथार्थ जें काय तू बोलविलेस तें मी बोललो'. (वे. ध. प्र. पृ. ७३९)

*ज्ञानोदय* कर्ते महाराज, ख्रिस्ती लोकांशीं बाबांनीं जे वाद केले त्या संबंधाने दोन शब्द मला लिहायचे आहे. ते पुढे लिहीन.

*ज्ञानोदय*, २२ मार्च १८८८, पृ. ९१, ९२. ख्रीस्तदास

## पत्र क्र. ३ : बालबोध आणि विष्णुबुवा ब्रह्मचारी–३

*ज्ञानोदयाचे* कर्ते यांस,

विनंती विशेष, ब्रह्मचारी बावांविषयी हें माझें तिसरें व शेवटचे पत्र आहे.

*बाळबोधाचे* कर्ते असे म्हणतात कीं, 'बावांस ख्रिस्ती लोकांस निरुत्तर करण्यास वेळ लागत नसे. हें जर खरें आहे तर ख्रिस्ती लोकांनीं बावांशी वाद करण्याचें कां सोडलें नाहीं? जोपर्यंत बावांनीं त्यांच्याशी वाद करण्याविषयी कंबर बांधली होती, तोपर्यंत ते त्यांच्याशी सामना करायला किंचितही मागे सरले नाहींत. ह्या गोष्टीचे मोठे प्रमाण 'समुद्रकिनारीचा वादविवाद' ह्या नांवाचें जें पुस्तक त्रा. सो. छापले आहे ते होय. ह्या पुस्तकांत बावांनीं मिशनेरी लोकांशी जे वाद दीर्घ काळ चालविले होते त्याची खरी हकीकत आहे. ती कोणी साधारण मनुष्यानें लिहिली नाहीं. तर ज्यांच्या साधुत्वाचें हिंदु व ख्रिस्ती सारखेच वर्णन करतात त्या बोएनसाहेबांनीं लिहिली असून ते ह्या वादांत प्रमुख होते. त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत बोएनसाहेब काय म्हणतात तें ऐका :

सन १८५६ या वर्षी सप्टेंबर महिन्यांत परभु लोकांच्या विद्यालयांत मीं त्यांशीं वाद करण्यास पुष्कळ वेळा गेलों. १८५७ च्या वर्षी मुंबई बेटाच्या पश्चिमेस समुद्र किनारीं बाबांनीं सभा चालू केल्या. जानुअरीच्या १५ व्या तारखेपासून पाऊस काळ लागे पर्यंत मीं त्या सर्व सभांस गेलों. ख्रिस्ती धर्म योग्य व अगत्याचा आहे आणि तो ईश्वर प्रणित आहे हे दाखविण्यास मिळालेला प्रसंग मी व दुसऱ्या पादरी लोकांनीं जाऊं दिला नाहीं. प्रत्येक भाषणाची हकीकत लागलीच इंग्रजीमध्ये लिहून ठेवीत असे आणि पुढच्या आठवड्यांत *बॉम्बे गार्डियन* पत्रांत छापून प्रसिद्ध करीत असे. या सभेतील कित्येकास इंग्रजीची माहिती होती. जर ह्या हकीकतीमध्ये कांहीं न्यूनता असतील तर त्यांनीं तेव्हांच तिचा शोध करून प्रसिद्ध केली असती. परंतु त्या सर्व हकीकती खऱ्या होत्या. साध्या पक्षकारानें ज्या शंका काढल्या त्या निःपक्षपातानें मीं प्रसिद्ध करण्यास फार काळजी घेतली. ज्या शंकांची निवृत्ती होणार नाहीं अशा शंका ख्रिस्तीधर्मा विरुद्ध काढणें कठीण अशी माझी खात्री होती.'

बावांनीं 'ख्रिस्ती लोकांशी वादविवाद करून त्यास चूप बसविलें व त्यांच्या तंगड्या त्यांच्या गळ्यांत घातल्या' हे *बाळबोधाचे* आणखी म्हणणें आहे. त्याला उत्तर सदरहू पुस्तकच आहे. *बाळबोधाच्या* कर्त्यांनीं हें पुस्तक पाहिलें नसेल असें वाटतें. अस आतां तरी त्यांनीं तें निःपक्षपातानें व लक्ष्य लावून वाचावें, म्हणजे बावाच्या शंका किती पळपळीत आहेत व त्यांच्या वाद कोटी किती निर्जीव आहेत हें त्यास समजेल. बावांस चर्वितचरवण करण्याची फार आवड होती. ज्या शंकांचे ख्रिस्ती लोकांनी यथार्थ उत्तर द्यावें त्याच त्यांनीं वारंवार लोकांपुढे आणाव्या व आपण मोठे ज्ञानी व चतुर आहो असा डौल मिरवावा असा त्याचा हेतु ह्या पुस्तकांत ठिकाणीं ठिकाणीं दिसण्यांत येतो. ह्या पुस्तकाच्या शेवटी बोएन साहेबांनीं असें लिहिलें आहे कीं, 'बावांशी वाद करण्यास मला हा प्रसंग मिळाला म्हणून मी देवाचे उपकार समजतों जी नास्तिक मतें या सभेंत निघालीं तीं मुंबईत फार दिवस घोटाळत होती आणि ज्यांनीं हीं मतें

धरली होती त्यांस आता समजलें कीं, ख्रिस्ती धर्म त्यांचें खंडन करण्यास समर्थ आहे.'

बावांच्या बोलण्यात व लिहिण्यांत कांहीं ताळ नव्हता. *समुद्रकिनारीचा वादविवाद* ह्या पुस्तकांत (पृ. ७७) त्यांस मिशनेरींचा एक असा प्रश्न आहे कीं, 'पारशी धर्म व मुसलमानी धर्म या विषयीं आपले मत काय आहे हें कृपा करून सांगावें. त्या धर्माचा मोड करायास तुम्ही का कंबर बांधत नाही? ह्यास बावांनीं असें उत्तर दिलें कीं, 'जर ते लोक हिंदु धर्माचा मोड करण्याच्या कामांत हात घालतात तर मी ही त्यांच्या धर्माचा मोड करण्यास यत्न करीन ख्रिस्ती धर्माखेरीज करून पारशी व मुसलमानी व इतर सर्व धर्म खुले आहेत असे मी मानतो.'

परंतु हेच बावा आपल्या धर्मप्रकाशांत (पृ. ३०१) असें म्हणतात कीं, 'मुसलमानी मत व नानक पंथीं शीखलोकांचे मत व दादू पंथी व कबीर पंथी व लिंगायत पंथी ही सर्व मतें वेदोक्त धर्माची निंदा करायास उत्पन्न झाली.' ह्या लेखाचा वरील उताऱ्याशी कसा मेळ जमतो हे *बाळबोध*कर्त्यांनीच पाहावें. ह्या मताविषयीं बावांनीं आणखीं असें लिहिलें आहे कीं, 'हीं सर्व मतें माझ्या पुढें वाद घालतांना लयास गेलीं.' खरेच काय? ख्रिस्ती लोकांशिवाय मुसलमान, कबीर पंथी, नानक पंथी इत्यादिकांशीं बावांनी कधी वाद घातला आहे असे बावा मुंबईत तर कोणाच्या ऐकण्यांत किंवा पाहण्यांत आलें नाहीं. असो.

परमार्थ साधनाच्या संबंधानें सगळे धर्म सारखे आहेत, त्यांत कमजास्त कोणताहि नाहीं, असा जो ग्रह आमच्या मंडळींत अलिकडे पुष्कळ दृढतर झालेला दिसतो त्या ग्रहास वि. बा. ब्र. ह्यांच्या भाषणांनीं आणि वादविवादांनीं पुष्कळ भर पडली असावी. *बाळबोध*कर्ते असे म्हणतात. पण बावा काय म्हणतात हे ऐका. (वे. ध. प्र. पृ. २५३) 'चिखलच पाणी म्हणून समजणें आणि पिणें तशी मतें म्हणजे इतर धर्म, (त्यास बावा धर्म अशी देखील संज्ञा देत नाहीत) आहेत. फक्त धर्म म्हणशील तर वेदोक्त आहे. इतर म. तरें मानव्या (बावांच्या व्याकरणाचा मासला) ती मतें म्हणजे वे. ध. प्र. प्रकरण १९ व्यांत म्लेंच्छ मतें म्हणजे यहुदी ख्रिस्ती व महंमदी यांचे वर्णन केलें आहे. त्यांत त्या मतास बावा 'नास्तीक मतें' म्हणतात. प्र. १९ पृ. ७२० यांत बावा म्हणतात कीं, 'जी पृथ्वीतील सर्व मनुष्यें वेदोक्तधर्माप्रमाणें आचरण करणार नाहींत त्या सर्व मनुष्यांची अधोगती होईल.' आणि ख्रिस्ती मुसलमान आदि करून अन्य धर्माच्या लोकांस वेदोक्त धर्म स्वीकारायास उपदेश करितात. या प्रमाणें बावा स्वतां आपल्या उक्तीचें खंडन करितात व त्याचे गुण गाणारे *बाळबोध*कर्ते यांचेंही म्हणणें खोडून काढतात. बावांच्या मतें सर्व धर्म परमार्थ साधनाविषयी सारखेच आहेत तर त्यांनीं आपल्या ग्रंथांत अशीं वाक्यें कां घातलीं?

शेवटी बा. कर्ते म्हणतात कीं, 'बावांच्या वाद विवादानें ख्रिस्ती धर्म प्रसारास बराच धक्का बसला.' तशा प्रकारची सगळी माहिती आंकडे टिपून काढली तर तींत आम्हीं म्हणतों ह्यास पुष्कळ प्रमाणें सापडतील.' जोपर्यंत ख्रिस्ती लोक स्वधर्म प्रचाराचे प्रयत्न व त्याला यश येण्या-करिता प्रार्थना करणें सोडीत नाहींत तोपर्यंत बावांसारिखे सहस्त्रावधी ब्रह्मचारी उत्पन्न झाले तरी ख्रिस्ती धर्म प्रचारास धक्का बसवयाचा नाहीं, असें *बाळबोध*कर्त्यांनी पक्कें समजावें. तर 'बावा निवर्तल्यापासून ख्रिस्ती लोकांचे प्रयत्न कमी झाले अथवा त्यांच्या प्रार्थना खुंटल्या'

ह्या गोष्टीचे प्रमाण *बाळबोध*कर्त्यास दाखवितां येणार नाहीं.

'विष्णुबुवांसारखे निर्लोभ धर्मप्रचारक सध्या उत्पन्न होणाची आवश्यकता आहे. हे सगळे सूत्र परमेश्वराधीन आहे. त्यानें कृपा करावी, (*बाळबोध*) परमेश्वर सत्य स्थापनेकरितां आत्मश्लाघी गर्विष्ठे व अहंता बाळगणारी मनुष्यें उत्पन्न करीत नाहीं. बावांच्या अंगीं तर हे गुण नखसिखांत आहे वसत होते. 'मला दत्तात्रयाचा वर आहे. त्यामुळें मला बोलण्यांत कोणी जिंकील असे नाहींच. लाखों मनुस्यांवर वादविवाद करून मी त्यांचीं मतें खंडन केली आहेत. मला हजारो मनुष्यांच्या सभेंत ज्या ज्या समयास जे जे पाहिजे तेच सुचते.' (वे. ध. प्र. ७४७) प्रति शंकराचार्यच हे. कसे बरें त्यांस सुचणार नाही?

बावा सारिखे वादविवाद करणारे जगांत बहुत होऊन गेले. अठराशें वर्षांमागे जे होते त्यांविषयीं साधु पौल यांने जे लिहिलें तेंच सांप्रतकाळीं ख्रिस्ती धर्माविरुद्ध वादविवाद करणारास लागू आहे.

'ज्ञानी कोठे? शास्त्री कोठे? या जगांतील वादविवाद करणारा कोठे? देवाने या जगाचे ज्ञान मूर्खपणे केले आहे कीं नाहीं? ज्ञान्यास लाजविण्यासाठीं देवानें जगांतील मूर्खास निवडून घेतले आहे, आणि बळवानास लाजविण्यासाठीं देवानें जगांतील दुर्बळास निवडून घेतले आहे. यासाठी कीं, त्याच्या समोर मनुष्य जातींतील कोणीहि नांवाजून घेऊं नये. जो नांवाजून घेतो तो प्रभूविषयी नांवाजून घेतो.'

ख्रीस्तदास

*ज्ञानोदय*, २९ मार्च १८८९, पृ. ९९ ते १०१.

## पत्र. क्र. ४ : पंडिता रमाबाईंच्या पत्रास उत्तर

*ज्ञानोदयाचे* कर्ते यांस,

वि. वि. पंडिता रमाबाईंनीं माझ्या पत्रांस जें उत्तर म्हणून दिलें आहे त्यांतील दोन चार गोष्टींचा विचार करण्याची मला आपल्या पत्रद्वारें परवानगी द्यावी.

पंडिताबाई म्हणतात कीं, 'ख्रिस्ती मनुष्यानें हिंदु देवळांत हिंदु पुराण सांगितले, यांत कांहीं अनन्वित केले नाहीं. मिशनेरी लोक जसे लोकांस मॅजिकलँटर्न दाखविण्यास बोलावून धर्मोपदेश करितात, अथवा आपल्या भाषणांत व लेखात हिंदु ग्रंथांतील वाक्यें घेतात तशांतलेंच हे पुराण पठन होते. परंतु ही साम्यता अगदी अप्रासंगिक आहे. मिशनेरी लोक कोण आहेत व कशा करितां आपल्या गांवीं आले आहेत हे लोकांस चांगलें माहीत असते. मॅजिकलँटर्न पहायला जाण्याचे पूर्वी आपण दशावतारांची चित्रें पहावयास जातो असा त्यास भास होत नाहीं व तशी अपेक्षा धरुन ते जात नाहींत. परंतु बार्शीकर स्त्रियांस जेव्हां पुराणास आमंत्रण आलें तेंव्हां त्यांच्या मनांत कोणते विचार आले असतील? पंडिताबाई या ख्रिस्ती आहेत हे त्यांस माहित होतें काय? व हिंदूनें ख्रिस्ती होणें म्हणजे तें काय? पुराणें ईश्वर प्रणित नाहींत, त्यांच्या पठनानें व श्रवणानें पुण्य प्राप्ती होत नाहीं, त्यांत तारणोपाय नाहीं म्हणून बैबलावर विश्वास ठेवणें हेच कीं नव्हे? तसेंच जी बाई ख्रिस्ती झाली ती जातीभेद मानीत नाहीं, तिला महार व ब्राह्मण समान, ती हिंदु धर्माप्रमाणें आचार भ्रष्ट व क्रिया नष्ट झाली, तिला पुराण सांगण्याचा अधिकार राहिला नाहीं, ती जर हिंदूंच्या देवळांत गेली तर देऊळ बाटविण्याचा दोष तिच्या पदरीं येईल, तिच्या मुखचें पुराण श्रवण करण्यास पातक लागतें ! अशा प्रकारचा बार्शीकर बायांचा समज झाला होता काय? कोणी ख्रिस्ती बाई आपल्या मताप्रमाणे पुराणांचा अर्थ सांगणार आहे अशी नोटीस पंडिताबाईंच्या मित्रांनीं जाऊन घरोघरीं फिरविली होती काय? आणि अशी नोटीस पाहून कोणी बाया आल्या असत्या काय? शिवालयाचे, पुराणाचें व संस्कृताबाईचें नांव ऐकून त्या आल्या कीं नव्हे? ब्राह्मण पुराणिकांचे पुराण श्रवण करायास जातें वेळीं फळ, पुष्प, दीप, दक्षिणा इ. घेऊन त्या गेल्या नसतील कशावरुन? आणि जरी हे पदार्थ पंडिताबाईंस समर्पण केले नसले तरी ते शिवलिंगापुढे व नंदीपुढे ठेविले असतीलच, व जर असा प्रकार खरोखर झाला असला तर त्याचे श्रेय किंवा अश्रेय पंडिताबाईच्या पदरीं पडलें असे म्हणण प्राप्त आहे. कारण त्या दिवसाची शिवपूजा ह्या पुराणश्रवणाच्या निमित्ताने घडली.

जर पंडिताबाईंस सरळ मार्गानें म्हणजे ख्रिस्ती धर्मास अनुसरून बार्शीकर उच्च वर्णाच्या बायांस व्याख्यान सांगण्याचा प्रसंग नव्हता तर नीच मानलेल्या वर्णाच्या स्त्रियांस व्याख्यान सांगावयाचे होतें. 'बार्शीस शूद्र, अतिशूद्र नाहींत काय? महारामांगाच्या बायकांस नीतिबोध नको काय? महारवाड्यांत चावडी नव्हती काय? आणि अशा ठिकाणीं पंडिताबाई गेल्या असत्या तर त्यांस बाट लागता काय? अथवा लहान पण येते काय? प्रभू येशू असा नीच व भ्रष्ट मानलेल्या लोकांचा मित्र होता तो त्यांच्याशीं दळणवळण ठेवीत असे. त्यांच्या संगती पत्रव्यवहार करीत असे व त्यामुळे श्रेष्ठ पदवीचे लोक त्याला दूषण लावीत असत. पंडिताबाई

बारशींत जे एकच ख्रिस्ती कुटुंब आहे त्याच्या येथे बिऱ्हाडास कां गेल्या नाहींत? त्यांची सगळी ओढ थोर लोकांकडे. त्यांस गरिबाचा सहवास कसा आवडेल?

'पुराणांतलें एखादे वाक्य घेऊन त्यावरून दोन बोधपर गोष्टी घेऊन सांगण्यांत मोठे पाप आहे काय?' असे पंडिताबाई विचारतात. बायबलांतले एखादे वाक्य घेऊन त्यावरून दोन बोधपर गोष्टी सांगण्यांत लाज आहे काय? अमेरिकेहून आल्यापासून आजपर्यंत जी त्यांनीं मोठमोठ्या शहरी मोठाल्या समाजास व्याख्यान दिली त्यांत अशी गोष्ट एकदां तरी केली आय? देशाच्या उन्नतिविषयीं अमेरिकेंतील लोकांची पुष्कळ उदाहरणे दिली व त्यांची मोठी तारीफ केली, परंतु ह्या उन्नतीस ख्रिस्ती शास्त्र हें मूळ कारण आहे हे अशी अक्षरे बाईंच्या मुखांतून कधी निघाली होती काय?

बाईसाहेब म्हणतात की, 'मीं कांहीं धर्मसंबंधी उपदेश करावयास गेलें नव्हतें व तसला उपदेश मीं करणार नाहीं हें बारशीच्या लोकांस ठाऊक होते.' या वाक्याची *प्रबोधरत्नाकरा*तील पुढील वाक्यांशी बाईसाहेब कशी संगती घालून देतील हें समजत नाहीं. त्या पत्रांत असें लिहिलें आहे कीं, 'श्लोकाच्या अर्थाप्रमाणे मनुष्यांचीं ऐहिक व पारलौकिक साधनानकरितां तसतसें वर्तन ठेवावें याच दिग्दर्शन करीत असत.' बाईंच्या उपदेशांत जर धर्माचा संबंध नव्हता तर पारलौकिक साधनांचे दिग्दर्शन तें कोणत्या संबंधाचे होतें? धर्मावाचून परलोक प्राप्त होते काय? आणि त्या प्राप्तीची साधने कोणती? ज्या धर्माचा पंडिताबाईंनीं स्वीकार केला आहे त्यांत तर असें स्पष्ट सांगितले आहे की येशूच्या नामावाचून मुक्ति नाहीं जेणे करून आमचे तारण झाले पाहिजे असें दुसरें नाम आकाशांखाली मनुष्यामध्ये दिलें नाहीं (प्रे.४.१२) हें ख्रिस्ती धर्माचे महावाक्य आहे, आणि तें पेत्रस व योहान्न हे प्रेषित यहुद्यांचे धर्माधिकारी वडिल व शास्त्री मुख्य याजक व मुख्य याचकांच्या गोत्रातील जितके होते त्यांच्या सभेपुढे वदायास लाजले नाहींत व भ्यालेही नाहींत. बाईनीं एकदा अपात्र विश्वास 'अपस्तलस क्रीड' (प्रे.चा मतांगिकार) याजवर आहे. असे *सुबोध-पत्रिके*त म्हटलें होते, तर तो क्रीड चर्चांत उभे राहून बोलण्यापुरतां आहे काय? स्वदेश बांधवास व भगिनीस सुधारणुकेविषयीं व्याख्यानें देतांना ते प्रीय नाम मागें सारून पारलौकिक साधनांकरितां जें वर्तन तें मात्र पुढें करावे ह्यांत सद्गुरूशी बेमानी केल्याचा दोष नाहीं काय? तर ख्रिस्तावाचून कोणत्या वर्तनानें परलोक प्राप्ती होते हें पंडिताबाईंनीं कृपा करून स्पष्टपणें सांगावें.

पंडिताबाई माझ्या धर्मविशाला जे दूषण देतात ते मी भूषण समजतो. माझ्या दूषण देशितांसारखा धर्मविश नाहीं म्हणून मात्र माझें चित्त विषण्ण आहे.

बाईंच्या मतें मी हिंदू ग्रंथांचा तिरस्कार करणारा आहे तर अशी गोष्ट नाहीं. मी सर्व सुनीतिचा व सुबोधाचा अभिमानी आहे परंतु तारकसत्याची तोडजोड पावणारा व अथवा कावड करणारा नव्हे.

*ज्ञानोदय*कर्ते महाराज, पत्र विस्ताराची क्षमा असावी. 'सत्य विकत घे, विकू नको.' (नी. २३.२३)

लक्ष्य

*ज्ञानोदय*, ८ ऑगस्ट १८८२, पृ. २५३.

## पत्र क्र. ५ : पंडिता रमाबाईंचे उत्तर

रा. रा. *ज्ञानोदय*कर्ते यांस,

वि. वि. आपल्या 'लक्ष्य' मित्रांनीं मागच्या खेपेच्या (तारीख ११च्या) *ज्ञानोदयां*त अन्ध ठिकाणीं राहून मला अनुलक्षून कांहीं वागबाण सोडिले आहेत ते पाहून मला बरेच नवल वाटलें. 'लक्ष्या'च्या अंगांत सद्धर्माचा आवेश आला त्याचें हें चिन्ह असेल. हिंदु स्त्रियांकरितां हिंदू देवळांत हिंदु पुराण सांगितले ह्यांत मी काय अनन्वित कृत्य केलें हें मला समजत नाहीं. बारशी-सारख्या रिकाणीं जेथें बायकांना सभा म्हणजे मोठा बाऊ आहे असें वाटतें व ज्या साध्या भोळ्या बायांना पुराणच काय ते ठाऊक, व्याख्यान कशाशी खावे हे देखील माहीत नाहीं त्यांस पुराणांतलें एखादें वाक्य घेऊन त्यावरून दोन बोधपर गोष्टी सांगण्यांत मोठें पाप आहे असे आपणांस वाटतें काय? वाटत असेल तर 'लक्ष्यांचे' पत्र ज्यांत आहे त्यांच *ज्ञानोदया*च्या अंकांत पत्रकर्त्यांनीं लिहिलेल्या निबंधामध्यें 'एकएव सुहृद्धर्मी निधनेप्यनुयाप्रियः। शरीरेण समं नाशं सर्वमन्यतु गच्छिन्ति ॥' ह्या हिंदुस्मृतीच्या श्लोकांच्या आधारें जो बोधकर निबंध आला आहे तो आला कसा व आपण मधून मधून तुकारामासारख्या हिंदूचे अभंग, उपदेश वगैरे आपल्या वाचकांच्या बोधाकरितां उतरून घेता हें कसें? 'लक्ष्याच्या' समजुतीप्रमाणें ही आपली कृत्ये अनन्वित नव्हें काय? सभेची माहिती नसल्यानें बायका व्याख्यानाला येईनात म्हणून पुराण सांगितले हा जर लाघवी उपाय असला तर पुष्कळ ख्रिस्ती मिशनेरी जादूच्या कंदिलाच्या (मॅजिक-लॅंटर्न) योगानें चित्रें व तमाशा दाखविण्याचे मिष करून किंवा अशाच दुसऱ्या उपायांनीं अज्ञ लोकांस आपणाकडे ओढून घेत असतात, ते उपाय फारसे वजनदार आहेत असें म्हणतां येणार नाहीं. आणि मी कांहीं धर्मसंबंधी उपदेश करायास बार्शीस गेले नव्हते व तसला उपदेश मी करणार नाहीं हे बार्शिच्या लोकांस ठाऊक होते. माझे व्याख्यान आणि पुराण ही दोन्ही साधारण सामाजिक नीति कशी असावी या विषयांवर होती.

बारशीस रा. भिवाजी दारकूजी ख्रिस्ती म्हणून कोणी एक गृहस्थ व त्यांची पत्नी ही काय ती ख्रिस्ती माणसे आहेत. सदरील गृहस्थ माझे व्याख्यान ऐकण्यास आले होते. पुराणास होते कीं नाहीं हे मला ठाऊक नाहीं. होते तर त्यांनीं 'लक्ष्यांनीं' पुराणांच्या संबंधानें जे प्रश्न केले त्यांची उत्तरे द्यावी अशी त्यांस माझी विनंती आहे. पुराणिकबुवांच्या चालीच्या पुराणांत मंगलाचरण, सरस्वती, गणपती यांची स्तुती, अर्पण, दीप आरति, पाया पडणें, हे सगळें लागते खरें आणि मी ही पूर्वाश्रमीं म्हणजे कडकडीत हिंदू धर्मी असतांना माझ्या पुराणांत हे सगळे प्रकार झालेले पाहिले आहेत. परंतु बारशींत सांगितलेलें पुराण नवीन तऱ्हेचें होतें. तें मी उभी राहून व्याख्यान दिल्याप्रमाणें सांगितलें. ह्यांत लक्षांच्या लक्ष्यात आलेल्या गोष्टी मुळीच नव्हत्या. बारशींत *प्रबोधरत्न* नांवाचें वर्तमानपत्र निघत असें त्यांत माझ्या पुराणाविषयीं सदरील पत्राच्या कर्त्यांनीं म्हटलें आहें कीं, पुराण सांगण्यास भागवत चतुर्थ स्कंधातील पृथु राजाचें आख्यान घेतलें होतें. श्लोकाच्या अर्थाप्रमाणें मनुष्यांनीं ऐहिक व पारलौकिक साधना करितां कसकसे वर्तन ठेवावें याचें दिग्दर्शन करीत असे. पुराण सांगण्याची पद्धत पुराणिक सांगतात

तशा पद्धतीची नव्हती. (प्र. २ वर्ष ५ अं. १) 'लक्ष्यांस' संस्कृत भाषा येत असून भागवत पुराणाची माहिती असेल तर विजयध्वजी पाठाच्या भागवत चतुर्थ स्कंधाच्या २२व्या अध्यायात प्रारंभापासून २७व्या श्लोकापर्यंत पृथु सनदकुमार संवादाचा भाग वाचून पहावा व त्यांत त्यांना काय अनन्वित व अग्राह्य दिसतें तें सांगावें. याच भागाचें मी पुराण सांगितले. हिंदूंच्या देवळांत जाऊन अशा प्रकारचे पुराण सांगायला कांहीं हरकत आहे असे मला वाटत नाहीं. आपण सुचविल्या प्रमाणें मुंबईतील एखाद्या देवळांत चातुर्मासांत पुराण किंवा मुसलमानी मशिदींत कुराण सांगण्यास मी सिद्ध आहे. मात्र हिंदूंनीं आपली देवळें व मुसलमानांनीं आपल्या मशिदीं यांचीं दारें उघडलीं पाहिजेत, आणि त्यांच्या पुराणांचें व कुराणांचें मी सांगीन तसें पुराण ऐकण्यास कबूल असलें पाहिजे. देवळांत व मशिदींत नीतिपर उपदेश करण्यात मी मोठें पाप करते असें मला वाटत नाहीं. ख्रिस्ती लोक हिंदूंच्या घरांत जातात, पानसुपारीला जातात, सभांतून लग्नमंडपांतून वगैरे जातात. देवळांत जाऊन उपदेश करायला सांगितल्यास ते नाकारणार नाहींत असे मला वाटतें. मात्र त्या देवळांत त्यांचा उपदेश कोणी ऐकून घेईल कीं नाहीं ह्याचीच शंका आहे.

'लक्ष्यास' हिंदूंच्या पुराणांचा व कुराणाचा एवढा तिरस्कार का वाटतो कोण जाणे? ते मराठी भाषा बोलतात तेव्हां बहुत करून ह्या हिंदूंच्या देशांतच त्यांचे जन्म झाले असावे असे वाटते. ते या हिंदूंच्या भूमिवर राहिले तरी कसें?

हिंदूंचे व मुसलमानांचे तितके अपवित्र असा समज होईल तितका 'सद्धर्माचा आवेश' माझ्या अंगांत नाहीं हें मी प्रांजळपणानें कबूल करते. माझी आईबापें हिंदू होती त्यांचे नीतिपर उपदेश माझ्या हाडात खिळून गेलेले आहेत. हिंदू शास्त्रें, स्मृति व पुराणे वगैरेंचे अध्ययन करण्यांत माझें अर्धेअधिक आयुष्य गेलें, त्यांत त्याज्यांश जरी पुष्कळ आहे तरी चांगला ग्राह्यांशही पुष्कळ आहे असें मी म्हणते. हें जर 'लक्ष्यास' फार अनन्वित वाटत असेल तर ते खुशाल वाटो.

मुंबई, तारीख ११ जुलै १८८९. रमाबाई

*ज्ञानोदय*, २५ जुलै १८८९, पृ. २३७, २३८.

## पत्र क्र. ६ : पंडिता रमाबाईंची धर्ममते—१

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस,

वि. वि. पंडिता बाईंचीं धर्म मतें नारुच्या तंतू प्रहाणे शनैः शनैः बाहेर पडत आहेत. ह्या बाई विलायतेत ख्रिस्ती झाल्यापासून तर आज दिनापर्यंत त्यांच्या धर्म मतांविषयी अनेक चर्चा वर्तमानपत्रांतून झाल्या, लोकांत नाना प्रकारची कुणकुण चालली, व बाजार गप्पा पुष्कळ उठल्या. परंतु त्यांनी स्वतः होऊन येथील ख्रिस्ती पत्रांस कांहीं लिहून पाठविले नाहीं, अथवा आपल्या ख्रिस्ती मित्रास खाजगत रीतीनें कांहीं कळविले नाहीं, किंवा येथे त्यांचे आगमन झाल्यावरही एखादी ख्रिस्ती लोकांची सभा मिळवून खुलासेवार कांही मजकूर त्यास निवेदन केला नाहीं. ह्या बाईंची पहिल्या पासून सर्व ओढ एकेश्वरी मताच्या लोकांकडे आहे. त्यांच्यामध्ये त्यांचे प्रिय बंधू व प्रिय भगिनी आहेत, आम्हा नेटिव्ह प्रॉटेस्टंट ख्रिस्ती लोकांमध्ये त्यांस क्वचित असे आप्त असतील. प्रार्थना समाजाचे *ज्ञानदीपक* पुस्तकांत त्यांचीं बरीच पत्र छापण्यांत आलीं, परंतु *ज्ञानोदय*, *कुटुंबमित्र*, *सत्यवादी*, *गार्डियन* इत्यादी ख्रिस्ती पत्रांत त्यांचे ख्रिस्ती होण्याविषयीं, धर्म मता विषयीं अथवा श्वासाविषयीं, निदान शारदासदनाविषयीं काय बरें त्यांच्याकडून प्रसिद्धीस आलें?

असो. पंडिताबाई येथे येऊन पोचल्यावर त्यांच्या धर्ममतांविषयीं त्यांचे प्रिय बंधू भगिनींशीं भाषण झालें असेलच. त्याचा आशय घेऊन *सुबोधपत्रिके*ने त्यांची एक यादी प्रसिद्ध केली. परंतु ती त्यास मान्य न झाल्यामुळे त्यांनीं आपले मत काय आहे हें जगाला कळविण्याकरितां पत्रिकेस एक पत्र लिहिलें. त्याला एक महिना होऊन गेला तरी त्याचा पहिला भाग (पूर्वार्ध म्हणतां येत नाहीं) मात्र बाहेर पडला आहे. बाईंनीं तरी थोडक्यांत आपली मतें कळवायची होती तसें न करतां विषयांतर करून व 'रान घेऊन चऱ्हाट वळण्याचा' आव घातला आहे. सारांश कोणाचीही धर्ममतें काय आहेत हें जनांस त्वरित कळविण्याचें जसे *सुबोधपत्रिके*स विशेष अगत्य वाटत नाहीं, तसेंच पंडिताबाईसही वाटत नाहीं. जर त्यांनीं आज ४ वर्षे ही गोष्ट मनावर घेतली नाहीं तर सु. प. ने त्यांचें पत्र ४ महिने छापले तरी तिला काय बोल लावायचा आहे?

अस्तु. 'घराची कळा अंगण सांगते' अशी एक म्हण आहे. त्याप्रमाणे पत्रिकेंतील पत्राच्या पूर्व भागांवरून पंडिताबाईंचीं धर्ममतें काय असतील यांचें अनुमान करता येते. संपूर्ण बायबल अस्सल नाहीं, त्यांत मागावून घुसडून दिलेले 'क्षेपक भाग' व 'पोटभेद' पुष्कळ आहेत हें एक त्यांच मत बाहेर पडलें आहे. दुसरे हें कीं सर्व बायबल ईश्वरप्रेरित नाहीं, केवळ ख्रिस्ताचा जो 'उपदेशक समुह' आहे तोच काय तो 'अनादि' व 'दोषशून्य सत्यांनीं' भरलेला आहे असेही पत्रिकाद्वारे प्रगट झालें आहे.

ह्या मतांची आज मला विस्तारानें परीक्षा करावयाची नाहीं. परंतु ह्या विषयीं हिंदू लोक काय म्हणतात हें प्रथम सांगतो. ते म्हणतात कीं, 'जर संपूर्ण बायबल ईश्वरोक्त नाहीं', तर रमाबाईंनी ख्रिस्ती धर्म कशास्तव अंगीकारला? आम्ही ख्रिस्ती लोकही हाच प्रश्न करून

आणखी असेही म्हणतो कीं, जर बायबलांत प्रक्षिप्त भाग आहे तर येशू ख्रीस्ताचा 'उपदेश समूह' म्हणून जो भाग आहे तो तरी त्याचाच असेल हे कशावरून? पंडिताबाई म्हणतात कीं, तो भाग त्यांच्या अंतरात्म्यास पटतो. पण पंडिताबाईंस ईश्वर सत्य म्हणजे काय आणि कोणत्या सत्याकडून आत्म्यास पापापासून मुक्ती प्राप्त होऊन त्याचे तारण होतें हें समजत नाहीं. हें समजण्यास ईश्वरी प्रकाश पाहिजे. उदाहरणार्थ 'जो माझे मांस खातो व माझे रक्त पितो त्याला सर्व काळचें जीवन आहे' 'जो माझे मांस खातो व माझे रक्त पितो तो मजमध्ये राहतो व मी त्याजमध्ये' ही जी येशूच्या मुखची सत्ये आहेत ती पंडिताबाईंच्या अंतरात्म्यास पटतात काय? ज्या लोकांस प्रभूनें ही सत्ये प्रथम सांगितली त्यांस ती अगदी रुचली नाहीत व पटलीही नाहीत. ते म्हणाले कीं, 'ही गोष्ट कठीण आहे, ही कोणाच्याने ऐकवेल? त्यांच्या इष्ट मंडळीमध्यें पंडिता रमाबाईसारखे त्यांच्या नीतिपर उपदेशास मोहित होऊन शिष्य झालेले बरेच लोक होते. त्याविषयीं असें लिहिले आहे कीं, 'ज्या काळापासून त्यांच्या शिष्यांतील बहुत मागे निघून गेले आणि त्यानंतर त्यांच्या बरोबर चालले नाहीत.'

पंडिता बाईंस बायबलचे मराठी भाषांतर ठीक दिसत नाही. इंग्रजीत देखील ते जे सुधारलेले भाषांतर (रिव्हाइज्ड व्हर्शन) तेंच मात्र त्या पसंत करतात. त्यांनीं एक बैबलांतील वाक्य आपल्या पत्रांत घेतले आहे. तें त्यांतूनच घेतलें आहे. पण त्याचें स्वत: मराठी कां केले नाहीं हें समजत नाहीं? असो. वरील वाक्य (रिव्हाइजड् व्हर्शन) च्या तरज्युम्यात येणें प्रमाणें आहे 'He that eateth my flesh and drinketh my blood hath eternal life'— 'This is a hard saying; who can hear it? Upon this many of his disciples went back and walked no more with him.'

'येशू जीवंत देवाचा पुत्र खीस्त आहे असा जेव्हां प्रेसनानें मतांगिकार केला तेंव्हां प्रभूनें त्यास म्हटलें कीं, 'तूं धन्य आहेस कारण मांस व रक्त (मनुष्य बुद्धि, अंतरात्मा इ.) यांनीं नाहीं, तर माझ्या आकाशांतील बापानें हें तुला कळविलें आहे.' याचा आशय असा आहे कीं, प्रत्यक्ष ईश्वरानें आपल्या आत्म्यांच्या शिकविण्यानें हें सत्य पेत्रसास व इतरांसही पटलें. पंडिताबाईंस हे सत्य पटले आहे काय? अथवा तें त्यांच्या मतें येशूच्या उपदेशसमूह बाह्य 'क्षेपक' आहे. परंतु तें जर पटलें असलें तर जुन्या करारांतील 'भविष्यग्रंथ संग्रह' ही त्यास पटला पाहिजे कारण 'सर्व भविष्यवादी त्याविषयीं साक्ष देतात'.

मनुष्याच्या पापांकरितां खीस्ताला मरायचे अगत्य होते. हें सत्य पंडिताबाईंस पटलें आहे काय? जोपर्यंत पेत्रसाला तें पटलें नव्हतें तोपर्यंत ख्रीस्ताने आपल्या मरणाची गोष्ट काढली म्हणजे ती त्यास समजत नसे इतकेंच नाहीं तर एकदां त्यानें आपल्या गुरुस धमकाविलेंही, तेंव्हा ख्रीस्तानें त्यांचा खडसून निषेध करून म्हटलें कीं, 'अरे सैताना, माझ्या मागे हो. तूं मला अडचण आहेस कारण तू देवाच्या गोष्टीकडे लक्ष लावीत नाहींस मांणसांच्या गोष्टीकडे लावितोस.' पंडिताबाई आपण पहिल्या ओवींतील धन्यत्व पावला आहांत किंवा काय या ओवींत सांगितल्या प्रमाणें माणसांच्या गोष्टीकडे लक्ष लावीत आहांत याचा नीट विचार करा. जर देवाच्या गोष्टीकडे लक्ष न देतां तर येशू विषयी जर 'जुन्या करारांत' भविष्ये आहेत तीं

खरीं आहेत काय? जर खरीं आहेत तर 'जुना करार' ईश्वर प्रेरित आहे असे सिद्ध होत नाहीं काय? येशू ख्रिस्त स्वतः जुन्या करारास 'देवाचे शास्त्र' मानीत नव्हता काय?

वर जीं सत्यें सांगितलीं तीं (व आणखीही कित्येक) ख्रीस्ती धर्माच्या जिव्हाळ्याचीं अंगें आहेत. जसा मनुष्याचा जीव स्थित असण्याकरिता त्यानें मेंदू, हृदय, काळीज इत्यादी पाहिजे त्याप्रमाणे ख्रीस्ती धर्माच्या जीवित्वास ही सत्यें आवश्यक होत. ती जर कोणी छिन्न भिन्न करण्याचा अथवा त्यांचा विध्वंस करण्याचा यत्न करितो तर तो त्या धर्माचा घातक शत्रू होय व त्याला ख्रीस्ताच्या साधुत्वापासून किंवा त्याच्या नीतिच्या उपदेशापासून कांहीं तारक लाभ होत नाहीं.

पंडिताबाईनीं बैबलावर जे आक्षेप लादिले आहेत त्याचा व त्यांच्या पत्राचा तो भाग 'सु.बो.प.'त अजून छापून यायचा आहे. त्याचा विचार पुढे करायचा आहे. म्हणून आता विशेष लिहीत नाहीं. तथापि पंडिताबाईस एका ईश्वर भक्ताची प्रार्थना सादर करतो. ती अशी कीं, 'हे देवा मी तुझ्या शास्त्रांतील आश्चर्यें पाहावी म्हणून माझे डोळे उघड.'

तारीख १८ मार्च १८८९ ख्रीस्तदास
*ज्ञानोदय*, २८ मार्च १८८९, पृ. १०२, १०३.

## पत्र क्र. ७ : पंडिता रमाबाईंची धर्ममते—२

*ज्ञानोदया*चे कर्ते यांस,

वि. वि. पंडिता रमाबाईंच्या धर्ममत निरूपणाची समाप्ती झाली. कालच्या (११ मार्च) *सुबोध पत्रिके*त त्यांच्या पत्राचा उत्तर भाग छापला आहे. त्यावरून पंडिताबाईंचा ख्रिस्ती धर्म कोणत्या प्रकारचा आहे त्याविषयीं शंका राहिली नाहीं. पत्रिकेंतून प्रथम त्यांचीं धर्ममतें म्हणून जो मजकूर बाहेर पडला होता त्यांस बाईसाहेबांनीं सरळ व स्पष्ट असे एकही उत्तर दिलें नाहीं. त्यांचा सर्व लेख टाळाटाळीचा व संदिग्ध अर्थाचा आहे तरी अशा गोंधळांत त्यांच्या धर्माचें रूप ओळखण्यात कांहीं अडचण पडत नाहीं. बैबलांतील ख्रिस्ती धर्म काय आहे हें पत्रिकेंतील मजकूर लिहिणारांस पंडिताबाईंपेक्षां चांगले समजतें असें म्हटलें पाहिजे. पंडिताबाई खऱ्या ख्रिस्ती धर्माचा भोग काढून त्यांत युनितेरियन पाखंडाचा पेंढा भरून लोकांस दाखवित आहेत. त्यांस त्या स्वकपोकल्पित ख्रिस्ती धर्म असे नांव खुशाल देवोत त्या विषयीं आमचें म्हणणें नाही. परंतु इंग्लंड व अमेरिका येथे जितकी वर्षे राहून तेथून धर्माचा असला चोथा आणावा ही मात्र अत्यंत शोचनीय गोष्ट होय. पंडिताबाईंनीं अमृत टाकून धूण घेतलें. परीस फेकून पाषाण पदरी बांधला.

मु. बो.तील त्यांचें पत्र साद्यंत वाचून पाहिलें असतां 'ख्रिस्त हा पाप्यांचा तारणारा आहे. त्यानें मज दीन पतीत पापीणीला तारिले. त्याच्या कृपेनें मला पवित्र आत्मा मिळाला व पवित्र आत्म्याच्या कृपेने मी पुनर्जन्म पावलें, आतां माझी देहबुद्धी जावून मी आत्मीक बुद्धीनें जीवनाच्या मार्गावर चालत आहे.' असें नम्रतेनें अनुभवाचे व उपकार स्तुतीचे उद्‌गार निघाल्याचें दिसत नाहीं. पवित्र आत्मा आहे असा विश्वास पंडिताबाई धरतात काय? प्रेषितांच्या वेळी कित्येक मनुष्यांनीं योहान्नाचा बाप्तिस्मा घेतला असतां त्यास पवित्र आत्म्याविषयीं कांहीं ठाऊक नव्हतें तेव्हां त्यांस पौलसाने विचारलें की 'तुम्ही विश्वास धरून पवित्र आत्मा पावला काय? तेव्हां ते म्हणाले की 'पवित्र आत्मा आहे किंवा नाहीं हे आम्ही ऐकलें नाहीं.' परंतु पंडिताबाईंनीं त्याविषयीं ऐकलें व वाचलें आहे, इतकेच नाहीं तर बापाच्या, पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नांवानें बाप्तिस्माही घेतला आहे असें असून त्यांनीं आपल्या धर्म मत निरुपणाच्या आरंभीं परमेश्वराचें आत्मरूप वर्णितांना त्याचे त्रेकत्वाविषयीं कां चर्चा केली नाहीं? ईश्वराच्या त्रेकत्वाचा सिद्धांत आपण मानितो किंवा नाहीं, हें ज्यांनीं स्पष्ट कां सांगितलें नाहीं? त्या म्हणतात कीं, सगळ्या धर्माचें मूळ तत्त्व वर्णनांत मी दाहांचीं कपोलकल्पित वाक्य घातली नाहींत.' ही वाक्यें कोणती याचा खुलासा करण्याचें अगत्य आहे. ईश्वरी त्रेकत्वासंबंधी जी शास्त्र वाक्यं आहेत ती ह्या दशकांतीलच कीं काय?

'ख्रिस्त देवाचा आहे' असें पंडिताबाई म्हणतात, तुकाराम रामदास हे देवाचे नव्हते काय? जर आहेत तर ख्रीयस्तामध्यें अधिक काय आहे? तो देवाचा अनादि पुत्र आहे.तो 'त्याच्या गौरवाचें तेज व तत्वतेची प्रतिमा आहे' हें शास्त्रवचन त्यास मान्य आहे काय? 'त्याच्या ठायीं ईश्वरी अंश पूर्णत्वानें वसत होता' म्हणजे काय? पूर्ण देवपणा होते (कल २ : ९) असे कां म्हटलें नाहीं?

अंश (भाग तुकडा) पूर्ण कसा होईल? तसेच ख्रिस्ताच्या ठायी देवाचे ऐश्वर्य होते, परंतु तो देवच होता असे पंडिताबाईंचे मत नाहीं काय? ख्रीस्ताविषयी अंश व विभूती असे शब्द योजणें हे शुद्ध हिंदूमत होय. कृष्ण विष्णुचा अंशांश होता, कित्येक वृक्ष, पाषाण, पशु, मनुष्ये इत्यादींच्या ठायी ईश्वराची विभूति असते असें हिंदुमत आहे. ख्रीस्ताच्या देवत्वाविषयीं यो. १.१–५ यांत जें सांगितले आहे तें कपोलकल्पित आहे काय? युनितेरियन पाखंडांत जी कपोलकल्पित मतें आहेत त्याविषयीं मी पुढें लिहिणार आहे परंतु हें पत्र समाप्त करण्यापूर्वी पंडिताबाईंस एक विनंती करतो ती अशी कीं *सुबोध पत्रिके*तील (पुढील उताऱ्यांतील) मजकुरास त्यांनी उत्तरें द्यावींत. त्यांतील विषयांच्या स्पष्टीकरणार्थ मी जे अंक जोडले आहेत त्यांचा क्रम धरून संक्षिप्त पण स्पष्ट अशी उत्तरें *ज्ञानोदया*त आलीं असतां आम्हां प्रॉटेस्टंट ख्रिस्ती लोकांवर बहुत उपकार होतील :

इतर ख्रिस्ती लोकांच्या विश्वासांत व यांच्या विश्वासांत फारच अंतर आहे. (१) ह्यांस ख्रीस्ताचा जन्म ज्याप्रकारे झाला म्हणून इतर ख्रीस्ती म्हणतात तो प्रकार कबूल नाहीं. (२) त्यांच्या मताप्रमाणें ख्रीस्त हा ईश्वराचा अवतार नाहीं. (३) तो मेल्यावर पुन्हा सदेह उरला व सदेह आकाशांत गेला ही गोष्ट ह्यांस मान्य नाही. (४) त्यानें जे अद्‌भूत चमत्कार केले म्हणून इतर ख्रीस्ती लोक म्हणतात ते ह्यांस कबूल नाहींत. (५) ख्रीस्त आपल्या पापाकरितां बळी गेला त्यामुळे आमच्या पापाचा दंड आम्हास चुकतो ही गोष्ट ह्यांस कबूल नाहीं. (६) ख्रीस्ती न होणारे लोक अनंत काळ नरकांत पडतात ही गोष्ट ह्यांस कबूल नाहीं. (७) ह्यांस ख्रीस्ती धर्मावर विश्वास एवढाच आहे की ख्रीस्तानें स्वत: केलेला उपदेश फार चांगला आहे. याकरिता त्यास गुरु समजून त्याच्या उपदेशाप्रमाणें चालावें.'

तारीख १ एप्रिल १८८९ ख्रीस्तदास

*ज्ञानोदय*, ४ एप्रिल १८८९, पृ. १०९, ११०.

## पत्र क्र. ८ : पंडिता रमाबाईंची धर्ममते—३

### देवत्रेक विरुद्ध पाखांडें

*ज्ञानोदयाचे* कर्ते यांस वि. वि.,

पंडितारमाबाईच्या धर्ममतांविषयीं लिहितांना मी आपल्या मागच्या पत्रांत युनितेरियन पाखांडाविषयीं सांगण्याचें व त्यांत पंडिताबाईनें म्हटल्याप्रमाणें दाहांचीं दाहा कपोलकल्पित मतें किती आहेत हें दाखविण्याचें वचन दिलें होतें, तें आतां पुरे करितों.

देवपणांत बाप, पुत्र व पवित्र आत्मा अशा तीन व्यक्ती असून एक देव आहे असा जो ख्रिस्ती त्रेकत्वाचा महासिद्धांत त्याचविरुद्ध खीस्ती मंडळींत आजपर्यंत कित्येक पाखांडें उत्पन्न झाली. परंतु मंडळीनें ती आपल्या मध्यें राहूं दिलीं नाहींत, त्यांच्या उत्पादनांपैकी कित्येकांस तिनें बहिष्कृत केलें, व कित्येक आपणच बाहेर पडलें. ह्या पाखंडांतून कित्येकांचा थोडक्यांतच काळ झाला, कांहीं दीर्घ काळ जगली, व कांहीं अद्याप रखडत आहेत.

ह्या पाखंडांपैकीं मुख्य तीन फार प्रसिद्ध आहेत म्हणजे (१) सबेलियन (Saballians) (२) एरियन (Arians) आणि (३) सोसिनियन (Socinians). पहिल्याचें मत असें आहे कीं बाप, पुत्र आणि आत्मा हे तीन मिळून एकच तत्त्व व एकच व्यक्ति आहे. शुद्ध (पुत्र) व आत्मा हे केवळ देवाचे गुण विस्सृत द्रव्यें (देवांतून निघालेले) किंवा त्याचीं कार्यें होत. (हिंदूंच्या त्रिमूर्तिविषयी त्यांचे कित्येक ग्रंथकार असेच मत बाळगतात. रजो ब्रह्मा तमो रुद्रो विष्णुः सत्वं जगत्पतिः। अतएवत्रयो देवास्तता एवत्रयोगुणाः। (मार्कंडेय पुराण) गुणेभ्यः क्षोभमाणेभ्यस्त्रयो देवा विजक्षिरे। एक मूर्ति स्त्रयो भागाः ब्रह्माविष्णुमहेश्वरः॥ (मत्स्य पुराण) देव बाप हाच कुमारीच्या उदरीं संभवला. बालक झाला. आणि तिचा पुत्र असा जन्मला. आमच्या तारणाचे गूढ कार्य सिद्धीस नेल्यावर तोच अग्नी ज्वालांच्या रुपानें प्रेषितांवर प्रकीर्ण (विस्तारीत झाला) व तेंव्हा पासून पवित्र आत्मा असें नांव पावला. (२) एरियन पाखांडाचें मत असें आहे कीं येशू ख्रिस्त हा एका गौण (हलक्या) अर्थानें ईश्वरी पुरुष होता आणि विशेष अर्थानें देवाचा पुत्र होता, परंतु बापापासून तत्त्वानें अगदी भिन्न होता, तो देवाने सृष्टीच्या उत्पत्ती सारी ज्यास उत्पन्न केले (जसे ब्रह्मदेवाने मानस पुत्र प्रजापती) त्यात प्रथम व सर्वोत्तम असा होता. यास्तव त्याची प्रकृती व पदवी बापापेक्षा कनिष्ठ आहे. पवित्र आत्मा देव नाहीं, तर तोही पुत्राच्या सामर्थ्यानें उत्पन्न केलेला आहे. ज्याला शास्त्रांत शब्द म्हटले आहे तोच पुत्र होय. असे जरी या पाखांडांत कबूल केले आहे तरी तो शब्द अनादि आहे असें त्याचें मत नाहीं. त्याचें दुसरें मत असें होते कीं पुत्राला मनुष्य प्रकृतीपैकीं केवळ देह मात्र होता. त्या देहाशी शब्द संयुक्त झाला हा शब्द आमच्या आत्म्याप्रमाणेंच आहे. ख्रिस्तानें खांबावर स्वसंतोषानें आपणास अर्पून प्रायश्चित्त केलें असे एरियस कबूल करीत असे. (३) सोसिनियन याचें मत असें होतें कीं येशू ख्रिस्त केवळ मनुष्य होता. त्याला कुमारीच्या उदरीं गर्भ संभव होण्यापूर्वी अस्तित्व नव्हतें. पवित्र आत्मा भिन्न व्यक्ती नाहीं तर बाप मात्र

सत्य व यथार्थ देव आहे हे पाखांडमती आणखी असें म्हणतात कीं येशूला शास्त्रांत देवाचें नांव दिलें आहे, परंतु ते केवळ प्रतिनिधित्वाच्या संबंधाचें आहे. तथापि त्याच्या योगाने तो एक ईश्वरी पदास चढला असून त्याला ईश्वरी मान देणें योग्य आहे ह्या पाखांडाखेरीज 'ह्यमॅनिटेरियन' नामक एक पाखांड आहे तें असे : प्रभू येशू हा आमच्यासारिखां मनुष्य असून चुकायजोगा व पापबाहा, पाप करायजोगा, आहे आणि तसा एखाद्या सत्पुरुषांस, नितीशास्त्रवेत्यांस अथवा भविष्यवाद्यांस मान द्यावा इतकाच त्याला देणें योग्य आहे.

ह्या संक्षिप्त हकीगतीवरून वाचकांच्या लक्षांत येईल कीं ह्या पाखांडांमधें मुख्य गोष्ट येशू ख्रिस्ताच्या देवत्वाचा नकार आहे. ह्या अनेक पाखांडांचें कांहीं प्रकारें एकीकरण करून ज्यानें युनितेरियन मत स्थापिलें त्याचें नांव सोनिसस असे होते, तरी त्याच्या मध्यें त्याच्याच मुख्य सिद्धांताचे अनेक पोटभेद आहेत. अर्वाचिन युनितेरियन आपणांस सोसिनियन म्हणवीत नाहीत. सोसिनसाची धर्ममतें येणें प्रमाणें होतीं : प्रभू येशू मनुष्य होता परंतु त्याचा संभव पवित्र आत्म्याच्या शक्तीने झाला यास्तव तो देवाचा एकुलता एक पुत्र आहे. ह्याशिवाय तो मेलेल्यांतून उरल्याने देवाचा पुत्र ठरला आहे त्याचा आणखी असा विश्वास होता कीं येशूला ईश्वरी मान देणे योग्य आहे. तो जन्मल्यानंतर व आपलें नियोजित कार्य करायास लागण्याचें पूर्वी कांहीं काळ स्वर्गांत होता. पापाच्या क्षमेविषयीं त्याचें मत असें होते कीं पापाची फुकट क्षमा करणें व त्याचा दंडही भरून घेणे ह्यापेक्षां परस्पर विरुद्ध असें दुसरें कांहीं नाहीं, म्हणजे देव येशू ख्रिस्तामध्यें मनुष्यास फुकटवारी क्षमा करतो, तरी येशूचें मरण प्रायश्चित्तात्मक होणें अथवा त्यानें आमच्या पापाची शिक्षा भोगली असें नाहीं. तर देव स्वसंतोषाने येशू ख्रिस्तामध्यें आम्हास प्रसन्न झाला आहे, असा कीं जे न्यायाने त्याला करतां आलें असते (म्ह. आमच्या पापाची शिक्षा करणें न्याय होते) तें त्याने ख्रिस्ताच्या द्वारे प्रसन्न होऊन केलें नाहीं. हें मत बाळगीत असतांही सोसिनियन असेहीं म्हणत असे कीं, येशूचें मरण व रक्तपात ही आमच्या करितां देवाला अर्पण व यज्ञ अशी होती परंतु हा यज्ञ खांबावर झाला नाहीं तर ख्रिस्त मरून उठल्यावर स्वर्गांत झाला.

ही मतें अलिकडच्या युनितेरियन लोकांस मान्य नाहीत. त्यांचे मत असें आहे कीं, येशू ख्रिस्ताचा गर्भसंभव चमत्कारीकरीतिनें झाला नाहीं आणि त्याची ईश्वराप्रमाणे भक्ती करणें योग्य नाहीं. त्याला जन्मास येण्यापूर्वी अस्तित्व नव्हतें, त्याच्या येण्याचा हेतू प्रायश्चितावाचून केवळ पश्चातापानें पापाची क्षमा होते असे शिकविण्याचा आणि आपल्या सद्वर्तनाचा कित्ता घालून देण्याचा होता. ह्या त्याच्या उद्देशाला त्याने आपल्या रक्तानें (मरणानें) शिक्का मारला. तो मरुन पुन्हा जिवंत झाला असे हे पाखांडी कबूल करतात व हें कृत्य सर्व मनुष्यें शेवटच्या दिवशीं मेलेल्यांतून उरतील ह्या गोष्टीला खचितार्थ दर्शविण्यासाठी झालें असे हें म्हणतात. ख्रिस्ती शास्त्राविषयीं त्यांचें असें मत आहे कीं तें पूर्ण ईश्वर प्रेरित नाहीं. त्याचे कांहीं भाग ईश्वरी प्रेरणेनं लिहिलें आहेत व कांहीं केवळ मनुष्य रचित आहेत.

याप्रमाणें पंडिता रमाबाईनें 'ख्रिस्ती धर्म म्हणून' जे पाखांड अवलंबिले आहे त्यांतील 'दाहा जणांचीं दहा कपोलकल्पित मतें' आहेत. आतां त्यापैकीं पंडिताबाईचें कोणते मत आहे

अथवा 'दाहाच्या' वर त्यांच 'अकरावें' असलें तर कृपा करून त्याचें निरुपण करावें. त्या आपल्या लेखांत ख्रिस्ती शास्त्रांतील प्रमाणार्थ म्हणून जीं वचनें घेतात त्यांचें मराठीत अक्षरशः भाषांतर करीत नाहीत व त्यांचे स्थळही दर्शवीत नाहींत. ही प्रशस्त रीत नाहीं आणि त्यापेक्षां अप्रशस्त रीत त्यांनी अशी धरली आहे कीं शास्त्र वचनाचा उतारा बरोबर घेत नाहीत.

उदाहरणार्थ ३१ मार्चच्या *सुबोध पत्रिकेत* त्यांनीं पुढील वाक्य घेतांना त्यांतील अत्यंत महत्त्वाच्या म्हणजे येशूनें मनुष्याच्या पापांकरितां प्रायश्चित्तात्मक मरण सोशिलें अशा अर्थाचा भाग सोडला आहे. तो उतारा येणेप्रमाणे : 'It was the good pleasure of the Father that in him should all the falness dwell, and through him to reconcile *all things unto himself having made peace through the blood of his cross.*'

ह्यांतील आम्ही लिहिलेला तिरकस अक्षरांचा शेवटचा वाक्य भाग पंडिता रमाबाई सोडला आहे. तो सोडण्याचें काय कारण होते? ख्रिस्ताच्या प्रायश्चित्तावर पंडिताबाईंचा विश्वास नाहीं म्हणूनच कीं नव्हें? जर त्यांचा विश्वास नसला तर तसे उघड रीतीनें सांगायास त्यांस कोणता प्रतिबंध आहे? पण तसे केल्यानें त्यांच्या प्रॉटेस्टंट मित्र मंडळींत त्यांस पुढें पुढें करणारे जे आहेत त्यांच्या डोळ्यांत माती कशी फेकतां येईल?'

तारीख ८ एप्रिल १८८९. ख्रीस्तदास

*ज्ञानोदय*, १८ एप्रिल १८८९, पृ. १२५, १२६.

## पत्र क्र. ९ : मि. सदोबा मिसाळ यांस ख्रीस्तदासाचे उत्तर

*ज्ञानोदयाचे* कर्ते यांस,

वि. वि. पंडिता रमाबाईच्या धर्ममतांवर चर्चा करितांना मी असा बेत केला होता की विषयाची समाप्ती झाल्यानंतर आपल्या ख्रीस्ती बांधवास कांहीं सूचना आपल्या पत्राद्वारें सादर कराव्या. परंतु आपल्या तारीख १८ एप्रिलच्या अंकांत मि. सदोबा मिसाळ यांचे पत्र पाहून हा बेत कांहींसा बदलावा लागला.

मि. मिसाळ यांच्या पत्राच्या प्रस्तावनेत मी विचार करीत बसत नाहीं. ती 'घरापेक्षां ढेकणं मोठी' ह्या म्हणीप्रमाणे किंवा 'हातभर लाकूड आणि सात हात ढलपी' ह्या म्हणी प्रमाणें आहे.

मि. मिसाळ मला पहिला प्रश्न असा करतात की मी मात्थी ७:१२ यांतील सुवर्ण नियमाप्रमाणें वागलो काय? ही ओवी व मात्थी १८·१५ (एकांती असतां त्याचा दोष त्याला सांग) ही जी दुसरी ओवी त्यांनीं उतरून घेतली आहे त्या उभयतांचा प्रस्तुत विषयाशी (पंडिता रमाबाईच्या धर्ममतांविषयीच्या वादाशी) काय संबंध हें त्यांनीं दाखविलें नाहीं. शास्त्र म्हणतें की 'जर तुझ्या भावाने तुझा अन्याय केला तर इत्यादी' तर पंडिताबाईनीं माझा खासगत अन्याय तर काही केला नाहीं. तेव्हां त्यांस एकांती जावून सांगण्याचें मला प्रयोजन दिसलें नाहीं. याशिवाय हा नियम मंडळींतील भावांविषयी आहे. पंडिता रमाबाई जरी आपल्याला ख्रिस्ती म्हणवितात तरी त्या आजपर्यंत कोणत्याही प्रॉटेस्टंट मंडळींत मिळाल्या नाहींत तसे मिळण्याची त्यांची इच्छा नाहीं असे मागेच त्यांनीं अमेरिकेंतील पत्रांतून प्रसिद्ध केलें होतें. मि. मिसाळ यांच्या मताप्रमाणें सुवर्णनियम सर्व गोष्टीस लाविला तर खरे खोटें, बरें वाईट यांची परीक्षा करणें, न्याय अन्याय यांचा निवाडा करणें, सत्याचे मंडन व असत्याचें खंडन इत्यादी अनेक गोष्टी बंद कराव्या लागतील. हा त्यांचा अर्थ पुढील गोष्टींत जसा एकदा मनुष्यानें दुसऱ्या एका ओवीचा अर्थ काढला तसा काढावा लागेल तो असा कीं एका अपराध्यास जज्जापुढे चौकशींत उभे केल्यावर त्यान बैबल उघडून पुढील ओवी जज्जसाहेबांस वाचून दाखविली : 'Judge not that ye may not be judged.' (मात्थी ७.१)

पंडिताबाईनीं स्वतःहून ज्या गोष्टी वर्तमानपत्राद्वारें चोघांमध्ये आणल्या त्या विषयीं त्यांची समजूत घालण्याचा 'एकांत' कशास पाहिजे?

२. 'स्त्री नाजूक पात्र आहे' हे शास्त्र वचन मि. मिसाळ यांनीं पुढ केलें आहे. परंतु त्यावरून चालू विषयाच्या संबंधानें कांहींच चर्चा केली नाहीं. ह्या अशक्त पात्राशीं मी कोणत्या प्रकारें असभ्यतेचें किंवा दांडगाईचें वर्तन केलें अथवा त्यांस कांहीं अपवब्द बोललों तर तो सांगायचा आहे. आजपर्यंत ज्या वर्तमानपत्रांनीं बाईसाहेबांवर अनेक प्रकारच्या अवाच्य व अमर्याद शब्दांनी वृष्टी केली त्यांकडे मि. मिसाळ यांनीं थोडे तरी लक्ष्य पुरवायचें होतें. व त्याबद्दल त्या पत्रांचा निषेध करावयाचा होता. *इंदुप्रकाशांत* तरी एका सूज्ञ गृहस्थाने अशांचा निशेध केला पण बाईच्या कैवाऱ्यांपैकी कोणी टांकभर शाई खर्चून एक अक्षरही लिहिलें नाहीं. असो. पण ह्या नाजूक पात्राने हातांत कुऱ्हाड घेऊन ख्रीस्ती धर्माच्या शेंड्या बुडख्यावर पाहिजे तेवढे प्रहार

करावें आणि मि. मिसाळांसारख्यानीं खुशाल मजा पहात बसावें हेच नाजूक पात्रासंबंधी कर्तव्य करण्याचें शास्त्रांत सांगितले आहे काय?

'नवीन विश्वासणारांचा नाश न व्हावा म्हणून वर्तमानपत्रांत मजकूर लिहिला, याशिवाय दुसरें काय केलें असें मि. मिसाळ मला विचारतात हे त्यास सांगण्यास मी बांधलेला नाहीं व सर्व कामें करण्याची माझ्या प्रभूची मला आज्ञा नाही.'

"In God's great field of labour
All work is not the same,
He hath a service for each one
who loves His Holy Name."

हा उतारा ज्या *ज्ञानोदया*च्या अंकांत त्यांचें पत्र छापले आहे तो त्यांनीं पाहिलाच असेल. शास्त्रही म्हणते कीं, 'सेवांचे अनेक प्रकार आहेत. कोणी एकास ज्ञानाची, कोणाला विद्येची गोष्ट दिली आहे.' इ. (१ कर ११.४–११) तरी मि. मिसाळ ह्यांस इतके सांगतो कीं पंडिताबाईकरितां मी वारंवार प्रार्थना करीत असतो. आता त्यांनीं आजपर्यंत त्यांजकरितां काय काय केले हें कळवावें. त्यांस अधाशाची वखवख लागली म्हणून *ज्ञानोदया*स पत्र पाठविले एवढेंच. किंवा पंडिताबाईसही खाजगी रीतिनें एखादे बोधपर पत्र पाठविले?

शारदासदनाच्या आरंभक समारंभाच्या संबंधानें मि. मिसाळ यांनीं जें लिहिलें आहे त्यावरून असें अनुमान होते कीं, त्यांस ह्या समारंभाविषयीं सर्व हकीकत माहीत नाहीं, किंवा असली तर त्यांनी तिजकडे दुर्लक्ष केलें असावे. 'त्यांनीं माझ्या नांवानें चमत्कार करील व माझी निंदा सहज करील असा कोणी' ही ओवी मि. मिसाळ यांनीं कोणत्या अर्थानें उतरून घेतली असेल ती असो, परंतु ती पंडिताबाईनी त्याप्रसंगी जे केले त्याला केवळ अप्रासंगिक आहे. त्या समारंभांत पंडिताबाईनीं जो धर्मरुप दिवा अमेरिकेंतून आणला तो मेजाखाली झांकून ठेवला इतकेंच नाहीं तर त्यांनीं एका मूर्तिपूजक (एकेश्वरी नव्हे) बाईकडून ज्यांत ख्रीस्ताचे नांवही नव्हतें अशी आपण लिहून दिलेली प्रार्थना वाचाविली हें करणे योग्य होतें काय? ह्यांत ख्रिस्ताची सहज निंदाच नव्हे तर बुद्धचा अपमान केला व त्याविषयी लाज धरिली. मि. मिसाळ जेव्हां उमरावतीस शास्त्र उघडण्याचा समारंभ करतील तेंव्हां असेंच वर्ततील काय? एखाद्या हिंदु मामलेदाराला प्रार्थना वाचावयास लावतील काय? जर 'पंडिताबाईनीं ख्रिस्ती हें नाम घेऊन ह्या विशाल कामांत यश मिळविले' तर ख्रिस्ताच्या नांवानें त्या कार्यास आरंभ कां केला नाहीं? परवा विल्सन कॉलेजांत जो समारंभ झाला त्यांत प्रार्थनेमध्ये ख्रिस्ताचें नांव गाळलें होते काय? प्रार्थना कोणी पारशी किंवा महंमदी धर्माच्या गृहस्थाकडून करविली काय? ह्या प्रार्थनेविषयीं एका ब्राह्म धर्मी पुढारी गृहस्थानें असे म्हटले कीं, 'आम्ही आमच्या मंदिरांत अशा मूर्तिपूजक बाईस प्रार्थना वाचायास कधी सांगितलें नसते.' अमेरिकेत 'आपणास ख्रिस्ती हे नाम घेऊन' द्रव्य मिळवावे आणि त्या द्रव्याची योजना करितांना सर्वांपुढें ख्रिस्ताचें नांव लपवावें, असे वर्तन ख्रिस्तास अनुकूल किंवा प्रतिकूल आहे याचा निर्णय मिसाळ साहेबांनीच करावा.

'या आसामीनें ख्रिस्ती धर्म जरी न शिकविला तरी बायांमध्ये ख्रिस्ती शास्त्राची बीजें

जाणण्यास आतां पेक्षां दहा पांच वर्षानंतर (ज्या बाया ह्या शाळेंत शिकून तयार होतील त्यास अधिक सुलभ मार्ग होईल) असा संभव होतो. हा संभव आपणांस पटतो काय? 'उत्तर' हा संभव मला पटत नाहीं व ह्या प्रश्नाची वाक्य रचनाही पटत नाहीं. सांप्रतच्या शिक्षण-पद्धतीप्रमाणें ज्या मिशन शाळेंत ख्रिस्ती धर्माचे बीज पेरितात तेथें देखील फळ दृष्टीस पडत नाहीं, तेव्हा जेथें मुळीच त्या बीजाची पेरणी नाहीं तेथे फळाची आशा कशावरून धरावी? 'फसूं नका. देवाची टवाळी होत नाहीं, मनुष्य जे पेरितो तेच पीक पावेल, म्हणजे तो आपल्या देहासारी पेरितो तो देहावरून नाश पीक पावेल, पण जो आत्म्यासारी पेरितो तो आत्म्यावरून सर्वकाळचे पीक पावेल.' (गल. ६.८)

*ज्ञानोदयकर्ते* महाराज, पत्र विस्ताराबद्दल क्षमा असावी. मि. मिसाळ यांच्या शेवटच्या पत्राचा जाब राहिला आहे तो ख्रिस्ती लोकांस जे सूचनारूप पत्र मला लिहायचें आहे त्यांतच सामील केला जाईल. ही विनंती.

ख्रीस्तदास

या संबंधानें आणखी वादविवाद चालविण्याचें अगत्य नाहीं.

*ज्ञानोदय*, २ मे १८८९, पृ. १४१, १४२. ज्ञा. क.

## पत्र क्र. १० : स्पष्टीकरण

ज्ञानोदयाचे कर्ते यांस,

वि. वि. मुंबईच्या ट्राक्ट सोसायटीने फुकट वाटण्याकरितां जी पत्रके प्रसिद्ध केली आहेत त्यांत 'जन्माष्टमी व गोकुळअष्टमी' ह्या नावाचे एक पत्रक आहे ते मी लिहिलेले असून त्यांत एक वाक्य येणेप्रमाणे आहे : 'कृष्णाने राधा व गोपी यांशी ज्या क्रीडा केल्या त्याबद्दल त्यास महाराष्ट्र देशातील हिंदू लोक दोष लावीत नाहीत. परंतू जगन्नाथपुरीस महोत्सवाच्या दिवशी बळिराम, कृष्ण व सुभद्रा यांच्या मूर्ति रथावर बसविण्याकरिता बाहेर आणितात तेंव्हा यात्रेकरू लोक कृष्णावर पुष्पवर्षाव न करिता शिव्यांचा वर्षाव करितात कारण कृष्णाने आपली बहीण सुभद्रा इशी कर्म केले ही कथा त्यास अवगत आहे. रामानुज, रामदास, कबीर इ. पंथस्थापकांनी कृष्ण भक्तीचा ऊत्सर्ग करून रामाची भक्ति का अवतरली ?'

हा मजकूर वाचून कित्येक हिंदी लोकांमध्ये या विषयी बरीच चर्चा चालली आहे व या लेखाला आधार काय असे ते ख्रिस्ती लोकांस विचारतात ? हे विचारणे योग्य आहे.

हिंदु धर्माच्या व विशेष करून हिंदु देवांच्या कथा सर्व देशांत सारख्याच आहेत. अथवा सर्व पुस्तकांत एकच आहेत असे नाही. बहुतेक कथा ग्रंथांतरी नसून परंपरेने चालत आलेल्या असतात. अशा कथा वेदात पुष्कळ आहेत. वेद रचण्यापूर्वी त्या कोठे लेखी नसूनही त्यांचे हवाले वेदात दिले आहेत.

आता ही कथा मला कोठून मिळाली असे कोणी विचारतील तर ज्या ग्रंथांतून मी ती घेतलेली आहे त्यांचे व त्यांच्या कर्त्याचे नांव खालील टीपेत दिले आहे. हा ग्रंथ फार मोठा असून (दोन भाग मिळून १२५६ पृष्ठे) सुप्रसिद्ध आहे. आणि त्यांतील गोष्टी वेद, रामायण व महाभारत इ. हिंदू ग्रंथांतून घेतल्या आहेत. कृष्णाविषयी ही कथा कोणत्या आधारावरून घेतली आहे हे काही सांगितले नाही, परंतू एकंदर लेख वाचून पाहिला असता ती दंतकथा असून ओरिसा प्रांतातील हिंदू व मुसलमान यास माहित आहे असे दिसते. कारण मुसलमान लोक हिंदू लोकांस या गोष्टीचे टोमणे मारितात असे व्हिलर साहेब म्हणतात :

(*A History af India from the Earliest Ages* by E.J. Talboys Wheeler).

In the older tradition Subhadra is said to have lived in criminal intimacy with both her brothers. This traditions is universally known and believed by the people in spite of the story of the marriage of Subhadra and the Muslims frequently taunt with the Hindus with the fact. The Pandits Reconcile the stories by a fiction of there having been two Subhadras. As to Krishna's proceedings, they explained away at maya.

(Wheeler's *History of India* Vol. I, page 153.)

कृष्ण किती पवित्र होता हे त्याने स्वमुखाने कबूल केले आहे. स्यमन्तक मण्याच्या प्रकरणात तो अक्रुरास काय म्हणाला हे विष्णुपुराणात सांगितले आहे.

एतत्सर्वकालं शुचिना ब्रम्हचर्येण च ध्रियमाण शेष राष्ट्रस्योपकारमशुचिना ध्रियमाण-माधारमेवहंति। अतोहमस्य षोडशस्त्रीसहस्रपरिग्रहादसमर्थो धारणे।। कथं चैत्य सत्यभामा स्वीकारोत्वार्थ–बलभद्रेणापि मदिरापानश्शेषोपभोगपरित्यागं । कथं कार्यं तदलंयदुलोकोयं बलभद्रोह सत्याच त्वां दानपते प्रार्थयाम:।। (वि.पु. अंक ४ अ. १३.६८–७०)

अर्थ: 'हा मणि सर्व राज्यास हितकारक होण्याकरिता जो मनुष्य ब्रम्हचर्यव्रत धारण करितो त्याजपाशी असला पाहिजे. जर तो अपवित्र मनुष्याने धारण केला तर तो त्याच्या मरणास कारण होईल. मला तर १६००० (सोळा हजार) बायका आहेत म्हणून मी तो ग्रहण करण्यास योग्य नाही. बलराम तर अतीशय मद्यपि व विषयलुब्ध आहे. त्याच्याने इंद्रियदमन करवत नाही. यास्तव आम्हाविषयीं विचार करायलाच नको. तर हे ऊदार अक्रुरा सर्व यादव, बलराम, सत्यभामा व मी मिळून तुला विनंती करितो की, हा मणि तू सांभाळ. तूच तो ग्रहण करण्यास योग्य आहेस.'

सोळा सहस्र नारी भोगून बालब्रम्हचारी असे जे कृष्णाविषयी म्हणतात त्यांनी या कृष्णवचनाचा चांगला विचार करावा. हिंदूंच्या देवांनी अगम्यागमन केल्याच्या अनेक कथा आहेत. 'ब्रम्हदेवाने स्वकन्येशी व्यभिचार केला' ही तर पुराणप्रसिद्ध कथा आहे. विष्णु व शीव हे व्यभिचाराच्या दोषापासून मुक्त आहेत असे नाही. वैदिक कालांत लग्नाचा निर्बन्ध नव्हता. कोणाची बायको कोण घेऊन जात असे. वैदिक देवांच्या नात्यातहि पुष्कळ गोंधळ आहेत. विस्तारभयास्तव उदाहरणे देता येत नाहीत.

हिंदू देवांचे वर्णन करण्याचा सर्व ख्रिस्ती ग्रंथकारांचा हेतु केवळ एकच आहे. त्यांची निंदा करावी अथवा त्यांच्या भक्तांची मने दुखवावी हा त्यांचा हेतू नाही. तर त्यांनी अशा देवांची भक्ति सोडून खरा तू एकच जो परमपवित्र परमेश्वर त्याला एकच जो तारणारा प्रभू येशू त्याच्या द्वारे शरण घेऊन सुख व शांति पावावी हा आम्हा सर्वांचा हेतू आहे.

*ज्ञानोदय*, २४ सप्टेंबर १८९१, पृ. ३०९. बी. पी.

## पत्र क्र. ११ : इंदुप्रकाशास उत्तर

*ज्ञानोदय*कर्ते यांस,

वि. वि. मुंबईच्या त्रा. सो. ने 'गोकुळअष्टमी' विषयी जे फुकट वाटण्याकरता हस्तपत्रक काढले आहे त्याविषयी 'स्पष्टीकरण' ह्या सदरांखाली जे माझे पत्र मागल्या *ज्ञानोदयात* आपण प्रसिद्ध केले त्यावर व त्या 'त्राक्टावर' आणि ख्रिस्ती धर्मोपदेशकांवर गेल्या *इंदुप्रकाशात* एक लांबलचक एडिटोरिअल आले आहे. बहुत वर्षे अशा प्रकारचे आर्टिकल ह्या पत्रात आले नव्हते. ख्रिस्ती लोक तर दरवर्षी अशी पत्रके वाटीत असतात व त्राक्ट सोसायटीची धर्मसंबंधी हजारो लहानमोठी पुस्तके विकली जातात. परंतू त्याविषयी वर्तमानपत्रकर्ते फारसे लिहीत नसतात. आताच मात्र त्यापैकी एक सुप्रसिद्ध व ज्यांत बहुधा सूज्ञतेच्या गोष्टी लिहिण्यांत येतात अशा एका वर्तमानपत्राने अशा प्रकारे ख्रिस्ती लोकांवर आग पाखडावी ही मोठी सखेदाश्चर्याची गोष्ट होय. यांत जे धर्मविचार व जी न्यायतत्वें प्रकट केली आहेत ती ज्या काळात ब्राम्हणांच्या शेजारी शूद्र बसला असता त्याच्या कुल्ल्यांस डाग देऊन त्याला देशपार करावे, अथवा शूद्राने हे यज्ञदत्ता, तूं सर्व ब्राम्हणांत नीच आहेस इतकेच म्हटले असतां त्याचे मुखात दहा अंगुल परिमित असा लोखंडाचा तप्त शंकू घालावा असे विचार व कायदे होते. त्या काळाला मात्र ती शोभण्याजोगी आहेत. हे अतिसंतप्त एडिटोरिअल मनुधर्मशास्त्रांतील तप्त शंकूच आहे. कोणी एका हिंदु कवीने म्हटले आहे की, 'जग रागे झाले वन्ही, संत मुखें व्हावे पाणी' तसे आम्ही प्रभू येशूचे दीन दास हा अति संतप्त ब्रम्हदंड सहनतारूप जलाने थंड करायास समर्थ आहोत. असो. ह्या एडिटोरिअलच्या योगें 'आज ३० वर्षे पुढे पाऊल टाकीत आलेल्या इंदूनें, ३०० वर्षे पिछेहाट केली' असे सर्व विचारी पुरुष म्हणतील.

ख्रिस्ती लोकांचा उद्देश हिंदू धर्माची अथवा कोणत्याही धर्माची निंदा करण्याचा मुळीच नाही, हे वारंवार सांगणे नको. जर त्यांचे लेख निंदापर आहेत तर त्यांची सर्व पुस्तके सरकारने जप्त करून जाळून टाकिली पाहिजेत, मिशनें बंद केली पाहिजेत, त्यांच्या शाळा व कॉलिजे मोडली पाहिजेत, व त्यांच्या सर्व उपदेशकांची तोंडे बंद करून प्रत्येक मिशनेरीस व क्याटिकिस्टास ज्ञानमठांत (तुरुंगात) नेऊन ठेविले पाहिजे, म्हणजे ते तेथे काही तरी ज्ञान शिकून शुद्धीवर येतील.

प्रत्येक मनुष्याला धर्मसंबंधी स्वतंत्रता बाळगण्याचा व आपल्या धर्माचीं कर्तव्यें आचरण्याचा हक्क आहे. हे न्यायतत्त्व हिंदु लोकांस कोठून समजलें ? त्यांच्या मन्वादी धर्मशास्त्रावरून समजेल काय ? ह्या तत्त्वाचें मूळ बैबलांत आहे. व ह्या तत्त्वाचा प्रवर्तक व अभिमानी केवळ ख्रिस्ती धर्मच आहे. आता ख्रिस्ती लोक हिंदु धर्माविरूद्ध जे बोलतात किंवा लिहितात त्याला इं. प्र. कर्ते निंदा म्हणतात. हे जर खरे आहे तर हिंदू धर्मात जे पंथस्थापक व साधुसंत झाले त्यांनी इतर पंथाविरूद्ध जी वचने लिहून ठेविली आहेत व आपल्या अनुयायास उपदेशिली तीही निंदात्मकच आहेत असे म्हटले पाहिजे, व त्याजवर अगोदर पिनल कोडाचा कोरडा चालविला पाहिजे. उदाहरणार्थ सर्व महाराष्ट्र जनांस व प्रार्थना समाजिस्टांस देखील परम-

पूज्य असे जे तुकाराम साधू त्यांनी शाक्तांविषयी काय म्हटले आहे ते ऐका :

शाक्ताची सुकरी माय। विष्ठा खाय बिदोची ।।
तीचि त्या लागे सवे। मागे धावे म्हणोनी ।।
शाक्ताची गाढवी माय। भुंकत जात वेसदारा ।।
तुका म्हणे शिंदळीचे। बोलता वाचे निंद ते . . ।।

चला उठा शाक्त मंडळी हो, (आणि ही काय हिंदुस्तानांत थोडी आहे? शंकराचारी ब्रम्हचारी पाणकेआचारी ह्यांतून बहुतेकांची नांवे ह्या मंडळीच्या पटांत दाखल केलेली सापडतील.) पाहा. एक चांगला सिलिसिटर व वक्ता बालीस्तर; आणि ठोका त्या बारकऱ्यावर फिर्याद. या प्रकरणाचा चांगला पिच्छा धरून या अनिर्जल झालेल्या लोकांस चांगले उदाहरण मिळेल आणि याच्या टवाळीच्या व खोडासाळपणाच्या वल्गना बंद होतील असे केले पाहिजे. पण आहो! इतके संतप्त कां होता? तर त्या बारकऱ्यांनी आमच्या परमपूज्य देवताची निंदा केली. जिच्यापासून ब्रम्हा, विष्णु, शिव ही तीन बाळें जन्मली, सर्व जगास जिचा आश्रय आहे अशी जी परमश्रेष्ठ ब्रम्हरूपिणी शक्ति तिची निंदा करणे यासारिखे पाप दुसरे कोणतेच नाही. तर घ्या हिसकावून त्या बारकऱ्यांच्या पताका, त्यांचे टाळ, वीणे, व त्यांच्या अभंगाच्या चोपड्या. तुकारामाने एकदा आपल्या अभंगांत लिहिले ते लिहिले, पण हे बेटे रस्तोरस्ती व निंदात्मक अभंग म्हणत की हो जात आहेत.

तसेच गणपतीचीही तुकारामानी निंदा केली आहे असे म्हटले पाहिजे.

गणोबा विकराळ। लाडूमोदकांचा काळ।
पूजिती विकट दोंद। पशु सोंड गजाची ।।

कोणतेही धर्मकृत्य व शुभ कर्म त्याच्या अग्रपूजेवाचून होत नाही. कोणताही धर्मग्रंथ अथवा कवन त्याचे स्तवन व प्रार्थना केल्या विरहित आरंभित नाहीत. ज्याची स्वारी नुकतीच मोठ्या धामधुमीने व कडाख्याने मुंबईत येऊन गेली अशा गणपतीची तुकारामासारख्या साधूने अशी निंदा करावी यांत हिंदू लोकांस व विशेषकरून गाणपत्यास वाईट वाटू नये काय? इ. प्र. पत्रात तर श्रीकर नसतो व गणपतीचे नमनही नसते असे कसे हे हिंदुधर्माभिमानी पत्र?

इं. प्र. कर्ते ह्या संतप्त एडिटोरियलांत कृष्णाचे शुद्ध भोळे भाविक भक्त बनले असून कृष्णाला 'परमात्मा' म्हणतात. परंतू भारतात कृष्णाखेरिज दुसऱ्यालाही परमात्मा म्हटले आहे. इतकेच नाही तर त्यावाचून दुसरा परमात्माच नाही असेही स्पष्ट सांगितले आहे. अनुशासन पर्व अ. १४ पाहा. त्यातील एकच वाक्य उदाहरणार्थ घेतो, 'ज्याचे लिंग ब्रम्हा, विष्णु व इंद्रादि देव नित्य पूजितात तो (म्हणजे महादेव) श्रेष्ठ.'

इं. प्र. च्या मते 'सर्व धर्माचे महत्त्व सारखे आहे.' हिंदुशास्त्र ही गोष्ट कबूल करिते काय?

ज्ञा. क. महाराज, पत्रविस्तार फार झाला असून क्षमा असावी. जगन्नाथाविषयींची व्हिलर साहेबाचा लेख खोटा आहे असे तर इं. प्र. कर्त्यांकडून स्थापित झाले नाही.

अथवा ओरिसा प्रांताकडील लोकांची तसी समजूत नाही असेही दर्शविण्यात आले

नाही. तथापि त्या लेखाकडून हिंदु लोकांची मने दुखावली आहेत तर त्याबद्दल मीही आपली दिलगिरी दाखवितो. कृष्ण व इतर देव याविषयीचे जे हिंदूशास्त्रांत दूषणार्ह लेख आहेत त्यांचे हिंदुधर्माभिमानी प्रमाणांनी व विचाराने निवारण करितील तर त्यांत आम्हा ख्रिस्ती लोकांस आनंदच आहे. तुकाराम, रामदास इ. साधुसंताच्या सद्गुणांप्रमाणे जर त्या कल्पित देवतांच्या ठायी सात्विकपणा आहे असे जर त्यांचे भक्त दाखवितील तरी देखील हर्षास कारण आहे, परंतु अशी गोष्ट होणे दुर्लभ.

मी आपल्या स्पष्टीकरण पत्रांत वि. पुराणातील घेतलेल्या कृष्ण उक्तीचा इं. प्र. कर्त्यांनी जो अर्थ केला आहे तो अगदी अयुक्तिक आहे. आपल्या भक्ताचे माहात्म्य वाढविण्याकरिता आपल्याकडे लघुतत्व घेण्याचा प्रभुसांप्रदाय आहे हे मत देवनिंदात्मक आहे; प्रभूचा हा परिपाठ नव्हे. तो ब्राम्हणांचा ज्ञानाभास होय. परमपवित्र जो परमेश्वर तो असे कधी करणार नाही, व नीच पामर अशा अपवित्र मनुष्याला तो आपले गौरव कधी देणार नाही, असे मत जे बाळगितात ते परमेश्वराचे मोठे अपराधी होतात.

ख्रिस्ती लोक आपल्या धर्माच्या कारणामुळे व त्यांच्या प्रभूने त्यांस शुभवर्तमान प्रसार करण्याची जी आज्ञा दिली आहे तिच्या पालनामुळे निंदा, अपमान, धिक्कार, छळ, दंड, तुरुंग व मरण देखील सोसायास तयार आहेत. ख्रिस्ताच्या आद्यशिष्यास यहूदी धर्म सभेने फटके मारून 'येशूच्या नावाने बोलूं नका' अशी आज्ञा केली, तेव्हा ते 'आपण त्याच्या नावाकरिता धिक्कार पावण्यास योग्य ठरलो यामुळे आनंद करून सभेच्या पुढून निघाले'.

ता. २९-९-९१

ता. क. : इंदूच्या एडिटोरियलातील आणखी कित्येक गोष्टींचा विचार पुढे करण्यात येईल.

ख्रीस्तदास

ज्ञानोदय, १ ऑक्टोबर १८९१, पृ. ३१५, ३१६.

* * *

परिशिष्ट ७

## बाबांच्या काही पुस्तकांच्या 'जाहिराती'

बाबा पदमनजींनी ग्रंथप्रसारार्थ जाहिरात या कलियुगातल्या पंधराव्या विद्येचा बराच उपयोग करून घेतला होता. त्यांनी जवळजवळ १२५ पुस्तके लिहिली. त्यांच्या काही उपलब्ध जाहिराती पुढीलप्रमाणे आहेत.

इ. स. १८५९ मध्ये बाबा पदमनजीकृत *क्यांडीच्या इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप* तयार झाला. या कोशाची जाहिरात मात्र फेब्रुवारी १८५९ पासून चालू होती ती पुढीलप्रमाणे :

> *क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप* शाळेतील विद्यार्थी व हापिसांतील लोक यांच्या उपयोगार्थ—
>
> या कोशात बावीस हजार (२२,०००) पेक्षा अधिक शब्द आहेत. म्हणजे मूळ ग्रंथांतील शब्दांपैकी केवळ एक अष्टमांश मात्र सोडिले आहेत. इंग्लिश शब्दाचे सर्व अर्थ मराठीत सांगितले आहेत. मराठी उपशब्द किंवा पर्यायशब्द उपयोगी पडण्यासारखे निवडून घेतले आहेत.

आपल्या कोशाची किंमत ती आगाऊ देणारास ३ रुपये तर मागाहून घेणारास ४ रुपये त्यांनी ठेविली आहे. तसेच अगाऊ पैसे देणारास टपाल हाशील पडणार नाही अशी लालूच पण ते दाखवतात.

> हा कोश मि. टामस ग्राहम यांच्या नामांकित छापखान्यांत ठशाच्या छापावर तयार होत आहे. ज्यास हा कोश घेणे असेल त्यांनी खाली लिहिलेल्या एजंटाकडे जावे म्हणजे मिळेल. . .

खाली एजंटाचे नाव व त्यांचे पत्ते आहेत. जाहिरातीचा शेवट बाबा पदमनजी या सहीने होतो.[1]

आपला हा कोश वाचकांनी उत्सुकतेने पण घ्यावाच यासाठी बाबा पदमनजींनी ही जाहीर खबर मुद्दाम छापली ती अशी :

> *क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशा*बद्दल अगाऊ पैका एप्रिल महिन्याच्या अखेरपर्यंत मात्र घेतला जाईल. नंतर देणारास पुस्तक छापून तयार झाल्यावर जी किंमत पडेल तीच म्हणजे चार रुपये पडतील.

ही जाहीरात ता. ३१ मार्च १८५९ला बाबा पदमनजींनी स्वतःच्या सहीनिशी *ज्ञानोदया*ला प्रसिद्धीसाठी पाठविली.[2]

नंतर जुलै महिन्यात परत याच पुस्तकाबद्दल जाहीर सूचना त्यांनी पुढीलप्रमाणे

वाचकांसाठी मुद्दाम प्रसिद्ध केलेली आहे. ते लिहितात :

> *क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप* ह्याच्या वर्गणीदारांस कळविले जाते कीं सदरहू पुस्तकाच्या प्रति येत्या ऑगस्ट महिन्याच्या आंत बाहेर त्यास मिळतील.[३]

जाहीर खबरमध्ये जी चूक होती ती 'चूक दुरुस्त' या मथळयाखाली पुढीलप्रमाणे दुरुस्त पण केलेली आहे ती अशी :

> **चूक दुरूस्त**
>
> *ज्ञानोदयाच्या* मागच्या अंकात *क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोश* या ठिकाणी *क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप* असे बाचावे.'[४]

असे छापले आहे. ही चूक बहुतेक बाबा पदमनजींनीच *ज्ञानोदयाच्या* संपादकांच्या लक्षात आणून दिली असावी. अशा प्रकारे बाबा पदमनजींनी आपल्या *क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप* या कोशाची जाहिरात देऊन वाचकांचे मन त्याकडे आकर्षित करण्याचा उत्तम प्रयत्न चालविलेला दिसून येतो. कोशाची उपयुक्तता कितीही असली तरी वाचकांच्या गळी त्याचे महत्व उतरवणे हे लेखकाचे कर्तव्यच ठरते. बाबांनी ते बजावले. सध्या आपण स्वस्त पुस्तक योजना किंवा 'पुस्तक प्रसिद्धीपूर्व सवलतीची योजना' वगैरे योजना पुस्तकाच्या जाहिरातीत केलेल्या पाहतो. *श्रीमान योगी, स्वामी, अमृतवेल* इ. पुस्तके या योजनांखाली प्रसिद्ध झालेली आहेत. बाबा पदमनजींनी शंभर वर्षांपूर्वी अशा तऱ्हेची योजना आखलेली आढळून येते. इ. स. १८६३ मध्ये त्यांनी *मोल्सवर्थकृत मराठी-इंग्रजी कोशाचा संक्षेप* हा आपला दुसरा शब्दकोश प्रसिद्ध केला. इ. स. १८६० पासूनच त्या कोशाची पद्धतशीर जाहिरात बाबा पदमनजींनी केलेली आहे. कोशकार्याचा प्रारंभ, हेतू, महत्त्व, कोशाची उपयुक्तता, किंमत, मिळण्याचे ठिकाण, कोशकार्यात झालेली प्रगती, प्रसिद्धीपूर्व सवलत इ. विविध अंगानी त्यांनी या कोशाची जाहिरात केली. तो कोश वाचकांनी घ्यावा यासाठी सतत त्यांच्या मनात कोशाविषयीची जिज्ञासा जागृत राहील असा प्रयत्न चालू ठेवला, तो सतत विविध प्रकारच्या जाहिराती छापून होय. कोशसंपादन हेच आधी खर्चाचे काम, त्यात जाहिरातीचा आणखी खर्च कशाला असा विचार त्यांनी केला नाही. पहिल्या प्रथम त्यांनी कोशलेखनास सुरवात करतानाच जाहिरात देऊन टाकली ती अशी :

> **जाहीर खबर**
>
> *मोल्सवर्थकृत मराठी व इंग्लिश कोशाचा संक्षेप* ह्या पुस्तकास आरंभ झाला आहे. त्यास वर्गणीदार होणारांनी आपली नांवे व पत्ता आताच लिहून पाठवावा. पुस्तकाची किंमत ते छापण्यास आरंभ होईल तेंव्हा कळविली जाईल, ती समजल्यावर ज्यास ते घेण्याची ईच्छा असेल त्यांनी लिहून पाठवावे, आणि त्याकडून लिहून येणार नाही त्यांची पूर्वी आलेली नांवे वर्गणीदारांमध्ये नोंदली जातील. पुस्तकाची पृष्ठें किती होतील वगैरे मजकूर पुढे कळविण्यात येईल.'[५]

याच जाहिरातीत त्या पुस्तकाची किंमत ते छापण्यास प्रारंभ झाल्याची जाहिरात लागल्या दिवसापासून तीन महिनेपर्यंत वर्गणीदारांकडून घेतली जाईल, नंतर घेणारास आगाऊ देणारांपेक्षा दीडपट जास्त पडेल असा व त्या कामाबद्दल जो पत्रव्यवहार होईल त्याचा खर्च वर्गणीदारावर पडेल असा धोक्याचा इशारा देऊन वर्गणी आगाऊ देण्याकडे वाचकांना वळवण्याचे कार्य वाचकांच्या न कळत बाबा पदमनजींनी केले आहे. पुस्तकाचे टपाल हाशील आगाऊ वर्गणी देणारास पडणार नाही हे प्रलोभन पण वाचकांसाठी आहेच. वर्गणीदारांची व्हावी म्हणून विविध गावी असणाऱ्या विविध व्यक्तींचे पत्ते देऊन त्यांच्याकडे वर्गणीदारांनी आपली नावे पाठवावीत असे शेवटी सुचविले आहेच. याच जाहिरातीत ता. क. लिहून आपल्या पूर्वीच्या कोशाच्या प्रती शिल्लक असून त्याची किंमत व टपाल खर्च दिला आहे.[६] यातच त्यांचे मुत्सद्दीपण किंवा जाहिरातदाराचे कौशल्य दिसून येते.

हा कोश तयार झाल्यावर बाबा पदमनजींनी फेब्रुवारी १८६२ मध्ये एक जाहिरात तयार करून *ज्ञानोदयात* प्रसिद्ध केली.[७] त्या जाहिरातीत ह्या कोशात २७००० शब्द असल्याचा उल्लेख महत्त्वाचा व मुद्दाम केलेला आहे. त्या सर्व शब्दांचे इंग्लिश अर्थ, व्याख्या व प्रसंगोपात उदाहरणे ही विपुल असल्याचे ते म्हणतात. पृष्ठे अंदाजे मोठ्या साच्याची ५५० पर्यन्त जातील. तरी सर्वांस विकत घेता यावा म्हणून किंमत स्वल्प म्हणजे पूर्वी नाव व पैका देणारास कातड्याने बांधलेले पुस्तक रु. ४ व नंतर विकत घेणारास कापडाने बांधलेले पुस्तक रु. ५ अशी आहे. पैसा कोठे पाठवावयाचा, नावे कोठे नोंदवावयाची व कोणत्या तारखेपर्यन्त या सर्वांचा खुलासा जाहिरातीत स्पष्टपणे केला आहे. ही जाहिरात अंमळ आकाराने मोठी वाटली तरी खुलासेवार असल्याने वाचकवर्ग या पुस्तकाच्या बाबातीत निःशंक होतो, यात शंका नाही. जाहिरात ही वाचकाचा वाटाड्या असावी लागते. वाचकाचे पूर्ण मार्गदर्शन करणारी एक उत्तम जाहिरात म्हणून वरील जाहिरात पाहता येईल. यांच कोशाची आणखी एक छोटी जाहिरात स्वतःच बोलकी असल्याने ती मुळातून जशीच्या तशी उद्धृत करीत आहे.

> जाहीर खबर–*मोलस्वर्थेकृत मराठी व इंग्लिश कोशाचा संक्षेप* ह्या पुस्तकाची आगाऊ वर्गणी घेण्याचा हा शेवटचा महिना आहे, तर ज्यांस वर्गणीदार होणे असेल त्याने पूर्वी जाहिरात दिल्याप्रमाणे वर्गणीचा पैका (दर प्रतीस ४ रु.) व नांव पाठवावे. पुढे पुस्तक निघेपर्यन्त वर्गणीदार होऊ इच्छिणारास ५ रु. पडतील व टपाल हाशील. परंतु पुस्तक कातड्याने बांधलेले मिळेल. पुस्तक छापण्याचे काम चालू आहे. 'ग' चे अक्षर लवकरच तयार होईल.[८] ता. ९ ऑगस्ट १८६२.

अशी तारीख घालून बाबा पदमनजी ही सही जाहिरातीच्या शेवटी बाबांनी केलेली आहे. तत्कालीन विविध नियतकालिकात व वृत्तपत्रात या कोशाच्या प्रसिद्धीची माहिती प्रसिद्ध झाल्याचे दिसून येते. त्यात *वर्तमानदीपिका*,[९] *सत्यदीपिका*[१०] इ. प्रमुख आहेत. विविध नियतकालिकांत स्वतःच्या पुस्तकावर अभिप्राय येणे वा आणणे ही एक जाहिरातच होय. इ. स. १८६५ मध्ये बाबा पदमनजींनी आपल्या *इंग्लिश आणि मराठी कोशाच्या संक्षेपा*'ची दुसरी आवृत्ती काढण्याचे ठरविले. दुसऱ्या आवृत्तीचे वैशिष्टय काय राहील आणि पहिली

आवृत्ती संपली या दोन्ही गोष्टी एकाच जाहिरातीमुळे लोकांना समजाव्यात असा तर बाबांचा प्रयत्न नसेल ना ? कोशासारख्या प्रचंड कामात लोकांची मदत घेऊन आपला कोश अद्यावत करावा, कोशनिर्देश व्हावा या दृष्टीने कोशांतर्गत विविध विषयांचा उल्लेख जाहिरातीत करून त्याबाबतीत असणारी लोकशिक्षण व लोकजागृती यासाठी बाबा करीत असलेली वैयक्तिक धडपड वगैरे अनेक गोष्टी बाबा पदमनजींच्या ज्या जाहिरातीतून प्रगट होतात ती अशी आहे

### जाहिरात

*इंग्लिश आणि मराठी कोशाचा संक्षेप* ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्ती पुष्कळ सुधारून व वाढवून तयार होत आहे. तर तिच्या कर्त्यास सर्व विद्वज्जनांस अशी विनंती आहे की, त्यांच्या विद्याभ्यासक्रमांत अथवा वाचनक्रमांत त्यास सापडलेले जे अनेक विषयांचे पारिभाषिक शब्द त्यांच्या संग्रहास असतील व जे आजपर्यन्त छापून प्रसिद्ध झालेल्या कोणत्याहि इंग्लिश व मराठी कोशांत नसतील ते (इंग्लिश व मराठी) अर्थासहित त्याजकडून कृपा करून पाठवून द्यावे, म्हणजे त्यांचा समावेश या नव्या आवृत्तींत केला जाईल. सूचनार्थ कित्येक विषयांची नांवे लिहितो—वैद्यशास्त्र, रसायणशास्त्र, खगोल कृषिकर्म, शरीर, मनोधर्मशास्त्र, पशुपक्षांची नांवे, कायदे प्रकरणी शब्द इत्यादि.

याबद्दल पत्र पाठविणे झाल्यास तिकीट लावून खाली सही करणाय इंदापूर येथे पाठवावे.[११]

आपल्या या पुस्तकाची प्रथमावृत्ती संपली यावरून तो किती उपयुक्त व लोकप्रिय आहे हे जाहीर करण्याचा छुपा हेतू प्रस्तुत जाहिरातीत आहे असे म्हणता येईल. नव्या आवृत्तीच्या जाहिरातीचा श्रीगणेशा तर उघडच आहे. साधारणतः आपण पाहतो की हल्ली बरेच लेखक आपले पुस्तक भाषांतरित असल्याचे जाहीर करीत नाहीत. काही जण तर भाषांतर केलेले पुस्तक आपले स्वतःचेच असल्याचा दावा करितात. पुस्तके व निबंध प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीच्या ३७ व्या वार्षिक रिपोर्टात बाबा पदमनजींचे *पहारेकऱ्याची वाणी* हे पुस्तक छापत असल्याचा व *पुणे जिल्ह्यातील पुरंधर तालुका येथील समस्त लोकांस* हे पुस्तक नव्याने छापल्याचा उल्लेख असून ही दोन्ही पुस्तके भाषांतरित असल्याचे स्पष्ट केले आहे.[१२]

पुस्तके व निबंध प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीस बाबा पदमनजींनी आपली पुस्तके भाषांतरे असल्याचे कळविले व म्हणून त्यांनी तसा उल्लेख केला. पुस्तकांचा उल्लेख ती भाषांतरित आहेत असा जाहीर रीतीने करणे यासाठी आवश्यक असणारा मनाचा मोठेपणा व स्वसामर्थ्याविषयीचा आत्मविश्वास या दोन्ही गोष्टी त्यांच्याजवळ होत्या. भाषांतरावरचे प्रभुत्व असल्याशिवाय कोणीही असा स्पष्ट उल्लेख करीत नाही. आपले पुस्तक भाषांतरित असले तरी त्याच्या खपाची शाश्वती असावी म्हणूनच त्यांनी वरील वृत्त जाहीर अहवालास पाठविले. अप्रत्यक्षरीत्या बाबांच्या पुस्तकांची ही जाहिरातच होती असे म्हणणे धाडसाचे होणार नाही. *सत्यदीपिका* नावाच्या मासिकाचे संपादन बाबा पदमनजी स्वतः करीत. त्या मासिकात बाबांनी आपल्या कोशाची जाहिरात कशी केली आहे पाहा :

### जाहिरात

इंग्लिश आणि मराठी डिकश्नेरी हे पुस्तक पांच वर्षांपासून तराय होत आहे. तें आता ईश्वर कृपेन छापायास पाठविण्याजोगे झाले आहे. यात इंग्लिश शब्दाचे इंग्लिश व मराठी असे अर्थ दिलेले आहेत. शब्दांचे ग्रीक, लॅटिन व संस्कृत धातू (रूढ) दिले आहेत व पुष्कळ उदाहरणे, भाषण, सांप्रदायिक बाक्ये, वगैरे विषय घातले आहेत.[१३]

यानंतर पुस्तकाची किंमत मिळण्याचीं ठिकाणे व टपाल हाशिल इ. मजकूर असून नंतर 'बुकाचे टैप, कागद व विषयाच्या नमुन्याची छापलेली पत्रे पाहावयास मिळतील.' असा निर्वाळा दिला आहे. 'गरीब विद्यार्थ्यांनी दरमहा एक रु. दिला असता सहा महिन्यांत त्यांच्या वर्गणीची फेड करून घेतली जाईल.' हे वाक्य जाहिरातीत घालून बाबा पदमनजींनी एक नवाच पायंडा पाडण्याचा यत्न केल्याचे दिसते. गरीब विद्यार्थ्यांना आपली पुस्तके हप्त्याने घेता येण्याची सोय कशी आपण केली आहे हे जाहिरातीत मुद्दाम सांगितले आहे. कोश हे किंमतीने तसे जास्तच असतात व सर्वसामान्यांना न परवडणारे असतात. तरी पण गरीब विद्यार्थ्यांना देखील ते खरेदी करण्यास कसे परवडतील व विद्यार्थ्यांचे खाऊचे पैसे वगैरे सत्कार्यार्थ कसे खर्च करता येतील, तर त्यांनी कोश खरेदी करावा असा तर उपाय ते सुचवित नाहीत ना? लहान मुलांचा पद्धतशीर विकास करण्याची बाबा पदमनजींची दृष्टी त्यांच्या जाहिरातीतून स्पष्ट होते. लोकांना आपली पैशाची गुंतवणुक कशी अनाठायी नाही व आपणांस पैशाचा पुरेपूर मोबदला मिळणार याविषयी खात्री पटावी म्हणून कोशाचा कागद, टाईप व विषयाचे स्थूल स्वरूप ते जाहिरातीत स्पष्ट करतात. त्यांच्या जाहिराती वाचकांचा विश्वास सहज कमावतात. लेखक व वाचकाचे नाते दृढ करितात. आपल्या पुस्तकांची जाहिरात अन्य मान्यवरांच्या अभिप्रायांच्या प्रसिद्धीने देखील उत्तम प्रकारे करता येते हे तंत्र ओळखनूच की काय बाबा पदमनजींनी आपल्या कोशा-विषयी *ज्ञानोदयात ज्ञानोदय*कारांचा अभिप्राय प्रसिद्ध व्हावा म्हणून पत्रकार परिषद त्या वेळी बाबांनी कांही घेतल्याचा उल्लेख नाहीं. पण आपल्या कोशाचे स्वरूप, हेतू, मूल्य, कागद, प्रगती व गिऱ्हाईकास विशेष सवलती इत्यादीबाबत ज्ञानोदयाच्या संपादकास मुद्दाम सविस्तर कळ-विले असावे. इतकेच नव्हे तर वेळोवेळी बाबा पदमनजींनी याबाबत आपल्या सहीची पत्रे *ज्ञानोदयात* प्रसिद्ध केली त्यांपैकी एक बरेच सविस्तर पत्र इ. स. १८६८ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे आहे :

> हा कोश आज सुमारे पांच वर्षांपासून तयार होत आहे. तो आतां ईश्वरकृपेने छापण्यांस पाठविण्याच्या पर्यायास येऊन पोहोचला आहे. ह्याची छापलेली पृष्ठे अजमासें ७०० होतील. पुस्तक सुन्दर कापडानें बांधले जाईल...पुस्तक येत्या डिसेंबरांत छापण्यांस प्रारंभ होऊन तें सप्टेंबर १८६९ या वर्षी छापून तयार होईल. . . ह्या कोशांत जितके शब्द, शब्दार्थ, उदाहरणें व वाक्यें आहेत तितकीं अशा प्रकारच्या दुसऱ्या कोणत्याही कोशांत मिळणार नाहींत. . .सर्वांस या पुस्तकाचा लाभ व्हावा म्हणून याची किंमत असावी त्यापेक्षां फार कमी किंबहुना अर्धोअर्ध ठेविली आहे असें समजावें. ह्यास सर्व विद्यावृद्धेच्छू लोकांनीं आश्रय द्यावा.[१४]

तसेच याच जाहिरातीत 'वर्गणीदाराचे नाव वर्गणी पाठविल्याशिवाय नोंदले जाणार नाही. वर्गणीची उगराणी करण्याचे खाते ठेवले जाणार नाही. ज्यास नाव व पैसा एकदम पाठविण्याचे सामर्थ्य नसेल त्यांनी हें पुस्तक घेण्याच्या खटपटीत पडू नये व आम्हास उगराणी करण्याची तसदी देऊ नये' असा कटू पण स्पष्ट, परखड इशारा दिला आहे. आपला माल चोख असल्यावर दुकानदार एकच किंमत व आज रोख उद्या उधार या पाट्या लावतो. त्यातलाच हा एक प्रकार. याशिवाय गिऱ्हाइकांचे मानसशास्त्र जाणून आपण काही अटी घातल्यास गिऱ्हाईकांना पुस्तकाचे मूल्य आपोआप पटेल व त्याचा खप होईल असेही त्यांना वाटले असावे. पुस्तक छापत असताना ते पूर्ण होण्यास कमी अधिक उशीर लागतो. त्यावेळी ज्यांनी आगाउ पुस्तकाची किंमत भरली असल्यास ते वाचक हवालदिल होतात. साशंक होतात. इथेच वाचक–लेखक काही करू शकत नाही. पण याचा परिणाम पुढच्या पुस्तकाच्या वेळी होण्याची दाट शक्यता असते. वाचक व लेखक यांत अंतर पडू नये म्हणून बाबा पदमनजी मधूनमधून अशी जाहिरात प्रसिद्ध करीत. इंग्लिश आणि मराठी कोश छापण्याचे काम ¾ झालें आहे. बाकीचें पुरे होण्यास सुमारें दोन महिने लागतील.[१५] त्यानंतर इ. स. १८७० साली *ज्ञानोदयात* या पुस्तकाविषयी अभिप्राय लिहून आला, त्याचे कारण बाबा पदमनजींनी कोशाची एक प्रत अभिप्रायार्थ संपादकास पाठविली. *ज्ञानोदयात* प्रसिद्ध झालेला अभिप्राय बाबांच्या कोशाची एक उत्तम अप्रत्यक्ष जाहिरातच होय व त्यापाठीमागची प्रेरणाही बाबांचीच म्हणून तो मुळातून वाचणे इष्ट होईल. *ज्ञानोदय*कार म्हणतात :

> मिस्टर बाबा पदमनजी यांनीं पुष्कळ श्रम व प्रयास करून हा कोश केला आहे. येणें कडून सर्व लोकांवर त्यांचे मोठे उपकार झाले आहेत. हा कोश किती उत्कृष्ट व अगत्याचा आहे हें लोकांस समजून मात्र आलें पाहिजे. म्हणजे ह्याचा पुष्कळ खप होईल. यास संशय नाहीं. हें पुस्तक बरेंच मोठें आहे. त्याची ६८० पृष्ठें (सर्व मिळून सुमारे ७०० पृष्ठें) आहेत, तरी त्याची किंमत फार थोडी आहे, म्हणजे केवळ ७ रुपये ठेवली. हा ग्रंथ किती उपयोगी आहे व तो करण्याकरितां किती श्रम लागले हे लक्षांत आणलें असतां तो इतका स्वस्त मिळतो यावरून सानंदाश्चर्य वाटते. आम्हांस तर वाटतें की याच्या किंमतीपेक्षा चौपट दाम मिळत असले तरी असले ग्रंथरत्न हातचे गमावूं नये.[१६]

या अभिप्रायाने कोणता वाचक हे पुस्तक विकत घेणार नाहीं? वाचकाला त्याच्या ग्रंथखरेदीच्या खर्चाबाबत स्वाभिमानी, स्तुतिपात्र बनविणे हा बाबा पदमनजींचा हेतू येथे साधला आहे. तोही आपण स्वतः प्रत्यक्षात पडद्याआड राहून. हेच बाबाचे खास वैशिष्ट्य येथे स्पष्ट होते. आपल्या पुस्तकांची जाहिरात अन्य मान्यवरांच्या अभिप्रायाने देखील उत्तम प्रकारे कशी करता येते व वाचकांच्या मनावर ती जास्त परिणाम करणारी कशी ठरते ह्याचे मानसशास्त्र बाबांनी पुरतेपणी जाणून तशा जाहिराती त्यांनी केल्या, हे आपण पाहिले. *ज्ञानोदयात* आपल्या पुस्तकांच्या जाहिराती विविध पद्धतीने देणे, पुस्तकावर अभिप्राय छापवून घेणे, पुस्तकांच्या माफक किंमती वेळोवेळी प्रसिद्ध करणे, छपाईच्या प्रारंभाची वर्दी देणे, गिऱ्हाईकांना दिलेल्या सवलती वेळोवेळी जाहीर करणे, पुस्तके किती खपली व किती शिल्लक आहेत, आवृत्ती कोणती

व का आणि कशी प्रसिद्ध करणार याचे निवेदन प्रसिद्ध करणे इ. सर्व गोष्टी जाहिरातीच्या विविध तंत्रात बसणाऱ्या आहेत. त्या सर्व वेळोवेळी बाबा पदमनजींनी केलेल्या दिसतात. त्यांपैकी काहींचे नमुने पाहाणे मनोरंजक ठरणार आहे. त्या दृष्टीने पुढील जाहिरात वाचा :

**जाहीर खबर** : बाबा पदमनजीकृत *इंग्लिश आणि मराठी कोश*. किमत रुपये ७. मुंबईत रा. जनार्दन रामचंद्रजी (टौन हाल) यांजपाशीं व इ. सौ. प्रेस भायखळा येथे व पुण्यांत (लष्कर सोलापूर बजार) ग्रंथकर्त्यांपाशीं मिळेल. मराठी व इंग्लिश कोशाच्या थोड्या प्रती शिल्लक आहेत. त्या इ. सो. छापखान्यांत मिळतात. किमत रु. ५."[१७]

त्याचप्रमाणे *साहित्य शतक* या बाबा पदमनजींच्या एका पुस्तकाची जाहिरात खरोखर पाहाण्यासारखी आहे. तीत ते म्हणतात :

*साहित्यशतक* नावाच्या पुस्तकाची जाहिरात ऑगस्ट महिन्याच्या *सत्यादीपिकेत* दिली आहे. हे पुस्तक तयार होत आहे. ते पुस्तक घेऊ इच्छिणाऱ्या लोकांची नावे आली असता ती वर्गणीदारांच्या पटांवर दाखल केली जातील. परंतू नांवाबरोबर किमत न आल्यामुळे (व ती आताच पाठविण्याचे कारण नाही) ह्या नावाची पोच टपालातून पत्रे पाठवून कबूल केली जाणार नाही. कारण या लहानशा पुस्तकासाठी पुष्कळ खर्च करून उपयोगी नाही. तथापि ज्यास पोच पाहिजे असेल त्यांनी अर्धा आण्याचे तिकीट पाठविले असता त्यांस ती मिळेल. ओळखीच्या मित्रांनी पुस्तक पोचल्यावर किमत पाठवावी, इतरांनी ते प्रसिद्ध झाल्याची नोटीस वाचून किमत पाठवावी म्हणजे त्यांस ते रवाना केले जाईल. पुस्तक छापून ते तयार होण्यास सुमारे एक महिन्याचा अवकाश आहे. ह्या पुस्तकाला जितके वर्गणीदार अधिक मिळतील तितकी त्याची किमत कमी होईल हे ध्यानांत ठेवावे.[१८]

पुस्तक तयार होत असतांना जाहिरात देऊन त्याच्या खपाची तरतूद करण्याची बाबांची दूरदृष्टी येथे प्रत्ययास येते. आपल्या पुस्तकाची किमत किती व त्यावर पोष्ट खर्च किती करावा याचे तारतम्य स्पष्ट करून वाचकांच्या हिताची गोष्ट मुद्दाम जाहिरातीत स्पष्ट करून वाचकांचा विश्वास कामावणे याला ते प्राधान्य देतात. ओळखीच्या मित्रांना प्रथम पुस्तके पाठविण्याचे धाडस ते स्वीकारतात किमान ते तरी नक्की खरेदी करणारच असा त्यांचा ठाम विश्वास या जाहिरातीत व्यक्त होतो. विक्रेता व खरेदी करणारा यांच्यातला विश्वास जाहिरातीतून दुणावतो तो असा. शेवटी जास्तीत जास्त वाचकांची पुस्तक घेतल्यास कमीत कमी किमत पडेल असा सामान्य अर्थ–सिद्धांत ते जाहिरातीत सहजपणे सुचवतात. आपल्या पुस्तकाच्या खपासाठी जास्तीत जास्त वाचकांची मनोभूमी तयार करणे हा त्यांचा हातखंडा या ठिकाणी दिसतो.

बाबा पदमनजी ट्रॅक्ट सोसायटी व बायबल सोसायटीचे संपादक होते. त्या पदावरून त्यांनी आपल्या पुस्तकांची उत्तम प्रकारे जाहिरात केलेली आढळून येते. त्या जाहिरातीत बाबा पदमनजींनी त्या ग्रंथाचे थोडक्यात महत्त्व प्रतिपादन केले आहे. ग्रंथ लोकोपयोगी कसा आहे व लोकांनी तो का घ्यावा याचे सुंदर विश्लेषण ते त्या जाहिरातीत करतात. याशिवाय ग्रंथाधार, ग्रंथस्वरूप, प्रसिद्धीची योजना, ग्रंथाची दुर्मिळता यासंबंधी आकर्षक माहिती बाबा मुद्दाम

जाहिरातीत देतात. वाचकांनी आपले ग्रंथ त्वरीत घेतले पाहिजेत असे कोणत्या लेखकाला वाटणार नाही? पण त्यासाठी खास प्रयत्न करावा तर बाबा पदमनजींनीच असे म्हणण्याइतक्या प्रभावी व परिणामकारी अशा त्यांच्या जाहिराती प्रत्यक्षातच पाहावयास हव्यात. नमुन्यादाखल हीच जाहिरात पाहा :

नवीन पुस्तके तयार होणार आहेत त्याविषयी सूचना.[१९] (१) *येशू ख्रिस्ताचे चरित्र* ह्या नावाचे पुस्तक मुंबईच्या ट्राक्ट सौसैटीकडून प्रसिद्ध होणार आहे. ते अनेक नामांकित इंग्लिश ग्रंथाधारे रचले जात आहेत. ह्याचा दरमहा सुमारे ४० पृष्ठांचा एक अंक बाहेर पडत जाईल. ते अष्टपत्री साच्याचे असून उत्तम प्रकारच्या कागदावर छापले जाईल. तर हे पुस्तक सर्वांना व विशेषकरून ख्रिस्ती लोकांनी घेण्याची त्वरा करावी. अशा प्रकारचा हा ग्रंथ मराठीत नवीनच आहे. प्रत्येक अंकाची किंमत १ आणा ठेविली आहे.

दुसऱ्या क्रमांकाच्या सूचनेत जुन्या कराराच्या पुस्तकासंबंधी माहिती देताना ते म्हणतात :

ही नवीन आवृत्ती पातळ कागदावर, निर्णयसागर छापखान्यात सुंदर रीतीने छापली जात आहे.

कागद, छापखाना, छपाई इत्यादींचा उल्लेख जाहिरातीत करून पुस्तकाचे गुणगान वाचकांच्या अंतःकरणापर्यंत पोहोचवणे व त्यास पुस्तक खरेदीस प्रवृत्त करणे हा त्यांचा मुख्य उद्देश्य येथे सुस्पष्ट आहे. पुस्तकाची दुर्मिळता वाचकांच्या कानावर घालणे ही पण एक अनन्यसाधारण जाहिरातच होय. याच सूचनेत क्रमांक ३ खाली ते लिहितात :

*यमुनापर्यटन* ह्या नावाचे पुस्तक फार दिवसांपासून मिळत नव्हते, ते आता ट्राक्ट सौसैटीकडून छापले जाणार आहे. त्याची किंमतही फार थोडी ठेवली आहे.

अशा प्रकारे संपादकीय सूचनेतही बाबांच्या पुस्तकांच्या जाहिराती दडलेल्या आहेत. यात त्यांची कला आहे, कौशल्य आहे. नवीन पुस्तकाचा खप जसा जाहिरातीने वाढविता येतो तसाच जन्या पुस्तकाच्या खपासाठी जाहिराती देण्याचा उपक्रम बाबांनी करून पाहिला. हा प्रयोग करणाऱ्या बाबा पदमनजी मला वाटते त्या काळात एकटेच असावेत. आपणास निरुपयोगी पण दुसऱ्यास उपयोगी अशी पुस्तके केवळ रद्दी म्हणून विकण्यापेक्षा पुस्तके म्हणून ती विकावीत असे बाबांसारख्या निष्ठावान लेखकाला वाटणे साहजिक आहे पण जुनी पुस्तके जाहिरातीच्या मार्गाने खपविण्याची युक्ती मात्र बाबांसारख्या कल्पक लेखकालाच सुचणे शक्य आहे. त्यांच्याजवळ काही जुनी पुस्तके आपणास अनावश्यक असणारी होती. ती विकण्यासाठी त्यांनी पुढील जाहिरात लावली :

जाहीर खबर : खाली सही करणारापाशी काही इंग्लिश व मराठी पुस्तके स्वस्त किंमतीने विकावयाची आहेत. ज्याला घेणे असेल त्याने आदितवारखेरीज खाली लिहिल्या ठिकाणी येऊन पाहावी.

घर नंबर ४८, बाबा पदमनजी[२०]
अपर डंकन रोड, मुंबई.

प्रस्तुत जाहिरातीप्रमाणे ती पुस्तके कोणी नेली किंवा नाही यासंबंधी काही वृत्त उपलब्ध नाही, पण सुमारे शंभर वर्षांपूर्वी बाबांनी केलेला हा उपक्रम मात्र अभिनव होता यांत शंका नाही. आज केवळ वधु-वरांच्या निवडीप्रित्यर्थ, जागा पाहिजे यासाठीही जाहिरात देतात अशा काळात वरील जाहिरातीचे कौतुक आपणास वाटणार नाही. पण शंभर वर्षांपूर्वी वरील दृष्टी असणाऱ्या बाबा पदमनजींची ही कल्पना कौतुकास्पदच होय. बाबा पदमनजी यांनी काही नियतकालिके चालविली. त्यांपैकी *कुटुंबमित्र* व *ऐक्यप्रदर्शक पत्रिका* या नावाची दोन होती. नियतकालिके व जाहिराती यांचा तर अन्योन्य संबंध असतो. त्या काळात बाबा पदमनजींनी आपल्या नियतकालिकांची जाहिरात कशी केली हे देखील पाहण्यासारखे आहे. आपल्या नियतकालिकाचे नाव, काल, किंमत, विषय, टपाल हाशील इ. गोष्टी वाचकांच्या माहितीसाठी ते अगोदर प्रसिद्ध करतात. *कुटुंबमित्र* हे मासिक पुस्तक एडिटर बाबा पदमनजी. यात अनेक प्रकारचे उपयुक्त व मनोरंचक विषय असतात. किंमत वर्षाचे १२ आणे व टपाल हाशील ६ आणे.[२१] 'ही माहिती ४ फेब्रुवारी १८८६च्या *ज्ञानोदयात* प्रसिद्ध करून १४ फेब्रुवारी १८८६ च्या *ज्ञानोदयात* पुढील वृत्त त्यांनी छापविले आहे. *ज्ञानोदया*चे संपादक त्याविषयी लिहितात :

*कुटुंबमित्र* हे मासिक चालू वर्षाच्या आरंभापासून म्हणजे गेल्या ज्यान्युएरीच्या १ ल्या तारखेपासून येथील ट्रॅक्ट सोसैटीने चालू केले. याचा साचा चतुष्पत्री असून प्रत्येक अंकांत २४ पृष्ठे असतात. हे निर्णयसागर छापखान्यात स्वच्छ रीतीने छापतात. याची किंमत सालीना १ रुपया किंवा दर अंकास दोन आणे आहे. यातील विषय व भाषा चांगली असती. आजपर्यंत याचे दोन अंक निघाले ते आम्ही पाहिले.[२२]

याच्यानंतर *ऐक्य प्रदर्शक पत्रिका* नामक मासिक पत्र निघाले. ही त्याची जाहिरात पाहा :

**जाहिरात** : *ऐक्य प्रदर्शक पत्रिका* नामक एक मासिक पत्र येत्या जानेवारीत निघणार आहे. किंमत दर अंकास अर्धा आणा. ह्या पत्राची एजन्सी 'खीस्ताप्रीत्यर्थ' ज्यास करपत्करण्याची इच्छा असेल त्यांनी त्याच्या एडिटरास 'मुसा बिल्डिंग, ग्रांटरोड, मुंबई' ह्या पत्यावर लिहून पाठवावे.[२३]

नियतकालिकास एजंट लागतात ते मिळविण्याचा बाबांचा प्रयत्न प्रस्तुत जाहिरातीत दिसून येतो. एजन्सीप्रित्यर्थ कमिशन नाही हे बाबांनी या जाहिरातीत सूचित केले आहे.

आपल्या पुस्तकाची छपाई, बांधणी चांगली आहे. त्याचा उपयोग विशिष्ट धर्माच्या लोकानाच आहे. त्याचप्रमाणे कांही पुस्तके फुकट वाटण्याकरिताच आहेत व सर्व बारीक सारीक गोष्टी बाबा पदमनजी आपल्या पुस्तकाच्या जाहिरातीतच मनमोकळेपणाने प्रसिद्ध करतात. जाहिरातीत प्रामाणिकपणाचा अभाव असतो व जाहिरातदार ग्राहकाची शिकार करतो असे जरी विनोदाने कै. न. चि. केळकरांनी म्हटले असले तरी बाबा पदमनजी व त्यांच्या जाहिराती यास अपवाद होत. बाबा पदमनजी आपल्या जाहिरातीत वाचकाचे जास्तीत जास्त मार्गदर्शन करिताना आढळतात. उदाहरणार्थ त्यांच्या काही पुढील जाहिराती वाचा :

**जाहिरात** : नवीन पुस्तक—*सदा रोगी व सदा उद्योगी*, रिचर्ड ब्यॉकस्टर याचा काळ व चरित्र रे. बाबा पदमनजी यांनी केले. ते त्राक्ट सोसैटीने निर्णयसागर छापखान्यात प्रसिद्ध

केले. प्रत्येक ख्रिस्ती कुटुंबाने हे पुस्तक वाचणे इष्ट आहे. किंमत १ आणा.[२४]

याचबरोबर आणखी एक जाहिरात वाचण्याजोगी आहे :

**जाहिरात** : त्राक्त सोसैटीकरिता रे. बाबा पदमनजी यांनी 'होळीचा सण'', 'रामनवमी' 'नारळी पौर्णिमा' आणि 'गोकुळ अष्टमी' हे चार निबंध लिहिले. ते आठवडयात छापून पुढील आठवडयात फुकट वाटण्याकरिता मिळतील.[२५]

अशा प्रकारे आणखी एक सूचना संपादकीय नात्याने त्यांनी जाहिरात स्वरूपात पुढीलप्रमाणे दिलेली आढळते.

**जाहिरात** : सूचना—ज्या मित्रांकडे ऐक्यप्रदर्शक पत्रिकेच्या पहिल्या अंकाच्या प्रती गेल्या आहेत त्यांसी पुढील अंकापासून किती प्रती लागतील ते कृपा करून वेळेवर कळवावे.[२६]

ऐक्य प्रदर्शक सभेचे पदाधिकारी, पश्चिम हिंदुस्थानातील ख्रिस्ती ऐक्य सभा, ऐक्य पत्रिकेचे एडिटर व त्राक्ट अँड बुक सोसायटीचे चिटणीस या प्रकारच्या विविध पदांवरून बाबा पदमनजीं यांनी काम केले. त्या काळी त्यांनी जाहिरात देऊन सभा बोलावल्या, निमंत्रणे दिली. या कामासाठी त्यांनी जाहिरातीचा वापर फारच चांगला करून घेतला. अशा काही जाहिराती पुढीलप्रमाणे होत :

ऐतद्देशीय ख्रिस्ती ऐक्य प्रदर्शक सभेच्या सर्व (पुरुष व स्त्रिया) सभासदांची पुढील आठवडयात मे तारीख १ शुक्रवार रोजी ८ वाजता खेतवाडीतील फ्री चर्च हायस्कूलच्या दिवाणखान्यात सभा भरून मागील कामाचा रिपोर्ट व पुढील वर्षाकरिता कामदार नेमण्यात येतील. त्या वेळी सर्व सभासदांस येण्याचे प्रीती पूर्वक निमंत्रण आहे.

सही—बाबा पदमनजी[२७]

रे. हार्मज्दजी पेस्तनजी आणि दाक्तर नारायण शेषाद्रि या उभयतांच्या स्मरणार्थ पश्चिम हिंदुस्थानातील एतद्देशीय ख्रिस्ती ऐक्य प्रदर्शक सभेच्या मार्फत खेतवाडीतील फ्री चर्च देवळांत मंगळवार ता. १८ रोजी संध्याकाळी साडेसहा वाजता भक्ति करण्यात येईल. तेव्हा मंडळातील सर्व भाऊ बहिणीस येण्यास प्रीतिपूर्वक निमंत्रण आहे.

धनजीभाई नौरोजी, अध्यक्ष
बाबा पदमनजी, उपाध्यक्ष
त्रिंबकराव कनारव, चिटणीस[२८]

बाबा पदमनजी यांनी *आत्मारामपंत व मृत्युशिपाई यांचा संवाद* या नावाचे एक पुस्तक प्रसिद्ध केले होते. हे पुस्तक फारच लोकप्रिय झाले. होते. त्याची पद्यमय रचना इ. स. १८९१ मध्ये झाली. त्याची *ज्ञानोदयात* बाबांनी इंग्रजी व मराठी अशी दुहेरी जाहिरात प्रसिद्ध केली आहे.[२९]

*सत्यदीपिका* मासिकाच्या मलपृष्ठावर त्याच मासिकासंबंधी जाहिरात छापली आहे ती

इंग्रजी व मराठी दोन्ही भाषांत छापली असून जास्त प्रती विकत घेणारास किंमत कमी पडते हे खुलाशेवार प्रसिद्ध केले आहे. तीत ते लिहितात,

हे पुस्तक मुलांसाठी महिन्यातून एकदा निघत असते. याची किंमत एका प्रतीस आगावू दिल्यास —

| | |
|---|---|
| वर्षास | ०–२–० |
| मागाहून दिल्यास | ०–४–० |
| फुटकळ अंकास | ०–०–३ |
| १२ प्रति घेणारास दर अंकास | १–४–० |
| १२ प्रति टपाल हांशिल सुद्धा | २–०–० |

वगैरे वगैरे. ह्या पुस्तकाच्या एका आण्यास १२ प्रति टपालातून पाठविता येतात. ह्या पुस्तकात छापण्याकरिता कोणास काही विषय पाठविणे झाल्यास पुणे येथे लष्करात 'सोलापूर बाजार' *सत्यदीपिके*च्या कर्त्यास हाशिल देऊन पत्र पाठवावे.[३०]

पुस्तकाच्या खपासाठी त्याची छापील किंमत काही काळ कमी करून त्याची उत्तम जाहिरात बाबा पदमनजींनी केली ती अशी :

*अनुभवसंग्रह* या पुस्तकाची किंमत अक्टोबर महिन्यापासून वर्षाअखेरपर्यंत आठ आणे केली आहे. (कागदाची बांधणी) शिवाय टपाल खर्च दोन आणे. कापडाच्या बांधणीचे पुस्तक १२ आण्यास मिळेल.[३१]

एखाद्या पुस्तकाची एकच प्रत घेतल्यास किंमत जास्त पण डझनाच्या भावास काही सवलत हा प्रकार पण त्यांच्या ह्या जाहिरातीत आहे. ही जाहिरात मुळातच पाहावी म्हणून येथे देत आहे :

*खिस्ती मनुष्याचा मरणावर जय*, किंमत दर प्रतीस अर्धा आणा. १२ प्रतीस चार आणे. ट. ख. अर्ध्या आण्यात १ किंवा २ प्रती जातात. खाली सही करणाराकडे हे पुस्तक मिळेल.[३२]

एक काळ असा होता की, इंग्रजी भाषा ही राजभाषा होती. जाहिरातीत देखील पहिला मान इंग्रजी भाषेला मिळे. प्रथम पुस्तकाची इंग्रजी भाषेत जाहिरात छापत व मग मराठीत ती जाहिरात छापली जाई. बाबा पदमनजी मराठी भाषेचे वाङ्मयसेवक खरे पण आपल्या काही पुस्तकांच्या जाहिराती त्यांनी इंग्रजी भाषेत करून नंतर त्याचा मराठी तर्जुमा छापलेला दिसतो. उदाहरण म्हणून ही एक जाहिरात पहा :

A New Tract. Just issued from the Bombay Tract and Book Society by Rev. Baba Padmanji. Entitled Richard Boexter the Industrious Invalid or *सदा रोगी व सदा उद्योगी* A most valuable tract to put the hands of every Christian. Price one anna.[३३]

इ. स. १८९१ साली बाबा पदमनजींनी *संस्कृत मराठी कोश* सिद्ध केला. त्याच्या जाहिराती त्यांनी अनेक पद्धतीने केल्या आहेत. *ज्ञानोदया*तून केलेल्या त्यासंबंधीच्या काही जाहिराती मुळातूनच पाहणे इष्ट ठरेल.[३४–३५–३६]

कधी टपाल हाशिलातील फायदा दर्शवून तर कधी ठोक व किरकोळ अंकास स्वतंत्र किंमत देऊन तर कधी आगावू किंमत भरावयास लावून आपल्या जाहिरातीने आपले पुस्तक बाबा पदमनजी वाचकाच्या गळी उतरवतात. त्याला पुस्तक खरेदी करण्यास उद्युक्त करितात. बाबा पदमनजींचे मोठेपण दिसते ते येथे. त्यांच्या अनेक युक्त्या प्रयुक्त्या येथेच प्रत्ययास येतात. पुस्तक छापल्यावर खपासाठी त्याची जाहिरात किती मार्गांनी करता येते हे बघायचे असल्यास बाबा पदमनजींचे *प्रभु भोजन घेणाराचा साथी* या पुस्तकाची जाहिरात पाहावी.[३७] पुस्तकाच्या खपासाठी त्याचे लोकप्रिय वृत्तपत्रात वा नियतकालिकात परीक्षण लिहवून आणणे हा तर आज जाहिरातीचा नित्याचाच प्रकार झालेला आहे. बाबा पदमनजींनी *प्रभु भोजन घणाराचा साथी* या पुस्तकाचे असेच परीक्षण इ. स. १८९२ मध्ये छापवून आणलेले दिसते. [३८] ८०–८५ वर्षांपूर्वीची जाहिरात क्षेत्रातील बाबा पदमनजींची ही कामगिरी खासच दुर्लक्षित करण्याइतकी सामान्य नाही. जाहिरात कलेचे महत्त्व व सामर्थ्य त्या काळी फारसे ज्ञान नव्हते. परंतु बाबा पदमनजींनी लेखन हा व्यवसाय पत्करल्यामुळे त्या व्यवसायाची नस 'जाहिरात' ही चांगलीच ओळखल्याचे दिसते. ता. १२ डिसेंबर १८८९ रोजी बाबा पदमनजींनी या पुस्तकाविषयीचा पुढील मजकूर *ज्ञानोदयात* प्रसिद्ध केला आहे.[३९] ते लिहितात,

> *प्रभु भोजन घेणाराचा साथी* या पुस्तकाच्या बऱ्याच प्रती शिल्लक आहेत. त्यांची किंमत या जाहिरातीच्या तारखेपासून दोन महिनेपर्यंत कमी केली आहे. तर ज्यास नाताळचे अथवा नवे वर्षाचे बक्षीस देण्याकरिता अथवा स्वतःसाठी पाहिजे असेल त्यांस अर्ध्या किंमतीस ते मिळेल म्हणजे ४ आण्याच्या किंमतीचे २ आण्यास व ६ आण्याचे ३ आण्यास. बाहेरगावी घेणारास टपाल हाशिल पडेल.

तसेच *अनुभवसंग्रहात* 'मी *प्रभु भोजन घेणाराचा साथी* या पुस्तकाच्या रेशमाने बंधलेल्या प्रती २० युरोपियन व नेटिव्ह ख्रिस्ती बायांस दिल्या' असा उल्लेख करतात[४०] व आपणांस रे. आर्. स्टादर्टसाहेब याने या पुस्तकाच्या कामी द्रव्याचे साहाय्य केले असे स्पष्ट कबूल करतात. जाहिरातीने पुस्तक विक्री व्हावी हा उद्देश्य काही बाबांचा नव्हता. त्याने ज्ञानलालसा वाढावी, ख्रिस्तप्रेम वाढावे हा त्यामागचा खरा हेतू होता. प्रामाणिकपणा हा व्यवसायाचा पाया असतो. बाबांना त्याची पुरेपूर जाण होती. बाबा पदमनजी जाहिरातीत देखील दुरुस्ती छापीत त्याचा एक नमुना पुढीलप्रमाणे :

> *प्रभु भोजन घेणाराचा साथी* (दुरुस्त केलेली जाहिरात). जाड टैपरंगीत कापडाची बांधणी, दर प्रतीस आणे ६, कागदाची बांधणी व ब्याक पट्टी आणे४, टपाल हांशिल कापडाच्या बांधणीस एक आणा. कागदाच्या बांधणीस अर्धा आणा. रेल्वेने प्रतींच्या संख्येप्रमाणे. मनिऑर्डरचा व टपालाचा खर्च घेणारावर.[४१]

जाहिरातीच्या द्वारा पुस्तकाच्या खपाची पराकाष्टा करणे हा बाबा पदमनजींचा विशेष आहे. गिऱ्हाईकांचे मानसशास्त्र त्यांनी अभ्यासले होते असे दिसते. मनुष्याच्या संग्रहप्रवृत्तीचा त्यांनी आपल्या एका जाहिरातीत उल्लेख केला असून त्याच जाहिरातीत मनुष्याच्या बक्षिसाच्या प्रलोभन वृत्तीचा छान उपयोग करून घेतला आहे हे दृष्टीस पडते. ती त्यांची जाहिरात अशी :

मित्र, ही चार रुपयास काय मिळेल ते सांगतो. दोन रुपयास *ज्ञानोदय*, शिवाय *प्रभु भोजनाचा साथी*, *नरनायक*, *यमुना पर्यटन* इ. ५–६ पुस्तके व एक वर्तमानपत्र मिळू शकेल. अशा प्रकारे दर वर्षी ४ रुपये खर्च केल्यास दर आठवड्यास एक वर्तमानपत्र आणि दर वर्षास ४–५ पुस्तके वाचण्यास मिळतील. या वर्षी जी पुस्तके ती पुढच्या वर्षी घेऊ नयेत. दुसरी घ्यावीत. अशाने गरीब मनुष्यास सुद्धा अल्प खर्चात दहा–पाच वर्षांनी आपले स्वतःचे एक लहानसे पुस्तकालय संग्रही ठेवता येईल.[४२]

बक्षिसाच्या प्रलोभनामुळे लोक खरेदीस प्रवृत्त होतात, हे लक्षात घेऊन बाबांनी शंभर वर्षापूर्वी आपल्या पुस्तकाच्या खपासाठी *ज्ञानोदया*चे बक्षीस प्रलोभन ठेवले. लोकांच्या मनात स्वग्रंथालय तयार करण्याची कल्पना जाहिरातीतच रुजवण्याचा प्रयत्न करण्यात पुस्तके लोकांनी घ्यावीत ही दृष्टी आहेच.

अनेक लेखक आपल्या एखाद्या ग्रंथाच्या मलपृष्ठावर आपल्याच इतर ग्रंथांची संपूर्ण यादीच्या यादी किंवा त्यापैकी काहींचा अल्पपरिचय देतांना आज आपणास दिसतात. हे पुस्तकाच्या खपाचे अत्याधुनिक तंत्र आहे. हे असे करण्यात आपल्या इतर ग्रंथांकडे वाचकांचे लक्ष जावे व वाचकांनी ते खरेदी करावेत असा सुप्त हेतू असतोच. हाही एक जाहिरातीचाच प्रकार होय. बाबांनी आपल्या अनेक पुस्तकांच्या मलपृष्ठांवर अशा जाहिराती छापल्या आहेत. त्यामुळे तर अनेक प्रकारच्या पुस्तकांची वेळोवेळी कल्पना येते. आणि ही सर्व पुस्तके व त्यांच्या सर्व आवृत्त्या उपलब्ध होत नाहीत, याची चुटपुट लागते.

* * *

## टीपा

१. *ज्ञानोदय*, १५ फेब्रुवारी १८५९, पृ. ५८.
२. *ज्ञानोदय*, १५ एप्रिल १८५९, पृ. ११२.
३. *ज्ञानोदय*, १५ जुलै १८५९, पृ. २२४.
४. *ज्ञानोदय*, १५ एप्रिल १८५९, पृ. १२८.
५. *ज्ञानोदय*, १५ ज्यु. १८६०, पृ. २२४.
६. *ज्ञानोदय*, १५ ज्यु. १८६०, पृ. २२४.
७. *ज्ञानोदय*, १५ मार्च १८६२, पृ. ८८,८९.
८. *ज्ञानोदय*, १५ ऑगस्ट १८६२, पृ. २५६.
९. *वर्तमानदीपिका*, २५ जुलै १८६३ मध्ये पुढील मजकूर आढळतो :
'मि. बाबा पदमनजींनी एक जाहिरात अशी लावली होती की ते मोलस्वर्थकृत मराठी व इंग्रजी कोशाचा संक्षेप करणार आहेत. तो झाला. एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत तो छापला त्याच्या छापाविषयी स्तुति करणे न लगे. कारण छापखाना अव्वल दर्जाचा व तेथील काम अव्वल प्रतीचे हे सर्वश्रुत आहे. हा कोश सर्वत्रास उपयोगी आहे. प्रत्येकाजवळ एक प्रत असावी.
पुढील प्रकारे कोशास प्रसिद्धी मिळाली :
(१) *बॉम्बे गॅझेट*, २८–७–१८६३ (२) *बॉम्बे गार्डियन*, १५–८–६३, (३) *दी टाईम्स ऑफ इंडिया रिव्हू*, १८–८–१८६३, (४) *दी बॉम्बदादा*, जुलै १८६३, (५) *इंदुप्रकाश*, ता. ३ री माहे ऑगष्ट १८६३, (६) *ज्ञानोदय*, १५ सप्टेंबर १८६३.
१०. *सत्यदीपिका* पु. ३ अं. ८ (ऑगस्ट १८६३) पृ. १२५ वर ह्या पुस्तकाची ३८२ पृष्ठे असून प्रत्येक पानात तीन मोडी असून पानांचा साचा *ज्ञानोदय*इतका असून बारीक अक्षर असल्याने शब्दांचा अर्थसंग्रह बहुत झाला आहे हा उल्लेख आढळतो. दर प्रतीस चार किंवा पाच आणे टपाल हाशील पडेल असा अंदाज पण वर्तविला आहे.
११. *ज्ञानोदय*, १५ फेब्रुवारी १८६५, पृ. ६४.
१२. *ज्ञानोदय*, पु. २४–९, १ मे १८६५, पृ. १३० व १३१ वर
(रिपोर्ट ऑफ दी ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटी)
१३. *सत्यदीपिका*, पु. ८ वे अंक ९ वा, सप्टेंबर १८६८, पृ. १४३ व १४४.
१४. *ज्ञानोदय*, १ ऑक्टोबर १८६८, पृ. ३००.
१५. *ज्ञानोदय*, १५ नोव्हेंबर, १८६९, पृ. ३५२.

१६. *ज्ञानोदय*, १ एप्रिल १८७०, पृ. १०४, १०५.
१७. *ज्ञानोदय*, १ ऑक्टोबर १८७२, पृ. ३०४.
१८. *ज्ञानोदय*, १० ऑगस्ट १८७६, पृ. ३८४.
१९. *ज्ञानोदय*, १३ ऑक्टोबर १८८१, पृ. ४८९.
२०. *ज्ञानोदय*, २० मे १८८०, पृ. २५२.
२१. *ज्ञानोदय*, ४ फेब्रुवारी १८८६, पृ. ७९.
२२. *ज्ञानोदय*, १४ फेब्रुवारी १८८४, पृ. १०४.
२३. *ज्ञानोदय*, २२ डिसेंबर १८९३, पृ. ४१६.
२४. *ज्ञानोदय*, १० एप्रिल १८९०, पृ. १२०.
२५. *ज्ञानोदय*, २६ एप्रिल १८९१, पृ. १०४.
२६. *ज्ञानोदय*, १९ जानेवारी १८९३, पृ. २४.
२७. *ज्ञानोदय*, २३ एप्रिल १८९१, पृ. १३६.
२८. *ज्ञानोदय*, १३ ऑगस्ट १८९१, पृ. २६४.
२९. *ज्ञानोदय*, २९ जानेवारी १८९१ पृ. ४०.
३० *सत्यदीपिका*, ९ सप्टेंबर १८६८, मलपृष्ठ क्र. ४.
३१. *ज्ञानोदय*, २४–१२–१८९६, पृ. ४१५.
३२. *ज्ञानोदय*, ३ फेब्रु. १८९८, पृ. ३२.
३३. *ज्ञानोदय*, १० एप्रिल १८९०, पृ. १२०.
३४. *ज्ञानोदय*, ८ डिसें. १८९१, पृ. ४००.
३५. *ज्ञानोदय*, २१ जाने. १८९२, पृ. २४.
३६. *ज्ञानोदय*, १४ जाने. १८९२, पृ. १६.
३७. *ज्ञानोदय* – पु. ४७, अं. ५२ (२७ डिसेंबर १८८८) पृ. ४१६ – ही जाहिरात प्रथम अशी दिसते. *प्रभु भोजन घेणाराचा साथी* विक्रीस तयार, सर्व भाविक ख्रिस्ती लोकांनी घेण्याची त्वरा करावी. हे पुस्तक १६ पत्रीं साच्याचे असून त्यांत एकंदर २१६ पृष्ठे आहेत. किमत : जाड रंगीत कागदाचे कवराची प्रत ४ आणे. रंगीत कापडाची प्रत ८ आणे. ८. ६ दर प्रतीस एक आणा. १२ प्रती घेणारास एक प्रत जास्त मिळेल . . . विशेष म्हणजे उधारीचे खाते ठेवण्यास अवकाश नाही हा उल्लेख महत्त्वाचा आहे. याच पुस्तकाच्या आणखी जाहिराती पुढील संदर्भात सापडतात.
*ज्ञानोदय*, ८ जानेवारी १८८९, पृ. ८.
*ज्ञानोदय*, १८ एप्रिल १८८९, पृ. १२२.
३८. *ज्ञानोदय*, १८ जानेवारी १८८९, पृ. १० – या परीक्षणात *ज्ञानोदय*कार लिहितात, *प्रभु भोजन घेणाराचा साथी* रे. बाबा पदमनजीकृत निर्णयसागर छापखान्यात सुरेख रीतीने छापले आहे. पृ. २१६, किमत आठ आणे आणि ४ आणे.' *ज्ञानोदया*च्या शेवटच्या पृष्ठावरील जाहिरात पाहण्यास ते सांगतात. शेवटी पुस्तकाच्या जास्त

वाटणाऱ्या किमतीचाही खुलासा त्यांनी केला आहेच. लोकाश्रयावर हे पुस्तक छापले आहे. ही पण एक त्यांची जाहिरातच आहे.

३९. *ज्ञानोदय*, १२ डिसेंबर १८८९, पृ. ४००.

४०. *अनुभवसंग्रह–भाग २*, मुंबई, १८९५, पृ. २४१.

४१. *ज्ञानोदय*, ८ जानेवारी १८८९, पृ. ८.

४२. *ज्ञानोदय*, ३ फेब्रुवारी १८९०, पृ. ५०.

* * *

परिशिष्ट ८

## संदर्भ साहाय्य

### ग्रंथ


उझगरे भा. कृ., *मराठी खिस्ती वाङ्मयाचा इतिहास*, सासवड, १९३१.
कर्वे चि. ग., *महाराष्ट्रातील ब्रिटिश राजवटीची पहिली घडी*, प्रसाद प्रकाशन, पुणे, १९५०.
कर्वे. चि. ग., *मराठी साहित्यातील उपेक्षित मानकरी*, पुणे, १९५७.
कानडे रा. गो., *मराठी नियतकालिकांचा इतिहास*, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३८.
कीर धनंजय, *महात्मा ज्योतिबा फुले*, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९६८.
कुरुंदकर नरहर, *धार आणि काठ*, पुणे, १९७१.
कुलकर्णी भीमराव, संपा., *अस्मिता महाराष्ट्राची*, मराठा मंदिर, मुंबई, १९७१.
कुलकर्णी भीमराव, *मराठी गद्याचा पूर्वरंग*, जोशी लोखंडे, पुणे, १९६६.
कुलकर्णी कृ. भि., *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति*, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, १९५६.
कॉटिनेंटल प्रकाशन, *प्रदक्षिणा*, पाचवी आवृत्ती, पुणे, १९७३.
केळकर द. के., *मराठी साहित्याचे सिंहावलोकन*, म. म. प्रकाशन, १९६३.
खानोलकर गं. दे., *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक*, (द्वितीय खंड), स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३८.
खानोलकर गं. दे., संपा., *धनंजय कीर : व्यक्ति व चरित्रकार*, मुंबई, १९७४.
चिपळूणकर वि. कृ., *निबंधमाला*, नवी. आ., चित्रशाळा प्रेस, पुणे, १९१७.
जोग रा. श्री., संपा., *मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड ४ (१८०० ते १८७४)*, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९६५.
जोशी अ. म., *चरित्र–आत्मचरित्र*, सुविचार प्रकाशन, नागपुर–पुणे, १९६२.
जोशी वि. कृ., *वृत्तपत्राचा इतिहास–खंड १*, युगवाणी प्रकाशन, मुंबई, १९५१. (साहा. लेले रा. के.)
जावडेकर शं. द., *आधुनिक भारत*, आ. २, पुणे. १९५३.
टिळक ना. वा., *वनवासी फूल*, आ. ५ वी. अमरावती, १९६२.
टिळक दे. ना., *महाराष्ट्राची तेजस्वीनी रमाबाई*, नागरिक प्रकाशन, नासिक, १९६०.

दाते य. रा., 'कोशरचनाशास्त्र व कोशवाङमय', *महाराष्ट्र भाषाभ्यास*, महाराष्ट्र कोश मंडळ, पुणे, १९३३.

दाते शं. ग. व इतर, *मराठी नियतकालिकांची सूची : १८००–१९५०–प्रथम खंड*, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई, १९६९.

देशपांडे कुसुमावती, '*मराठी कादंबरीचे पहिले शतक : १८५० ते १९५०* मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई १९१७ ते १९५३.

पाध्ये प्रभाकर व टिकेकर श्री. रा., संपा., *आजकालचा महाराष्ट्र*, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३५.

पंडित नलिनी, *महाराष्ट्रातील राष्ट्रवादाचा विकास*, २ री आ., पुणे, १९५२.

पिंगे श्री. म., *युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा*, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई, १९६०.

पोतदार दत्तो वामन, *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (१८१०–१८७४)*, पहिली आवृत्ती, १९२२ व २ री आवृत्ती १९५७.

प्रियोळकर अ. का., *दादोबा पांडुरंग : चरित्र-आत्मचरित्र*, के. भि. ढवळे प्रकाशन, मुंबई, १९७१.

प्रियोळकर अ. का., *डॉ. भाऊ दाजी : काल व कर्तृत्व*, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई, १९७१.

प्रियोळकर अ. का., *प्रिय आणि अप्रिय*, विदर्भ मराठवाडा बुक कं., पुणे, १९६५.

फडकुले निर्मलकुमार, *लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व*, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, जुलै १९७३.

फाटक न. र., *न्यायमूर्ति रानडे चरित्र*, आ. २, नीलकंठ प्रकाशन, पुणे, १९६६.

मोटे ह. वि., संपा., *विश्रब्ध शारदा*, मोटे प्रकाशन, मुंबई, १९७२.

रानडे गो. मो., *महाराष्ट्रातील समाजविचार (इ. स. १८१८–१८७८)*, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपुर–पुणे, १९७१.

रानडे रमाबाई मा., *आमच्या आयुष्यातील काहीं आठवणी*, ७ वी आ., पुणे, १९५३.

माडखोलकर ग. त्र्यं., *विष्णु कृष्ण चिपळूणकर : काल आणि कर्तृत्व*, चतुर्थ संस्करण, अमरावती, १९५४, पृ. १०९.

वाळिंबे रा. शं., *एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना–भाग १*, प्रतिभा मुद्रणालय, पुणे, १९६९.

सरदार गं. बा., *अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका*, मॉडर्न बुक डेपो, पुणे, १९३७.

सरदार गं. बा., *महाराष्ट्र जीवन–खंड दुसरा*, जोशी–लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६०.

सरवटे वि. सी., *मराठी साहित्य समालोचन–खंड १, २*, इंदूर, १९३७.

Candy Thomas, Edt., *English Marathi Dictionary*, 1847.

Davis M.P., Edt., *My Struggle for Freedom*, Raipur 1944. The Christian Book Depot, C.P.

Fredrick C.E., *The Abingdon Bible Commentary*, (Lewis Edwin &

Downery David) The Epworth Press, London, 1929.

Molesworth J.T., Edt., *Marathi and English Dictionary*, 2nd Ed., Bombay Education Press, Bombay, 1857.

Mulay B.P., (Baba Padmanji) *Stray Notes*. Bombay, 1900.

A Native Missionary, *An Earnest Student*, Bombay Family Press Bombay, 1891.

Albert H. Morehead, Edt., *The New American Roget's College Thesaurus*, The New American Library, New York, 1962.

Ray Paskal, *Design and Truth in Autobiography*, 1960.

Sengupta Padmini, *Pandita Ramabai Saraswati : Her Life & Work*, 5th Ed., Asia Publishing House, Bombay, 1970.

*Sketches of Indian Christians*, The Christian Literature Society, Madras, London, 1896.

*Report of the Board of Education*, Bombay, printed at Education Press, Bombay, 1863.

*Report of the Department of Public Instructions Bombay Presidency*, 1868-1869.

*The Bombay Guardian* of 15th November 1856.

## नियतकालिके

*नवभारत*, वर्ष १७, अं. ७, एप्रिल १९६४.

*प्रभाकर*, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे उपलब्ध असलेले अंक.

*प्रभोदय*, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय येथे उपलब्ध असलेला एक अंक.

*सत्यदीपिका धाकटी*, इ. स. १८६१ ते इ. स. १८७२ मधील उपलब्ध अंक.

*सत्यदीपिका थोरली*, इ. स. १८७२ ते इ. स. १८७५ मधील उपलब्ध अंक.

*ज्ञानप्रकाश*, पुणे विद्यापीठ व भारत इतिहास संशोधक मंडळ येथे उपलब्ध असलेले सुटे अंक.

*ज्ञानोदय*, इ.स. १८४५ ते इ. स. १९१० पर्यंतचे सर्व उपलब्ध अंक अहमदनगर कॉलिज लायब्ररी, अहमदनगर.

*The Oriental Christian Spectator*, Vol. XXIV, American Mission Press, Bombay, 1854.

* * *

# सूची

(या सूचीतील पुस्तकें, नियतकालिकें तिरप्या ठश्यात, महत्त्वाचे विषय अवतरण चिन्हात व व्यक्तींचा उल्लेख साध्या अक्षरात आहे.)

* * *



डावीकडून उजवीकडे बसलेले : राणीबाई (एस्तरबाई), बाबा पदमनजी, सौ. दिनकरराव पदमनजी (अण्णाराव पंडितांची मुलगी);
उभे : एबिनायझर विश्वास पदमनजी, दिनकरराव पदमनजी, भास्कर दलाया



डावीकडून उजवीकडे बसलेले : हॅना (प्रियंवदा), एस्तर (सरला), ए. व्ही. पदमनजी, सौ. सुंदराबाई पदमनजी, रुक्मिणी सांगळे;
उभे : हेमन्त स्टीफन पदमनजी, शांती (सेरा)




बाबा पदमनजी प्रबंध पारितोषिक



श्रीमती सुंदराबाई पदमनजी (बाबांची सुन) ग्रंथकर्त्यास पारितोषिक अर्पण करताना (दि. ३ नोव्हें. १९७५)
(बारामती येथील ख्रिस्ती साहित्य संमेलन प्रसंगी)

# यमुनापर्यटन

अथवा

## हिंदुस्तानांतील विधवांच्या स्थितीचें निरूपण.

हा ग्रंथ

## बाबा पद्मनजी

यानीं रचिला, व याच्या आरंभीं

### रावबाहादुर दादोबा पांडुरंग

यानीं विधवांच्या पुनर्विवाहाविषयीं निबंध लिहिला असे.

---

"विधवेला जाचूं नका."—खि. शा.
"विधवेच्या हितासाठीं रदबदली करा."—खि. शा.

---

मुंबई.
टामस ग्रेहाम यानीं छापिलें.
इ० सन १८५७.

'यमुनापर्यटन'च्या पहिल्या आवृत्तीचे मुखपृष्ठ

# अरुणोदय.

## बाबा पदमनजी यांचें चरित्र.

ह्यांत पुस्तककर्त्यानें आपलें हिंदु जिणें व
ख्रिस्ती होणें ह्या गोष्टींचें वर्णन
केलें आहे.



"मी जसा असावा तसा नाहीं, मला असें असण्याची इच्छा आहे तसा मी नाहीं, मला असें होण्याची आशा आहे तसा मी नाहीं, परंतु मी एकदां जसा होतों तसा आतां देवाच्या कृपेनें नाहीं."

जान न्युतन.



मुंबईमध्यें
अंग्लो-वर्नाक्युलर छापखान्यांत छापिला.

सन १८८८.

'अरुणोदय'च्या पहिल्या आवृत्तीचे मुखपृष्ठ

# सत्यदीपिका.

THE LAMP OF TRUTH.

पु० ३ मुं० आक्टोबर सन १८६३. अं० १०.

अनुक्रमणिका.



BOMBAY:

PRINTED FOR THE CHRISTIAN VERNACULAR EDUCATION SOCIETY.
Under the direction of the Bombay Tract and Book Society;
AT THE "EXCHANGE PRESS," Fort.

1863.



३ प्रार्थना केल्यावर तूं [ उत्तर मिळेल असा ] विश्वास धरितोस काय?

४ विश्वास धरल्यावर तुला नम्रता व आज्ञांकितपणा हीं येतात काय?— उदयप्रभा.

V.—GOWRI

## गौरी.



सत्यदीपिकेचे कर्ते यांस.

मी श्रावणमासीं कृष्णाष्टमीचे दिवसीं नदीवर

२४: ३: ९३.
Bombay.

ख्रिस्तामध्ये प्रिय वेंकट मि. कुलकर्णी यांस
बहुत प्रितीपूर्वक सलाम. आपले
पत्र वाचून फार संतोष झाला. ईश्वराने
आपणास आपल्या राज्यात बोलावले
इतकेंच नव्हेंतर आपल्या सेवेसही
लावले ही फार मोठी गोष्ट आहे.
आता ही सेवा करण्याची आपण
विद्येच्या संबंधाने जसकी मिळविली
ही मोठीच आनंदाची गोष्ट होय
प्रभुच्या कामात आनंद असला
पाहिजे. तो आपल्या संगती आहे
व आपले काम पाहून संतुष्ट होतो
या सेवेचे मोठे बक्षिस पुढे दूर
मिळणारच आहे पण आताही ते
काही अंशी आपल्या पदरी
पडतें. जें जिवनाचे बिज आपण
पेरितों तें व्यर्थ जातें असें
कधीं समजूं नये ज्या-त्या कळाची-

आशा धरावी व तें कोठें मिळते हें पहावें आणि जरी तत्काळ तें न दिसलें तरी दैवाचें काम आपण बजावलें असें समजल्यांत बक्षिस मिळतें.

पंडिता बाई विषयीं आपण जे ऐकलें ते मला ठाऊक नव्हते परंतु एका मित्रास विचारल्यावरून असें समजतें की ती गोष्ट खरी आहे. त्यांत कांहीं विशेष नाहीं ज्यास जसा शास्त्रांतून प्रकाश मिळाला असेल त्याप्रमाणे त्याने वर्तावें. अशा गौण गोष्टीवर आपलें तारण अवलंबून नाहीं.

आपलें लेकरूं व कुटुंब सुखरूप हें ऐकून आनंद वाटला. इथें अध्याय बंद

HELP TO MARATHI STUDENTS AND AUTHORS.



# शब्दरत्नावली.

BY

BABA PADMANJI.



BOMBAY:
PRINTED BY THOMAS GRAHAM.

1860

# प्रस्तावना.

---

क्यांडीकृत इंग्लिश व मराठी कोशाचा संक्षेप करितां वेळीं मला त्या शब्दसमुद्राच्या संपूर्ण प्रदेशांतून पर्यटन करीत जावें लागलें. तेव्हां महाराष्ट्र भाषेंतील शब्दरूप रत्नाचीं जीं बेटें जागोजागीं अढळलीं, तीं पाहून चित्तास बहुत आनंद व आश्चर्य वाटूं लागलें. आणि अशी ही आपली मातबर भाषा आपल्याच लोकांस माहीत नसावी, आणि तिचा इंग्लिश लोकांनीं शोध करावा व इंग्लिश शिकणारास मात्र तिचा लाभ व्हावा ह्मणून दुःखही वाटलें. पुढें इंग्लिश कोशाचें काम झाल्यावर अवकाशानुसार मोलस्वर्थकृत महाराष्ट्र व इंग्लिश कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीचें अवलोकन करूं लागलों, तींतही अनेक प्रकारचे शब्द व अनेक विषय व त्यांची उपपत्ति व व्याख्या हीं दृष्टीस पडूं लागलीं. ते सर्व शब्द जर कोणी इतर ठिकाणीं शोधूं लागला तर त्यास शेंकडो ग्रंथ मिळविल्याशिवाय व शेंकडो मनुष्यांस विचारपूस केल्याशिवाय सांपडणार नाहींत असे आहेत. अशांचा संग्रह त्या महा ग्रंथांत त्याच्या महा विद्वान कर्त्यानें केला आहे. ह्या शब्दांचाही वर सांगितल्याप्रमाणेंच सर्व लोकांस लाभ होणें दुर्लभ आहे. मुळीं इंग्लिश भाषा सर्व महाराष्ट्र लोकांस येत नाहीं, आणि ज्यांस ती येती त्यांतून स्वभाषेवर भक्ति ठेवणारे असे फार थोडे, आणि त्यांतही ज्यांस स्वभाषेची अभिरुचि आहे त्यांतून क्यांडीकृत व मोलस्वर्थकृत कोश घेण्यास समर्थ अस

किती थोडे निघतील! हजारांतून एकापाशींही हे भारतप्राय ग्रंथ मिळणें कठीण. तेव्हां अशा कारणानें जीं मुलें महाराष्ट्र भाषा शिकतात अथवा जे तरूण विद्यार्थी त्या भाषेंत निबंध व ग्रंथ लिहितात त्यांस अति उपयोगी असे शब्द व विषय कोठून मिळणार व त्यांच्या कामास सहाय कोठून होणार!

हा विचार मनांत आणून पूर्वोक्त दोन्ही ग्रंथांत जे सहस्रावधि महाराष्ट्र शब्द आहेत त्यांतील कित्येक निवडून एक लहानशी शब्दरत्नावली नामक वही केली आहे. ही केवळ पुढें उभारायाच्या एक्या मोठ्या इमारतीची भूमिका किंवा पाया आहे असें समजावें. त्या इमारतीचा बेत एथें सांगवत नाहीं, व तिचा नकाशा काढून दाखविण्याची गरजही दिसत नाहीं. ज्यानीं इंग्लिश भाषेंतील "रोजेटस थिसीरस" नामक कोश पाहिला असेल त्यांच्या ध्यानांत तिची भावी रचना येईल.

ह्या लहान पुस्तकांत दोन भाग आहेत. पहिल्या भागांत मोलस्वर्थकृत कोशांतील कित्येक चमत्कारिक, पारिभाषिक व ज्यांच्या पोटांत बहुत उपविषय किंवा व्याख्या आहेत असे कांहीं शब्द निवडून घेतले आहेत. दुसऱ्या भागांत क्यांडीकृत कोशांतील ज्या महाराष्ट्र शब्दांस बहुत उपशब्द आहेत ते त्या शब्दांसहित निवडून घेतले आहेत. ह्या दोन्ही भागांतील शब्दांची गरज महाराष्ट्र भाषा शिकणारांस, व महाराष्ट्र ग्रंथ व कवन करणारांस किती आहे हें एथें सांगायास नको. त्यांस ह्या लहानशा चोपडींत बहुत विषयांचा संग्रह व बहुत शब्दांचा भरणा सांपडेल, व जर त्यानीं कुशलतेनें त्यांचा उपयोग केला तर त्यांच्या लेखास

रस, लालित्य, चेतना इत्यादि गुणांची शोभा येईल. विशेष काय सांगावें, ही चोपडी अनेक प्रकारच्या मसाल्याच्या व किराण्याच्या थैलीप्रमाणें आहे. ही जर कुशल स्वयंपाक्याच्या हातीं पडली तर तो परोपरीचीं अन्नें सिद्ध करण्यांत जे जिन्नस पाहिजेत तेच परिमित मानानें घेऊन आपल्या पाकास सुवास, रुचि, माधुर्य व पुष्टता आणील. परंतु ज्यास ही अन्नसिद्धी कसी करावी हें माहीत नाहीं त्याच्या हातीं ही चोपडी गेली असतां तो कसा काला करील हें सांगायास नको. तर तरूण विद्यार्थ्यांस ही पाकक्रिया शिकविण्याच्या स्तुत्य व उपयुक्त कामास जे लागले आहेत, व ज्यांस आपल्या स्वदेशीय बांधवाच्या भोजनार्थ अनेक प्रकारचीं पुष्टिकारक अन्नें सिद्ध करावीं लागतात त्या सर्व विद्वान गुरूंस, शिक्षकांस व गद्यपद्यादि ग्रंथकारांस हा अनेक द्रव्ययुक्त बालकोश समर्पण केला आहे, त्याचा त्यानीं कृपाकरून स्वीकार करावा ही ग्रंथकर्त्याची त्यांस प्रार्थना आहे. आणि सर्व विद्यावृद्धीच्छु लोकांसही अशी विनंती आहे कीं, जर त्यानीं ह्या त्याच्या प्रयत्नरूप अंकुरास आपल्या आश्रयाचें पाणी घातलें तर लवकरच एक मोठा वृक्ष त्यांच्या दृष्टीस पडेल आणि त्याचीं फळें त्यांस बारमाही मिळतील.

---

# प्रस्तावना.

## सूचना.

ह्या पुस्तकाच्या पहिल्या भागांत मूळशब्द ३५८ आहेत व त्यांचा अर्थ किंवा विस्तार प्रदर्शक शब्द ४८५३ आहेत. दुसऱ्या भागांत मूळ शब्द २६५ आहेत व त्यांचे उपशब्द व भाषण संप्रदायीक शब्द मिळून ६५८२ आहेत. एकंदर शब्द सुमारें १३,००० आहेत.

ह्या कोशाच्या शेवटास दोन अनुक्रमणिका आहेत. पहिल्या भागाच्या अनुक्रमणिकेंत मूळ शब्दाचे अर्थ मोलस्वर्थकृत कोशावरून इंग्रजित घेतले आहेत. आणि दुसऱ्या भागांत इंग्रजी शब्दावरून पुस्तकांतील पर्याय शब्दाचें मूळ पाहण्याचें पत्रक रचिलें आहे. ज्यांस इंग्लिश भाषेवरून मराठीचा अभ्यास करण्यास सुलभ पडतें त्याच्यासाठीं ही व्यवस्था केली आहे.

## ह्या पुस्तकांतील संज्ञा.

अ० = अथवा, प्र० = प्रकार, २ = दुसरा अर्थ किंवा दुसरा प्रकार. औ० = औषधसंबंधी, भा० सं० = भाषण संप्रदाय. जेथें शब्दापुढें हा = रेघ आहे तेथें मागल्या शब्दाचा अर्थाहून कांहीं प्रकारें निराळे अर्थाचे शब्द आहेत असें समजावें.

---

# शब्दरत्नावली.

---

## भाग पहिला.

## अ.

**अठराअखाडे.** अघोरी, अरण्य, अवधूत, आनंद, आश्रम, इंद्रउदासी, कानफाट्या, कालबेला, गोदड, गोरखपंथी, डवरा, नंगागिरी, निरंजनी, निर्बानी, पुरी, भराडी, भारती, राऊळ, वन, सर- भंगी.

**अठरा उपधान्यें.** सजगुरा, भादली, वरी, नाचणी, बरग, कांग, खपले गहूं, मका, करडई, राजगिरा, मटकी, पावटा, मूग, वाल, काराळा, देवभात, सातू, अंबाडी. २ सजगुरा, नाचणी, वरी, मका, मटकी, राजगिरा, शिरस, पांढरफळी, जिरा, मेथी, वेणूबीज, देवभात, कमलबीज, पाकड, अंबाडी, भेंडीबीज, गोवारी, कुड्याचें बीज.

**अठरा पुराणें.** पुराणें पाहा.

**अठरा कारखाने.** उष्टर- कबुतर- जवाहीर- जामदार- जिकीर- तालीम- तोफ-थट्टी- दप्तर- दादिवान- नगार, पील, फरास, बंदी, मोदी, शिकार- खाना. २ तोप- पील- उष्टर- फरास- शिकार- रथ- जामदार- जवाहीर- जिराईत- नगार- दारू- वैद्य- लकडइमारती- मुदबख- कुणबिणी- खाजगत-थट्टी. ३ खजीना- दप्तर- जामदार- पील- जिराईत- अंबर- फरास- मुदबख- नगार- सरबत- आबदार- शिकार- तालीम- दारू- उष्टर- बकरे- तोप- सराफ- जनान.

**अठरा धान्यें.** गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लांक, चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, चवळी.

**श्लोक.** गोधूम शालि तुवरी यव यावनाल वातान लंक चणका अतसी मसूराः ॥ मुद्ग प्रियंगु तिल कोद्रवकाः कुलित्थाः श्यामाक माष चवला इतिधान्यवर्गः ॥

**अंतःकरणचतुष्टय.** मन, बुद्धि, चित्त, अहंकार.

**अंतःकरणपंचक.** अंतःकरण, मन, चित्त, बुद्धि, अहंकार.

**अंतःप्रकृति.** स्वामी. आमात्य, सुहृत्.

**अतिसार.** प्र० आमातिसार, ज्वरातिसार, पित्तातिसार, रक्तातिसार, श्लेष्मातिसार, सर्वसाधारणातिसार

**अरबी सालें.** इहदे, इसन्ने, सल्लास, अरबा, खम्मससिन, सब्बा, सम्मान, तिस्सा, अशर, अहदअशर, इसन्नेअशर, सल्लास अशर, अरबाअशर, खम्मसअशर, सित्तअशर, सब्बाअशर, सम्मानअशर, तिस्साअशर, अशरीन, सल्लासीन, अरबैन, खमसैन, सित्तैन, सबैन, सम्मानीन, तिस्सैन, मया, मयातैन, सल्लासमया, अरबामया, खम्मसमया, सित्तमया, सब्बामया, सम्मानमया, तिस्सामया, अलफ, अशरअलफ.

**अर्थ.** (४ पुरुषार्थ) धर्म, अर्थ, काम, मोक्ष.

**अलंकार.** प्र० (पुरुषाचे.) अंगठी, कंठी, कडें, कलगी, गेठा, गाठा, गौरीशंकर, चौकडा, जिगा, तुरा, तोडा, दंडपेटी, पवित्रक, पोंहची, भिकबाळी, गोफ, शिरपेंच, सोंगल, लवंग. (स्त्रियांचे) अडकण, अनुवट कंठा, कर्णफूल, कमरपट्टा, काकण, कांची, कांडोळें, काप, कारलें, कुईरी, कुरडूं, केतक, केवडा, खड्गपात्र, खपट, खटूं, गळसरी, गेंद, गुळखी, गोट, गोफ, घोंसबाळी, चंद्रकोर, चंद्रहार, चादणी, चिंचपेटी, चितंग, चितांग, चुटकी, चुडा, छंद, जवा, जुगणी, जोडवें, ठुशी, नकट, तांदळीपोत, तानवड, तायतळें, तिदाणें, तोडा, तोरडी, तोळबंदी, थुशी, दडकडी, नग, नथ, नाग, पाटली, पायजिभी, पैंजण, पोत, पोल्हार, फूल, भेरव, बांगडी, बाजूबंद, बाळी, बिजवरा, बिंदी, बिरी, बुगडी, बुलाक, भांगसळ, मंगळसूत्र, मासोळी, माळ, मुखडा, मूद, राखडी, लफा, वज्रटीक, वांकी, वाळा, विरवळी. विरवधी, शिसफूल, समती, साकळी, सरी, हार.

**अवतार.** (दाहा) मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बुद्ध, कल्की.

**अवस्थात्रय.** बाल्यावस्था, तारुण्यावस्था, वार्धक्यावस्था.

**अवस्थाद्वय.** पूर्वावस्था, उत्तरावस्था अथवा पूर्ववय, उत्तरवय.

**अवस्थाचतुष्टय.** बाल्य, पौगंड, तारुण्य, वार्धक्य.

**अवस्थाभेद.** जागृदवस्था, स्वप्नावस्था, सुषुप्त्यवस्था.

**अव्यक्तराशि.** (बीजगणितांतील) कालक, नीलक, पीतक, लोहितक, मेचक, श्यामलक, कपिलक, पिंगलक, चित्रक, हरितक.

**अशुभचिन्हें. अशुभलक्षणें.** (घोड्यांचीं) असुदाळ, आसनकुहा, उपडगोळा, अ० केरसुणी, एकाळ्या, केराडोळा, एकागी, धसरंड, खुंटेउपाड, निमुट, चक्रावळ, दलभंजन, कुसभोंवरा, कुसगोम, जांघउजाड, रिकावदाल, अदमनसम, खाडकुहा, आसनखोड, जांघभोंवरी, हृदावळ, चोटीभोंवरी, भुजभोंवरी, त्रिकर्ण, दोखुरी, पंचदंती, विकाळनामा, कृष्णतालू, काळमुखी, काखभोंवरा, पंचनखी, रक्तनेत्र, काळीजनी, जानुपर्ण, नाकभंकन, कर्णमूळ, सारभंकन, लेंडावर्त, मंडकमुख, लपुंदंता, खिमावर्त, विषानेत्री, पीतानी, काळटिक्या, सर्पजाति, कोरमुख, चांदणी, शीरगामी, हयभंग, अंगावर्त, पादरपाय, कपिमुख, शिरीनोम, फासोळीस उजव्याटिक्या, ऊर्ध्वमुखी गोम, एकरंगी पाठीवर शुभ्र, हरएक रंगी.

**अष्टगंध.** चंदन, अगरू-हीवेर, देवदार, कोष्टकोलिंजन, कुसुम, शैलज, जटामांसी, मुरगोरोचन.

**अष्टदिक्पाल.** इंद्र, वन्हि, यम, नैर्ऋति, वरूण, मारुत, कुबेर, ईश.

**अष्टदिशा.** पूर्व, आग्नेय, दक्षिण, नैर्ऋति, पश्चिम, वायव्य, उत्तर, ईशान्य.

**अष्टधातु.** सोनें, रूपें, तांबें, कथील, शिसें, पितळ, लोखंड, जिस्त.

**अष्टनायका.** (कृष्णाच्या) रुक्मिणी, जांबवंती, भामा, सत्या, भद्रा, लक्ष्मणा, कालिंदी, मित्रविंदा.

**अष्टविधा प्रकृति.** स्वामी, अमात्य, सुहृत, कोश, राष्ट्र, दुर्ग, बल, प्रजा.

**अष्टप्रधान.** प्रधान, अमात्य, सचीव, मंत्री, प्रतिनिधि, राजाज्ञा, वैद्य, उपाध्याय. २ **श्लोक.** प्रधान अमात्य सचीव मंत्री ॥ डबीर न्यायाधीश न्यायशास्त्री ॥ सेनापती त्यांत असे सुजाण ॥ अष्ट प्रधानीं नृप मुख्य जाणा ॥

**अष्टभाव.** स्तंभ, स्वेद, स्वरभंग रोमांच वेपथु अ० कंप, वैवर्ण, अश्रुपात, प्रलय. **श्लोक.** स्थंभःस्वेदोत्थरोमांचःस्वरभंगोत्थवेपथुः॥ वैवर्णमश्रुप्रलयो अष्टोभावाश्च सात्विकाः ॥

**अष्टभैरव.** पाहा.

**अष्टमहारोग.** वातव्याधि, अश्मरी, कृच्छ, मेह, उदर, भगंदर, अर्श, संग्रहणि.

**अष्टयोगिनी.** मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा, संकटा.

**अष्टवसु.** धर, ध्रुव, सोम, आप्, अनिल, अनल, प्रत्यूष, प्रभास. २ द्रोण, प्राण, ध्रुव, अर्क, अग्नि, दोष, वसु, विभावसु, भागवत.

**अष्टवायन.** हळकुंड, सुपारी, दक्षिणा, खण, सूत, कंकण, धान्य, कांच मणी.

**अष्टविध समाधि.** यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधि.

**अष्टविधा शृंगार नायका.** **अष्ट नायका** पाहा.

**अष्टसिद्धि.** अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व, वशित्व.

**अष्टक्षार.** पलाश– स्नुही– सर्जिका– अपामार्ग– अर्क– तिल–यव– टंकणक्षार. द्या० पळसाचा– निवडुंगाचा– सीजा-- अघाड्याचा, रुईचा– जवाचा तिळाचा– टाकणखार.

**अष्टांगयोग.** **अष्टविध समाधि** पाहा.

**अष्टादश धान्य– पुराण– उपपुराण.** **अठरा** खालीं पाहा.

**अष्टाधिकार.** जलाधिकार, स्थलाधिकार, ग्रामाधिकार, कुल लेखन, ब्रह्मासन, दंड विधि नियोग, पौरोहित्य, ज्योतिषी.

**श्लोक.** जलाधिकारश्च स्थलाधिकारो ग्रामाधिकारः कुललेखनंच ॥ ब्रह्मासन दंडविधेर्नियोग पौरोहितं ज्योतिषनष्टमेवं ॥अर्थ॥ कोळ्यापणा,

पाटिलकी, देशमुखी, महाजनकी, कुळकरण, वत्तकी, धर्माधिकार, उपाधीक अथवा भटपणा, आणि जोशीपणा.

**अष्टाक्षरी मंत्र.** काय करूं कसें करूं.

**अष्टोपद्वीप.** स्वर्णप्रस्थ, चंद्रासुक्र, आवर्तन, रमणक, मंदरहरिण, पांचजन्य, सिंहल, लंका.

**अष्टाविवाह.** ब्राह्म, गांधर्व, राक्षस, दैव, आर्ष, प्राजापत्य, शुल्क, पैशाच.

## आ.

**आनंद.** आत्मानंद, ब्रह्मानंद, विषयानंद, विद्यानंद.

**आन्वीक्षिकी.** (राजनीतीचे प्रकार) त्रयी, वार्त्ता, दंडनीति.

**आभ्यंतर प्रयत्न.** स्पृष्ट, ईषत्स्पृष्ट, विवृत, संवृत.

**आश्रमचतुष्टय.** ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, संन्यास.

**आशौच.** प्र० जननाशौच, ग्रहणाशौच, निर्हरणाशौच, जाताशौच, प्रेताशौच, शवाशौच, स्पर्शाशौच, स्नावाशौच, आनुगमनाशौच, दर्शनाशौच, पाताशौच.

**आसन.** प्र० अगोचरी मुद्रा, कुक्कुटासन, कूर्मासन, खेचरीमुद्रा, गोमुखासन, गोरक्षासन, चाचरीमुद्रा, देहुडा, देहुडाचरण, पद्मासन, भद्रासन, प्रेतासन, भुचरीमुद्रा, मयूरासन, वासन अढी, अलखट-पालखट, अलखंड मालखंड, खुराडेंवा, खुरमाडी, गेठा, खोंगी, घोंण, जेठा, मुडमुशी, मुरकुंडी, वीरासन, आसन मोडी.

## इ.

**इंद्रिय.** (दाहा) त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, श्रोत्रेंद्रिय, रसनेंद्रिय, घ्राणेंद्रिय. यांस ज्ञानेंद्रिय ह्मणतात. वागिंद्रिय, हस्तेंद्रिय, पादेंद्रिय, गुदेंद्रिय, उपस्थेंद्रिय. यांस कर्मेंद्रिय ह्मणतात. ३ ज्ञानेंद्रिय, कर्मेंद्रिय, अंतरिंद्रिय.

## उ.

**उपपुराणें.** लघु कालिका, बृहत्कालिका, पराशर, सिंह, नारद, सनत्कुमार, सौर, दुर्वास, कपिल, मानव, विष्णु धर्मोत्तर, शैवधर्म, माहेश्वर, नंदी, कुमार, औशनस, देवी, वरूण.

**उपप्राण.** नाग, कूर्म, कृकल, धनंजय, देवदत्त.

**उपवेद.** आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, स्थापत्यवेद.

**उपायचतुष्टय.** साम, दान, दंड, भेद.

## ऊ.

**ऊद.** जा० भीमसेनी-जनार्दनी- लोहोबंदी-कवड्या-ऊद.

## ऋ.

**ऋण.** प्र० देवऋण, ऋषिऋण, पितृऋण.

**ऋतु.** (साहा) वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत, शिशिर.

**ऋषिधान्य.** सावे, वरी, देवभात, इ०

## क.

**कंठमाला.** प्र० अक्षमाला, एकदाणें, कंठा, कंठी, कमालखानीहार, गरसळी, गळसरी, गांठलें, चंद्रहार, चापेकळ्यांची माळ, टिका, ठुशी, तुळसीची माळ, नवरत्नहार, नक्षत्रमाला, पुत्रवंतीची माळ, पेंच्याचाहार, पेंडें, मोहन माळ, रुद्राक्ष माळ, सरी, पुतळ्यांचा हार.

**कबुतर.** जा० गलटोप, गिरेबाज, रुमाली, लका, लोटण, कागदी, कबुतर, पारवा, ग्रहकपोत.

**कमल.** जा० काळें कमळ पांढरें कमळ, (पुंडरीक), रक्त कमल, सूर्य कमल, नीलकमल, कुमुद, स्थल कमल.

**करभूषण.** प्र० वाळा, गोट, कंकण, काकण, कंगणी, कडगुलें, पाटली, खिसमती, गजरा, तोडोची पाटली, चटईची वाक, छंद, जवा, जुळी, ठोसला, लगदा, पहुंची, दोरा, हातसर, तोडा, मंदसर, अंगठी, बांगडी, लपेटा.

**कर्णभूषण.** प्र० कर्णफूल, कवळी, काप, कुडा, कुडें, कुडूक, कुडकी, खिडकवाळी, खुंटवाळी, खुरडु, घोंसवाळी, चंद्रवाळी, झुबकेवाळी, झुवा, टोपणवाळी, दूल, तळप, ताटक, तानवड, तोंगलवाळी, पखवाळी, पानवाळी, बुगडी, मासवाळी.

**कर्में.** (पांच) प्र० उत्क्षेपण, अपक्षेपण, आकुंचन, प्रसारण, गमन—वैशेषिकसूत्र.२ नित्य, नैमित्तिक, काम्य.

**कर्मेंद्रियें.** (पांच) पाणि, पाद, वाक्, उपस्थ, वायु.

**कल्पवृक्ष.** पारिभद्र प्र० लिंब, मंदार, [illegible]तानक, संतान, हरिचंदन.

**कवडी.** जा० दहीकवडी, सगुणीकवडी, भवानीकवडी.

**कांड.** कर्मकांड, यज्ञकांड, उपासना का[illegible].

**कारक.** कर्ता, कर्म करण, संप्रदान [illegible]करण, अपादान.

**कारसाई.** बां० इरलें, तवसें, काळभोपळा, कोन, करादे, इरसाल फणसपोळी, ओवसोल, दोरगुंडे, चुडा, वासें, चिवली.

**किराईत.** जा० किराईतफुलकी, काटें किराईत, गांठी किराईत.

**कुग्रह.** मंगल, शनी, राहु, केतु.

**कुंडली** (तील ग्रह). तनु, धन, सहज, सुहृत, सुत, रिपु, जाया मृत्यु, धर्म, कर्म, आय, व्यय.

**कुधान्य.** उडीद, मसूर, लाख, चवळी, बाजरी, कांग.

**केंद्र.** पतनकेंद्र, द्वितीयकेंद्र, शीघ्रकेंद्र, मंदकेंद्र.

## ख.

**खडतरदैवतें.** झसोबा, काळी, नरहरी, वीरभद्र, हैग्रीव.

**खेळ.** म० आव्यापाव्या, अकूटे दुकटें, अप्पाअप्पा, इरगी मिरगी, खांबखांबोळी, खिचकुला, खुंटाफळी, गायचाळा, घारमोर, छापो, डोळेझाकणी, टिपरपाई, दडकुली, हुंबली, हुतुतु, हुंबर, हुरकुंड, भासूमासू, सारिपाट, सोंगव्या, गंजिफा, वाघबकरी, ताबुतफळ, गोंदें, भारण्या, मांडाण, पतंग, मृदंगपाट.

**खोतवेठ.** बा० बरंडीगवत, पानपेंढा, शाकारणी माणूस, रवळी, पाटी, सूप, शिंपली, इवसा, वाढवण, हातरी, तव्या, हातर, नागरजोत, भाऱ्यालाकडें, मानसेबंबें नारळ सुपारी, बाबभाडें, अखेंली तिखेंली.

## ग.

**गंजिफा.** म० चंग काचन, दशावतारी, बाराराशी. (गंजिफाचेरंग) चंग, काचन, बरात, खुमाश, ताज, गुलाम, रूप. (परीभाषा) काटणी, काटणी वाटणी, काडी, केतैपान, घेणी, चंगचिळी, चंगाराणी, देणी, चढतीबाजू, चषा, चाळणी, चोर, छक्का, छक्कापंजा, जबर, तावनेदस्त, तिक्कल, तिका, तिगस्त, नहल्या, नादर, पानबांळी, चैल्या, बुळी, बूज, रंगडाव, रंगलूट, जेरजबरडाव, रंगपानी, सत्या, केल्याचाडाव, अठ्ठया, दाबदुबीचा डाव, राजतल्फ, सर, हरद.

**गण.** (तीन) देवगण, मनुष्यगण, राक्षसगण.

**गवत.** जा० करड, कशेट, कसईकाश, कुंजरा, कुंदें, कुंदा, कुंभा, केणा, कोयेर, गोंडाळ, गोप, गोपुर, चिकटा, चिमचारा, डाग, तांबेट, धापा, धुपा, निरा, पटींग, पंधें, पयाधिर, फुयण, बेर, बेरकी, बोवडा, बोर, भद्रमोथा, माकडशेंडा, माचळ, मारवेल, मुंज, मेथी, मोथा, लव्हा, लोखंडी चार, लोहाळा, शिंपी, शेंडें, साज, हड, कुश, दर्भ, तांबरा, भातणा, करवेल, धव्या, शमनामेर.

**गुण.** (चावीस) रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिमाण, पृथकत्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, गुरुत्व, द्रवत्व, स्नेह, शब्द, बुद्धि, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, संस्कार.

**गुणाकार.** म० धावरा गुणाकार, कोष्टकी गुणाकार, बैठगुणाकार.

गुरांचेरोग. कासेफोड, कुकडें, कुंद, कोणें, पोटरोग, शेंडू, सडी, पायलाग, फासी, पेय, फोडळणें, घरग, लाळ, नरड, सोंडलाग, खुरखुत, पंड्या किचण.

गोटीचेखेळ. अगळगोळ्या, कुरगोळ्या, टोपरगोळ्या. (खेळांतील भाषा) एकलकाजा, कानपुशी, कोंड, कोपरपुसणी, कोपरी.

गोप्य. (कोणत्या गोष्टी ठेवाव्या) आयुष्य, द्रव्य, गृहछिद्र, मंत्र, मैथुन, भेषज, दान, मान, अपमान.

# च.

चंगकांचनी (ख्याबाजू). चंग, कांचन, बरात, खुमाश, ताज गुलाम, रूप, समशेर.

चतुर्वर्ग. धर्म, काम, अर्थ, मोक्ष.

चतुर्विधिजाति. (स्त्रियांच्या) पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी, हस्तिनी.

चतुर्विधअन्न. खाद्य, चोष्य, लेह्य, पेय.

चतुर्विधामुक्ति. सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्य.

चतुरशास्त्री. न्याय, व्याकरण, उत्तरमिमांसा, पूर्वमिमांसा. (हीं ज्यास येतात तो)

चर. (राशि) मेष, कर्क, तुळा, मकर.

चरण. (हस्तनक्षत्राचें कुणबी रीतिप्रमाणें) लोखंडाचा, तांब्याचा, रुप्याचा, सोन्याचा.

चातुराश्रम. आश्रमचतुष्टय. पाहा.

चातुर्जातक. दालचिनी, एलदोडा, पत्री, नागकेशर (यांचें औषध).

चातुर्भद्र. औ० अतिविष, सुंठ, नागरमोथा, गुळवेल.

चातुरवर्ण्य. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र.

चारखाणी. अंडज, जारज, स्वेदज, उद्भिज.

चारवाणी. परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी.

**चारहीठाव.** भात, भाजी, वरण, पोळी.

**चाल.** प्र० (घोड्याची) कुकरचाल, कोंकरचाल, खुदकीचाल, चवडचाल, चौकचाल, टाकण चाल, तुर्कीचाल, दुडकीचाल, धावरी चाल, वाजीचाल, भरधांवचाल, हुदरूकचाल.

**चौकडी.** (युगांची) कृत, त्रेत, द्वापार, कलि.

**चौचाकी पांढर.** देशमुख, देशपांड्या, कुळकरणी, पाटील. २ सुतें, कुंभाराचें चाक, मोटेचें चाक, गाड्याचें चाक. ३ सरकार, पाटील, कुळकरणी, देशपांड्या, देशमुख, मिरासदार, शेतकरी, बलुतेदार.

**चौदा भुवनें.** **सप्तलोक** आणि **सप्तपाताळ** पाहा.

**चौदा रत्नें.** लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्र कामधेनु, ऐरावत, अप्सरा, सप्तमुखीअश्व, विष, हरिधनु, शंख, अमृत.

**चौदा विद्या.** चतुर्वेद, षडंगें, अठरापुराणें, मीमांसा (पूर्व आणि उत्तर), न्याय (गौतमन्याय आणि कणादन्याय) धर्मशास्त्र.

**चौपायीं उगवणें.** चोरी, चाहडी, शिंदळकी, लबाडी (श्वान).

**चौसष्ट कळा.** गीत, वाद्य, नृत्य, नाट्य, आलेख्य, विशेषकच्छेद्य, तंदुलकुसुम बलिप्रकार, पुष्पास्तरण, दशनवसनांगराग, मणिभूमिकाकर्म, शयनरचन, उदकवाद्य, नेपथ्ययोग, उदकघात, चित्रयोग, माल्यग्रथनविकल्प, कर्णपत्रभंग, पानकरसरागासवयोजन, सूचीवानकर्म, सूत्रक्रीडा, सुगंधयुक्ति, वीणाडमरुकवाद्यानी, प्रहेलिकाकूटवाणीज्ञान, प्रतिमाला, दुर्वाचकयोग, पुस्तकवाचन, नाटकाख्यायिकादर्शन, काव्यसमस्यापूरण, पट्टिकावेत्रबाणविकल्प, पुष्पशकटिकानिमित्तज्ञान, यंत्रमातृकाधारणमातृकासंपाठ्य, मानसीकाव्यक्रिया, छलितयोग, तर्ककर्म, तक्षण, वास्तु, रौप्यरत्न परीक्षा, धातुवाद, मणिरागज्ञान, बालक्रीडन, आकरज्ञान, वृक्षायुर्वेदयोग, मेषकुक्कुटलावकयुद्धविधि, शुकसारिकाप्रलापन, उत्साहन, केशमार्जनकौशल, अभिधानकोश, शेखरापीडयोजन, गंधयुक्ति, भूषणयोजन, ऐंद्रजाल, कौचुमारयोग, हस्तलाघव, चित्रशाका पूपभक्षविकारक्रिया, अक्षरमुष्टिकाकथन, देशभाषाज्ञान, छंदोज्ञान, क्रियाविकल्प, वस्त्रगो-

